काष्ठमृत्तिकादि भौतिकात् कुलालादिः पात्रिकाद्युद्भावयति यथा । एवंसंघातादि कृति-विशेषात् त्वष्टैव क्रियंत इतिभावः । तदेवाविश्वकर्मपदं श्रुत्यैव निरुक्तं—विश्वं ( कृत्स्नं-अंत्यावयविपर्यंतं, कर्म ( क्रियाव्यापारोयस्यस ) विश्वकर्मा—इति

अर्थ—उदकापासून पृथ्वी उत्पन्न करण्याकारितां, पूर्वी विश्वकर्मा हा उदकजन्य नानारसात्मक नारायणरूपानें प्रकट होता झाला आणि त्या अनेकरसरूपबीजांपासून पृथ्वीतलाचे ठायीं मनुष्य, पशु, पक्षी, कीटकादि सर्व प्रकारचे जीव उत्पन्न होते झाले. परंतु शरीर निर्माण होण्यास पंचभूतांचें ऐक्य झालें पाहिजे; तस्मात् कोणीतरी सचेतन शिल्पकाराप्रमाणें योजना करणारा असल्यावांचून या पृथिव्यादि अचेतन पंचमहाभूतांचा ऐक्यभाव कसा झाला ? अशा आशंकेच्या निरासार्थ सांगतात कीं, तीं अचेतन पंचमहाभूतें शिल्पाधिपति सचेतन विश्वकर्म्याचे ठायीं प्राप्त होऊन एकत्र होतीं झालीं. त्या ऐक्य झालेल्या पंचभूतसमुदायाचीं नानाप्रकारचीं रूपें धारण करून तो एकच विश्वकर्मा सर्व लोकाचे ठायीं प्रगटलेला आहे " मग पृथ्वींतील सर्व आकारमात्र वस्तु सर्वत्र प्रगट कां नाहींत ? व त्या सर्वांना विश्वकर्माच कां ह्मणत नाहींत, अशी कोणी शंका घेतील, ह्मणून सांगतात कीं, माती, लांकडें, चुना, दगड वगैरेप्रमाणें पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाशादि अचेतन भूतें सजीव मुख्य कर्त्यावांचून एकत्र होण्यास देखील जर समर्थ नाहींत तर त्यांना चित्रविचित्र रूपानें सर्वत्र प्रगट होण्यास शक्ति कोठून असेल ? या कारणास्तव त्या पृथक् अचेतन पंचभूतांना एका ठिकाणीं नांदवून अर्थात् सचेतन करून देवादिक अनंत चित्रविचित्र सर्व जीवसृष्टिरचना करणारा विश्वकर्मा नामक कोणीएक मुख्य ईश्वर या मायिक पांचभौतिक सृष्टीहून निराळा आहे आणि तो विश्व निर्माण करणारा विश्वकर्मा एकच आहे या अर्थी ' जनयन्देवएकः ' अशी श्रुति मागें आलीच आहे. याच प्रमाणें अन्य श्रुतींनींही हाच अभिप्राय दाखविला आहे कीं, चित्रविचित्र उत्तम देवालयादि मंदिराप्रमाणें गर्भापासून शरीरें निर्माण करणारा विश्वकर्माच आहे. त्या श्रुति—त्वष्टारूपाणामीशे, आणखी श्रुति यजुर्वेद अष्टक ३ पन्न ४ अनुवाक ५ च्या पहिल्या पन्नाशीमध्यें पदें ३७–४३ पर्यंत त्वष्टारूपाणामधिपतिः । आणखी ऋग्वेद अष्टक ८ वें यांतील ८ वे अध्यायांत ४२ वे वर्गांत मंत्र १ ला यांत त्वष्टारूपाणिपिंशतु इत्यादि अनेक श्रुतींचा सिद्धांत असा कीं, त्वष्टा ह्मणजे विश्वकर्मा हा सर्व अवयवादि स्वरूपांचा ( देहांचा अधिपति सत्ताधारी ) आहे ह्मणून तो विश्वकर्मा गर्भांतील प्राण्यांचीं नेत्रादिक अवयवस्वरूपें विभजतु ह्मणजे सुटक खुलीं दिसतील अशीं करो, असा ' त्वष्टारूपाणि पिंशतु, या श्रुति पदांचा अर्थ आहे. याच अभिप्रायाचीं आणखी वाक्यें ऋग्वेद अष्टक २ अध्याय ५ व-९ मंत्र ४ था—" त्वष्टारूपाणिहिप्रभुः " तसेंच आणखी यजुर्वेद अष्टक २ पन्न ४

१ येथें विश्वकर्मणः या पंचमी विभक्तीचा अर्थ ' ल्यपलोपेकर्मण्याधिकरणेच, या वार्तिकानें ल्यप् ( य ) प्रत्ययांत अव्ययाचा लोप समजून त्या ठिकाणा द्वितीया व सप्तमीप्रमाणें होतो.

अनुवाक ६ पन्नाशी १ पदें ३९–४२ पर्यंत यामध्यें आणखी यजुर्वेद अष्टक २ पन्न ६ अनुवाक १० पन्नाशी २ री मध्यें " **त्वष्टारूपाणिविकरोति** " आणखी यजुर्वेद अष्टक ६ पन्न ६ अनुवाक ६ पन्नाशी २ पदें २०–२६ पर्यंत **त्वष्टावैरेतसः सिक्तस्यरूपाणि विकरोति०** आणि अरण प्रश्न ३ अनुवाक ११ दशक २ पाद १० मध्यें श्रुति—**त्वष्टारँरूपाणि विकुर्वंतंविपाश्चिं** " इत्यादि अनेक श्रुतींचा सिद्धांत विद्यारण्य स्वामींच्या आणि सायणाचार्यांच्या भाष्यावरून स्पष्ट आहे कीं विश्वकर्मा हा देवादि पिपीलिकेपर्यंत सर्व जीवजंतूंचीं शरीरें निर्माण करतो तस्मात् त्या सर्वेश्वर विश्वकर्म्याच्या विराटशरीररूप आदिगर्भाचे ठायीं हीं संपूर्ण अनंत जीवांचीं शरीरें निर्माण झालीं आहेत, ह्मणजे विश्वकर्मा हा महापुरुष सर्व सृष्टीचें उत्पत्तिस्थान आहे. जसें माती, लांकूड इत्यादिकांनीं युक्त असें चाक वगैरे साधनांहींकरून कुंभकार घटादिक भांडीं निर्माण करितो तसें पंचभूतांचे एकीकरण ( सर्वसृष्टि ) वगैरे त्वष्टा नाम विश्वकर्माच निर्माण करितो, असा भावार्थ आहे; ह्मणून विश्वकर्म नामाची व्याख्या " यजुर्वेद अष्टक ७ पन्न ५ अनुवाक ४ पन्नाशी १ पदें ४१—४७ " **वैश्वकर्मणोगृह्यतेविश्वान्येवतेनकर्माणि** " या श्रुतीनें वर्णिली आहे कीं, विश्व—सर्व ( ब्रम्हपासून अणुरेणूपर्यंत ) ज्याचीं कर्में म्हणजे क्रिया व्यापार व्यापून आहे तो विश्वकर्मा होय. यावरून अरण प्रश्न १० अनुवाक १० दशक १—" **अणोरणीयान्महतोमहीयान्**० या श्रुतीनेंही विश्वकर्माच वर्णिला आहे.

## अरण प्र० ३ अनु० १३ दशक १ ला.

**वेदाहमेतंपुरुषंमहांतं आदित्यवर्णंतमसः परस्तात् । सर्वाणिरूपाणिविचिंत्यधीरो । नामानिकृत्वाभिवदन्यदास्ते ॥ २ ॥ धातापुरस्ताद्यमुदाजहार । शक्रःप्रविद्वान्प्रदिशश्चतस्रः । तमेवविद्वानमृतइहभवति । नान्यःपंथाविद्यतेऽयनाय ॥ ३ ॥**

भाष्य—कश्चिदृषिः शिष्यान्प्रतिवदति । अहं एतं ( विश्वकर्माणं ) **आदित्य वर्णं महांतं पुरुषं** ( अंतरहितंमहापुरुषं ) **वेद** ( जानामि ) **तमसः** ( आवरणात्तु—बाह्यतोविलक्षणादांतराज्ञानात् ) **परस्तात्** ( दूरे ) स्थितिमितिशेषः । तमसा आवृतत्वादेवान्ये एनं न जानंतीतिभावः । **धीरः** ( सोऽयंमहान् पुरुषः धियं प्रेरयतीति ) **सर्वाणिरूपाणिविचिंत्य** (रचयित्वा ) तेषां रूपाणि । **नामानि** च **कृत्वा** । तानि । **यत्** ( यतः ) **अभिवदन् आस्ते** । अतः स एव महान् पुरुषो ज्ञातव्य इत्यर्थः । **धातेति**—**धाता**

---

१ हिरण्यगर्भः समवर्ततताग्रेभूतस्यजातः पतिरेक आसीत्० ॥ ऋग्वेद अ. ८ अ. ७ व ३

[ चतुर्मुखः ] यं पुरस्तात् ( पूर्वं ) **उदाजहार**[ ज्ञातत्वेन-उक्तवान् ] **शक्रः**( इंद्रोपि ) **यं प्रविद्वान्** ( सम्यक् जानन् ) **प्रदिशश्चतस्रः** ( चतुर्दिगवस्थिताश्चसर्वे--ऊर्ध्वमध्याधः समंततःस्थिताः ) यं जानंति । तं एवं ( भूतानां भौतिकानांतत्तद्रूपाणांचस्रष्टाऽयंमेवेत्येवं रूपेण ) **यो विद्वान्** । **स इह** जीव इत्येवाह । **अमृतो** ( मुक्तो ) **भवति अन्यःपंथा** ( मार्गः ) **अयनाय** ( स्वरूपप्राप्तये ) **न विद्यते** इति भाष्यकारः ।

**प्राकृत अर्थ**—या मंत्रांत कोणी एक ऋषि शिष्यांना सांगतो, मी, या विश्वकर्मया स तेजोमय अनंत गुण गंभीर महान् असें जाणतों. **"आणि ऋग्वेद अष्टक ६ अध्याय ७ वर्ग १ मंत्र १ विश्वकर्माविश्वदेवोमहाँअसि** " अशीं श्रुतिवाक्येंही-आहेत; परंतु इतर अज्ञान लोक अज्ञानरूप अंधकारांत पडल्यामुळें, या विश्वकर्मयास जाणत नाहींत. तो सर्वांचे बुद्धीस प्रेरणा करणारा ( चित्तचालक ) आहे सर्व प्रकारचीं देवादिक शरीरें निर्माण करितो आणि त्या प्रत्येकाचीं नांवें ही पृथक् पृथक् ठेविलीं आहेत व ते ते देव ऋष्यादि आपापल्या नामोच्चार पूर्वक त्या विश्वकर्मयास वंदन करितात; ह्मणून तोच महान् पुरुष ( ईश्वर ) जाणावा. पहा ब्रह्मदेवसुद्धां पूर्वीं विश्वकर्मयानें मला आत्मज्ञान दिलें, म्हणून त्या जगद्गुरु विश्वकर्मयाची स्तुति करिता झाला. तसाच इंद्र आणि इतर अष्टदिक्पालादिक सर्व देव त्या विश्वकर्मयास महात्मा असें जाणून स्तवन करिते झाले; म्हणून त्या भूत भौतिकादि चराचर प्राणिमात्रांस उत्पन्न करणारा विश्वकर्मा यास जो जाणून भजेल तो प्राणी अमर [ जीवन्मुक्त ] होईल. तस्मात् या विश्वकर्म उपासनेवांचून ब्रम्हस्वरूपप्राप्तीस दुसरा मार्ग नाहीं. कारण विश्वकर्मा हा देवादि सर्व प्रजेचें उत्पत्तिस्थान आणि पूज्य दैवत आहे; म्हणून त्यास वेदादिग्रंथांमध्यें प्रजापति म्हटलें आहे. तसेंच त्याचे वंशज जे विश्वब्रह्माख्य शिल्पीश तेही सर्वत्र अग्रपूज्य आहेत हें पुढील मंत्रावरून पहा.

**अरण प्रश्न २ अनु १२ दशक १**

**प्रजापतिश्चरतिगर्भे अंतः । अजायमानोबहुधाविजायते ।**

**तस्यधीराःपरिजानंतियोनिं । मरीचीनांपदमिच्छंतिवेधसः ॥ ३ ॥**

**भाष्य**—**प्रजापतिर्विश्वकर्मामनोगंधर्व इतिश्रुतेः** । प्रकरणवशाच्चात्रप्रजापतिपदेन विश्वकर्मैवगृह्यते । सः । **गर्भे** ( गर्भस्थस्यदेहिनोनिमित्तं )**अंतः** ( मातुरुदरे ) **चराति** ( संचरति ) ततश्चसगर्भः । **अजायमानः** ( स्वयं अपरिणममाणः ) अनेनचांतश्चरतानिमित्तभूतेन । **बहुधा** ( बहुप्रकारेण अनेक सकल शिराद्याकारेण) **विजायते** ( विविधरूपेणचजायते ) काष्ठतुल्योगर्भः । अनेनैवाकृति विशेषंप्राप्नोतीत्यर्थः । इति भाष्यकारोक्तिः ॥ **तस्य** ( विश्वकर्मणः ) **धीराः** ( ध्यान शीला—योगिनो ) **योनिं** ( निवासस्थानं ) विष्णोरिवशालिग्रामं । **परिजानंति** ( साकल्येन विंदंति )योनि शब्दस्यस्थानवाचित्वं " **योनिष्टइंद्रसदनेअकारी** तिमंत्रेदृष्टं ।तत्रविश्वकर्मणः स्थानभूताः

शिल्पिनः । इति वास्तुतंत्रेरुद्रयामलेसपादलक्ष्यांतेप्रसिद्धम् । "**मृदाकाष्ठेनलोहेनपाषाणैःपारदेनवा ॥ रचयंतिविचित्राणिरूपाणिविविधानिये ॥ दिव्यान्भौमानांतरिक्षान्भावान्संदर्शयंति ये ॥ पंचालास्तेसदापूज्याःप्रतिमाविश्वकर्मणः ॥ अचेतनंचेतनकार्यकारिकुर्वंतियंत्रप्रतिमादिकंये ॥ स्वयंवहंवोशिशुमारचक्रंरथान्विमानानिचखेचराणि ॥ ३ ॥ पंचांगुलांस्तानिहवर्णलोपात्पंचालसंज्ञाश्चतुरांश्चहस्तान्॥ पंचप्रभेदान्-भुवनस्यभर्तुःपूजापदानीतिविदुःपुराणाः ॥ ४ ॥ गृहादिनिर्माणविधौततस्तानाद्यंतमध्येषुविनायकांश्च ॥ संपूजयेदन्नधनादिभिश्चसौवर्णरूपैश्चतदायुधैश्च ॥५॥** तस्माद्विष्णोः शालिग्राममिव विश्वकर्मणः प्रतिमाभूतान् शिल्पिवरान्विश्वकर्मदृष्टचाजानीयात् । तेनच विश्वकर्मसायुज्यप्राप्तिरितिभावः । कथंतर्हिब्राह्मणादीन्विहाय शिल्पिनःपूजनीया इत्याशंक्याहमरीचीनामिति--**वेधसः** [ ब्रह्मणस्तुल्यत्वाद्वेधःशब्देनब्राह्मणाउच्यंते । तेसर्वे **मरीचीनां** ( अंशूनां ) पदमिव । **पदं** ( संचारस्थानं ) **इच्छंति** । पूजयितुमितिशेषः। तथाहि मत्रांतरं—"**ज्योतिर्मयस्यसूर्यस्यभास्वरतरमंडलमेवाधिष्ठानंस्वरूपं । भूभूधरादिकंतुतत्किरणानांसंचारस्थानं । एवंसर्वशिल्पकर्तुर्विश्वकर्मणःशिल्पिवराएवमुख्यंस्वरूपं । शिल्पित्वसाधर्म्यात् । सहिजगद्धिंबांशिल्पिएतेतूतदंतर्वर्तिकतिपयपदार्थविषयाःशिल्पवंतइति** । अथभाष्यकारः--ब्राह्मणदेवतादस्तुत्वष्ठुरंशभूतानांकलानांसंचारपदानि । अतः येकर्मारान्विहायवास्तुकर्माणि ब्राह्मणानेवपूजयंतितेसूर्यमंडलंविहाय भूप्रदेशस्थं तत्प्रभामंडलं प्रणमंतीतितेषामज्ञत्वमुक्तं भवति । तस्माद्ब्राह्मणाद्यपेक्षयापिशिल्पिनएवपूज्या इति भावः

**प्राकृत अर्थ**—"**यजुर्वेद अष्टक ३। पन्न ४ अनु ७ पन्नाशी १ पदें ४७–५१** १**प्रजापतितिर्विश्वकर्मामनो गंधर्वस्तस्यंऋक्सामान्यप्सरसोवन्हयः**॥ याजवर भाष्य—प्रजानांपालकः । ( प्रजापतिः ) विश्वकर्मकरणीयं यस्यासौ ( विश्वकर्मा) तादृशो मनोनामकः । कश्चिद्गंधर्वः तस्यचऋक्सामदेवता भार्याः ताश्चसौंदर्यंवहंतीतिवन्हयइत्युच्यंते ।" या श्रुतीवरून व आणखी श्रुति "**तैतिरीयब्राह्मण अष्टक२ "प्रजापतिर्विश्वकर्मा । तस्यमनोदेवंयज्ञेनराध्यासं** । या श्रुतीवरून आणि ऋग्वेदऐतरयब्राह्मणपंचिका ४ खंड २२ । अध्याय ३ **विश्वकर्माभवत्प्रजापतिः प्रजाः सृष्ट्वाविश्वकर्माभवत्संवत्सरो विश्वकर्मैंद्रमेवतदात्मानंप्रजापतिंसंवत्सरं विश्वकर्माणमान्पुवंतींद्रएवतदात्मानिप्रजापतौसंवत्सरे विश्वकर्मण्यंततः प्रतितिष्ठंतिप्रतितिष्ठंतियएवंवेदयएवंवेद २२** इत्यादि अनेक श्रुतीवरून आणि विश्वकर्मसंबंधीं श्रुतीच्या चालू प्रकरणावरून,प्रजापति शब्दानें येथें विश्वकर्मा घ्यावा तो विश्वकर्मा गर्भांतील प्राण्यांकरितां मातेच्या उदरांत संचार करितो, नंतर तो गर्भाचा मांसमय गोळा स्वतः जन्म पावण्यास समर्थ नाहीं; परंतु परमात्मरूपानें आंत संचार करणाऱ्या या विश्वकर्म्याच्या सत्तेनें तो गर्भ सर्व संधिशिरादि आं-

१ ही श्रुति हिरण्यकेशी शाखेच्या पुंसवनाख्य संस्काराच्या प्रयोगांत राष्ट्रभृत् यासंज्ञेनें पडलेली आहे.

तील बाहेरील अवयवांनीं आकारयुक्त होऊन नानाविधरूपानें उपजतो ( लांकडाप्रमाणें अचेतन गर्भ विश्वकर्मयाचे प्रभावेंकरून जन्म पावतात ) त्या विश्वकर्मयाचें निवासस्थान ह्मणजे "विष्णूचें निवासस्थान जसें शालिग्राम तसें" तद्वंशीय शिल्पी आहेत, असें योगिजन पुरतेपणीं जाणतात ' येथें योनि ह्मणजे निवासस्थान असें ह्मटलें आहे यास प्रमाण—ऋग्वेद अष्टक ५ अ. ३ वर्ग ८ मंत्र १ योनिष्टइंद्रसदने अकारि०—या मंत्राचें भाष्य पहावें" तस्मात् विश्वकर्मा याचें स्थान त्याचीच संतति आहे. असें रुद्रयामल वास्तुतंत्रांतही स्पष्ट आहे, तें असें कीं, माती, लांकूड, नवलोह ( सर्व धातु ) दगड, पारा इत्यादि पदार्थांचीं निरनिराळ्या चमत्कारिक वस्तूंचीं स्वरूपें जे निर्माण करितात आणि स्वर्ग, भूमि, आकाश यांतील अद्भुत देखावे जे हुबेहुब दाखवितात ते पंचाल प्रत्यक्ष विश्वकर्ममूर्तीच असल्यामुळें सदासर्वत्र पूज्य आहेत; विश्वकर्मसंततीयास पंचाल हें नांव असण्याचें कारण त्याच रुद्रयामलांतर्गत वास्तुतंत्रांतच कांहींसें पुढें सांगितलें आहे तें अचेतन म्हणजे निर्जीव असून जीवंत प्राण्याप्रमाणें कार्य करणारीं यंत्रें. तसेंच पाहिल्याबरोबर अभीष्टद श्रीलक्ष्मीनारायणादि देवमूर्तींच्या स्वरूपांचा अनुभव देऊन नारायणाचे ठायीं सप्रेम भक्ति उत्पन्न करणाऱ्या, पाषाण, धातु इत्यादिकांच्या मूर्ति, अलंकार, देवालयें वगैरे तसेंच सूर्यचंद्रादि ग्रह अश्विन्यादि नक्षत्रें ज्याच्या आधारानें रात्रंदिवस भ्रमण करितात असें स्वतः चालणारें शिशुमार चक्र, इंद्रादिकांचे रथ, आयुधें, अंतरिक्षीं चालणारीं विमानें, इत्यादि जे निर्माण करितात त्या विश्वकर्मसंततीयांना स्वर्गी ' पंचांगुल, अशी संज्ञा आहे. त्यासच इह म्हणजे या मृत्युलोकांचे ठायीं ( पंचांगुल ) या नामांतील तिसऱ्या ( गु ) या अक्षराचा लोप करून ( पंचाल ) असें म्हणतात. हे शिल्पकर्मांत परम चतुर असल्यामुळें विराटपुरुषाच्या हाताप्रमाणें असून, जगत्पालक नारायणाचे पांच स्वरूपभेद असल्यामुळें पूज्य आहेत असें प्राचीन जाणतात. "या ठिकाणीं पूर्वोक्त ( तस्यधीराः परिजानंतियोनिं ) या श्रुतीचें अनुसंधान करावें. देवालयें, घरें, मूर्तिप्रतिष्ठा, ग्रामरचना, तलाव, वापी, कूप, बाग, यज्ञमंडप, कुंड विवाहांत वधूचे अलंकार व कुलदेवप्रतिमा सुवर्णादि धातुमय घटिकापात्र, इत्यादि निर्माण करते वेळीं, या पंचाल लोकांप्रत वास्तुपूजांगत्वेंकरून त्या त्या कार्यांचे आरंभीं, मध्यें आणि अंतीं ( काम तयार झाल्यावर ) त्यांचीं आयुधें [ तासणी, टांकी, ऐरण, अग्निकुंड ( वागीश्वरी ) वगैरे ] हीं सर्व यजमानानें यथाशक्ति सुवर्णाचीं करून त्या आयुधांसहित ज्यांना विनायक अशी संज्ञा आहे अशा पांच पंचालांची अन्न, वस्त्र, द्रव्य दक्षिणादिकांहीं करून पूजा करावी तेणेंकरून केलेलीं कामें म्हणजे; ( घरें संततिसंपत्तींनीं चिरकालयुक्त देवालयांत दैवतें सर्वकामप्रद, सर्वोपद्रवरहितगांवें तलावादि जलदेवतेच्या पीडेविरहित, अलंकार अखंड सौभाग्यवर्धक; सुमुहूर्तसाधणारी घटिका ) अशीं सफल होतात. पंचाल अग्रपूज्य आहेत म्हणूनच त्यांना गणपतिसंबंधीं विनायक या नांवाची संज्ञा आहे आणि रूढींतही सोनार सुतार इत्यादि नामधारी पंचालांस नाईक असें म्हणण्याची चाल आहे. असो—जसे विष्णु स्वरूपीं शालिग्राम, तसे विश्वकर्मस्वरूपी विश्वब्रह्माख्य शिल्पी [ प्रत्यक्ष विश्वकर्म मूर्तीच जाणावेत, तेणेंकरून

विश्वकर्मसायुज्यपदाची प्राप्ति होते, हा भावार्थ. आतां ब्राह्मणादिक सोडून शिल्पीच अवश्य कसे पूजावेत? अशी शंका असेल तर सांगतात—जे वेधस म्हणजे ब्रह्मदेवसंततीय ब्राह्मण वास्तुप्रमुख यज्ञादिकर्मांचे ठायीं आरंभीं पुजूं इच्छितात ते जसे सूर्याचीं किरणें ज्या पर्वत, काष्ठ पाषाणादिकांवर संचार करितात म्हणजे पडतात, त्या त्या पर्वत, काष्ठ पाषाणादि, किरणांच्या संचार स्थानांची पूजा करूं इच्छितात असें जाणावें. याविषयीं " ज्योतिर्मयस्य " असा एक मंत्र आहे त्याचाही अभिप्राय हाच आहे कीं, दैदीप्यमान सूर्याचे तेजोमय किरणांनीं युक्त बिंब [ मंडल ] मुख्य स्वरूप आहे, आणि भूमि, पर्वतादि हे त्याच्या कलांचीं संचारस्थानें आहेत. हें जसें, तसेंच सर्व शिल्पकर्मकरणाऱ्या विश्वकर्मयाचे जगदात्मक तद्वंशीय पांच शिल्पी हेंच मुख्यस्वरूप आहे. या जगद्बिंबांतील चारी खाणी इत्यादि जे कित्येक चराचर पदार्थ आहेत, ते या जगद्बिंबरूप शिल्पींच्या शिल्पकलांचीं संचार स्थानें आहेत. ह्मणजे त्यांच्या शिल्पक्रियेनें झालीं आहेत; ह्मणून उक्त श्रुतीचा मथितार्थ भाष्यकार सांगतो कीं, देव ब्राह्मणादिक सर्व जगत् विश्वकर्मस्वरूप जे मनु मय, त्वष्टा, शिल्पी, तक्षा या विश्वब्रह्माख्य शिल्पींच्या शिल्पकलांचीं संचार स्थानें आहेत, या कारणास्तव कर्मार ह्मणजे कुंड, मंडप, यज्ञपात्रें, देवमूर्ति, देवालयें, प्रासाद, मंदिरें, शस्त्रास्त्रें, अलंकारादिक निर्माण कर्में हींच आहेत परंपरा वृत्ति ज्यांची, ते कर्मार नामक विश्वब्रह्माख्य शिल्पी यांना सोडून वास्तुप्रमुख यज्ञादि कर्मांचे ठायीं ब्राह्मणासच जे पूजितात, ते मुख्य सूर्य मंडल सोडून भूमीवरील काष्ठपाषाणादिकांवर पडलेल्या उन्हाची पूजा करितात असें होतें; अर्थात् हा त्यांचा अज्ञानपणा होय. यांत अभिप्राय हाच कीं, वैधसाख्य ब्राह्मणापेक्षां विश्वब्रह्माख्य शिल्पी पूज्य आहेत.

आतां या पंचाल शिल्पींचे पूजेची वहिवाट अद्यापि थोडी थोडी राहिल्याची दिसत आहे ह्मणजे गृहादिकांचा पाया भरतेवळीं पाथरवटाची दक्षिणा, प्रासादादि तयार झाल्यावर वास्तूचे वेळीं पागोटें वगैरेच्या द्वारें सुताराची, विवाहांत देवप्रतिमा नेतेवेळीं सोनाराची [ शिधावगैरेचेद्वारें ] , इत्यादि निमित्तानें पूजाकरण्यासारखी वहिवाट राहिल्याचें दिसत आहे परंतु त्या पूजा नव्हेत, कारण पूजा या शद्बास कारण भूत जो पूजक लोकांच्या मनांतील पूज्य बुद्धीचा उद्देश तो सांप्रत काळीं नसल्यामुळें पूर्वोक्त सांगितलेल्या पंचालांच्या सांप्रतपूजा ( लाथेनें पाणी दाखविल्या सारख्या ) शोभतात. ह्मणून हल्लीं आपल्या देशांतील वगैरे मंदिरादिकांच्या वास्तुशांति प्रतिष्ठादिक अविधीनें होतात ह्मटलें तरी चालेल, कारण ज्या कर्मास ज्या देवता शास्त्रानें उक्त त्या सोडून अन्यदेवता त्या ठिकाणीं पूजणें, या शास्त्रविरुद्ध कर्तव्येकरून त्या गृहादि निर्माण केलेल्या वस्तूपासून जें वास्तविक सौख्य मिळावें तें न मिळून यजमानाचा नाश होतो, हें मी आपले पदरचें बोलत नाहीं याविषयीं श्रुतीच आहे. श्रुति- " यथादेवत अग्निराधीयते । नदेवताभ्य आवृश्च्यतेवसीयान्भवति । " भाष्य- 'यस्यपुरुषस्य याभिमानिनीदेवतातामनतिक्रम्याधानं तस्यपुरुषस्याधानं यथादेवतमाधान-

मित्युच्यते। तदतिक्रमे सतिदेवताद्रोहोदरिद्रश्चभवति। अनतिक्रमेतु देवताप्रसादोधनसंपतिश्च भवति।' प्राकृत अर्थ ( ही श्रुति तैत्तिरीय ब्राह्मण अष्टक १ प्रश्न १ अनु. ४ दशक ९ आधानाधिकारनिरूपणांतील आहे ) ज्या पुरुषाची जी अभिमानिनी देवता असेल तिला अनुसरून जें आधान [ अग्निहोत्रादि श्रौतकर्म ] तें त्या पुरुषाचें यथादेवत आधान म्हणावें आणि ती विहित देवता सोडून कर्म केलें असतां देवतेचा कोप होऊन त्यापासून दरिद्र प्राप्त होतें. आणि आपल्या यथादेवतेला अनुसेवन करून चाललें असतां देवतांची प्रसन्नता होऊन धनसंपत्ति प्राप्त होते. तसेंच वास्तुकर्मांत पंचाल पूजन विहित होय कारण पृथ्वीमध्यें यज्ञयागादिक पवित्र वैदिक कर्में किंवा कोणतींही सर्व कर्में, शिल्पविद्येवांचून निर्मितां येत नाहींत आणि जेथें शिल्प तेथें वास्तुपूजा नित्य आहे, कारण वास्तुशांतीचे प्रयोगाचे संकल्पांत [ अद्ये० ममनूतनगृहाश्रित सुवर्ण रजत ताम्र त्रपु सीस काष्ट लोह पाषाणाष्टशिल्पामेदिनीदोषपरिहारार्थं। शिल्पशास्त्रोक्तन्यूनाधिकमानजनितविरुद्धफलनिवृत्यर्थं। अस्मिन गृहे चिरकाल निवाससिद्धयर्थं ] इत्यादि शिल्पसंबंधीं उच्चारच आहेत. जेथें वास्तुपूजा आहे तेथें पंचालांची अग्रपूजा नित्य आहे. ह्मणून ब्राह्मणांनीं ही आपल्या गृहादिकांचे वास्तूंत पंचालांची पूजा कर्तव्य आहे अशीं श्रुतीचीं आणि रुद्रयामलादि ग्रंथांचीं वचनें आहेत. रुद्रयामल, ब्रम्हयामल इत्यादि ग्रंथ मंत्रशास्त्राचे केवळ सागर आहेत त्यांत रुद्रयामल हा ग्रंथ मोठा, याची श्लोक संख्या एकंदर सव्वालक्ष आहे अनेक देवतेचीं स्तोत्रें कवचें देवीचीं शंकराचीं, गणपतीचीं इत्यादि कित्येक सहस्रनामें, मंत्र, तंत्र प्रयोग या रुद्रायामलांतून प्रगट झालेले आहेत. या रुद्रयामलाप्रमाणें आणखी प्रत्यक्ष प्रमाण **वास्तुशास्त्रे विश्वकर्मनारदसंवादे प्रासादाधिकारे** ' अध्याह ८ वा, **प्रतिष्ठाविधौ**—श्लोक ३७ पासून **सुदिनेचमुहूर्तेचलग्नेसौम्ययुतेऽक्षये ॥ अभिषेके प्रतिष्ठायां प्रासादादिषुचोच्यते** ३८इत्यादि श्लोकांत मूर्ति प्रतिष्ठेस मुहूर्त वगैरे सांगून पुढें **प्रासादाग्रईशानोत्तराग्रमंडपंशुभम्**० इत्यादि ४३ श्लोकापर्यंत मंडप करण्याचें शास्त्रप्रमाण सांगून पुढें **हस्तमात्रंभवेत्कुंडंमेखलायोनिसंयुतं। आगमैर्वेदमंत्रैश्चहोमंकुर्याद्विधानतः ॥** इत्यादि ७९ श्लोकांपर्यंत—अयुत १०,००० होमास १ हस्तकुंड, अर्धलक्ष होमास २ हस्त, लक्ष ( १,००००० ) आहुतिहोमास ३ हस्त, १० लक्ष होमास ४ हात, तीस लक्ष होमास ५ हात, अर्धकोटीस ६ हात, ऐशीलक्ष होमास ७ हात, कोटि होमास ८ अष्टहस्तकुंड इत्यादि कुंडांचीं प्रमाणें सांगून पुढें वेदि करण्याचीं प्रमाणें सांगितलीं आहेत पुढें सर्वतोभद्रमंडल ब्रम्हतोभद्र, विष्णुतोभद्र, लिंगतोभद्र, गौरीतिलक भद्र मंडल, सूर्यतोभद्र इत्यादि ज्या देवतामूर्तींची प्रतिष्ठा करणें असेल त्याप्रमाणें भद्रमंडलें सांगून पुढें तडागप्रतिष्ठेस अर्धचंद्राकार, वापीकूपवास्तूंस धनुष्याकार स्वस्तिकाकार, जलदेवतापूजेस योन्याकार अशीं मंडलें सांगून वास्तुदेवता न्यासविधि आणि वेदीवर कलश, कमंडलु, पंखा, दर्पण, नवरत्नें, सर्वौषधि, सप्तधान्य वगैरे द्रव्यें ठेवून प्रथम वस्त्र अलंकारादि भूषणांनीं नूतन मूर्तीची पूजा करावी तें पूजेचें साहित्य शिल्पीस द्यावें

( **देवस्याभरणंपूजावस्त्रालंकारभूषणैः । तत्सर्वंशिल्पिनेदेयमिति श्लोक ६४** )
असें वचन आहे. पुढें वास्तुपूजा ग्रहपूजा होम, बलिदान इत्यादि सांगून सर्व देवालयांत पायऱ्यापासून शिखरापर्यंत व्याप्त असलेल्या वास्तुपुरुषाच्या ( विश्वकर्माच्या ) कल्पित पादादि अवयवाचे ठायीं म्हणजे उंबरठ्यांत वृक्षदेवता, पायऱ्यांत वाराहदेवता, खांबांत पर्वतदेवता, कांसवाचे ठायीं गंगा, शिखराचे पांच शृंगाचे ठायीं ब्रम्हा, विष्णु, रुद्र, ईश्वर, आणि सदाशिव. ऊर्ध्व पंचशिखांचे ( कळसांचे ) ठायीं सद्योजातावामदेवादि पंच शिवमूर्ति, असा न्यास सविस्तर आणखीही आहे इत्यादि विधि झाल्यावर पुढें शिल्पिपूजन— —**इत्यनंतरतः कुर्यात्सूत्रधारस्यपूजनं । वस्त्रालंकारभूषादिवित्तगोदानवाहनैः ॥ ८१ ॥ अन्येषांशिल्पिनांपूजाकर्तव्याकर्मकारिणां ॥ स्वाधिकारानुसारेण वस्त्रतांबूलभोजनैः ॥ ८२ ॥ काष्ठपाषाणनिर्माणे कोणेयंत्रेचमंदिरे ॥ भुंजंतस्तेचभुंक्तेऽसौशंकरस्त्रिदशैः सह ॥ ८३ ॥ पुण्यंप्रासादजंस्वामीप्रार्थयेसूत्रधारतः ॥ सूत्रधारोवदेत्स्वामिन् अक्षयंभवितातव ॥ ८४ ॥ इतिसूत्रधारपूजा॥अथाचार्यादिपूजा ॥ आचार्यपूजनंकृत्वा वस्त्रस्वर्णधनैः सह॥ दानंदद्याद्विजातिभ्यो दानंवैदुर्बलेषुच ॥ ८५ ॥ सर्वेषांधनमाधारः प्राणिनांजीवनंपरम् ॥ वित्तदत्तेप्रतुष्यंतिमानुषाः पितरः सुराः ॥ ८६ ॥ इतिप्रतिष्ठाविधिः ॥ अथवास्तुविधिः ॥**

**अर्थ**—महोत्साहपूर्वक शास्त्रोक्तविधीनें मूर्तिप्रतिष्ठापन केल्यावर सूत्रधाराची ( शिल्पशास्त्रपारंगत मुख्य पंचाल शिल्पाचार्याची ) वस्त्र, गंध, पुष्पहार, अलंकार, भोजन, इत्यादि उपचारांनीं पूजा करून त्यास द्रव्यदक्षिणा, गोप्रदान[1], आणि अश्वादि वाहनें विधिपूर्वक दान करून सूत्रधाराच्या आज्ञेप्रमाणें हाताखालीं काम करणाऱ्या इतर पंचालांची यथाधिकाराप्रमाणें वस्त्रगंधादि उपचारांनीं पूजा करून भोजनादि दानांनीं त्यांस संतुष्ट करावें. कारण वास्तावादि यज्ञाचे ठायीं पंचालशिल्पी ब्राह्मणास अन्नदानें करून तृप्त केलें असतां सर्व देवासहित शंकर तृप्त होतात. याप्रमाणें पंचाल ब्राह्मण संतर्पण झाल्यावर **पुण्यंप्रसादजंस्वामी प्रार्थयेत्सूत्रधारतः** यजमानानें प्रासादादिक निर्माण केल्यापासून प्राप्त होणारें श्रेय मुख्य शिल्पीपासून संपादन करण्याच्या हेतूनें त्यास प्रार्थना करावी. नंतर सूत्रधारानें ( शिल्पिमुख्यानें ) " **अक्षयंभवितातव** ,, असा आशिर्वाद करून प्रासादादि श्रेयोरूप नारिकेलफल यजमानास द्यावें. याप्रमाणें प्रासाद, मूर्ति इत्यादि पवित्र शिल्पकर्म करणाऱ्या पंचालांची पूजा केल्यावर होम केलेल्या आचार्यादिक ब्राह्मणांची पूजा करून त्यांना गोप्रदानादिक दानें व दक्षिणा द्यावी. तसेंच सर्व दुर्बळ, अनाथ, व्यंग वगैरे प्राणिमात्रांस द्रव्य व अन्नवस्त्रादि अवश्य देऊन संतुष्ट करावें. कारण सर्व प्राणिमात्रांस द्रव्याचा आधार आहे. द्रव्यदानें करून देव, पितर, आणि मनुष्य तृप्त होतात. याप्रमाणें मूर्तिप्रतिष्ठा व प्रासादवास्तूचें विधान यथार्थ वर्णन केलें. याचप्रमाणें वास्तु-

१ जर पंचाल शिल्पीस गोप्रदानादिक करण्यास सांगितलें आहे तर ब्राह्मण आहेत हें उघड आहे.

सार ग्रंथामध्येंही श्लोक १४७ प्रवेशेवास्तुदिक्पालग्रहदैंवतपूजनम् ॥ आचार्यशिल्पिविप्रेंद्रान्भोजयेत्स्वजनादिकम् ॥ अर्थ—गृहप्रवेशाविषयीं वास्तुपुरुष, अष्टदिक्पाल, नवग्रह, इत्यादि देवतांचें पूजन करून आचार्य आणि पंचालशिल्पी यांना भोजन देऊन नंतर स्वजनादिकांस भोजन करवावें. याचप्रमाणें मत्स्यपुराणामध्येंही—मत्स्यपुराण अध्याय २६४ अथशिल्पिपूजनम्—

तस्याप्युत्तरतःकुर्यात्स्नानमंडपमुत्तमम् ॥ तदर्धेनत्रिभागेनचतुर्भागेनवापुनः ॥ २६ ॥ आनीयलिंगमर्चांवाशिल्पिनःपूजयेद्बुधः ॥ वस्त्राभरणरत्नैश्चयेऽपितत्परिचारिकः ॥ २७ ॥ शिल्पीप्रार्थना—क्षमध्वमितिताम्ब्रूयाद्यजमानेप्यतः परम् ॥ देवंप्रस्तरणेकृत्वानेत्रज्योतिः प्रकल्पयेत् ॥ २८ ॥ अथर्त्विक्पूजा—विप्राणांचार्चनंकुर्याद्द्याच्छक्त्याचदक्षिणाम् ॥ गामहींकनकंचैवस्थापकायनिवेदयेत् ॥ २९ ॥

**अर्थ**—त्या मुख्य मंडपाच्या उत्तरेस देवांचा स्नानमंडप करावा, तो त्या मुख्य मंडपाचा अर्धाभाग, तृतीयांश किंवा चतुर्थांश अशाप्रमाणानें करून तेथें लिंग अथवा मूर्ति शिल्पकाराकडून आणवून वस्त्रें, आभरणें व रत्नें यांनीं तें पंचाल शिल्पिजन व त्यांचे परिचारक पूजावेत. नंतर त्या शिल्पिजनांची प्रार्थना करावी. हे पंचालशिल्पिजनहो, आपल्या पूजेंत न्यूनाधिक असल्यास क्षमा करा, आणि संतुष्ट व्हा; असें म्हणून देव मूर्ति शिळेवर ठेवून तिचा नेत्रसंस्कार करावा, नंतर आचार्यादि सर्व ऋत्विजांची पूजा करून व यथाशक्ति दक्षिणा देऊन आचार्यास गो, भू आणि सुवर्ण हीं दानें करावींत. याचप्रमाणें देवालयें कशीं बांधावींत, मूर्तिप्रतिष्ठापान कशा कराव्या याविषयीं "पद्मसंहिता" म्हणून एक प्राचीन ग्रंथ आहे; त्यांमध्येंही मूर्तिप्रतिष्ठादि कर्मांत विश्वकर्म संततीय रथकाराशिल्पींचें पूजन, अगोदर करण्यास सांगितलें आहे. एवंप्रासाद, गृह, कुंड, मंडपाची वास्तु सशास्त्र (पंचालशिल्पिपूजनादि यथोक्तविधीनें) केली असतां, सर्व फल प्राप्ति होते; यास प्रमाण वास्तुशास्त्रें अध्याय.२२ श्लोक ७७

यःपूजयेद्वास्तुमनेनयुक्तंनतस्यदुखंभवतीहकिंचित् ॥
जीवत्यसौवर्षशतंसुखेनस्वर्गेनरस्तिष्ठतिकल्पमेकम् ॥

**अर्थ**—या पंचालशिल्पिपूजनादि विधीनें युक्त, जो गृहादिकांची वास्तु करितो त्यास या लोकीं किमपि दुःख न होतां सर्व सुखानें युक्त पूर्ण शंभर वर्षें वांचतो आणि एककल्पपर्यंत स्वर्गामध्यें राहतो.

विधी सोडून अज्ञानपणानें वास्तु करणारास अनर्थ प्राप्ति होते. यास प्रमाण मत्स्य पु० अ० २५१ "अज्ञानात्तुकृतो यत्नस्तवाहारो भविष्यति ॥ यज्ञोत्सवादौच बलिस्तवाहारोभविष्यति ॥ १८ ॥ अकरणेपि—आहारोवैस्त्वदेवांतेनूनमास्मिन्भविष्यति वास्तुपूजामकुर्वाणास्तवाहारोभविष्यति" ॥ १९ ॥" यावरून विधियुक्त वास्तुशांतीची सांगता पंचालशिल्पी पूजनापासून प्राप्त होते. अर्थात् पंचाल

जर शूद्र असते, तर वास्त्वादियज्ञकर्मांत आचार्यांच्या पूर्वी पंचालपूजाविधि कधींच नसता. ज्यापेक्षां आचार्यत्वानें पंचाल पूजन सांगितलें आहे त्यापेक्षां पंचाल ब्राह्मण आहेत हें उघड आहे. आचार्यांपूर्वी पंचाल शिल्पी पूजन असण्याचें कारण—" **तस्य धीराः परिजानंतियोनिं** " या श्रुतीनें पूर्वी सांगितलें आहे कीं, "**तस्माद्विष्णोःशालिग्रामइवाविश्वकर्मप्रतिमाभूतान् शिल्पिवरान्विश्वकर्मदृष्ट्याजानीयात्**" जसें विष्णूचें साक्षात् स्वरूप शालिग्राम आहेत, तसेंच वास्तुपुरुष जो विश्वकर्मा त्याचें साक्षात्स्वरूप तद्वंशीय पंचाल शिल्पी आहेत; म्हणून पंचाल पूजन म्हणजे वास्तुपुजनांगभूत एक कर्मच समजावें. जसें ब्राह्मण भोजन द्वारा देव तृप्त होतात, तसेंच "**एवं सर्वे शिल्पकर्तु विश्वकर्मणः शिल्पिवराएव मुख्यं स्वरूपं**"याश्रुतीवरून पंचालशिल्पिब्राह्मण भोजनद्वारा वास्तुपुरुषस्थ ब्रह्मादि देवता आणि अखिल देवतात्माविश्वकर्मा तृप्त होतो. पंचालही भूदेव आहेत.

प्रश्न—वास्त्वादि यज्ञांत पंचाल शिल्पींना अग्रपूज्यत्व जर ब्राह्मणत्वानें आहे, तर पंचाल हा शब्द ब्राह्मण जातिबोधक आहे. अशा विषयीं प्रमाण काय ?

उत्तर—ब्राह्मण जातीचा बोध आर्षेय गोत्रावरून होतो. तर पंचाल हा शब्द ब्रह्मर्षिगोत्राच्या नडादि गणांत पठित असल्यामुळें पंचाल या शब्दावरून ब्राह्मण जातीचाच बोध होतो. नडादि गणांतील ब्रह्मर्षिगोत्रबोधक नड चर शलंक मित्र द्वीप काश्यप कृष्ण रणौ शकट जलंधर अध्वर पंचाल[1] चमसिन् ब्राह्मण बदर अश्वल ब्रह्मदत्त उदुंबर इत्यादि ८१ शब्द आहेत हे सर्व ऋषिब्राह्मणवर्ण प्रवर्तकच आहेत. या-**नडादिभ्यः फक्** ४।१।९९ या सूत्रांनीं गोत्रप्रत्यय होऊन नाडायण,चारायण, शालंकायन, मैत्रायण, द्वैपायन, कार्ष्णायन, राणायन, शाकटायण, जालंधरायण, पांचालायण, चामासिनायण, ब्राह्मणायन, बादरायण, आश्वलायन, इत्यादि आर्षेयगोत्रें ब्राह्मण जातीचींच असल्यामुळें पंचविधशिल्पकर्ते पंचाल हे ब्राह्मणच आहेत. म्हणूनच " **रचयंति विचित्राणिरूपाणि विविधानिये ॥ पंचालास्तेसदापूज्याः प्रतिमाविश्वकर्मणः**" यावरून त्यांस पूज्यत्व आहे. कारण पूज्यत्व हें शूद्रास असत नाहीं. पहा म्हटलें आहे. **श्लोक**—

**अनाचारा द्विजाः पूज्यानचशूद्राजितेंद्रियाः ॥**
**अभक्ष्यभक्षकाः गावः कोलाः सुमतयोनच ॥ १ ॥**

**अर्थ**—ब्राह्मण अनाचारी असला तरी पूज्यच आहे.शूद्र जितेंद्रिय जरी असला तरी पूज्य नाहीं. जशा गाई विष्ठा भक्षण जरी करितात तरी त्याच पूज्य आहेत. अर्थात् जर आचारभ्रष्ट ब्राह्मणास देखील पूज्यत्व आहे तर आचारशील पंचाल हे ब्राह्मण

---

१ पंचाल हें नांव विश्वकर्मऋषीस आहे. पंचभिः स्वर्णादिशिल्पैः अलतिविश्वंसपंचालः नामविश्वकर्मादेवशिल्पी । अल् भूषणादौ ॥ पंचालास्तेसदापूज्याः प्रतिमाविश्वकर्मणः इतिस्मृतेः पंचालाः विश्वकर्मकूलोत्पन्नाः ब्राह्मणजातीयाः शिल्पीविशेषाइत्यर्थः ॥ पांचालायनाएवपंचालः फगित्यस्यगोत्राप्रत्ययस्यबहुत्वेलुकृत्यात् ॥

आहेत, 'यांस पूज्यत्व' हें स्पष्ट प्रमाण असून त्यांच्या परंपरागत उपनयनादि वेदोक्त ब्रह्मकर्मोपभोगावरूनही प्रत्यक्ष दिसत आहे.

**प्रश्न**—विश्वकर्मा जर परमेश्वर आहे. तर त्याला शिल्पकर्माचा संबंध काय म्हणून? तसेंच शूद्र कर्माप्रमाणें शिल्पकर्मावर उपजीवन करणाऱ्या विश्वकर्मसंततीय पंचाल स्वर्णकारादिकांस ब्राह्मणत्व, अग्रपूज्यत्व असणें; हें मोठें आश्चर्य आहे! फार तर काय? परंतु तेच स्वतः "आम्ही पंचाल सोनार आहों" असें सांगतात. आणि अमरकोशांत तर संकर रथकार या संज्ञेनें सोनार सुतार वगैरे कारागीर लोकांची गणना शूद्रवर्गांत केली आहे याचें कारण काय?

**उत्तर**—अमरकोशांत जे सोनारवगैरे शूद्रवर्गांत वर्णिले आहेत, ते केवळ संकर रथकारादिक म्हणजे शूद्रजातीचे आहेत; हें त्यांचीं नामें शूद्रवर्गांत असल्यावरूनच उघड आहे. त्यांचा संबंध विश्वकर्मसंततीय पंचाल स्वर्णकारादिकांकडेस अगदीं नाहीं. कारण पंचाल शब्दाचा उल्लेख अमरकोशांतील शूद्रवर्गांत कोठेंच केला नाहीं. याचें कारण पंचाल हा शब्द सर्व ग्रंथांत ब्राह्मणवाची आणि देशवाची मात्र आढळतो. शूद्रवाची कोठेंच नाहीं. म्हणून पंचाल हे ब्राह्मण आहेत. आतां सांप्रतकाळीं त्यांचें शिल्पकर्म शूद्रादिलोक करूं लागल्यामुळें, सामान्यतः सर्व प्रकारचें शिल्पकर्मही शूद्रवृत्तीच आहे, असें लोकांस भासत आहे. परंतु विचारदृष्टीनें पाहिलें असतां देवमूर्तिरथादि देवांचें शिल्पकर्म आणि यज्ञादि यज्ञशालादि ब्राह्मणांचें शिल्पकर्म हीं पवित्र शिल्पकर्मे ब्राह्मणांनींच कर्तव्य आहेत. शूद्रहस्तनिर्मित उपयोगी नाहींत.पहा निघंटादि. प्राचीन कोश ५६ आहेत; तथापि अगोदरच इतकें लांब जावयास नको. त्याच अमरकोशाचे प्रथमकांडांत " **मोक्षेधीर्ज्ञानमन्यत्रविज्ञानंशिल्पशास्त्रयोः** ॥ यांतील भावार्थ—ज्ञान म्हणजे मोक्षाची बुद्धि, आणि विज्ञान म्हणजे शिल्प आणि शास्त्र म्हणून ज्ञान म्हणजे वेदावरून एकाद्या देवतेचें अगर पदार्थाचें स्वरूप समजणें अर्थात् ज्ञान ह्मणजे वेदविद्या होय. आणि त्या वेदोक्त देवादि वस्तूचें स्वरूप प्रत्यक्ष दाखविण्याचें जें कर्म तें विज्ञान ह्मणजे शिल्पविद्या होय. याविषयीं भागवत द्वितयिस्कंध **शब्दस्यहिब्राह्मणएषपंथा॰** या शब्दाचा भावार्थ मोक्ष सुखाकरितां वैदिक लोक वेदाध्ययनाख्य ज्ञान संपादन कारितात; याविषयीं एक उदाहरण, श्रुति "**चत्वारिश्रृंगात्रयोऽस्य पादा॰**" या श्रुतीनें चार श्रृंगें, तीन पाय, दोन मुखें, सात हात वगैरे अग्नीच्या मूर्तीचें ज्ञान झालें. आतां तीच अग्नीची मूर्ती शिल्पानें प्रत्यक्ष तयार करून दाखविणें ह्मणजे साक्षात् रूपाचा अनुभव, याचें नांव विज्ञान होय. तस्मात् दर्शनपूजनें करून चतुर्विध मुक्ति देणाऱ्या अशा वेदोक्त शिवविष्ण्वादि मूर्तींचीं स्वरूपें ज्याविद्येनें प्रत्यक्ष दाखवितां येतात ती शिल्पविद्या वेदविद्येचें भांवंड आहे,

---

१ नडादिभ्यः फक् या सूत्रावरून पंचालस्यगोत्रापत्यंपांचालायनः ( ब्रह्मर्षिः ) पतंजली महाभाष्यांत- पंचालस्य ब्राम्हणस्य आपत्यंपांचालिः [ इञ् ] २ तुकाब्रह्मानंदोक्ति-ब्रह्मविद्येचें भावंड ॥ शिल्पविद्या अत्यंत गूढ ॥ '

म्हणूनच शिल्पास वेद अशी संज्ञा आहे. यास प्रमाण भागवत स्कंध ३ अध्याय १२ आयुर्वेदं धनुर्वेदं गांधर्वं वेदमात्मनः ॥ स्थापत्यंचासृजद्वेदं क्रमात्पूर्वादिभिर्मुखैः ॥ स्थापत्यंविश्वकर्मशास्त्रम् ॥ इति श्रीधरस्वामी ॥ अर्थ—ब्रह्मदेवाच्या पूर्वमुखापासून आयुर्वेद, दक्षिणमुखापासून धनुर्वेद, पश्चिम मुखापासून गांधर्ववेद, आणि उत्तर मुखापासून स्थापत्यवेद ( शिल्पवेद ) असे वेद उत्पन्न झाले. हे मुख्य वेदांगभूत असल्यामुळें यांस उपवेद असें ह्मणतात. त्यांचे मुख्य वेद सांगतो. प्रमाण चरणव्यूहे, चतुर्थखंडे आयुर्वेदश्चिकित्साशास्त्रं । ऋग्वेदस्योपवेदः ॥ १ ॥ धनुर्वेदोयुद्धशास्त्रं यजुर्वेदस्योपवेदः ॥ २ ॥ गांधर्ववेदः संगीतशास्त्रं सामवेद स्योपवेदः ॥ ३ ॥ स्थापत्यवेदो विश्वकर्मादिशिल्पिशास्त्रं अथर्ववेदस्योपवेदः[1] ॥ ४ ॥ या चरणव्यूह व्याख्येवरून स्पष्ट आहे कीं, स्थापत्यवेद ह्मणजे विश्वकर्मादि शिल्पिशास्त्र. विश्वकर्मादिक जे शिल्पी अर्थात् विश्वकर्म ऋषिसंततीय ब्राह्मण जातीय जे पंचाल शिल्पी त्यांचे देवसंबंधी, यज्ञकर्मसंबंधीं जें पवित्र शिल्पशास्त्र त्यास वेद अशी जर संज्ञा आहे, तर तें शूद्रकर्म नव्हे ! ब्रह्मकर्म आहे. यास आणखी प्रमाण—निघंटकोश अध्याय २ " अपइत्यारभ्य क्रतुः । धीः । शिल्पं । इति षड्विंशतिकर्मनामानि" ह्मणजे ' अप या शब्दापासून शिल्पं या शब्दापर्यंत २६ नामें यज्ञादि ब्रह्मकर्मास आहेत. तसेंच आणखी ' शिल्पंतुवैक्रियायोगे ' या विश्वकोशावरून आणि दुसऱ्याही कित्येक ठिकाणीं यज्ञादिकर्मास शिल्पकर्म म्हटलें आहे. कारण शिल्पविद्येचा प्रवर्तक जो विश्वकर्मा प्रजापति यानें आपल्या शिल्पक्रिया शक्तीनेंच यज्ञयागादि क्रिया उत्पन्न केल्या आहेत. या विषयीं प्रमाण—द्वारका निर्माण करण्याकारितां श्रीकृष्णांनीं आणि दिव्यशिवमंदिर निर्मिण्यास्तव शंकरांनीं परशिवविश्वकर्मा याची ध्यानावाहनादि षोडशोपचारांनीं पूजा करून स्तोत्र केले आहे तें;—

पद्मपुराणे भूखंडे स्कं० विश्वकर्ममाहात्म्ये अ० २५ श्लोक ७–१६ विश्वकर्मस्तोत्रेकृष्णरुद्रावूचतुः ॥ यशंतंतुमयंशिक्यंशिक्येब्रह्मांडमद्भुतम् ॥ निहितंउभयंयेनविश्वकर्मासपातुनः ॥ ७ ॥ दिविभुव्युदरेकाष्ठपाषाणादौचयोविभुः ॥ चतुर्धान्यभजज्ज्योतिश्चतुर्विधफलाप्तये ॥ ८ ॥ वातरज्जूघृतं दिव्यंज्योतिः कालस्यकारणम् ॥ बिभ्रमीत्यनिशंयेनप्रवर्ततेक्रतुक्रियाः ॥ ॥ ९ ॥ भौममाकरजंज्योतिः स्वर्णाद्यः पारदादिकम् ॥ नानाकार्यकरं लोकेभूषायुधरसायनैः ॥ १० ॥ योसौवैश्वानरोवन्हिःप्राणिनांदेहमाश्रितः ॥ चतुर्विधंपचत्यन्नंतदुदर्यमहत्स्मृतम् ॥ ११ ॥ हठाघातेनकाष्ठादेर्यस्तेजोजायतेमहत् ॥ ज्वलनोनामतल्लोकेश्रौतंस्मार्तंहविः पचेत् ॥ १२ ॥ यः कालेदक्षिणांचैवप्रजामामं हवींषिच ॥ धारयन्यः परशिवोविश्वकर्मासपातुनः ॥ १३ ॥ मथत्यनेकरसतां मधुरैकरसंजलम् ॥ यस्तत्तद्बीज-

१ " अर्थ वेदो ,, असाही पाठ भेद आहे.

योगेन महाशिल्पीसपातुनः ॥ १४ ॥ भौमान्यनेकरूपाणियस्याशिल्पा-निमानवाः ॥ उपजीवंतितंविश्वंविश्वकर्माणमीमहि ॥ १५ ॥ दिक्कालौ सूर्य चंद्राभ्यांगोविप्राभ्यांहविर्मनून् ॥ निर्मायानिर्ममे यज्ञंतस्मैयज्ञात्मने-नमः ॥ १६ ॥ दिविभुव्यंतरिक्षेवापातालेवापिसर्वशः ॥ यत्किंचिच्छिल्पिनांशिल्पंतत्प्रवर्तकतेनमः ॥ १७ ॥

अर्थ—विश्वकर्मे यांनीं सूत्रमय रचिलेल्या पृथिवीरूप शिक्यामध्यें सूक्ष्म देहरूप पिंडांड आणि ब्रह्मांड हीं दोन्हीं एक ठिकाणीं गुंतवून, त्या सर्व सूक्ष्म तत्वात्मक चराचरास स्थूलत्व दिलें आहे. तो विश्वकर्मा चतुर्विध फल प्राप्तीस्तव यज्ञकर्म निर्माण करण्याच्या हेतूनें तेजस्तत्वाचे चार भाग करिता झाला. ते चार भाग त्यानें आकाश-भूमि, उदर, आणि काष्ठपाषाणादि या चार ठिकाणीं ठेविले आहेत. आकाशांत ठेवि, लेलें तेज वायुरूपरज्जूंत गुंतवून त्यापासून नेहमीं फिरणारा आणि जेणेंकरून यज्ञ क्रिया चालू होतात, असा काळ प्रदर्शक सूर्य उत्पन्न केला त्यास दिव्य तेज म्हण-तात. भूमींत ठेविलेल्या तेजापासून सुवर्ण, लोह, पारा, इत्यादि धातु उत्पन्न केल्या; त्या धातु अलंकार, शस्त्रें, रसायनें वगैरे द्रव्यास कारणीभूत होऊन त्यांचा सृष्टीमध्यें मोठा उपयोग होत आहे. या सुवर्णाख्य भौम तेजाचा मुख्यत्वेंकरून उपयोग यज्ञादि संबंधीं दक्षिणेकडे केला आहे. प्राण्यांच्या पोटांत ठेविलेल्या तेजाच्या तिसऱ्या भा-गास उदर्य ( जठराग्नि ) तेज म्हणतात. तें चतुर्विध अन्नाचें पाचन करितें. म्हणून हें तेज यज्ञकर्त्या यजमानाचे रक्षणार्थ जाणावें. काष्ठादिकांत ठेविलेलें तेज काष्ठांच्या अथवा पाषाणांच्या परस्पर संघर्षणानें अथवा दृढ आघातानें उत्पन्न होतें, तें ज्वलन ( अग्नि ) या नांवानें प्रसिद्ध आहे. तो अग्नि यज्ञसंबंधीं वगैरे हविष्यान्नें पचवितो. याप्रमाणें काल, दक्षिणा, यजमान आणि हविष्यान्नें हीं चार प्रकारचीं सामग्री यज्ञा-करितां ज्यानें उत्पन्न केली तो पराशिव विश्वकर्मा आमचें रक्षण करो. तसेंच एका मधुर उदकापासून नानाप्रकारच्या बीज संयोगानें आंबा, निंब, जांभळ, चिंच इत्यादि अनेक वृक्षांचे ठायीं, आंबट, कडू, गोड, तुरट, तिखट वगैरे अनेक रस, जो उत्पन्न करितो, तो महाशिल्पी विश्वकर्मा आमचें रक्षण करो. पृथ्वीमध्यें नानाप्रकारचीं चमत्कारिक दृश्य पदार्थांचीं रूपें उत्पन्न करून, ज्याच्या शिल्पविद्येवर सर्व मानव आपली उपजीविका करितात, त्या विश्वरूप विश्वकर्म्यास वंदन करितों. सूर्यापासून यज्ञार्थ पवित्र देश, चंद्रापासून शुभतिथीनक्षत्रादिकाल, गाईपासून दूध, दहीं, तूप इत्यादि हवन द्रव्यें आणि ब्राह्मणापासून वेद मंत्र, हीं सर्व याज्ञिक सामग्री निर्माण करून जो यज्ञयागादि क्रिया निर्माण करिता झाला, त्या यज्ञमूर्ती विश्वकर्म्यास माझा नमस्कार आहे. स्वर्ग, पृथ्वी, आकाश, पाताळ, इत्यादि ठिकाणी यच्चयावत् जीं जीं शिल्पींचीं शिल्पें त्यांचा जो प्रवर्तक विश्वकर्मा त्यास माझा नमस्कार असो.

या श्रीकृष्णकृत स्तोत्रावरून स्पष्ट समजेल कीं, शिल्पकर्म आणि यज्ञकर्म एकरूपच आहेत. कारण, शिल्पक्रियाशक्तीच्यायोगेंकरून विश्वकर्म्यांनींच यज्ञविधि उत्पन्न केला आहे. म्हणून पवित्र शिल्पकर्मवृत्ति ब्राह्मण धर्मविहित आहे.

शिल्पकर्मकौशल्याच्या महत्वाविषयीं आणखी प्रमाणें—**तैत्तिरीय ब्राह्मण अ० २ प्रपाठक ७ । अनुवाक १५ दशक २ श्रुति**—

**येभिःशिल्पैःपप्रथानामदृंहत् ॥ येभिर्द्यामभ्यपिंशत्प्रजापतिः ॥**

**येभिर्वाचंविश्वरूपा ँ समव्ययत् ॥ तेनेममग्नइहवर्चसासमङ्धि ॥**

**भाष्य**–प्रजापतिः । **येभिः शिल्पैः** ( यैः कर्मकौशलैः ) **पप्रथानां** ( विस्तारयुक्तामिमांपृथिवीं ) **अदृंहत्** ( दृढीकृतवान् ) तथा येभिः कर्मकौशलैः । **द्यां**(द्युलोकं) **अभ्यापिंशत्** ( अभितश्चंद्रतारकादिभिःसुरूपामकरोत् ) तथा **येभिः** (यैःकर्मकौशलैः) **वाचं** ( इमामुच्चार्यमाणां ) **विश्वरूपां** ( नानापदार्थवाचकत्वेनानेकरूपां ) **समव्ययत्** ( सम्यक्संपादितवान् ) **तेन** ( तथाविध कौशलजालेन ) **वर्चसा** ( तद्योगेनबलेनच ) **हे अग्ने इमं** ( राजानं ) इह ( इहलोके ) **समङ्धि** ( समृद्धं ) कुरु तथाविध सामर्थ्येन संयोजयेत्यर्थः )

**प्रा० अर्थ**—ही श्रुति राज्याभिषेकसंबंधीं आहे. राजाला सिंहासनावर बसवून आचार्य अभिषेक करतेवेळीं, त्यास सर्वसमृद्धि व्हावी म्हणून सर्व देवांना प्रार्थित होत्साते विश्वकर्मयाची प्रार्थना करून अभिषेक करितात. "प्रजापतिर्विश्वकर्मामनोगंधर्वः" या श्रुतीवरून आणि "**भारत आदिपर्व अध्याय ६५ विश्वकर्मामहाभगस्तस्यांजज्ञे प्रजापतिः ॥ कर्त्ताशिल्पसहस्राणांत्रिदशाणांचवर्धकी ॥**" इत्यादि वचनावरून आणि शिल्पप्रशंसा प्रकरणावरून प्रजापति नामविश्वकर्मा आपल्या ज्या शिल्पकर्मकौशल्यांनीं अतिशय विस्तारयुक्त पृथ्वीप्रत दृढ( अचल ) करिता झाला. तसेंच आणखी ज्या शिल्पकर्मकौशल्याच्यायोगेंकरून चंद्रप्रभृतिग्रहनक्षत्रादिकांनीं आकाशाला भासमंतात् व्याप्त करून सुशोभित करिता झाला. तसेंच ज्या शिल्पकौशलांनीं या अस्मादिकांच्या उच्चार्यमाण वाचेला नानाप्रकारक पदार्थांच्या वाचकपणानें व शृंगारवीरादि अनेक रसांनीं स्वलंकृत करून ठेविता झाला. त्या आपल्या शिल्पकर्मकौशल्यसमूहानें विश्वकर्मा नामक ब्रह्मर्षि या भूमंडलाचे ठायीं या राजासही समृद्ध करो म्हणजे त्यास तसें सामर्थ्य येवो. यावरून सृष्टि निर्माण करणें, हें शिल्पच होय. आणखी प्रमाण—

**तै० ब्रा० अष्टक २ । प्रश्न ७ । अ० १५ । द० ३ । ऋ० ७**

**यत्तेशिल्पंकश्यपरोचनावत्॥ इंद्रियावत्पुष्कलंचित्रभानु॥यस्मिन्सूर्याअर्पिताःसप्तसाकम्॥ तस्मिन्राजानमधिविश्रयेमम्॥**

**भाष्य**—हे कश्यपाख्य प्रजापते ते (तव) **यत्शिल्पं** (कर्मकौशलम्) **रोचनावत्** ( दीप्तिमत् ) इंद्रियावत् ( वीर्योपेतम् ) **पुष्कलम्** ( संपूर्णम् ) **चित्रभानु** ( विचित्रत्वेन भासमानं, किंच यस्मिन् त्वदीयेशिल्पे सप्तसंख्याका; **सूर्याःसाकं अर्पिताः** ( **सहावस्थिताःतेच** सप्तसूर्या अरण्यकांडे आरोगोभ्राजइत्यनुवाके प्रपंचिताः ॥ तस्मिन् शिल्पे **इमं राजानं अधिश्रय** ( अधिकत्वेन आश्रितंकुरु )

अर्थ—ऋ० ऐतरेयब्राह्मण पं० ८ " **एतेनहवामहाभिषेकेणकश्यपोविश्वकर्माणंभौवनमभिषिषेच०** " आणि " **कश्यपोविश्वकर्माचविश्वलोकपितामहौ ॥ इतिस्कांदे नागरखंडे ॥** " जसें विश्वकर्म्यानें जगत् उत्पन्न केलें, तशी कश्यपानेंही पुष्कळ प्रजा उत्पन्न केली आहे, म्हणून आणि विश्वकर्माचीच विभूति कश्यप असल्यामुळें विश्वकर्माप्रमाणें कश्यपानेंही आपल्या शिल्पकौशल्यासून प्रजा उत्पन्न केली ह्मणून, आचार्य कश्यपाची प्रार्थना करीत आहें. हे कश्यपाख्य प्रजापते, तुझे जें शिल्पकर्मकौशल्य तेंही दीप्तिमत् पराक्रमयुक्त परिपूर्णरूप बिचित्रपणानें भासत आहे; कारण ज्या तुझ्या शिल्पाच्याठायीं सातही सूर्य स्थापित झाले आहेत ( ते सप्तसूर्य अरण्यकांडामध्यें " **आरोगो भ्राज्ज०** " या अनुवाकांत सांगितलें आहेत. ) तसें त्या शिल्पाचे ठायीं या राजासही श्रेष्ठत्वेंकरून स्थापित कर.

या पूर्वोक्त श्रुतीवरून वाचकांनीं विचार करावा कीं, जर विश्वकर्मा, कश्यप, आंगिरस इत्यादि ब्रह्मर्षि शिल्पकर्माचे अधिपति आहेत तर तें देवसंबंधीं शिल्पकर्म ब्राह्मणाचीच वृत्ति आहे.

प्रश्न—पूर्वोक्त श्रुतींतील शिल्प त्रैलोक्यसृष्टि संबंधीं पवित्र असल्यामुळें तें विश्वकर्मादि ऋषींनीं केलें तें योग्यच आहे, परंतु वरील श्रुतिप्रोक्त शिल्पांत सोन्याचे अलंकार करणें अगर काष्ठादि शिल्पें ब्राह्मणांनीं केलीं आहेत अगर करावींत, असें प्रमाण दाखवा ?

उत्तर—"**पृथिव्यां यानि तीर्थानि तानि तीर्थानि सागरे** " यावरून स्पष्ट आहे कीं, जसें एका समुद्रामध्यें सर्व तीर्थांचा समावेश होतो, तसेंच विश्वकर्मादिकृत सर्व सृष्टि रूप एक महाशिल्प वर्णिलें. त्यांत सुवर्णादि सर्व शिल्पांचा समावेश होत आहे. तथापि शंका असेल तर मृत्, काष्ठ सुवर्णादि शिल्पेंहीं पवित्र असून ब्राह्मणांचींच अवश्य कर्तव्य कर्में आहेत. याविषयीं पुढील श्रुत्यादि प्रमाणें पहा—

**श्रुति ऋ० ऐतरेयब्राह्मण पंचिका ६ खंड २७ अध्याय ५**

**शिल्पानि शंसंतिदेवशिल्पान्येतेषांवैशिल्पानामनुकृतीहशिल्पमधिगम्यते हस्ती कंसो वासोहिरण्यमश्वतरीरथशिल्पंशिल्पंहास्मिन्नाधिगम्यते य एवंवेद यदेवशिलपानी २ आत्मसंस्कृतिर्वा व शिल्पानि छंदोमयंवा एतैर्यजमान आत्मानंसंस्कुरुते ॥**

अर्थ—सर्व शिल्पामध्यें देवशिल्पें पवित्र आहेत. तीं—हस्तिदंत, कांस्य, दुकूलवस्त्रें, सुवर्णादि धातु रत्नें इत्यादि यज्ञसंबंधीं, देव संबंधीं अलंकार, मूर्ति, रथशिल्प (रथ करणें यांत हस्तिदंत, काष्ठ, अष्ट धातूचें ग्रहण होतें ) शस्त्रास्त्रें हीं देवशिल्पें या पृथ्वीचे ठायीं श्रेष्ठत्वें पवित्र आहेत. या सांगितलेल्या शिल्पकृतीच्या वस्तु देहादिकांस सुशोभन पवित्र करितात, ह्मणून हीं शिल्पें वेदस्वरूप होत, कारण सर्व प्रकारच्या यज्ञादि कर्मांमध्यें यज्ञकर्ते यजमान या शिल्पकृतीच्या अलंकारादि वस्तु आपआपल्या सांप्रदायाप्रमाणें धारण करून अगोदर आपला देह पवित्र करितात, नंतर यज्ञादि कर्मास प्रवृत्त होता-

त. तस्मात् अशाप्रकारचें यज्ञविहित स्वकर्मरूप शिल्पकर्म, परंपरा करणाऱ्या विश्वब्रह्मवंशस्थलोकांस जरी पंचाल स्वर्णकार ह्मणतात, तथापि त्यांच्या ब्राह्मणत्वाचा लोप होणार नाहीं. कारण सुवर्णादि शिल्पकर्म आणि यज्ञकर्म या दोन्ही वृत्ति ब्राह्मणाच्याच आहेत इतकेंच नव्हें तर देवयज्ञाच्या करणसामग्रीप्रमाणें सुवर्णादि देव शिल्पाचीही करण सामग्री पवित्र आहे, ह्मणून पंचाल शिल्पी हा नित्य अग्निहोत्री आहे, पहा, देवयज्ञास आयतन नामक अग्निकुंड, देवशिल्पास वागीश्वरी नामक अग्निकुंड, देवयज्ञास समिधा, गोमयगोळ देवशिल्पास खादिर अंगार, गोमय यज्ञास वेणु धमनि, शिल्पास ताम्रधमनी, यज्ञास मृगचर्म व्यजन, देवशिल्पास वैणव व्यजन, यज्ञास प्रणीतापात्र, शिल्पास पाषाणमय प्रणीताकृति जलपात्र, यज्ञास घृतादि हविष्यें, शिल्पास सुवर्णादि धातूंचीं हविष्यें, यज्ञास उलूखल मुसलें, ( उखळ मुसळ) देव शिल्पास मेरुटंके ( ऐरण व हातवडा ) यज्ञास स्रुक्स्रुवौ ( स्रुवा पळी ), शिल्पास ताम्रमय स्वनस्वन्यौ ( सांडस सांडसी ) यज्ञास दर्भकूर्च, देवशिल्पास सूकरकेशकूर्च, ( अलंकारउजळण्याची कुंचली ) सूकर केश हे दर्भतुल्य पवित्र आहेत यास प्रमाण—**भागवत स्कंध ३ अध्याय १३ श्लोक ३५ छंदांसियस्यत्वचिबर्हिरोमस्वाज्यंदृशित्वंघ्रिषु चातुर्होत्रम् ॥**

अर्थ—वराह अवतार धारण करणाऱ्या नारायणाचा सूकर देह यज्ञरूप आहे. त्याच्या त्वचेच्याठायीं गायत्र्यादि सात छंद, केशांच्याठायीं दर्भबर्हि कूर्चादि, दृष्टीच्याठायीं घृत, चारी पादांचेठायीं चहूं वेदांचे चार आचार्य, इत्यादि वराह रूपाचेठायीं यज्ञसामुग्रीची संभावना केली आहे. आणखी प्रमाण-**मत्स्यपुराण अध्याय २४८ अग्नि जिव्हो दर्भलोमा ब्रह्मशीर्षोमहातपाः॥**अर्थ—वराहाच्या जिव्हेच्याठायीं अग्नि, केशाचे ठायीं दर्भ, आणि मस्तकीं ब्रह्मदेवता आहे. यावरून स्पष्ट आहे कीं, सूकराचे केश दर्भतुल्य पवित्र आहेत. याविषयीं आणखी सर्वत्र प्रसिद्ध प्रमाण—श्रीधरस्वामीकृत रामविजय ग्रंथ—**बालकांड**, अध्याय ६ ओवी—**व्याघ्रचर्मग्रहण ॥ तैसेचसूकरकेश जाण ॥"हस्तिदंतखवाश्रृंगआपण ॥ इतुकींब्राह्मणपवित्रह्मणती ॥२१॥"** तसेंच द्विजविशेषांच्या आयतनाख्य अग्निकुंडांत **"भृगूणांत्वादेवानांव्रतपतेव्रतेनादधामीति"** इत्यादि वेदमंत्रांनीं अग्नि स्थापन करितात, तसे पंचालही **"ऋभूणांत्वादेवानां व्रतपतेव्रतेनादधामि "** या वेदमंत्रानें आधानाग्नी आयतनांत अग्निस्थापन करितात. यज्ञास उरवा ( स्थाली ) शिल्पास मुषा ( मुस ) याशिवाय नीक्षण, असेचनपात्रें, कपालें, सूना, अंक इत्यादि आयुधें जशीं यज्ञास लागतात तशीं शिल्पासही शलाका, कर्तरी, इत्यादि आयुधें लागतात.

**शंका**—जसें ऐरण, हातवडा, सांडस, फुंकणी इत्यादि. शिल्पाच्या उपकरणास आयुधें ( हत्यारें ) ह्मणतात; तसें यज्ञाचे उपकरणास ( स्फ्य, कपालें, स्रुक्, स्रुव, इत्यादिकांस ) आयुधें असें ह्मणण्यास प्रमाण काय?

---

१ वागीश्वरी ह्मणण्याची रूढ आहे. २ खैराचे कोळसे आणि शुष्क गोमय पवित्रच आहेत. ३ लोखंडाच्या फुंकणीविषयीं विकल्प आहे.

४ पंखा. ५ वंशव्यजन.

उत्तर—यज्ञायुधें ह्मणतात यास प्रमाण श्रुति–यजुर्वेद अष्टक १ प्रश्न ६ अनु० ८ पन्नाशी २

**यज्ञायुधानिसंभरंतियज्ञोवैयज्ञायुधानियज्ञमेवतत्संभरंति ॥ स्फ्यश्चकपालानिचाग्निहोत्रहवणीचशूर्पंचकृष्णाजिनंचशम्याचोलूखलंचमुसलंचदृषच्चोपलाचैतानिवैदशयज्ञायुधानियएवंवेदमुखतोऽस्ययज्ञः कल्पते ॥**

भाष्यं—वक्ष्यमाणानि स्फ्य कपालादीनि यज्ञस्य साधनत्वादायुधानीत्युच्यंते तान्यध्वर्युः संपादयेत् ॥ साध्यासाधनयोरभेदोपचाराद्यज्ञस्यैवतदायुधत्वंतत्तेनायुधसंपादनेन यज्ञमेवसंपादयति

अर्थ—पुढच्या "**स्फ्यश्चकपालानि०**" या श्रुतींत सांगितलेलीं स्फ्य, कपालें, अग्निहोत्रहवणी, शूर्प, कृष्णाजिन, शम्या, उलूखल, मुसल, दृषद, उपल, हीं दहा आयुधें यज्ञास साधनभूत असल्यामुळें यांना ' आयुधें ' असें ह्मणतात. हीं आयुधें अध्वर्यूनें ( दक्षिणद्वारस्थ आचार्यांनें ) संपादन करावीं‌त. साध्य ह्मणजे यज्ञ आणि साधन ह्मणजे यज्ञायुधें यांची अभेदवृत्ति असल्यामुळें यज्ञाचींच तीं आयुधें होत. दुसऱ्या कोणत्याहि कामाचीं नव्हेत. कारण त्या यज्ञायुधांनीं यज्ञच संपादन होतो. यावरून वाचकांस स्पष्ट समजेल कीं, शिल्पोपकरणाप्रमाणें यज्ञोपकरणासही आयुधेंच ह्मणतात. जशीं यज्ञाचीं मुख्य आयुधें १० आहेत तशीं शिल्पाचींहि मुख्य आयुधें १० आहेत, यास प्रमाण पद्मपुराण भूखंडे—

**श्लोक—मेरुंटंकंस्वनंभूषावन्हिंचदधतंकरैः ॥ कुद्दालंकरणींवास्यमग्नियंत्रंकमंडलुं ॥ १ ॥ इतिदशशिल्पायुधानि**

अर्थ—मेरु ( ऐरण ) टंक ( हातवडा ) स्वन ( सांडस ) भूषा[1] ( धमनी ) अग्निकुंड, कुद्दाल, करणी, तासणी, घटिकापात्र[2] आणि कमंडलु हीं मुख्य देवशिल्पायुधें दहा आहेत. जसें यज्ञाच्या स्फ्यादि दशायुधांनीं दर्शपूर्णमास, **चातुर्मास्य, षोडशी उक्थ्य, चयन, अग्निष्टोम, वाजपेय** इत्यादि यज्ञ संपादन करितात; तसेंच देवशिल्प्याच्याही मेर्वादिदशायुधांनीं देवब्राह्मणांचें **स्वर्णरत्नालंकार, प्रासाद, गृह, देवमूर्ति, देवरथ, यज्ञकुंडमंडप, यज्ञपात्रें** इत्यादि यज्ञरूप पवित्र शिल्पवस्तु संपापादन करितात. तसेंच ज्या नक्षत्रावर सुवर्णरत्नादि अलंकार, मूर्ति, देवरथ, इत्यादि शिल्पकर्मास आरंभ करण्यास सांगितलें आहे. त्याच त्वष्टा देवताक ( विश्वकर्म देवताक ) चित्रा नक्षत्रावर अश्वमेधादि यज्ञाचा संकल्प ( आरंभ ) करण्यास सांगितलें आहे. यास प्रमाण श्रुति–**तैत्तिरीय ब्राह्मण अष्टक ३ प्रश्न ८ अनुवाक १ दशक १।२ चित्रानक्षत्रंभवति । चित्रंवाएतत्कर्म । यदश्वमेधःसमृध्यै ॥**

**भाष्यं**—अश्वमेधस्य संकल्पकाले नक्षत्रविशेषंविधत्ते । बहुविधानामनुष्ठेयानामिष्टिपशुसोमरूपाणां सद्भावादश्वमेधकर्मणश्चित्रत्वमतस्तस्यसमृध्यर्थम् ॥

---

१ भूषा म्हणजे कोणी अलंकार असा प्रसिद्ध अर्थहा घेतात. २ अग्नियंत्र म्हणजे घटिकापात्र तु-ब्रह्मानंदस्वामीच्या ग्रंथावरून घेतला आहे.

अर्थ—अश्वमेध यज्ञकर्माच्या संकल्पकालीं नक्षत्र कोणतें असावें तें सांगतात. अनुष्टित करण्यास योग्य अशा इष्टि,पशु,सोम इत्यादि,अनेकविध यज्ञांचीं विधानें ज्या यज्ञांत असतात त्या अश्वमेध यज्ञकर्मांत चित्रत्व ( अनेक कौशल्य ) आहे. यास्तव त्या चित्रत्वयुक्त यज्ञाच्या समृद्धीकरितां शिल्पसंबंधीं चित्रानक्षत्र उक्त आहे. चित्रानक्षत्राची शिल्पाधिपति त्वष्टादेवता आहे. यास प्रमाण श्रुति "त्वष्टानक्षत्रमभ्येतिचित्राम्" म्हणून च चित्रास त्वाष्ट्र म्हणतात. यावरून स्पष्ट आहे कीं, शिल्पसंबंधीं चित्रानक्षत्र यज्ञ कर्मास जर विहित आहे तर पवित्र शिल्पकर्म आणि यज्ञकर्म एकरूपच आहेत. जशी यज्ञाची गणना वेदांत आहे तशी शिल्पाचीही गणना वेदांत आहे, याविषयीं प्रमाण भागवत स्कंध ३ अध्याय १२

**ऋग्यजुः सामाथर्वाख्यान्वेदान्पूर्वादिभिर्मुखैः ॥ शस्त्रमिज्यास्तुतिस्तोमंप्रायश्चित्तंव्यधात्क्रमात् ॥ ३७ ॥ आयुर्वेदं धनुर्वेदंगांधर्ववेदमात्मनः ॥ स्थापत्यंचासृजद्वेदंक्रमात्पूर्वादिभिर्मुखैः ॥ ३८ ॥**

अर्थ—ऋग्वेद,यजुर्वेद,सामवेद आणि अथर्वणवेद हे चार आणि शस्त्र(मंत्रोक्तदेवता प्रशंसारूप होतृकर्म ) इज्या ( अध्वर्युकर्म ) स्तुतिस्तोम ( उद्गातृकर्म ) प्रायश्चित्त (ब्रह्मा जो चवथा आचार्य त्याचें कर्म ) तसेंच आयुर्वेद, धनुर्वेद,गांधर्ववेद,आणि शिल्पवेद, एवं हीं तीन चतुष्टयें ईश्वराच्या पूर्वादि चार मुखांपासून क्रमानें उत्पन्न झालीं. तसेंच "मुखतोवर्ततब्रह्म" मुखापासून ब्राह्मणवर्ण उत्पन्न झाला हें प्रसिद्धच आहे. अर्थात् वेदाची यज्ञाची आणि ब्राह्मणाची उत्पत्ति जर मुखापासून आहे तर वेदसंज्ञक व यज्ञरूप शिल्पांचे कर्ते ब्राह्मणच असले पाहिजेत हें उघड आहे. कारण शिल्पांस वेदसंज्ञा आहे. "वेदोनारायणः साक्षात्" म्हणजे जसा वेद पुरुष स्वरूप आहे तसें शिल्पजन्य प्रासादमूर्त्यादिकही पुरुषस्वरूप आहे. शिल्पशास्त्रे—**पादौपादशिलास्तस्यजंघापादोर्ध्वमुच्यते ॥ गर्भश्चैवोदरंज्ञेयंकटिश्चकटिमेखला ॥ १॥ स्तंभाश्चबाहवोज्ञेयाघंटाजिव्हाप्रकीर्तिता ॥ दीपःप्राणोस्यविज्ञेयोह्यपानोजलानिर्गमः ॥ २ ॥ ब्रह्मस्थानंयदेतच्चतन्नाभिःपरिकीर्तितः॥ हृत्पद्मंपिंडिकाज्ञेयाप्रतिमापुरुषःस्मृतः ॥ ३ ॥ पादचारस्त्वहंकारोज्योतिस्तच्चक्षुरुच्यते ॥ तदूर्ध्वंप्रकृतिस्तस्यप्रतिमात्मास्मृतोबुधैः ॥ ४॥ तलकुंभादधोद्वारंतस्यप्रजननंस्मृतम् ॥ शुकनासाभवेन्नासागवाक्षः कर्णउच्यते ॥ ५ ॥ कायपालीस्मृतः स्कंधोग्रीवाचामलसारिका ॥ कलशस्तुशिरोज्ञेयोमज्जादित्मरसंयुतम् ॥ ६ ॥ मेदश्चैवसुधाविद्यात्प्रलेपोमांसमुच्यते ॥ अस्थीनिचशिलास्तस्यस्नायुः कीलादयः स्मृताः ॥ ७॥ चक्षुषीशिखरास्तस्यध्वजाःकेशाःप्रकीर्तिताः॥ एवंपुरुषरूपंतंध्यात्वाचमनसासुधीः ॥ ८ ॥**

---

१ ज्योतिःशास्त्रें—भेशादस्त्रयमाग्निधातुशशिनःशर्वोदितिर्वाक्पतिः फद्भुजाःपितरोभगोयमरवी त्वष्टासमीरः क्रमात् इतिरत्नमालायां ॥ यांत अश्विन्यादिनक्षत्रांच्या देवता सांगितल्या आहेत. २ ही श्रुति प्रसिद्ध आहे ( उदकशांति. )

**अर्थ**—देवालयाचें विराटपुरुषरूपानें ध्यान करावें, तें असें—पायाचे दगड पाद जाणावे, पायाच्या वरला भाग ( भूमि ) जंघा, देवळाची गर्भ ( पोकळी ) उदर, जोतें ही कंबर, खांब हे बाहू, घांटी ही जीभ, अखंड दीप हा प्राण, सोमसूत्र हें अपान, ब्रह्मस्थान नाभी, पिंडिका त्दृदयकमल, देवमूर्ति हा पुरुष, पादचार–अहंकार, ज्योति-नेत्र, प्रकृति–मूर्तीचा आत्मा, तळघरचें अधोद्वार–उत्पत्तिस्थान, शुकनासिका नासिक, गवाक्षद्वार–कर्ण, कायपाली–खांदे, अमलसारिका–ग्रीवा, कलश–मस्तक, विटा–मज्जा, चुना–मेद, गिलावा–मांस, घडीवशिला–अस्थि, खिळे–स्नायु,शिखर–मुकुट, ध्वज–केश, याप्रमाणें विराट पुरुष देवालय जाणावें. हें प्रमाण एथें घेण्याचा उद्देश हाच कीं, जसें गाय[1],अश्वत्थवृक्ष[2], ब्राह्मणाचा[3] देह इत्यादि पवित्र पदार्थांचे ठायीं देवता वास करितात. तशा शिल्पकृतिजन्य[4] प्रासाद गृह[5], देवमूर्ति, शस्त्रास्त्रें[6], कुंडें[7], मंडप[8] आणि वधूचे सुवर्णरत्नालंकार[9], रथ[10], इत्यादि पवित्र पदार्थांचे ठायींही देवता वास करितात. तर अशा पवित्र वस्तु ज्या सुकर्मानें[11] निर्माण होतात; तें पवित्र शिल्पकर्म आणि यज्ञकर्म एकरूप आहे.

**प्रश्न**—जसे यज्ञकर्त्या यजमानास यज्ञकर्मानें देव संतुष्ट होऊन स्वर्गवासादि सुख प्राप्त होतें तसें शिल्पकर्म करणारास शिल्पकर्मानें देव संतुष्ट होऊन स्वर्गवासादि सुख कोणास प्राप्त झालें आहे व होतें याविषयीं प्रमाण आहे काय ?

**उत्तर**—शिल्पकर्मानें व शिल्पजन्य वस्तु निर्माण केल्यानें स्वर्गवासादि चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त होतात. देव प्रसन्न होऊन शिल्पकर्त्यास तर साक्षात् देवत्व प्राप्त होतें. यास प्रमाण श्रुति ऋग्वेद अष्टक १ अध्याय ७ वर्ग ३० मंत्र ४

विष्ट्वीशमीतरणित्वेनवाघतोमर्तासः संतोऽअमृतत्वमानशुः ॥
सौधन्वनाऽऋभवःसूरचक्षसःसंवत्सरेसमपृच्यंतधीतिभिः ॥

**भाष्य**—सौधन्वनाः सुधन्वनऋषेःपुत्राः । ऋभवः मर्तासो वाघतः संतोमरणधर्माणो यजमानाः संतोपि । तरणित्वेन शीघ्रत्वेन । शमीविष्ट्वीआत्मानंकर्मणा व्यापृतंकृत्वा कुशल कर्माणि एकंचमसंचतुरः कृणोतनेत्यादिनादेवैरुक्तानि कर्माणि कृत्वा अमृतत्व

---

१ गवामंगेषु तिष्ठंति सर्वेब्रह्मादयः सुराः ॥ इतिगरुडपुराणे ॥ २ मूलतोब्रह्मरूपायमध्यतोविष्णुरूपिणें अग्रतःशिवरूपायअश्वत्थायनमोनमः ॥ तथाच ॥ वृक्षाणामहमश्वत्थइति भगवदुक्तिः ॥

३ अग्निरापश्चवेदाश्चसोमसूर्यौमरुत्तथा ॥ सर्वएवतुविप्रस्यकर्णेतिष्ठंतिदक्षिणे ॥ इत्यादिस्मृतेः ॥

४ संग्रह १ पृष्ठ १४ ओळ ३–५ पर्यंत पहा.

५ गृहाचेठायीं ब्रह्मादिपिलिपित्सांत वास्तुदेवता वास करितात.

६ शस्त्रास्त्रांचेठायीं पूर्वी अथर्वण मंत्रांनीं अग्निसूर्यादि देवता स्थापून प्रयोग करीत होते.

७ कुंडाचे सयोनित्रिमेखलाच्याठायीं दुर्गा, ब्रह्मा, विष्णु, महेश, देवतांचें आवाहन करितात. चयन यज्ञांत तर [ ज्या यज्ञांत पक्ष्याच्या आकृतीचें कुंड करितात त्या यज्ञांत ] कुंडाचे प्रत्येक इष्टकेंत देवता स्थापन करितात. ८ यांत नंदिन्यादि मंडप देवता स्थापन करितात. ९ सुमंगलीरियंवधू० या मंत्रांनीं अभिमंत्रित करून शची आदि देवता स्थापन करितात- १० रथाचेठायीं देवता प्रसिद्ध आहेत. पुढें वर्णन करूं. ११ सुकर्मादेवशिल्पिनीति विश्वकोशः ॥

मानशुः अमरत्वंप्रापुः । संवत्सरेचैकस्मिन्नेववर्षेगते । सूरचक्षसः सूर्यवत्तेजोयुक्ताभूत्वा । धीतिभिःसमपृच्यंत उपासकक्कृतैर्यज्ञादिभिः कर्मभिः स्तोत्रैश्चसंयुक्ता अभवं स्तेषांप्री त्यर्थमुपासकाः कर्माणि स्तोत्राणिचाकुर्वन् ॥

अर्थ—सुधन्वानामक ऋषीचे पुत्र जे ऋभू त्यांना मनुष्यत्व असतां, त्यांनीं आपल्या शिल्पकौशल्यानें देवांच्या आज्ञेनें त्यांच्या एका चमस नामक सोमपात्राचीं चार चमस पात्रें करून दिलीं; त्यामुळें देव प्रसन्न होऊन त्या ऋभूंस देवत्व देऊन देवलोकीं अक्षय ठेविते झाले. एका वर्षात सूर्याप्रमाणें तेजस्वी होते झाले. त्या ऋभूंच्या प्रीतिकरितां यज्ञकर्ते यजमान यज्ञ आणि स्तोत्रें करूं लागले.

तसेंच त्या ऋभूनीं रथादि शिल्प निर्माण करून, ते इंद्रादि देवांहीं पूज्य होते झाले हें पुढें सांगूं. यावरून यज्ञाप्रमाणें शिल्पचातुर्यानेंही अमरत्व प्राप्त होतें हें स्पष्ट आहे.

याचप्रमाणें विश्वकर्मांनीं आपल्या शिल्पकौशलजन्य भूषणांनीं श्रीजगदंबेस संतुष्ट केलें. यास प्रमाण—**मार्कंडेयपुराणें देवीमहात्म्ये** ( सप्तशत्यां ) **महिषासुरवध कथायां**—

**श्लोक—चूडामणिंतथादिव्यंकुंडलेकटकानिच ॥ अर्धचंद्रं तथाशुभ्रं केयूरान्सर्वबाहुषु ॥ नूपुरौविमलौतद्वद्ग्रैवेयकमनुत्तमम् ॥२६॥ अंगुलीयकरत्नानिसमस्तास्वंगुलीषुच॥ विश्वकर्माददौतस्यैपरशुंचाति निर्मलम् ॥ २७ ॥ अस्त्राण्यनेकरूपाणि इति**

अर्थ—महिषासुर दैत्य मारण्याकरितां ज्याकालीं देवी प्रगट झाली, त्याकालीं विश्वकर्मांनीं देवीला मुकुट, कुंडलें, रत्नजडित कंकणें, गोट, पाटल्या, तोडे, शुभ्रहिऱ्याचा बिंदी बिजवरा, सर्व भुजांचेठायीं बाजुबंद, नूपुरें, ( पाद भूषणें ) कंठभूषणें ( चंद्रहार मुक्ताहारादि ) सर्व करांगुलीमध्यें, रत्नांच्या मुद्रिका इत्यादि अलंकार व परशु आदिकरून सर्व शस्त्रास्त्रें देऊन फार संतुष्ट केलें. याचप्रमाणें आपल्या मन्वादि पांच पुत्रांसहित विश्वकर्मांनीं द्वारका निर्माण करून देऊन श्रीकृष्णास प्रसन्न केलें, हें प्रसिद्धच आहे. पाराशरस्मृतीमध्यें सुवर्ण धेनुदान प्रशंसा—

**धेनुर्देयासुवर्णस्यकारयित्वाद्विजातये ॥ यांदत्वाप्राङ्महीपालाब्रह्मणःसदनंगताः ॥ ५४ ॥ अग्रेपि—सुवर्णधेनुमार्यायविप्रायप्रतिपादयेत् ॥ अश्वमेधसहस्रस्यदत्वाफलमवाप्नुयात् ॥**

अर्थ—सुवर्णाची धेनु करून ब्राह्मणास द्यावी. ज्या धेनुप्रत दान केल्यानें पूर्वी राजे ब्रह्मलोकाप्रत गेले. कारण विद्वान् ब्राह्मणास शिल्पजन्य सुवर्णधेनुदान केली असतां सहस्र अश्वमेध यज्ञांचें फल प्राप्त होतें. तसेंच शिव विष्णवादि प्रासाद वगैरे

---

१सुधन्वा ऋषि अंगिरा ऋषीचा पुत्र हा शिल्पकर्ता असल्यामुळें यास विश्वकर्मा असें नांव आहे सुधन्वाविश्वकर्माणि इति विश्वकोशेनचतुः श्लोक ४४

२ सुवर्णाची धेनु रत्नें, सुवर्ण, रौप्य इत्यादि, धातूंनीं शिल्पविद्येनें देवशिल्पी ( पंचाला ) कडून तयार करवावींत.

पवित्र शिल्पें निर्माण केलीं असतां त्या पुण्यास पार नाहीं. यास प्रमाण—राजवल्लभ-ग्रंथे अध्याय ४ शिल्पजन्य प्रासादादि फल—

वापीकूपतडागदेवभवनान्यारंभयोगादिकंतीर्थानामवगा
हनंचविधिवत्कन्याप्रदानादिकम् ॥ सर्वंपुण्यमिदंनृपस्यल
भतेयःकारयेत्पर्वतेगेहंसर्वजनायशर्मजननविश्राममेकंपरम् ॥

**अर्थ**—वापी, कूप, तलाव, देवालयें,योगाभ्यासाचे मठ, तीर्थस्नानार्थ घांट बांधणें, कन्यादानार्थ अलंकार, वृक्षारोपण ( उद्यान ), धर्मगृह ( धर्मशाला ) इत्यादि सर्व जनांस सुखोत्पत्ति करणारीं महत्पुण्यें राजानें अवश्य करावींत. देवालय निर्माण फल अग्निपुराण अध्याय ३८ **अहन्यहनियज्ञेनयजतोयन्महाफलम् ॥ प्राप्नोतितत्फलं विष्णोर्यः कारयतिकेतनम् ॥ ४५ ॥** अर्थ—दररोज यज्ञ केल्यानें जें महा फल तें फल एक विष्णूचें देवालय करविल्यानें प्राप्त होतें. आणखी—श्लोक—**फलंयन्नाप्यतेयज्ञैर्धामकृत्वातदाप्यसे ॥ देवागारेकृतेसर्व तीर्थस्नानफलंलभेत् ॥ ६ ॥**

**अर्थ**—पुष्कळ यज्ञ करूनही जें फल प्राप्त होत नाहीं तें फल देवालय केल्यानें मिळतें देवालय केल्यानें सर्व तीर्थस्नानें केल्याचें पुण्य आहे. आणखी प्रमाण—

घंटावितानकसतोरणचित्रयुक्तंनित्योत्सवप्रमुदितेनजनेन
सार्द्धम् ॥ यः कारयेत्सुरगृहं विविधध्वजांकं श्रीस्तं नमुंचति
सदादिवि पूज्यते-चेति ( मत्स्य पुराण अध्या. २६४ )

**अर्थ**—घांटी, मंडपाचें छत, तोरण, चित्रें पूजनादि उत्सवानंद कर्ते जन यासहित व अनेक प्रकारच्या ध्वजांनीं युक्त असें देवालय जो करवितो त्याला या लोकीं लक्ष्मी कधीं सोडीत नाहीं. आणि स्वर्गीं पूज्य होतो. यावरून स्पष्ट आहे कीं, यज्ञापासून जें फल तें, शिल्पापासून आहे. तसेंच उद्यान ( बाग बगीचा ) कूप, वापी, तलाव हीं शिल्पजन्यें असून यापासून उत्पन्न होणारें पुण्य- मत्स्य पुराण अध्याय १५३

देव्युवाच—एवंनिरुदकेदेशेयःकूपंकारयेद्बुधः ॥ ५११ ॥ बिंदौबिंदौच
तोयस्यवसेत्संवत्सरंदिवि ॥ दशकूपसमावापी दशवापीसमोऽन्हदः
॥ ५१२ ॥ दशन्हदसमःपुत्रो दशपुत्र समोद्रुमः ॥

**अर्थ**— देवी म्हणत्ये—याप्रमाणें निर्जळ देशामध्यें जो कूप ( आड ) करितो त्या सूज्ञ मनुष्यास, केलेल्या आडांतील पाण्याचे प्रत्येक बिंदूस एक वर्ष, या मानानें जितके बिंदु, तितकीं वर्षे स्वर्गवास प्राप्त होतो. असें महत्पुण्यदायक दहा कूप केल्याचें पुण्य एक वापी ( विहीर ) बांधल्यानें मिळतें. दहा वापींचें पुण्य एक तलाव केल्यानें मिळतें. दहा तलावांबरोबर १ पित्रुद्धारक सत्पुत्र, दहा सत्पुत्रांबरोबर एका वृक्षारोपणाचें पुण्य आहे. अशा अनेक वृक्षांच्या समुदायरूपानें जें उद्यान तें केल्यानें अनंत पुण्य आहे. तसेंच गृहस्थाश्रमार्थ गृहकर्मफल—राजवल्लभग्रंथे अध्याय १ ला श्लोक—

स्त्रीपुत्रादिक भोगसौख्यजननं धर्मार्थकामप्रदंजंतूनामयनं सुखा-

**स्पदमिदं शीतांबुघर्मापहम् ॥ वापीदेवगृहादिपुण्यमखिलं गेहात्स मुत्पद्यते गेहंपूर्वमुशंतितेनविबुधाः श्रीविश्वकर्मादयः ॥ ४ ॥**

अर्थ–गृह कर्म हें स्त्रीपुत्रादिक सुख भोगास कारण,धर्मादि पुरुषार्थ दायक, सर्व-प्राणिमात्रांचें सुखस्थान, आणि शीतोष्ण बाधा परिहारक आहे. वापी, देवालयें इत्यादि अनेक कर्मांचें सर्व पुण्य घर बांधल्यापासून उत्पन्न होतें. म्हणून शिल्पशास्त्र-कर्ते विश्वकर्मादिकऋषि गृहकर्म शिल्पविधि अगोदर कथन करितात.

एवढेंच नव्हे, तर शिव विष्णवादि देव मूर्तींच्या ध्यानेंकरून व पूजनें करून चतुर्विध पुरुषार्थ व साज्युयमुक्ति प्राप्त होते. एवंच यज्ञकर्माप्रमाणेंच शिल्पकर्मापासून सर्व देव मानवादि जीवजंतु प्रसन्न होतात.

जसें यज्ञाच्या आदि अंतीं यज्ञकर्ते; यजमानश्रेयःप्राप्तीस्तव आचार्यांची पूजा करितात तसें प्रासादादि शिल्पकर्माचे ठायींहि आदि मध्यें अंतीं प्रासादादि कृतसत्कर्माचे श्रेयःप्राप्तीस्तव शिल्पींची पूजा ऋत्विजांच्या पूर्वी करितात. कारण यज्ञकर्मकर्त्या आचार्यांची आणि प्रासादादि शिल्पकर्त्या पंचाल शिल्पींची दक्षिणादि उपचारांनीं पूजा केल्यावांचून दोन्हीही(यज्ञकर्त्या आणि प्रासादादिकर्त्या)यजमानास त्या यज्ञाचें व प्रासादादिकांचें श्रेयस प्राप्त होत नाहीं; म्हणूनच शिल्पिपूजनविधींत “ **पुण्यंप्रासादजंस्वामी प्रार्थयेत्सूत्रधारतः** ” श्रेयः संपादन करण्यास सांगितलें आहे.

जसें गृह प्रासादादि केल्यापासून महत्पुण्य प्राप्त होतें, तसें सुवर्ण रत्नादि अलंकार संबंधीं शिल्पापासूनही चतुर्विध पुरुषार्थदायक महत्पुण्य प्राप्त होतें कारण “ **एकतः पृथिवी कृत्स्ना सशैल वनकानना ॥ स्वलंकृतायथाशक्ति सुकन्याचैकतःस्मृता ॥ इति ब्रह्मपुराणे गौतमी महात्म्ये** ”

अर्थ—पर्वत वनारण्यासहित संपूर्ण पृथ्वीदानाचें श्रेय एक कन्यादान केल्यानें प्राप्त होतें. विद्वानांच्याही सद्धर्म संततिरूप धर्मसाधनास कारण कन्याच होय. ह्मटलें आहे **धर्मस्य साधनं कन्या विदुषामपिभास्कर ॥ गौ. म.॥** तस्मात् अशा सर्व सत्कर्म श्रेयोरूप कन्यादानाची सांगता कन्येची यथाशक्ति अलंकारादिकांनीं पूजा केल्यानें होते.

**यत्कन्यायाः पिताकुर्याद्दानपूजनमीक्षणम् ॥ यत्कृतंतत्कृतंविद्यात्ता-सुदत्तंतदक्षयम् ॥ १५ ॥ करोतियःकन्यकानांससंपद्भाजनंभवेत् ॥**

अर्थ–पिता कन्येचे जें अलंकारद्वारा पूजनादि करितो तेंच दानपूजन केलें असें जाणावें. कारण तें दान अक्षय असतें. म्हणून जो कन्येस सुवर्णालंकारांनीं संतुष्ट करितो त्यास अक्षय संपत्ति प्राप्त होते. कन्यासंतोष अलंकार दानापासून होतो म्हणून—

**पितृभिर्भ्रातृभिश्चैताःपतिभिर्देवरैस्तथा ॥ पूज्याभूषयितव्याश्चबहुकल्याणमीप्सुभिः ॥** मनुस्मृति ॥

अर्थ–ज्यांना बहुत कल्याण प्राप्तीची इच्छा असेल त्या ( पिता, बंधु,पती, दीर ) यांनीं स्त्रिया अलंकारांनीं भूषित कराव्या. अलंकारांनीं स्त्रिया पूजिल्यानें सर्व कर्में सफल होतात. कारण—

यत्रनार्यस्तुपूज्यंतेरमंतेतत्रदेवताः ॥ यत्रैतास्तुनपूज्यंते सर्वा स्त-त्राफलाः क्रियाः ॥ मनु० ॥ अर्थ—ज्या घरांत स्त्रिया अलंकारादि-कानीं संपूजित असतात त्या घरांत देवता आनंदानें निवास करितात. आणि ज्या घरांत त्या अलंकार रहित असतात त्या घरांत केलेलीं नित्य नैमित्तिकादि सर्व कर्में निष्फल होतात. एवढेंच नव्हे तर कन्या विक्रयादि कारणापासून अलंकारहीन होणाऱ्या कन्येच्या कोपापासून कुलक्षय होतो. यास प्रमाण मनुस्मृति-अ. ३

शोचंतिजामयोयत्र विनश्यत्याशु तत्कुलम् ॥
नशोचंतितु यत्रैता वर्द्धते तद्धि सर्वदा ॥ मनु० ॥

अर्थ—ज्या कुलांत जामि म्हणजे कन्या, स्नुषा, बहिणी, जावा, पत्नी इत्यादि स्त्रिया अलंकार नसल्यामुळें खिन्न असतात तें कुल देवांच्या आणि राजाच्या पीडेनें लवकर ( सुमारे बारा वर्षांचे आंत ) नाश पावतें आणि कुलांत पूर्वोक्त स्त्रिया अलंकारांनीं स्वलंकृत संतुष्ट असतात तें कुल लवकर वृद्धि पावतें. तस्मादेताःसदापूज्या भूष-णाच्छादनाशनैः ॥ भूतिकामैर्नरैर्नित्यं सत्कारेषूत्सवेषुच ॥ मनु० ॥

अर्थ—म्हणून कन्या आदिकरून स्त्रिया अलंकार, वस्त्रें, मधुर अन्न यांहींकरून सन्मानाचे ठायीं आणि उपनयन विवाहादि उत्सवाचे ठायीं संतति संपदादि ऐश्वर्य प्राप्तीची इच्छा करणाऱ्या मनुष्यांनीं नित्य पूज्य आहेत, कारण स्त्रियांच्या सुवर्णादि अलंकार धारणापासून गर्भ धारणा होऊन वंशाला श्रेष्ठत्वास आणणारी धर्म प्रजा उत्पन्न होते यास प्रमाण—

यदिहिस्त्रीनरोचेतपुमांसंनप्रमोदयेत् ॥
अप्रमोदात्पुनःपुंसःप्रजननंनप्रवर्तते ॥ मनु० ॥

टीका—दिप्तयर्थोऽत्ररुचिः।यदिस्त्रीवस्त्राभरणादिना शोभाजनकेनदीप्तिमती न स्यात्तदा स्वामिनंपुनर्नहर्षयेत् । हिशब्दोऽवधारणे । अप्रहर्षात्पुनःस्वामिनःप्रजनं गर्भधारणंनसंपद्यते । इतिमन्वर्थमुक्तावलिः। ( कुलूक भट्टः )

अर्थ—येथें रुचि शब्द प्रकाशार्थी आहे. जर शोभाकारक सुवर्णादि वस्त्रालंकारादि-कांनीं स्त्री प्रकाशवती नसेल तर ती स्त्री पतीस आनंदच उत्पन्न करीत नाहीं आणि आनंदरहित पतीपासून गर्भ धारण होत नाहीं.

निरोगी स्वधर्मनिष्ठ कुलदीपक संतति होण्यास साधन सुवर्णादि अलंकार आहेत याविषयीं—

स्त्रियांचरोचमानायांसर्वंतद्रोचतेकुलम् ॥
तस्यांत्वरोचमानायांसर्वमेवनरोचते ॥ मनु० ॥

टीका—स्त्रियां अलंकारादिना कांतिमत्यां भर्तृस्नेहविषयतया परपुरुषसंपर्कविरहात्तत्कुलं दीप्तं भवति । तस्यांपुनररोचमानायां भर्तृविद्विष्टतया नरांतरसंपर्कात्सकलमेवकुलंमलिनं-

१विक्रीणीतेयश्चकन्यामश्वंवागास्तिलानपि ॥ नतस्यरौरवादिभ्यःकदाचिन्निष्कृतिर्भवेत॥ब्रह्मपु०गोदा० अर्थ—कन्याविक्रयपातकानें रौरव नरक प्राप्त होतो त्यांतून कधींही सुटका होत नाहीं.

भवति। ( कु० भ० ) अर्थ—गृहस्थाश्रमी मनुष्यांनीं स्वस्त्री अलंकारादिकांनीं प्रकाशमती केली असतां ती आपल्या पतीवर पूर्ण स्नेह ठेविते. परपुरुषाचा संपर्क करीत नाहीं, ( ह्मणजे आत्मप्रिय सुखदायक आपल्या पतीचें ऐश्वर्य त्रैलोक्यापेक्षां श्रेष्ठ मानित्ये ) आणि त्या स्त्रीच्या प्रेमवृद्धीस्तव पतीही अन्य स्त्री स्वप्नींसुद्धां अवलोकन करीत नाहीं. असे प्रीतियुक्त स्त्रीपुरुष ज्या कुळांत असतात तें कुळ सूर्याप्रमाणें तेजस्वी होतें, कारण त्या प्रीतियुक्त दंपतीपासून पितरांस सानंद ब्रम्ह लोक प्राप्त करविणारी अशी सद्धर्मी संतति होते. आणि जो मनुष्य स्वस्त्रीस सुवर्ण रत्नादिअलंकारांनीं प्रकाशित करीत नाहीं, ती स्त्री पतीचा द्वेष करून परपुरुषाचा संपर्क करिते ( ह्मणजे दुसऱ्या स्त्रियांचे पतींची मनांत प्रशंसा कारित्ये ) आणि त्या प्रेमहीन स्त्रीच्या तिरस्कार वृत्तीनें पतीही अन्य स्त्रीची मनांत प्रशंसा करून खिन्न असतो. त्यामुळें असे परस्पर कुत्सित स्त्रीपुरुष ज्या कुळांत असतात तें कुळ मलिन ( तेजोहीन ) होतें. कारण त्या कुत्सित स्त्रीपुरुषापासून सर्व पितरांस नरकांत टाकणारी अशी अधर्मी संतति उत्पन्न होते."म्हणूनच देह पवित्र होण्याकरितां स्त्रीपुरुषांनीं अलंकार धारण करावेत(**नवरत्नमुद्रिकाज्याचेहाती ॥ त्यासीपापें न लागती ॥ गुरुचरित्र अ. ३६** ) ही नवरत्नमुद्रिका नवग्रहमंत्रानीं हवन करून प्रत्येक रत्न, मुद्रिकेंत जडण्यास निरनिराळे सुमुहूर्त लागतात व कर्ता तोपर्यंत शुचिर्भूत असला पाहिजे. अर्थात ही वैदिक शिल्पें पंचाल ब्राह्मण हस्त निर्मितच पाहिजेत.

" **सुवर्णस्यपवित्रस्यकलांनार्हतिषोडशीम् ॥ अग्रेपि ॥ ताम्रतारसुवर्णानामर्कषोडशखेंदुभिः ॥ पुष्यार्केमुद्रिकाकुर्यात्तीव्रदारिद्रनाशिनी ॥ ( आचारमयूरव )**

अर्थ—१२ भाग तांबे, १६ भाग रुपें आणि १० भाग सोनें घेऊन पुष्यार्क योगावर विधीनें मुद्रिका करून नित्य धारण केली असतां महा दरिद्र दूर होतें. सर्व पवित्रांहून अनंतपटीनें अधिक सुवर्णपवित्रक धारणाचे श्रेय आहे. तसेंच—"**देवेंद्राणि नमस्तुभ्यं०**"यामंत्रानें शचीदेवतात्मक सोन्याचे सरीची पूजा करून वधूस वाग्दानाचे वेळीं धारण करवितात तसेंच रक्षाबंधन ( पोंची ) सुवर्णयज्ञोपवीत, शिव, विष्णु, देवी इत्यादि देवतेंच्या मुर्ति व अलंकार हीं सुवर्णशिल्पें अनंतयज्ञफलदायक पवित्र आहेत.

असो उभयकुलोद्धारक पातिव्रत्य धर्मास सदृढपणा आणणारे, पतीचें आयुष्य वृद्धि करणारे, सर्व पदार्थापेक्षां अतिप्रिय, शरीर संस्कार रूप जे हिरण्यालंकार ते लोक नित्य धारण करितात सुवर्णालंकारांनीं संतुष्ट केलेल्या कन्या तर सालंकृत कन्यादान करणाऱ्या आपल्या आईबापास ब्रह्मलोकाची प्राप्ति करवितात. ह्मणून कन्येचा पिता ह्मणतो—( कन्यादान कर्माचेठायीं. )

**कन्यां कनकसंपन्नांकनका भरणैर्युताम् ॥ दास्यामिविष्णवे**

**तुभ्यं ब्रह्मलोकजिगीषया** ॥ ॥ याचा अभिप्राय हाच कीं मणिमंगळसूत्रादि सुवर्णालंकारयुक्त कन्यादान केलें असतां ब्रह्मलोक प्राप्त होतो. जसें उपनयनाचें मुख्य लक्षण यज्ञोपवीत धारण, तसेंच कन्यादानाचें मुख्य लक्षण अलंकार धारण करणें होय. कारण कन्यादानाची मुख्य सार्थकता पतीचें दीर्घायुष्य होय आयुष्य

वृद्धीचे हेतु सुवर्णालंकार धारण करणें. कारण " **अग्निरेतः सुवर्णं स्यात्** " अग्नि-पु० या वचनावरून सुवर्ण हें रेतोरूप आहे. ह्मणूनच " **हिरण्यंस्वर्णरेतसोः** " या विश्वकोशांत सुवर्णास आणि रेतास हिरण्य हें सुवर्णवाची नाम दिलें आहे. ह्मणून " **अग्निमूलं बलं पुसां रेतोमूलंच जीवितम्** ( **वैद्यक.** ) अर्थ—ज्यास बळाची इच्छा असेल त्यानें दीपक पाचक पदार्थांनीं जठराग्नि प्रदीप्त ठेवावा. आणि ज्यास आयुष्यवृद्धी होऊन जगण्याची इच्छा असेल त्याने पौष्टिक पदार्थांनीं शरीरांत रेतोवृद्धि करून तें रक्षण करावें. या वरून जसें रेत आयुष्यवृद्धीस कारण आहे तसें हिरण्य ( सुवर्ण ) ही " **योबिभर्ति दाक्षायणाहिरण्यं सदेवेषुकृणुतेदीर्घमायुः समनुष्ये षुकृणुतेदीर्घमायुः** ।। ऋग्वेद अ.८अ.७सू.१६परिशिष्टं ) या श्रुतीवरून आयुष्यवृद्धि करणारें आहे. रेतासही धातु ह्मणतात आणि सुवर्णासही धातु ह्मणतात- आणि **त्वष्टावैरेतसः सिक्तस्यरूपाणि विकरोति** ॥ **त्वष्टारःरूपाणिविकुर्वंतांविपश्चितं** ॥ इत्यादि श्रुतीवरून आणि तदनुसार ॥ **विभज्यमूर्तिरूपेण तत्तद्गर्भांकुरादिकम्** ॥ **अदृश्येनैवरूपेण विश्वकर्मा सृजत्ययम्** ॥ या पद्मपुराणोक्त भूखंड स्मृतीवरून जसा विश्वकर्मा रेतोधातूंची सावयव जीवरूपें निर्माण करितो. तसेंच—

**विराज्येनाविराजाति तेनास्मान्ब्रह्मणस्पतेविराजसमिधंकुरु** ॥ या श्रुतीवरून आणि **सौवर्णं राजतंचैव ताम्रंपाषाण दारवम्** ॥ **शिल्पंत्वत्संततौ स्थाता यावत्कलियुगंदृढम्** ॥ **अग्रेपि गृहयंत्ररथो भूषाप्रतिमावसनादिकं** ॥ **यत्किंचिद्दृश्यते शिल्पं तत्सर्वं विश्वकर्मजम्** ॥ **पद्मपु० भू०** ॥ आणि **रचयंति विचित्राणिरूपाणि विविधानिये** ॥ **पंचालास्तेसदापूज्याःप्रतिमाविश्वकर्मणः** ॥ **रुद्र०** ॥ इत्यादि वचनावरून विश्वकर्म संततीय पंचालही सुवर्णादि धातूंची अलंकारादि रूपें निर्माण करितात. एवंच रेतो धातूप्रमाणें सुवर्ण धातूही आयुष्यवृद्धि करणारी आहे ह्मणनच कन्यादानाचे वेळीं सुवर्ण मणिमंगलसूत्रारुग अलंकार-**मांगल्य तंतुनानेन भर्तृजीवनहेतुना** ॥ **कंठे बध्नामि सुभगे साजीवशरदः शतम्** ॥ या मंत्रानें इष्टदेवता स्मरण पूर्वक वरानें वधूस धारण करवावें. नंतर सोन्याचे गोट पाटल्या, शची ( सरी ) इत्यादि करभूषणें आणि कंठभूषणें, अर्ध चंद्रादि ( चंद्रकोर वगैरे ) शिरोऽलंकार, कुंडलादि कर्णभूषणें, नूपुरादिपादभूषणें इत्यादि अलंकार " आयुष्यंवर्चस्यं " यासूक्तानें वधूस धारण करावेत, तसेंच पुरुषासही समावर्तन ( सोडमुंज ) संस्काराचेवेळीं कंठमणि ( कंठी गोफ वगैरे ) सुवर्णालंकार याचसूक्तानें धारण करावेत. ह्मणजे हें सूक्त हिरण्य धारण करण्याकरितांच विश्वकर्ममुखापासून झालेल्या सुवर्णादि शिल्पकर्त्या सानगादि ऋषींनीं अनुष्ठित केलें आहे. सानगादि ऋषि पंचालब्राह्मणाचे गोत्र पुरुष आहेत. अलंकार धारण करविण्याचें काम अलंकार कर्त्यावाचून दुसऱ्यास येत नाहीं ह्मणून पंचाल ब्राह्मणजातीय स्वर्णकारानें हें सूक्त पठण करीत होत्साता वधूस

१ ही कृष्णाची आणि शंकराची विश्वकर्म यास वरोक्ति आहे.

किंवा स्नातकास किंवा कोणताहि नवीन अलंकार धारण करणाऱ्या त्रैवार्णिक स्त्री पुरुषाना धारण करवून आशीर्वाद द्यावा प्रयोग पारिजात ग्रंथांत—**भूषणैश्चायुष्यंवर्चस्यमिति सूक्तं पठन्भूषयेत्** ॥ असें वाक्य आहे. अथसूक्तं—**आयुष्यमितिसूक्तस्य सानगादय ऋषयः । हिरण्यंदेवता । आद्याश्चतस्रोऽनुष्टुभः पंचमी० । अलंकार धारणे विनियोगः । आयुष्यं वर्चस्यंरायस्पोषमौद्भिदं ॥ इदंहिरण्यंवर्चस्वं जैत्रायाविशतादिमां ॥ उच्चैर्वाजिपृतनाषाट्सभासाहं धनंजयं ॥ सर्वाः समग्रा ऋद्धयोहिरण्येऽस्मिन्त्समाहिताः ॥ शुनमहंहिरण्यंस्वपितुर्नामेवजग्रभं ॥ तेनमांसूर्य त्वच मकरं पूरुषु प्रियं ॥ संज्ञांचविराजंचाभिष्टिर्याचमेध्रुवा ॥ लक्ष्मीराष्ट्रस्य यामुखेतयामासृजसंसृज ॥ अग्नेः प्रयातंपरियद्धिरण्यममृतंजज्ञेऽअधिमर्त्येषु ॥यएनद्वेदस ऽइदेनर्दहतिजरामृत्युर्भवतियोबिभर्ति ॥ १॥ यद्वेदराजावरुणोयद्दुदेवीसरस्वती ॥ इंद्रोयद्वृत्रहावेदतन्मेवर्चसआयुषे ॥ नतद्रक्षांसिनपिशाचास्तरंतिदेवानामोजः प्रथमजह्ये ३ तत्** ॥ इत्यादि ११ ऋचेच्याया हिरण्यसूक्ताचा भावार्थ असा कीं, सुवर्णालंकार धारणापासून पूर्ण शंभरवर्षे आयुष्य, कांति, पुष्टि, सर्वसमृद्धि व देवत्व प्राप्त होतें. राक्षस आणि पिशाच सुवर्णालंकारयुक्त शरीरांत प्रवेश करीत नाहींत. लक्ष्मी नारायणादि देवता घरीं वास करितात. कारण सुवर्ण हें लक्ष्मीचें अधिष्ठान आहे म्हणून लक्ष्मीस हरिणी[1] (सुवर्ण मूर्ति ) ही संज्ञा आहे. यावरून स्पष्ट आहे कीं, सुवर्ण शिल्पापासून चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त होतात. या सुवर्णालंकार शिल्पाविषयीं **श्रीतुकाब्रह्मानंद स्वामीची उक्ति—विश्वकर्ममाहात्म्य अध्याय २९ ओव्या ॥ सुवर्णाचे अलंकार ॥ रत्नखचितमनोहर ॥ तुझियेप्रजेमाजि विचित्र ॥ सुवर्णकार निर्मितील ॥ ६२ ॥ तेवींच रजताचें भूषण ॥ रजतशिल्पनिर्मिती पूर्ण ॥ रजत ऐसें रौप्याभिधान ॥ रौप्य सौवर्ण कर्म एकाचें ॥ ६३ ॥ जेणें भूषणें भूप्रदेशीं ॥ कुरूपी स्त्रिया त्यागिल्या पुरुषीं ॥ त्याची अत्यंत रमविती त्यासी ॥ भूषणें स्त्रियांसी सौंदर्य शोभा ॥ ६४ ॥ संपूर्ण लक्षणी नुसती नारी ॥ विनालंकारी विवसीपरी ॥ अवचितीं दिसे पडतां नेत्रीं ॥ विलक्षणी सालंकारी सलक्षण ॥ ६५ ॥ वस्त्रालंकार परिपूर्ण ॥ विलक्षण तेंचि सलक्षण वस्त्रालंकार परिहीन ॥ प्रेतासमान नरहो नारी ॥ ६६ ॥ तीं तव शिल्पीविचित्रवस्त्र ॥ सौवर्णरौप्य दिव्यालंकार ॥ लक्षणहीनासीसर्वत्र ॥ अर्पिती साचार स्वलक्षणें ॥ ६७ ॥ पंचाळ भेदा सुवर्णकार ॥ सुवर्ण रौप्य शिल्पविचित्र ॥ यथोक्त वर्णिलें ते समग्र ॥ करितील सर्वत्र संतती तुझ्या ॥ ६८ ॥ त्वष्टकांसताम्रकर्मातें ॥ तुझिये संतती माजी तेथें ॥ विस्तारील स्वसामर्थ्यें ॥**

---

१ हरिणी हरितायांच चारु स्त्री व्रतभेदयोः॥ सुवर्णप्रतिमायांचेतिविश्वकोशः ॥ २ सौवर्णराजतंचैवतांम्रपाषाणदारवं ॥ शिल्पत्वसंततौ स्थाता यावत्कालियुगंद्दढं ॥ या प. भू. श्लोकावर टिका आहे.

जाणतूं निरुतेंशिल्पाधिपती ॥ ६९ ॥ लोहशिल्पअतिविचित्र ॥ लोहकर्मामन्वीश्वर ॥ तुझियेसंततीमाजीसमग्र ॥ शस्त्रादिप्रकारनिर्मितील ॥ ७१ ॥ दारू ह्मणजेकाष्ठनामदारव ॥ कृष्णोपकरणादिअपूर्व ॥ निर्मीलसर्वमयाचार्य॥७२॥ एवंतुझीनिजसंतती ॥ पंचाळनाम्नीशिल्पाधिपती ॥ शिल्पविद्यानिपुणक्षितीं ॥ तुझीचप्रतीहोईलपूर्ण ॥ ७३ ॥

या तुकाब्रह्मानंदोक्तीवरून आणि पूर्वोक्त हिरण्यसूक्तावरून स्पष्ट आहे कीं, सर्व शिल्पापेक्षां सुवर्णशिल्पय ज्ञाप्रमाणें अनंत फल देणारें आहे. सुवर्णाचे अलंकार करणारे शिल्पीस मूर्तिकार अशी प्राचीन संज्ञा आहे. आणि सर्वशिल्पाचें मुख्य लक्षण मूर्तिकर्मच आहे. कलियुगांत शस्त्रास्त्रादि इतर शिल्पें शूद्रामध्यें गेल्यामुळें पंचालब्राह्मण बहुतकरून अलंकारादि मुख्य सुवर्णशिल्प करितात. अलंकार हे मूर्तीच्या अवयवाश्रयानें असल्यामुळें मूर्तिशिल्पामध्येंच सुवर्णालंकारशिल्पाचा अंतर्भाव होतो म्हणूनच पंचालब्राह्मण स्वर्णकारास मूर्तिकार संज्ञा आहे. जरी पाषाण, मृत्तिका, काष्ठादि सर्व धातूंच्या मूर्ति करण्यास योग्य आहेत तथापि पाषाणादि सर्वमूर्तीपेक्षां सुवर्ण धातुमूर्तीचा विशेष महिमा आहे. यास प्रमाण—

अग्निपुराण अध्याय ३८ मूर्तिकर्मफलम् ॥ शिवब्रह्मार्कविघ्नेशचंडीलक्ष्यादिकात्मनाम् ॥ देवालयकृतेःपुण्यंप्रतिमाकरणेऽधिकम् ॥ ३१ ॥ प्रतिमास्थापनेयागे फलस्यांतो नविद्यते ॥ मृन्मयाद्दारुजेपुण्यं दारुजादिष्टकाभवे ॥ ३२॥ इष्टकोत्थाच्छैलजेस्याद्धेमादेरधिकंफलम्॥सप्तजन्मकृतंपापंप्रारंभादेवनश्यति३३

अर्थ—शंकर, ब्रह्मा, सूर्य, गणपति, देवी, लक्ष्मी इत्यादि देवांचीं देवालयें केल्यापेक्षां देवमूर्ति करण्याचें अधिक पुण्य आहे, मूर्तिप्रतिष्ठेच्या यज्ञापासून जें फल प्राप्त होतें त्याचा तर अंतच नाहीं. मृत्तिकेची मूर्ति करण्यापेक्षां काष्ठाच्या मूर्तीचें अधिक फल. काष्ठमयमूर्तीपेक्षां विटेची मूर्ति श्रेष्ठ. विटेच्या मूर्तीपेक्षां पाषाणाची मूर्ति श्रेष्ठ. पाषाणमूर्तिपेक्षां सुवर्ण मूर्तीचें अधिक फल आहे, सुवर्णाची मूर्ति करण्यास प्रारंभ केल्याबरोबर सप्तजन्मांचीं पातकें नाश पावतात.

मूर्तिवडविण्याचा विधि—अग्निपुराण अ० ४३ —बलिंदत्वाकर्मशस्त्रंटंकादिकमथार्चयेत् ॥ हुत्वाऽथशालितोयेनास्त्रेणसंप्रोक्षयेच्छिलां ॥ १७ ॥

अर्थ—भक्तबलि देऊन टांकीं, हातवडा वगैरे मूर्ति करण्याच्या शिल्पायुधांची पूजा करून त्याच्या देवतांच्या मंत्रांनीं होम करावा नंतर ज्या द्रव्याची मूर्ति करणें असेल तें सुवर्ण शिलादि द्रव्य अस्त्रमंत्रानें प्रोक्षण करावें. पुढें—

कुदालं टंक शस्त्राद्यंमध्वाज्याक्तमुखंचरेत् ॥ आत्मानंचिंतयेद्विष्णुंशिल्पिनंविश्वकर्मकम् ॥ २६ ॥ शस्त्रंविष्णवात्मकंदद्यान्मुखपृष्ठादिदर्शयेत् ॥

१ मृन्मयी दारु घटिता लोहजा रत्नजा तथा ॥ शैलजा गंधजा चैव कौसुमी सप्तधा तथा ॥८॥ अग्निपु० अ० ४३ अत्र लोहशब्द सुवर्णवाची ॥२ या वचनावरून मृदादिमूर्तिकार शिल्पी विश्वकर्मसंततीयच पाहिजे इतर ग्राह्य नाहीं.

जितेंद्रियःटंकहस्तःशिल्पीतुचतुरस्रकाम् ॥२७॥ रथेस्थाप्यसमानीयसव-स्त्रांकारुवेश्मनि ॥ पूजयित्वाथघटयेत्प्रतिमांसतुकर्मकृत् ॥ २८ ॥

अर्थ–टंकादि शिल्पायुधांचीं मुखें मधूनें आणि घृतानें अभिघार करून मूर्त्यादि करावें. जसे यज्ञामध्यें आचार्य पूज्य असतात तसे मूर्त्यादिपवित्रशिल्पकर्मांत शिल्पाचार्य पंचालही पूज्य आहेत. मूर्तिकर्त्यानें आपल्या आत्म्याचेठायीं विष्णु स्मरण करून पंचाल शिल्पीस प्रत्यक्ष विश्वकर्मा समजून त्यांची पूजा करणें. नंतर त्या संपूजित शिल्पीची टंकादि ( टांकी हातवडा इत्यादि ) दहा शिल्पायुधें विष्णुस्वरूप ( विष्णु-देवताक ) समजून ' इदंविष्णु० ' या मंत्रानें यथाविधि पूजा करावी. नंतर पंचाल सुवर्णकारादि शिल्पीनें मूर्त्यादि पवित्र शिल्प तयारहोईपर्यंत जितेंद्रिय " जसा उपाध्याय यज्ञ जपादि संपेपर्यंत व्रतस्थ राहतो त्याप्रमाणें " व्रतस्थ राहून मूर्ति तयार करावी. सप्तविध मूर्त्यादि शिल्पामध्यें सुवर्णशिल्प पवित्र आहे. सुवर्णधातूचे पवित्रतेविषयीं प्रमाण–

भारत आदिपर्व अध्याय २०९–२१२ श्लोक–यत्सुवर्ण-भगवानग्निरीशःप्रजापतिः ॥ पवित्राणां पवित्रंहि कनकं-द्विजसत्तम ॥ अग्नीषोमात्मकंचैवजातरूपमुदाहृतं ॥

अर्थ—सुवर्ण धातूमध्यें अग्नि, ईशान आणि प्रजापति या तिन्ही देवतांचें साक्षात् वास्तव्य असतें, ह्मणून सुवर्ण हें सर्व पवित्र वस्तूमध्यें फार पवित्र आहे. सुवर्ण हें अग्नीषोमात्मक असल्यामुळें, त्यापासून रूप ( अग्निषोम देवताक चक्षुरिंद्रिय ग्राह्य विषय देवप्रतिमालंकारादि शिल्प ) निर्माण होतें ह्मणून त्या सुवर्णास जातरूप ( जायते रूपं मूर्त्यादिशिल्पमस्मात् ) असें नांव आहे. अग्नीवांचून सुवर्णादि शिल्प तयार होत नाहीं, कारण सुवर्ण हें भौमतेजो नामक अग्नीचेंच एक रूपांतर आहे–प्रमाण–सामवेदीय तांडयमहाब्राह्मणे–" अग्नये हिरण्यं " भाष्यं–हिरण्य प्रतिग्रहे मंत्रमाह--अस्मिन् मंत्रे हिरण्यस्य अग्निरेतोरूपत्वात्संबंधः । अर्थ—अग्निदेवताप्रीत्यर्थ सुवर्णदान करावें, कारण सुवर्ण हें अग्नीचें वीर्य असल्यामुळें तें अग्निरूपच आहे, आणि त्या सुवर्णाच्या मूर्त्यादि शिल्पांचे कर्तेही अग्नीपासून झालेले आग्नेय संज्ञक भृग्वांगिरस कुलावतीर्ण विश्वकर्मसंततीय पंचाल ब्राह्मण शिल्पीच आहेत. असो पंचाल शिल्पीनें सोवळ्यांत असलेल्या वागीश्वरीनामक पवित्र अग्निकुंडांत त्वष्ट्रनामा कर्मवान् ( शिल्पकर्म करणारा ) अग्नि स्थापन करून अग्निः सप्तिं० या सूक्तानें सात आणि विश्वकर्मादि सूक्तांनीं यथासंख्य आज्याहुति देऊन अग्नि सुप्रणीत करावा. ह्मणजे त्या सुप्रणीत अग्नींतून देवब्राह्मणांचीं सुवर्णमूर्त्यलंकारादि शिल्पें निर्विघ्नपणें निपजून निघून शिल्पकर्त्यास आणि करवित्या यजमानास अखंड श्रेयस्कर होतात. या सूक्तानें होम करण्याचा अधिकार ब्राह्मण जातीय विश्वकर्मसंततीय शिल्पींचाच आहे आणि हें सूक्तही शिल्पकर्मासंबंधीं आहे असें त्या सूक्ताच्या भाष्यावरून स्पष्ट समजतें. या सूक्तांत सौचीक ऋषीनें रथमूर्त्यादि शिल्पकर्म श्रेयस्कर होण्याविषयीं शिल्पकर्मकर्त्या

त्वष्टृदेवताक अग्नीची स्तुति केली आहे. असें या सूक्ताच्या प्रथम ऋचेवरून समजतें भाष्यं–अग्निः सप्तिमितिसप्तर्चं द्वादशंसूक्तं सौचीकस्य वैश्वानरस्याग्नेरार्षं त्रैष्टुभमाग्नेयं। अग्निःसप्तिमिति

ऋक्—अग्निःसप्तिं वाजंभरंददात्यग्निर्वीरं श्रुत्यं कर्मनिष्ठां ॥ अग्नीरोदसीविचरत्समंजन्नग्निर्नारींवीरकुक्षिंपुरंधिं ॥ ऋग्वेद अ.८अ०३ सू.१२.

भाष्यं—अयमग्निः सप्तिं सर्पणस्वभावमश्वं वाजंभरं युद्धे शत्रून् जित्वाऽन्नसंपादकं ददाति स्तोतृभ्यः। तथाग्निर्वीरं वीर्यवंतंपुत्रं श्रुत्यं पितृव्यपदेशकं कर्मनिष्ठं यागेऽनन्यचित्तं ददाति। अग्नीरोदसी द्यावापृथिव्यौ समंजन् सम्यगंजयन् विचरत्। विविधं चरति। अयमग्निर्नारीं योषितं वीरकुक्षिं वीरप्रसवकुक्षिं पुरंधिंच करोति।

अर्थ—हा कर्मकृत अग्नि, स्तुति करणाऱ्या उपासकांना वेगानें पळणारा आणि युद्धांत शत्रूंना जिंकून अन्नसमृद्धि करणारा असा अश्व देतो. तसेंच हा अग्नि पराक्रमी कर्मनिष्ठ पुत्राप्रत देतो. आकाशामध्यें आणि पृथ्वीमध्यें अनेक ठिकाणीं संचार करणारा हा अग्नि स्त्रियेला पुत्रवती करितो.

या मंत्राचा आणि " त्वष्टावीरं देवकामंजजान त्वष्टुरर्वाजायत आशुरश्वः " या वक्ष्यमाण त्वष्टृदेवताकमंत्राचा अर्थ एकच असल्यामुळें हा अग्नि शिल्पकर्मवान् होय, हें पुढील मंत्रावरूनही स्पष्ट आहे. या मंत्राहुतीनें मूर्त्यादि कर्मकरण्याविषयीं कौशल्यबुद्धि विशेष वृद्धिपावते आणि कर्म त्वरित तयार होतें.

ऋक् २--अग्नेरप्नसः समिदस्तु भद्राग्निर्मही रोदसीऽआविवेश ॥ अग्निरेकंचोदयत्समत्स्वग्निर्वृत्राणिदयतेपुरूणि ॥

भाष्यं—अप्नसः कर्मवतोऽग्नेः समिद्भद्राऽस्तु। अयमग्निर्मही महत्यौरोदसी द्यावापृथिव्यावाविवेश। आविष्टवान् स्वतेजसा। तथाऽयमग्निरेकमसहायमेवचोदयचोदयति समत्सु संग्रामेषु। युद्धे स्वभक्तं स्वयंसहायः सन् जयिनं करोतित्यर्थः। तथाग्निर्वृत्राणि पुरूणि बहूञ्शत्रून्दयते। हंति।

अर्थ—या शिल्पकर्मवान् अग्नीची समिधा ( इंधन ) कल्याणदायक असो. हा अग्नी स्वर्गीं आणि पृथ्वींत आपल्या तेजानें प्रवेश करिता झाला. तसाच हा अग्नि निराश्रित एकट्यालाच प्रेरणा करून युद्धांत आपल्या उपासकांस सहाय करून जय देतो आणि अनेक शत्रूंचा नाश करितो. ( यामंत्राहुतीनें शिल्पकर्मांतील विघ्नें दूर होतात. ) यामंत्रात ( अप्नसः ) या पदाचा अर्थ शिल्पकर्मवान् असा आहे, यास प्रमाण भास्कराचार्यकृत वैदिक कोश–कर्त्वं कर्तोव्रतंविष्टी शम्मंवेपश्चकर्वरं ॥ शिमीशिल्पंशमीशक्तिर्दंसोऽप्नइतिकर्मणः॥ निघंटामध्येंही असेंच आहे. यावरून सायणाचार्यांनींही शमी विष्टी सुऽ अप्नसः या मंत्रपदांचा अर्थ–( रथ यज्ञपात्रादीनि कुशलकर्माणिकौशलेनकर्माणि कुर्वंत ऋभवः ) ह्मणजे शिल्पकौशल्यकर्मं असाच केला आहे. ह्मणून येथें अप्नसः हें पद कर्मवतःह्मणजे शिल्पकर्मार्थींच आहे.

कारण हें सूक्त रथमूर्त्यादि देवशिल्पकरणाऱ्या ऋभुदेवतोपासक शिल्पींनीं केलें आहे, असें अंतिम ऋचेवरून समजतें ह्मणून प्रकरण वशेंकरूनही अग्नसः हें पद-शिल्पार्थकच आहे.

**ऋक् ७—अग्नयेब्रह्म ऋभवस्ततक्षुरग्निंमहामवोचामासुवृक्तिं ॥**
**अग्ने प्रावजरितारं यविष्ठाग्नेमहिद्रविणमायजस्व ॥ ७ ॥**

**भाष्यं**—अग्नये ब्रह्मस्तोत्रं ऋभवो मेधाविनस्ततक्षुः। अकुर्वन् । वयंचमहामहांत मग्निंप्रति सुवृक्तिं स्तुति मवोचाम । हे यविष्ठ युवतमाग्ने जरितारं स्तोतारं प्रावाप्ररक्ष । हे अग्ने माहिमहद्द्रविणं धनमायजस्व । प्रयच्छेत्यर्थः । अत्रप्रतिवाक्य मग्न्याभिधानंतस्य स्तुत्यत्वप्रदर्शनार्थं ॥

**अर्थ**—रथमूर्त्यादि शिल्पकर्माची सिद्धि होण्याकरितां ऋभु नामक मेधावान् ब्रह्मशिल्पी अग्निप्रीत्यर्थ स्तोत्र करिते झाले, तसेंच आम्हींहीं या महान् अग्नीची स्तुति करितों. हे प्रज्वलित अग्ने स्तोत्र करणारास रक्षण कर आणि पुष्कळ धन दे. या सातें ऋचेच्या प्रत्येक पादारंभीं अग्निपद त्याच्या स्तुत्यर्थ आहे याप्रमाणें या सुप्रणीत अग्नींत देवांचे आणि त्रैवर्णिकांचे यज्ञादि व रथमूर्त्यालंकारादि जें पवित्र शिल्प असेल तेंच पंचाल ब्राह्मणांनीं करावें. देवमूर्ति व तत्संबंधीं अलंकारादि घडतेवेळीं "**ससिंवाजं०**" असें अग्निपदरहित सप्त मंत्र, पठण करीत त्या धातूवर दुग्ध धारा धरावी आणि वागीश्वरी संज्ञक अग्निकुंडांत तापविल्यावर अग्निपदसहित सप्त मंत्र, म्हणून धारा धरून विझवावें " शिल्पकर्म करतेवेळीं अंगाराग्नीवर थोडेंसें दुग्ध शिंपडून आंतील सुवर्णादि धातु शिल्प काढून घेत जावें. याप्रमाणें मूर्त्यादि तयार होईपर्यंत जितके वेळ घडणें व तापविणें होईल तितके वेळ अनुक्रमें अग्निपदरहित व सहित सूक्तांच्या आवृत्ति होतात. एवं पंचाल ब्राह्मणांचा शिल्पकर्म करणेचा विधि संक्षिप्त येथें सांगितला.

हल्लीं या कलियुगांत यज्ञादि पवित्र शिल्पकर्म लोप झाल्यामुळें शूद्र शिल्पकारांचेंही हातून अज्ञान लोक एखादे ठिकाणीं देवप्रतिमा करूत घेतात आणि त्या शूद्र हस्तनिर्मितप्रतिमेची शुद्धि होण्याच्या हेतूनें अर्वाचीन प्रयोगकार याज्ञिकांनीं प्राण प्रतिष्ठेच्यापूर्वीं एकवारच पूर्वोक्त सूक्त अग्निपदरहित सहित म्हणून त्या प्रतिमेवर पयो धारा करितात. या कर्मास अग्न्युत्तारण असें नांव ठेवून प्रतिष्ठेच्या पूर्वीं हा विधि जोडून दिला आहे प्रमाण ( वास्तुशांतिप्रयोगांत ) अद्येत्यादि० **वास्तुपुरुषध्रुवमूर्त्योःघनदोष परिहारार्थं अग्न्युत्तारण पूर्वकं प्राणप्रतिष्ठांकरिष्ये । घृतेनाभ्यज्य**

---

**१. अग्निः ससिं० १ अग्नेरप्न० २ अग्निर्हव्यं० ३ अग्निर्दा० ४ अग्निरुक्थे० ५ अग्निर्विश० ६ अग्नयेब्रह्म० ७ इतिसप्तर्चः**

२ उदकमिश्रित दुग्धधारा. ३ हें दुग्ध उदक मिश्र करून अग्नीवर अव तप्त केलेलें असावें अग्नीवर नुसतें पाणी शिंपडणाऱ्या अज्ञान शिल्पीची संततिहानि होते. सोन्याचा रस निळाचे तेलांत ओतावा. दिव्याचे तेलांत सोनें किंवा अग्नि बुचकळील तर अपमृत्यू होय. अग्नीवर किंवा सुवर्णावर दुग्ध अर्पण केलें तर तेंजव यशोवृद्धि आणि तिळाचें तेल आयुष्यवृद्धि करणारे आहे.

अग्निःसप्तिमिति सूक्तमग्निपदहीनं पठन् पुनःसाग्निपदं पठन् प्रतिमायामुदकं पातयेदित्यादि ॥ हा प्रतिमेचा अग्न्युत्तारण नामक संस्कार ती प्रतिमा संकट समयीं शूद्रहस्त निर्मित असेल तरच करितात. आरंभापासूनच मंत्रोक्तविधीनें पंचाल-ब्राह्मण शिल्पीनें निर्मिलेल्या संस्कृत प्रतिमेस पुनः संस्कार करण्याचें कारण नाहीं याप्रमाणें सुवर्ण मूर्त्यादि देवब्राह्मणांचे शिल्प करण्याचा विधि आहे. शूद्रांचें शिल्प अमंत्रक करावें.

आतां जसें यज्ञांत आचार्याची पूजा करून व दक्षिणा देऊन त्याजपासून श्रेयः संपादन केल्यावांचून यज्ञकर्माचें फल यजमानास मिळत नाहीं त्याचप्रमाणें प्रासाद मूर्त्यलंकारादि शिल्पकर्मांत पंचालदैवज्ञशिल्पाचार्याची पूजा करून व दक्षिणा देऊन त्याजपासून श्रेयः संपादन केल्यावांचून त्या प्रासादमूर्ति गृहालंकारादि शिल्पकर्माचें श्रेय कर्त्यास मिळत नाहीं. म्हणूनच—

अग्निपुराणे अ० ९७प्रतिष्ठाविधौ—वित्तशाठ्यंविनादद्याद्
हिरण्यादि दक्षिणाम् ॥ मूर्तिपान्विधिवत्पश्चाज्जापका
ब्राह्मणांस्तथा ॥ ६३ ॥ दैवज्ञंशिल्पिनंप्राच्यदीनानाथांश्च भोजयेत् ॥

**अर्थ**—वित्तशाठ्य न करितां मूर्तिप्रतिष्ठायज्ञ करणारे जापक ब्राह्मणांस आणि दैवज्ञ शिल्पीस म्हणजे विश्वकर्मसंततीय पंचाल शिल्पीस प्राच्य म्हणजे गोदान, भूदान, हिरण्य इत्यादि महादानें देउन पूजा करावी. नंतर दीन अनाथ ब्राह्मणांस भोजन करवावें. पंचाल शिल्पीपैकीं मूर्ति व तदुपलक्षण अलंकार शिल्प करणारास दैवज्ञ म्हणतात. याचें कारण-दैवं देवसंबंधीं ( मूर्त्यादि देवशिल्पं ) जानातीति दैवज्ञः । म्हणजे देवसंबंधीं मूर्त्यादि शिल्प जाणतो तो दैवज्ञ. यास प्रमाणही आहे तें असें कीं, ज्योतिशास्त्र वेत्त्यास दैवज्ञ म्हणतात. ज्योतिःशास्त्राचे आठ अधिकार आहे. त्यांपैकीं शिल्पकौशल्य शास्त्रसंहिता हा एक अधिकार आहे. अर्थात् ज्योतिःशास्त्राच्या अष्टमाधिकाराचे ( शिल्पशास्त्राचे ) वेत्ते म्हणून मूर्तिशिल्पज्ञास दैवज्ञ म्हणतात. आठ अधिकारापैकी एक अधिकार जरी जाणत असेल तरी त्यास दैवज्ञ म्हणावें म्हटलें आहे श्लोक—

( ज्योतिःशास्त्रे ) व्यक्ताव्यक्तभूगोलवासनसमतः सिद्धांतआ
दिस्ततोहोराशाकुनसंहितास्वरविधिश्चूडामणिर्विस्तरः ॥
सामुद्रोऽथकुमारकौशल मिमानष्टाधिकारान्जगुर्दैवज्ञाः
परमेष्ठिसूर्ययवनाः खेमेघमालाजगुः ॥ १ ॥ कृत्स्नस्यज्योतिः
शास्त्रस्यत्रयएवस्कंधाः ॥ संहितास्कंधोगणितस्कंधोहो
रास्कंधश्चेतितत्रसंहितास्कंधादनेकभेदाः ॥

**अर्थ**—ज्योतिः शास्त्राचें मुख्यत्वें संहितास्कंध गणितस्कंध आणि होरास्कंध असे तीन स्कंध केले आहेत. पैकीं प्रथमच्या संहितास्कंधांतून अनेक भेद उत्पन्न झाले आहेत त्यांतच प्रासाद मूर्त्यादि शिल्पाविषयीं देश, काल, मूर्तिकर्मादि प्रमाणविद्या,

वास्तुविद्या, मूर्तिप्रतिष्ठादि शिल्पशास्त्रही सांगितलें आहे. तिन्ही स्कंध मिळून अष्टाधिकार केले आहेत ते—भूगोल स्थिति १ गणितसिद्धांत २ होराशास्त्र ३ शकुन ४ संहिता ५ स्वरशास्त्र ६ सामुद्रिक ७ आणि शिल्पकौशल्यशास्त्र ८ असे अष्टाधिकार जो जाणतो त्यास दैवज्ञ ह्मणावे हे अष्टाधिकार ज्योतिःशास्त्र ब्रह्मादिकांनीं कथन केलें आहे. ह्मणून मूर्तिकार शिल्पीस दैवज्ञ ह्मटलें आहे.

यज्ञकर्मापेक्षां शिल्पकर्माचें फल विशेष आहे कारण यज्ञकर्मानें पुनरावृत्तिकारक स्वर्गलोक मात्र प्राप्त होतो. आणि मूर्त्यादि शिल्पकरणाऱ्या पंचालांना तर त्या मूर्त्यादि शिल्पकर्मानें जन्ममरण दुःखरहित अक्षयसुखाधिष्ठान असा वैकुंठ लोक प्राप्त होतो यास प्रमाण.

**अग्नि पुराण अध्याय ३८—श्लोक—इष्टकाचयविन्यासोयावं त्यब्दानितिष्ठति ॥ तावद्वर्षसहस्राणितत्कर्तुर्दिविसंः स्थितिः॥ ४८ ॥ प्रतिमाकृत्विष्णुलोके स्थापकोलीयतेहरौ ॥**

**अर्थ**—शिवविष्णूचें देवालय केलं असतां देवालयास जितक्या विटा असतील त्या प्रत्येक विटेबद्दल हजार वर्षे स्वर्गवास अश्या मानानें जितक्या विटा देवळास असतील तितकीं वर्ष सहस्रें देवालय करणारे पंचाल आणि करविणारे यजमान हे स्वर्गी वासकरून तें देवमूर्ति निर्माण करणारे कुशल पंचाल शिल्पी वैकुंठ लोकीं अक्षयीं वास करितात आणि मूर्ति स्थापक ( द्रव्यखर्च करून स्थापना करणारे ) विष्णुरूपांत लीन होतात. यावरून स्पष्ट आहे कीं, चयन,प्रासाद मूर्त्यादि शिल्पकर्म यज्ञ स्वरूप आहे. यज्ञयोगापेक्षां शिल्पयोगाचें फल श्रेष्ठ आहे कारण यज्ञानें स्वर्गसुख प्राप्त होतें आणि प्रासादमूर्त्यादि शिल्पक्रियेनें अक्षय वैकुंठवास प्राप्त होतो, ह्मणूनच नारायणाचे प्राप्तीस शास्त्रांनीं जितके मार्ग सांगितलें आहेत, तितक्या मार्गामध्यें शिल्पक्रिया योग प्रथम सांगितला आहे, यास प्रमाण

**भागवत स्कंध ३ अध्याय ३२ क्रिययाक्रतुभिर्दानैस्तपःस्वाध्यायमर्शनैः ॥ आत्मेंद्रियजयेनापि संन्यासेनचकर्मणां ॥ ३४ ॥ योगेनविविधांगेन भक्तियोगेनचैवहि ॥ धर्मेणोभयचिन्हेनयः प्रवृत्तिनिवृत्तिमान् ॥ ३५ ॥**

**टीका**—शास्त्रमार्गानेव प्रपंचयति क्रिययेति त्रिभिः ॥ क्रियया पूर्तरूपया क्रतुभिर्यागैः मर्शनं मीमांसा। आत्मेंद्रियजयो निषिद्धवर्जनम् ॥ ३४ ॥ उभयचिन्हेन सकामनिष्काम लक्षणेन तमेवाह यइति सकाम धर्म प्राप्यं स्वर्गाद्यपि भगवतएव सगुणस्वरूपमितिभावः ॥

**अर्थ**—सकाम आणि निष्काम अशी धर्माची दोन लक्षणें आहेत सकाम धर्मानें ईश्वर प्राप्त होण्याचे मार्ग—पहिला क्रियायोग ह्मणजे देवालयमूर्ति, कूप, तलाव, आरामगृह, अलंकारादि शिल्पकर्म पंचालशिल्पींकडून सशास्त्रविधीनें केलें असतां नारायणाची प्राप्ति होते. तसेच यज्ञयागादि कर्म आचार्याकडून यथाविधीनें करणें,

हिरण्यादिदानें, तप, वेदशास्त्राभ्यास आणि मीमांसोक्त वेदांतविचार या उपायांनीं वैकुंठाधिपति सगुण भगवान् प्राप्त होतो. आणि अष्टांग योग, संन्यासधर्म, भक्तियोग या योगानीं निराकार निर्गुण भगवान् प्राप्त होतो. तथापि मूर्तिपूजात्मक कर्मयोगरूप सगुणें भक्तीवांचून नैष्कर्म्यरूप निर्गुण ब्रह्म प्राप्तीस दुसरा मार्गच नाहीं. ह्मणूनच जनकराजानें आविर्होत्रास प्रश्न केला—**कर्मयोगंवदतनःपुरुषोयेनसंस्कृतः॥ विधूयेहाशुकर्माणि नैष्कर्म्यं विंदतेपरम् ॥ ४१ ॥ भागवत स्कंध** ११ अ. ३ यावरून आविर्होत्रमुनींने जनकराजास कर्मयोग ( शिल्पकर्मजन्य मूर्ति पूजाविधि ) सांगितला. तेव्हां कर्म योग पर्यायनाम क्रियायोग अर्थात् **"शिल्पंस्त्रुवे क्रियायोगे"** या विश्वमेदिनीकोशोक्ती वरून शिल्पास क्रियायोग संज्ञा आहे, कारण शिल्पजन्य देवमूर्ति ध्यानादिकापासून पूजकास योगाप्रमाणें समाधि सुखाची प्राप्ति होते. शिल्प हें समाधिसुखाचें साधन अशी शिल्प शद्बाची व्युत्पतीच आहे. शील् **समाधौ** ( शील या परस्मै धातूचा अर्थ समाधि लावणें असा आहे ) म्हणून—

**यत् शीलति समादधाति तत् शिल्पं ( कौशलं ) व्हस्वादेशः कृत्पप्रत्ययांतो निपात्यते ॥**

अर्थ—जें शीलति म्हणजे समाधि लावतें तें शिल्प अर्थात् समाधि सुखदायक देवमूर्ती प्रासादादि शिल्पकर्म होय. व शिल्पाचे कर्ते जे पंचाल शिल्पी ते परम भगवद्भक्त महावैष्णव जाणावेत, कारण विश्वकर्म संततीय पंचाल शिल्पींच्या हृदयांत ( **विष्लृ व्याप्तौ इति धातोः** ) सर्वव्यापक विष्ण्वादि सर्व देवमूर्ति, रूपमंडनादि शिल्पशास्त्राच्या अध्ययनानें सशास्त्र सालंकार पूर्ण ठसून, वसत असल्यामुळें ते पंचाल शिल्पी, ज्यांच्या भजन पूजनानें भक्तांस ब्रम्हानंदसुख प्राप्ति होते अशा ईश्वराधिष्ठानात्मक सुवर्ण रत्नपाषाणादि भौमतेजोमय मूर्ति सालंकार व्यक्त करून देऊन ब्राह्मणादि सर्व वर्णांस भक्तिमार्गास लावून कृतकृत्य करितात, ह्मणूनच ब्राह्मणादि सर्व वर्णांनीं वास्त्वादि यज्ञांत विश्वकर्मसंततीय पंचाल शिल्पी पुरोहिताप्रमाणें अग्रपूज्य आहेत इतकेंच नव्हे तर परलोकींही शिवविष्णु इंद्रादि देवांनींसुद्धां शिल्पकर्माचे आदिमध्यांतीं विश्वकर्मा आणि त्यांचे मनुमयादि पांच पुत्र यांच्या पूजा केल्या आहेत. प्रमाण—

**ब्रह्मवैवर्त पुराणें कृष्णजन्मखंडे राधाकृष्णसंवादे अध्याय ४७**
**कृष्णउवाच—अथ शक्रस्यवृत्तांतंपरमंशृणुसुंदरी ॥ पापघ्नंपुण्य बीजंतंसव्यस्यकथयामिते ॥ १ ॥ * * * * योजयामाससत्कारंनिर्मातुममरावतीम् ॥ पूर्णमब्दशतंत्वष्टानिर्ममेरुचिरांपुरीम् ॥**

---

१ भक्तिः परे शानुभवोविरक्तिरन्यत्रचैष त्रिकएककालः ॥ प्रपद्यमानस्य यथाऽश्नतः स्यु स्तुष्टिः पुष्टिः क्षुदपायोऽनुघासम् ॥ ४२ ॥ इत्यच्युतांघ्रिं भजताऽनुवृत्याभक्तिर्विरक्तिर्भगवत्प्रबोधः ॥ भवंतिवै भागवतस्यराजंस्ततः परांशांतिमुपैतिसाक्षात् ॥ ४३ ॥ भा. स्कंध. अ. २ ॥ २ आत्मानंतन्मयं ध्यायन्मूर्तिसंपूजयेद्धरेः॥ शेषामाधाय शिरसास्वधाग्न्युद्धास्यसत्कृतं ॥ एवमग्न्यर्कतोयादौवतिथौहृदयेचयः। यजतीश्वरमात्मानमचिरान्मुच्यते हिसः ॥ अ. ३

॥ ३७ ॥ नानारत्नविचित्राढ्यांमणिरत्नैंद्रनिर्मितां ॥ मनोहारां निरुपम्यांदृष्ट्वातुष्टस्तयाहरिः ॥ ३८ ॥ विश्वकर्माणमानीय प्रिय. मुक्त्वाशतक्रतुः ॥ दत्वारत्नानिसंपूज्यतंप्रस्थापितवान्गृहम् ॥ ३९ ॥

अर्थ—श्रीकृष्ण राधेला इंद्राचीकथा सांगतात, त्यांत विश्वरूपाच्या ब्रह्महत्येपासून मुक्त होऊन इंद्र स्वर्गास आल्यावर शचीला आणि सर्व देवांना आनंद झाला. त्या कालीं इंद्राच्या सत्कारार्थ विश्वकर्मयानें नानारत्नमय उपभारहित दिव्य अमरावती निर्माण केली ती अमरावती पाहून इंद्र संतुष्ट होतसाता विश्वकर्म्याची स्तुति करून पूजा केली आणि अनेक रत्नें देऊन स्वाश्रमास पाठविता झाला.

याचप्रमाणें विश्वकमर्मयांनीं द्वारका निर्माण केली, त्या काली मनु मयादि पांच पुत्रांसहित विश्वकर्म्याची षोडशोपचार पूजा करून त्यांना श्रीकृष्ण द्वारकेंत आपल्याजवळ नेहमी राहविता झाला. श्रीविश्वकर्मा आणि त्यांचे मनुमयादि पांच पुत्रयांची पूजा केली असतां लक्ष्मी आणि मेधा प्राप्त होते प्रमाण पद्मपुराणें भूखंडे—पंचाभिःसहितः पुत्रैर्विश्वकर्मागिरींद्रजे ॥ द्वारकावासिभिर्नित्यंश्रीकामैःपूज्यतेसदा ॥ ३७ ॥-

अर्थ—हे पार्वती मनु, मय, त्वष्टा शिल्पी, तक्षा, या पांच पुत्रासहित विश्वकर्म्याची पूजा लक्ष्मी प्राप्तीच्या इच्छेनें द्वारकावासी जन नित्य करितात. तसेंच स्कंदोत्पत्ती करितां पार्वतीच्या इच्छे प्रमाणें शिवमंदिर आणि सुवर्णरत्नादि अलंकार निर्माणकरण्याकरितां मनुमयादि पांच पुत्रासहित विश्वकर्म्याची षोडशोपचार पूजा केली याविषयीं प्रद्मपु० भू० अ० २५

विश्वकर्माकथंसूत वासुदेवेनपूजितः॥कथंवाशंकरेणैतद्विस्तरेणप्रकीर्तयेति ॥

अर्थ—श्रीकृष्णांनीं आणि शंकरांनीं सपुत्र विश्वकर्म्यांची पूजा कोणत्या विधीनें केली, तो विधि आह्मांस विस्तारें करून सांगा. असा शौनकांनीं प्रश्न केल्यावर सूतऋषि, विश्वकर्म्यादि पुजेचा वैदिक विधि.आणि तांत्रिक विधि सांगते झाले. ती कथा सविस्तर असल्यामुळें थोडक्यांत येथें लिहितों --

पद्म पु. भू. अध्या. २८ महादेवउवाच—विश्वकर्मन्नमस्तेऽस्तु विश्वचित्तविभावन ॥ ७३ ॥ विभावयममाभीष्टंगृहालंकरणादिकम् ॥ त्वत्कृतांभोगसामग्रीमुपादायमहामते ॥ ७४ ॥ भोक्ष्यामिविविधान्भोगानिहामुत्रचयोजितः ॥ एवमुक्त्वामहादेवोविश्वकर्माणमद्भुतम् ॥ ७५ ॥ अष्टाक्षरेणमंत्रेण पूजयामाससादरम् ॥ सांगंसावरणंदेवंशिल्पानामीश्वरंप्रभुं ॥ ७६ ॥ ततःस्वेष्टंगृहारामालंकाराद्यान्सवान्सुखम् ॥ पंचभिस्तनयैःसार्धंविश्वकर्मातदाशिवम् ॥ ७७ ॥ तोषयामासशिल्पैःस्वैस्ततस्तुष्टोमहेश्वरः ॥ कार्यांतेपूजयामासततस्तान्शिल्पिसत्तमान् ॥ ७८ ॥ वासोभिरन्नपानैश्चधनैर्नानाविधैरपि ॥ वरांश्चतेभ्यःप्रत्येकंददौदुःखहरोहरः ॥

॥ ७९ ॥ अक्षयंसंतातिर्वोऽस्तुयशःस्फीतंतथाऽस्तुवः ॥ युष्मांश्च-स्मरतःसंतुसंपदश्चपदेपदे ॥ ८० ॥ इत्युक्त्वातान्महादेवोविस-र्ज्यचयथाक्रमम् ॥ प्रासादेरमयामासपुत्रकामामुमांसतीम् ॥ ८१॥

अर्थ—शंकरानें यथाविधि विश्वकर्म्याचें आराधन केल्यानंतर विश्वकर्मा प्रकट होता झाला. त्यास शंकर म्हणतो—हे विश्वकर्मन् हे अतर्क्य जग निर्माण कर्त्या तुला नमस्कार असो. तूं माझ्या इच्छे प्रमाणें दिव्यमंदिर आणि अलंकारादि निर्माण कर त्वां केलेल्या गृहालंकारादि भोगसामग्रीचा अंगिकार करून मी या लोकीं आणि परलोकीं नाना प्रकारचीं सुखें भोगीन. असें बोलून शंकर अष्टाक्षरमंत्रानें विश्वकर्म याच्या अंगदेवता आवरणदेवतासहित शिल्पाधिपति सर्वेश्वर विश्वकर्मा जो त्याची आदरें करून पूजा करिता झाला. मग आपल्या पांच पुत्रांसहित विश्वकर्मयानें शिवपार्वतीच्या मनोरथाप्रमाणें गृहालंकारादिक सिद्धकरून देऊन आपल्या शिल्पकौशल्यानें शंकराप्रत संतुष्ट केलें. नंतर सर्वांचें दुःख हरण करणाऱ्या शंकरानें स्वकार्यांतीं विश्वकर्म्याची आणि त्याच्या मनुमयादि पांच शिल्पींद्रांची अन्न,पान, वस्त्र द्रव्यदक्षिणादि नानाविध उपचारांनीं पूजा करून,त्या प्रत्येकास वर दिले ते असे–तुमची संतति अक्षय राहील कीर्ती वृद्धिगत होईल. आणि तुमचें जे स्मरण करतील त्याना पदोपदीं संपत्ति प्राप्त होतील. असे वर देऊन त्यांना सत्कार पूर्वकनिरोप दिला. नंतर त्या विश्वकर्मादि निर्मित प्रासादामध्यें श्रीशंकर पुत्रेच्छा करणाऱ्या पार्वतीप्रत रमविता झाला. यावरून शिव, विष्णू, इंद्र इत्यादि देवतांनींही पंचाल ब्राह्मणांची पूजा केली आहे ह्मणूनच प्राचीन पासून गृह निर्माण करणें. उपनयन, विवाह, मूर्तिप्रतिष्ठा इत्यादि कर्माचे ठायीं ऋत्विक् ब्राह्मणांच्यापूर्वीं पंचाल ब्राह्मणांची अन्नवस्त्रादिद्वारा पूजा करण्याची सशास्त्र रुढीही आहे. ज्यांना संतती संपत्यादि कृतकर्माचें फल प्राप्त होण्याची इच्छा असेल त्यांनीं पूज्य बुद्धीनें पंचालशिल्पींना आणि ऋत्विक् ब्राह्मणांना यज्ञयागादि शांतिक पौष्टिक सर्व प्रकारच्या कर्मोत्सवाचे ठायीं अन्नवस्त्र दक्षिणांतोपचारांनीं संतुष्ट करावें.

शंका—जरी शिल्पकर्ते पंचाल हे ब्राह्मण असल्यामुळे पूज्य आहेत तरी हल्लीं पंचालास ज्यापेक्षां प्रायःलोक त्यांना ब्राह्मण न ह्मणतां पंचाळ सोनार ह्मणतात, त्यापेक्षां, अमरकोशांतलि शूद्रवर्गांत सांगितलेले शूद्रजातीय सोनार, तांबट, सुतार, लोहार, गवंडी यांना जरी पंचाल संज्ञा नाहीं तरी सोनार या सामान्य नामाचाच पंचाल सोनार हा विशेष नाम पोटभेद समजून शूद्रवर्गोक्त अपूज्यांत कां गणूं नये?

उत्तर—अमरकोशाचे शूद्रवर्गांत सांगितलेल्या स्वर्णकारादिकांची उत्पत्ति शूद्रकमलाकर ग्रंथांतील जातिनिर्णय प्रकरणीं सांगितली आहे, त्यांचा संबंध पंचालाकडेस नाहीं. हे त्या शूद्रकमलाकर ग्रंथोक्त सविस्तर शूद्रजाति निर्णय प्रकरणांतहि पंचाल या ब्राह्मण जातिवाचक शब्दाचा उल्लेख बिलकूल नसल्यावरून स्पष्ट आहे. असें असूनहि सांप्रत जरी पंचाल ब्राह्मणांस कसबावरून पडलेलें सोनारादि सामान्य नाम देतात तथापि जसा जोशी या सामान्यनामाचाच भट्ट जोशी हा विशेष नाम

पोटभेद समजून त्यास कुडमुड्या जोश्याच्या अपूज्य शूद्र जातीय जोशांत अ
णीत नाहींत, तसेंच सोनार या सामान्य नामाचा पंचाल सोनार हा पोटभेद
त्यास शूद्र वर्गोक्त शूद्र सोनारांत गणूं नये. कारण पंचाल हा शब्द ब्राह्मण
आहे. शूद्र वाची कोठेंच सांगितला नाहीं. आणि पंचाल हा शब्द ब्राह्मणजात्य
न्न आहे. ह्मणूनच पंचाल लोकांस तुमची जाति, धर्म उपासना काय? असें
असतां ते सांगतात. आमची जाति पंचाल ब्राह्मण, धर्म वेदोक्त, उपासना-
वागीश्वरी, धंदा-सुवर्णादि पवित्र शिल्प. इत्यादि आपलें परंपरा सत्य आहे
गतात. ह्मणून पंचाल ब्राह्मणांस जरी व्यवहारांत पंचाल सोनार ह्मणतात तरी
जोश्याप्रमाणें अग्रपूज्य आहेत.

**प्रश्न**—ब्राह्मण जोशी आणि कुडमुडे जोशी यांच्या धर्मांत भिन्नता आ
पंचाल ब्राह्मण ' ह्मणविणारे पंचाल स्वर्णकारादिक आणि शूद्रकमलाकरांतील
वादि शूद्रस्वर्णकारादिक, यांच्या धर्मांत भिन्नता काय आहे? सांप्रत पंचाल हे
आहेत असें कशावरून ओळखावें.

**उत्तर**—ज्या सोनार जातींत मांस खातात. दारू पितात. विधीनें गळ्य
नवी नसतात. एका हातानें राम राम करितात. पाठ लागतात. पुराणोक्त
लतात ते सोनार शूद्र कमलाकरांत सांगितलेले शूद्र जाणावेत. आणि ज्या
रांत हिंसा नाहीं. अभक्ष्य भक्षण नाहीं. अपेयपान करीत नाहींत. परजातीचे
दक सेवन करीत नाहींत. आपल्या अन्नोदकास अन्य जातीयाचा स्पर्श झाव
तां त्या अन्नोदकाचा त्याग करितात. गर्भाधानादि षोडश संस्कार षट्कर्मे
समंत्रक करितात. आर्षेयगोत्रें असून भिन्नगोत्रांनीं विवाह होतात स्त्रियांचा पु
होत नाहीं. स्वजातीस दोनी हात जोडून नमस्कार करितात. पंचाल उपाध
नच आपलीं हव्यकव्य कर्मे करितात. आठवे वर्षी उपनयन करितात. अग्निहो
सन्यास घेतात. इत्यादि ब्राह्मण धर्म प्राचीनपासून भूतभविष्य वर्तमानादि
ज्यांच्यामध्यें आहे, ते विश्वकर्मसंततीय पंचाल शिल्पी जात्या ब्राह्मण जाणावे

**शंका**—सुवर्णादि शिल्पकर्म करण्याकरितां ब्राह्मणजातीय शिल्पीच कश
हिजेत पंचाल शिल्पीकडूनच जर शिल्पकर्म करावें असें असते. तर शू
स्वर्णकारादिक शिल्पी कशा करितां सांगितले?

**उत्तर**—ज्या शिल्पकृतीच्या बस्तु वेदमंत्रांनीं तयार कराव्या लागतात
संस्कार करावा लागतो, तीं शिल्पकर्मे करण्याकरितां ब्राह्मण जातीय शिल्पीच
आणि अवैदिक ( वैदिक धर्मबाह्य ) शिल्पकरण्याकरितां शूद्र शिल्पी सांगितले
उदाहरण—तंतु तयार करण्याकरितां जरी कोष्टी असतात, तथापि वेदमंत्रविध
करावयाचीं जानवीं, विष्णवादि पवित्रारोपणें, रक्षा कौतुकसूत्रें, चवदा गाठींच

१ श्रुत्यादि वचनावरून भूतकाळीं आणि ' नंदांतं क्षत्रियकुलं, अशी ब्रह्मकुलास उच्छेव
ल्यामुळें भविष्यकाळीं आणि द्रविड, तेलंगादि सर्व देशीं सर्वत्र व्याप्त असल्यामुळें वर्तमान
ह्मणून, ' नवीन आहे, अशी शंका घेऊं नये.

हीं शिल्पें पंचाल ब्राह्मणांनींच केलीं पाहिजेत. मोळाची दोरी वळणें किंवा कूर्च ( कुंचले ) करणें, हें प्राकृत असतां अंत्यजाचें काम आहे. परंतु ब्रह्मचारी बटूची मौंजी मेखला आणि अग्निहोत्रींचें कूर्च, रज्जु, दर्भासनें, पवित्रकें, शूर्प, मृगचर्मव्यजनादि हीं शिल्पें पंचाल ब्राह्मणांनींच केलीं पाहिजेत. तसेंच शूद्रादिकांची अभक्ष्यापेयपानाचीं भांडीं शूद्र जातीय तांबटानें अगर कुंभारानें घडावीत. परंतु यज्ञांतील कपालें. चरुस्थाली, आज्यपात्रें देवांचीं उपकरणीं वगैरे पंचाल ब्राह्मणांनींच केलीं पाहिजेत, कारण- "**अचक्रवर्तीमशूद्रकृतामूर्ध्वकपालामग्निहोत्रस्थालीं**" इति हिरण्यकेशीसूत्रें आधानें ३ प्रश्ने ७ पटले इत्यादि श्रुति, वचनें आहेत. तसेंच असंस्कार्य घरें, बंगले, मकानें, काटवटी, डावा, रेकले, तांगे, बैलगाड्या वगैरे शूद्र जातीय बढई सुतारांनीं केलीं असतां हरकत नाहीं. परंतु त्रैवर्णिकांचीं घरें, राजवाडे, देवालयें, देव्हारे, मठ, योगपीठ, वाजपेय यज्ञप्रयोगोक्त मंत्रांनीं तयार करावयाचे रथ, यज्ञशाला, स्रुक् स्रुवादि यज्ञपात्रें इत्यादि वैदिक काष्ठशिल्पें पंचाल ब्राह्मणहस्तनिर्मितच पाहिजेत. तसेंच शूद्र व यवनजातीय राजांचे खंदक, किल्ले, तट, आसुरी प्रतिमा इत्यादि पाषाण शिल्पें शूद्रजातीय व यवन जातीय गवंड्यांनीं करावींत. परंतु ज्यांचे ठायीं वेदमंत्रांनीं वास्तु व प्राणप्रतिष्ठादि करावें लागतें. अशा शिव, विष्णु, देव्यादि देवमूर्ति, देवालयें, तीर्थोदकांचे कूप, वापी, पुण्यसरोवर, वाट बांधणें, क्षत्रियांचे दुर्गादि रचना, क्षेत्ररचना, ग्रामरचना, तपोवनादि आरामरचना इत्यादि पाषाण शिल्पें पंचालब्राह्मणोपदेशानें केलीं पाहिजेत. तसेंच शूद्रादिकांचीं विठांनी बांधून काढावयाचीं शिल्पें शूद्रजातीय मृछिल्पकारानें करावींत. परंतु यज्ञकुंड, मंडप, यज्ञवेदी, त्रैवर्णिकांचीं विवाहोपनयनवेदी ( बहुलें ) चयनयज्ञाचे मंत्रयुक्त प्राणभृत् अपानभृत् इष्टकोपधानादि ( विठांनीं बांधून काढावयाच्या यज्ञभूमि अथवा पक्ष्याकृति यज्ञकुंड रचना, पार्थिव गणपति पार्थिव लिंगे, सर्वतोभद्र मंडलादि रचना हीं मृदादि शिल्पें पंचाल ब्राह्मणांनींच केलीं पाहिजेत. तसेंच यवनादि राज्यांच्या तरवारी, बंदुका वगैरे शस्त्रें आणि कोयते खुरपीं फाळें वगैरे शूद्रांचीं हत्यारें शूद्र लोहारानें अगर विसाड्यानें करावींत परंतु ज्या शस्त्रास्त्रांत आथर्वण वेदोक्त मंत्रांनीं अग्निसूर्यादि देवता व त्यांचीं तेजें स्थापन करावीं लागतात अशीं देवांचीं, ब्राह्मणांचीं आणि क्षत्रियांची धनुष्य, बाण, खड्ग, चक्र, वज्र, त्रिशूल, गदा, पाश, इत्यादि शस्त्रास्त्रें पंचालब्राम्हणांनीच केलीं पाहिजेत, तसेंच धर्मबाह्य लोकांचें अथवा ऐंताळू विक्री करितां बाजारांत मांडून ठेवावयाचें सुवर्णरौप्यादि अलंकारशिल्प शूद्रजातीय सुवर्णकारांनीं करावें. परंतु "अग्निःसप्तिं०" इत्यादि वेदमंत्रांनीं अग्निस्थापन केलेल्या आणि "**जातवेदसे पावकानः सरस्वती०**" इत्यादि मंत्रांनीं पूज्य अशा वागीश्वरी नामक अग्निकुंडांतून तयार करावयाच्या सुवर्णादि धातूंच्या देवमूर्ति, देवांचे त्रैवर्णिकांचे अलंकार हे पवित्र सुवर्णशिल्प ( **आयुष्यंवर्चस्यं०** या वेदमंत्रांनीं धारण करावयाचें ) आणि पंचविधशिल्प संहितेचें अध्ययन करून दैवज्ञवृत्ति हीं पंचालब्राह्मणांनीच केलीं पाहिजेत.

हीं पूर्वोक्त पंचालब्राह्मणांनीं करावयाचीं पंचविध सुवर्णादिशिल्पें यज्ञकर्मरूप पवित्र आहेत यास प्रमाण

**स्कंदपुराण नागरखंड अध्याय ६ अयस्कातिर्मनूनांचमयानांदारुकर्मच ॥ त्वष्टृणांताम्रकर्माणिशिलाकर्मचशिल्पिनाम् ॥१३॥ सौवर्णतक्षकाणांचपंचकर्माणितानिवै ॥एतेपंचैकरूपाश्चयज्ञकर्मपराःस्मृताः॥ १४ ॥**

**अर्थ**—सानगगोत्रोत्पन्नमनूचे लोहकर्म सनातन० मयाचें काष्ठकर्म, अहभून० त्वष्ट्याचें ताम्रशिल्प. प्रत्न० शिल्पीचें शिलाशिल्प आणि सुपर्ण० तक्षांचे सुवर्णशिल्प हीं पंचालांचीं पंचविध शिल्पें त्यांनीं यज्ञ संबंधीं, देवसंबंधीं करावींत.

आतां कोणीं अशी शंका घेतील कीं हल्लींचे पंचाल शूद्रादिक सर्वजातीचे सर्वशिल्प करितात. तर ही शंका घेण्यास सवड नाहीं. कारण सांप्रतकालीं या कलियुगांत यज्ञयागांदि वैदिक कर्माचा प्रायः लोप झाल्यामुळें जसे उदरनिर्वाहार्थ बहुधा सर्व ब्राह्मण आपलें तपःश्रुत स्वाभाविक ब्रह्मकर्म सवडीप्रमाणें करून शूद्रादिकांचेही अमंत्रक कर्मे करून हजारी जपास अमुक एकादशिनीस अमुक असा दर ठरवून अनेक दुष्ट प्रतिग्रहही घेतात. तसेच पंचाल ब्राह्मणही हल्लीं या कलियुगांत यज्ञयागादि त्रैवर्णिकांच्या पूर्वोक्त पवित्र शिल्पांचा प्रायः लोप झाल्यामुळें आणि कित्येक पवित्र शिल्पही शूद्र शिल्पीकडून लोक घेऊं लागल्यामुळें, कित्येक पंचालब्राह्मणही हल्लीं आपलें वैदिक देवशिल्प, यज्ञशिल्प स्वाभाविक ब्रह्मकर्म यथाशक्ति करून परान्नोदक सेवन न करितां आपला ब्राह्मणधर्म संभाळून उदरनिर्वाहार्थ शिल्पकर्माच्या संभावनेचे दर ठरवून अप्रणीत अग्नीवर शूद्रादिकांचींही शिल्पकर्मे करितात म्हणून त्यांच्या ब्राह्मणजाति बोधक पंचाल संज्ञेचा कांहीं लोप झाला नाहीं. पंचाल प्रसिद्ध आहेत.

**शंका**—पंचाल ब्राह्मणांची लोह, काष्ठ, ताम्र, पाषाणादि पांच प्रकारचीं शिल्पें असून सांप्रत ते प्रायः सुवर्ण रत्नादि शिल्पच करणारे दिसतात याचें कारण काय?

**उत्तर**—जेव्हांपासून चंयन वाजपयादि यज्ञकर्माचा लोप झाला. विजयरथांत बसून युद्ध करण्याची चाल मोडली, क्षत्रिय धर्माचा लोप होऊन राजे शूद्र व यवन होते झाले त्या कालापासून खटाऱ्या गाड्या, मसीदी वगैरे करण्याचा प्रसंग आल्यामुळें पंचालांनीं काष्ठशिल्प सोडिलें. शस्त्राचा उपयोग पशुहिंसा गोहत्यादि दुष्टकर्माकडे राजे करूं लागल्यामुळें लोहशिल्प सोडिलें. मांसपाचनाकडे वगैरे भांड्याचा उपयोग करूं लागल्यामुळें ताम्रकर्मही प्रायः सोडिलें. याच प्रमाणें परिचारकाच्या सहायावांचून न होणारें अथवा सशक्तपणावाचून न होणारें, मूर्तिशिल्प खेरीज करून दुर्गादि कठोर पाषाण शिल्प प्रायः सोडून दिलें. परंतु सर्व प्रकारच्या शिल्पग्रंथाचें अध्ययन सुवर्ण पाषाणादि सर्व धातूंच्या देवमूर्ति आणि मूर्तिशिल्पाच्या अंगभूत असलेलें सुवर्ण रौप्य रत्नादि अलंकारशिल्प हीं ब्राम्हणहस्तानिर्मितच ग्राह्य व पूज्य आहेत म्हणूनच पंचाल ब्राह्मण पंचशिल्पसंहिताध्ययन सुवर्णादि देवमूर्ति आणि मूर्त्युपलक्षण सुवर्णालंकार या पवित्र शिल्पानें सांप्रत आपली उपजीविका करितात.

शंका—आपण सांगितलें कीं ज्यांच्यांत उपनयनादि संस्कार होतात ते पंचाल ब्राह्मण जाणावे परंतु कांहीं देशांतील बहुतेक लोहकाष्ट शिल्पकर्ते सोनार सुतार आह्मीं पंचाल ब्राह्मण आहों असें ह्मणतात मात्र परंतु ते व्रात्य ( संस्कारहीन आचारभ्रष्ट ) होत आहेत. मग ब्राह्मण्याचा अभिमानका.

उत्तर—" **ब्राह्मणो हीनसेवया** " ( नीचसेवेनें ब्राह्मण भ्रष्ट होतो ) जे कांहीं देशांतील पंचाल विशेष द्रव्य लोभास्तव हीन जातीचेही काष्ठ लोहादि शिल्प करून उपजीविका करूं लागले आहेत ते कांहीं कांहीं पंचाल ब्राह्मणच काय पण सर्वच प्रकारचे कित्येक देशांतील ब्राह्मण या कलींत व्रात्य झाले आहेत. यास प्रमाण—भागवत **स्कंध १२ अध्याय १ श्लोक ३८ सौराष्ट्रावंत्या भीराश्च शूराअर्बुद मालवाः ॥ व्रात्याद्विजा भविष्यंति शूद्रप्राया जनाधिपाः ॥** ३८ ॥ अर्थ—सौराष्ट्र ( सुरतेकडचादेश ) अवंतीदेश ( उज्जयिनीप्रांत ) आभीर ( ज्या देशांत गवळी पुष्कळ तो वऱ्हाड वगैरे ) शूर ( राजपुताना देश ) अर्बुद ( अबू पर्वताच्या पहाडावरील देश ) आणि माळवा या देशांतील सर्व प्रकारचे ब्राह्मण व्रात्य ( उपनयनादि संस्कार न करणारे आचारभ्रष्ट ) आणि राजे शूद्राप्रमाणें होतील असें द्वापारांतीचें भविष्यच आहे. तथापि ते व्रात्य ( " **संस्कारहीना भटमारव--नरा व्रात्या भवंत्युत्तमवंशजाऽअपि** " यामुहूर्तमालोक्तीवरून ज्यास भटमारही ह्मणतात, ते असंस्कृत ) असूनही आम्ही उत्तम ब्रह्मण आहों असा स्वकीय ब्राह्मण्याचा अभिमान बाळगून जसे आचारशील ह्मणविणाऱ्या दक्षिणी ब्राह्मणाचे पाणीं सुद्धा पीत नाहींत. तसेंच पूर्वोक्त देशांतील व्रात्य झालेले पंचाल सोनार सुतारही आम्ही पंचाल ब्राह्मण आहों असा स्वधर्माचा अभिमान बाळगून इतर ऋषि ब्राह्मणास ब्राह्मण्याच्या नात्यानें श्रेष्ट मानीत नाहींत. याचें कारण " **जरी ब्राह्मण झाला भ्रष्ट । तरी तिहीं लोकीं श्रेष्ठ** " अशी सदुक्ति आहे आणि दुसरें कारण—व्रात्य ब्राह्मणांच्या भ्रष्ट जातीसही व्रात्यस्तोम नामक यज्ञ केला असतां शुद्ध होऊन उपनयनाधिकारी होतां येतें. असो, सांप्रत भटमारादि व्रात्य ब्राह्मणांची जाति निराळी होऊन त्यांच्यांशीं आचारसंपन्न इतर ब्राह्मण जसे अन्नोदक व्यवहार ठेवीत नाहींत, तसेंच व्रात्य पंचाल ब्राह्मणांचीही जाति निराळी होऊन त्यांच्यांशीं पंचद्रविड पंचालब्राह्मणस्वर्णकार अन्नोदक व्यवहार ठेवीत नाहींत. तथापि स्वधर्मात्मक पंचालधर्माच्या आपल्या ब्राह्मणत्वाचा अभिमान सर्वांनीं धरणें योग्य आहे.

शंका—देवमूर्त्यादि पवित्र शिल्पकर्म जरी पंचालब्राह्मणांची वृत्ति सशास्त्र आहे तथापि त्या शिल्पवृत्तीनें शूद्रही उपजीवन करितात. याचें कारण काय ? आणि जी विद्या शूद्रादिकांमध्यें गेली ती विद्या आणि त्या शिल्पविद्येवर उपजीवन करणारे अपूज्य होण्यास काय हरकत ?

उत्तर—शिल्पविद्या ही विश्वब्रह्म वंशस्थ ब्राह्मणांची मुख्य वृत्ति खरी; परंतु " **तेजानिमित्तें फिरणें रवीला** " इत्यादि प्रमाणें ज्या ज्या वृत्ति अथवा वस्तु, प्राणी पूर्वी तेजस्वी ( उत्कृष्ट ) असत, तितक्यांचें बहुत करून परस्पर शापादि कारणांनीं

या कलियुगांत महत्व कर्मीं झालें आहे. तसेंच या शिल्पकर्मास दुर्वास ऋषीचा शाप आहे कीं, " कलियुगांत शिल्पकर्म शूद्रादिक सर्व लोक शिकतील " ह्मणूनच सर्वलोक शिल्पविद्येनें उपजीवन करिताहेत; परंतु या योगानें शिल्पविद्या किंवा शिल्पकर्मोपजीवी पंचाल ब्राह्मण अपूज्य होतील असें कोणीं समजूं नये; कारण दोष दृष्टीनेंच पाहूं लागलें तर निर्दोष वस्तु त्याला त्रैलोक्यांत दिसणार नाहीं. पहा चंद्रास कलंक, सूर्यास भ्रमण, विष्णूस गर्भवास शंकरास नर-कपालीं भिक्षा इत्यादि देवादिकांसही कर्मवशात् जरी लांच्छनें दिसतात तथापि चंद्र, सूर्य, विष्णु, शंकरादिक जसें सर्वपूज्य आहेत. इतकेंच नव्हे तर शापाच्या योगानें गायी विष्टा भक्षण जरी करितात तरी त्याच पूज्य आहेत. तसें शिल्पकर्मविद्या जरी अन्यजातीचे लोक करितात आणि महिषी वगैरे अन्यपशू जरी पुष्कळ दूध देतात तथापि गायीप्रमाणें ब्राह्मणजातीय पंचाल शिल्पीच पूज्य आहेत. कारण सूर्य, अग्नि, ब्राह्मण, गायी, वैष्णव, इत्यादि नारायणाची अकरा अधिष्ठानें असल्यामुळें भगवद्भावनेनें पूज्य आहेत. ह्मणून शिल्प जरी शूद्रांत गेले तरी त्यायोगानें पंचाल अपूज्य होत नाहींत आणि शिल्पविद्याही भ्रष्ट होत नाहीं. पहा शापास्तव सर्वच विद्या सरस्वती नीचाघरीं वास करित्ये, ह्मणून शिष्ट लोकांनीं विद्याभ्यास सोडिला आहे काय ? नाहीं. तसेंच पंचालांनींही शिल्पशास्त्राध्ययन व मूर्त्यादि शिल्पकर्म सोडिलें नाहीं शिल्पविद्या ही जरी सर्वत्र आहे तरी अग्नीसारखी पवित्र आहे, ह्मणून ब्रह्मविद्योपलक्षण शिल्पकर्म करणारे पंचाल ब्राह्मण पूज्य आहेत. भ्रष्ट नाहींत. उदाहरणें--**संगीत पारिजातग्रंथांत--" संगीतं वैदिकैर्वाक्यैर्बोधितं ब्राह्मणाःसदा ॥ कृत्वैहिकं तथामोक्षं प्राप्नुवंतित्वरान्विताः ॥ अग्निहोत्रं तथाकार्यं गानकार्यं तथैवहि ॥ वेदोक्तत्वात्स्मृतिप्रोक्त कर्तव्यत्वान्मनीषिभिः ॥ ४ ॥** अर्थ--संगीतविद्या आणि अग्निहोत्रकर्म हीं " **सामशद्बवाच्यस्यगा** " **नस्य स्वरूप मृगक्षरेषु क्रुष्टादिभिः सप्तभिःस्वरैः । अक्षरविकारादिभिश्चनिष्पाद्यते । क्रुष्टः १प्रथमः २ द्वितीयः ३ तृतीयः ४ चतुर्थः ५ पंचमः ६ षष्ठश्चेत्येते सप्त स्वराइति सामवेदसंहितायां नवमाध्याये द्वितीयपादे प्रथमाधिकरणे प्रथमवर्णके साम शद्बस्यगानमात्रवाचित्वं स्मारितामिति भाष्यम्** ) इत्यादि वैदिक वाक्यांनीं स्पष्ट केलें असल्यामुळें त्याचा अभ्यास करण्याचा अधिकार ब्राह्मणांसच आहे. असें असून यवन, घडशी वगैरे लोकही गायन विद्येवर वंशपरंपरा उपजीविका करीत असल्यामुळें गवई ह्मणवितात म्हणून ब्राम्हण जातीय गवई वगैरे अपूज्य होतात काय ? आणि गानवाच्य सामवेद भ्रष्ट होतो काय ? नाहीं. तसेंच "**ज्योतिर्निबंधांत-वेदस्यचक्षुः किलशास्त्रमेतत्प्रधानतांगेषुततोऽर्थजाता ॥ अध्येतव्यंब्राह्मणैरेवतस्माज्जोतिःशास्त्रंपुण्यमेतद्रहस्यम्** " म्हणजे ज्योतिःशास्त्रवेदाचे अंग ( डोळे ) असल्यामुळें ते ब्राम्हणांनींच

शिकवावें. इतरानीं शिकूं नये, अशी स्पष्ट मनाई असूनही शूद्रादि लोक ज्योतिःशास्त्र शिकवितात म्हणून गावोगांवचे भट्ट गांव जोशी शूद्राप्रमाणें मानावेत अथवा ज्योतिःशास्त्र भ्रष्ट होतें असें नाहीं, एवढेंच नव्हें तर ऋग्वेदादि संहिता, भाष्ये यांचा जर्मनी यूरोप-एतद्देशीय युरोपियन पंडितानीं व्यासंग करून भट्ट मोक्षमूलर, भट्टकिलहार्न अश भट्टपणाच्या पदव्या मिळविल्या, तथापि हिंदुस्थानांतील ब्राम्हणजातीय भट्ट आणि वेद वेदांगें जशीं सर्व पूज्य आहेत. तसेंच "अणृगयनादिभ्यः[1]४।३।७३ या पाणिनि सूत्रांत सांगितलेल्या ब्राह्मणोपजीविकेच्या वेदवेदांगविद्येंतच[2] वास्तुविद्या ( पर्याय नाम शिल्पविद्या[3] ) गणिली असल्यामुळें तिचे अधिकारी ब्राह्मणजातीय पंचाल शिल्पीच पूज्य आहेत. सर्व शिल्पकर्म शूद्रादिकांत गेल्यामुळें जरी अर्वाचीन निबंधकारानीं ब्राह्मणांस शिल्पोपजीवन प्रतिषिद्ध ह्मटलें आहे तथापि विश्वकर्मसंततीय पंचाल ब्राम्हणांच्या ब्राह्मण्याला तें पवित्र शिल्प गौणत्व आणण्यास कारण न होतां, तें शिल्प पंचालाचें ब्राह्मण्यास विशेष हितावह आहे; कारण शिल्पकर्मविद्या ही पंचालांचें आदिब्रह्म जो विश्वकर्मा त्याचे वरप्रसादानें आणि शिवप्रसादानें प्राप्त झालेली असून त्यांची परंपरा प्राप्त स्वकर्मवृत्ति आहे. ह्मणून शिल्पकर्तेपंचाल मुख्य ब्राम्हण, वैदिकवत् सर्वपूज्य आहेत. करण ज्या लक्ष्मीची फक्त कृपादृष्टि होण्याकरितां ब्रह्मादिकादेवानाहीं अनेक तपें करावीं लागतात, त्या लक्ष्मीची प्राप्ति, मनुमयादिसहित विश्वकर्म्याची पूजा केल्यानें होते, याचें कारण "विष्णुश्चविश्वकर्माचनभिद्येतेपरस्परं॥ पद्मपु० भूखंडे"॥ आणि "विश्वकर्मामनुस्त्वष्टा ॥ विष्णुसहस्रनाम" आणि "ऱ्हीःश्रीश्चतेपत्न्यौ॥ तै०अरण प्रपा- ३ अनु० १३" या विश्वकर्मदेवताक श्रुतीवरून आणि याच श्रुतीला अनुलक्षून असलेल्या "लक्ष्मीसरस्वतीभ्यांच संक्षालितपदद्वयम्" ॥ या पद्मपुराण भूखंडोक्त विश्वकर्मध्यानाच्या स्मृतीवरून विष्णु[4] विश्वकर्मा यांत भेदनाहीं, दोघांचे समानैश्वर्य आहे ह्मणून "श्रीर्यत्पदांबुजरजश्चकेमतुलस्या

---

१ ऋगयन । पदव्याख्यान । छंदोमान । छंदोभाषा। छंदोविचिंत्ति । न्यांय । पुनरुक्त । निरुक्त । व्याकरण । निगम । वास्तुविद्या। क्षत्रविद्या। अंगविद्या । विद्या । उत्पात । उत्पाद । उद्याव । संवत्सर। मुहूर्त । उपनिषद् । निमित्त । शिक्षा भिक्षाइत्यृगयनादिः गणपाठे॥ २ वेदाचे पाय छंदःशास्त्र, हस्त, कल्प, चक्षुः, ज्योतिःशास्त्र, कर्ण, निरुक्त, नासिका, शिक्षा, मुख व्याकरण हीं ६ वेदांगें ॥ ३ शिव्यापासून रूपाविषय, रूपांचें ग्राहक चक्षुःरिंद्रिय, आणि चक्षु स्थानीय ज्योतिःशास्त्रात्मक शिल्पविद्या आहे ह्मणून शिल्पविद्येस वेदांगत्व आणि शिल्पज्ञास दैवज्ञसंज्ञा. ४ विश्वकर्मा विष्णुस्वरूप आहे ॥ चक्रं हस्तिकास्मेहा शंखंच जलपात्रकं ॥ गदाच स्फटिकंचैव पद्मंचेत्कर्तरीमुखं ॥ श्रीवत्सटंक मित्युक्तं वसनी वेणुरुच्यते ॥ चापंच कुंडली मुद्रा शेष कृष्णाजिनंभवेत् ॥ लक्ष्मीरुपं हिरण्यंस्यादिश्वलोकोपकारकं॥ शेषोपकरणं चैवसर्वदेवाभावेदिति ॥ विश्वसंरक्षणार्थाय विश्वकर्माभवेदिति ॥ मनुसूले शिल्पशास्त्रे

लब्ध्वापिवक्षसिपदंकिलभृत्यजुष्टं ॥ यस्याःस्ववीक्षणकृतेऽन्यसुरप्रयासस्तद्वयं चतवपादरजःप्रपन्नाः ॥ ३७ ॥ भा० स्कं० १० अ० २९" यावचनावरून दुष्प्राप्यलक्ष्मी श्रीविष्णुपूजनानें प्राप्त होण्यास योग्य असूनही श्रीविश्वकर्मपूजेनें प्राप्त होते यास प्रमाण शंकर म्हणतात-"पंचभिःसहितःपुत्रैर्विश्वकर्मागिरींद्रजे ॥ द्वारकावासिभिर्नित्यंश्रीकामैःपूज्यतेसदा ॥ पाद्मेभू०"या श्लोकांतील रहस्य हेंच कीं ज्यापेक्षां लक्ष्मीचा पति श्रीकृष्ण साक्षात् द्वारकेंत श्रेष्ठत्वें राहात असूनही द्वारकावासी जन लक्ष्मी प्राप्ती साठीं श्रीविश्वकर्मयाची व तत्पुत्र मनुमयादी देवपंचालांची पूजा करीत होते, त्या पेक्षां अष्टसिद्धि नवनिधिरूप लक्ष्मी प्राप्त होण्यास मुख्यत्वें श्रीविश्वकर्मयाचीच उपासना प्राधान्य असून श्रीशिवविष्णूसही मान्य आहे. श्रीविश्वकर्मपूजेनें द्वारकावासी लोकांस ऐश्वर्य प्राप्त झालें तें-दिव्यालंकारवासोभिर्दिव्यस्रगनुलेपनैः ॥ द्वारका वासिनोभांतिविश्वकर्मप्रसादतः ॥ २२ ॥ निधयोनवपद्माद्याःसिद्धयोऽष्टाणिमादयः ॥दासदास्यश्चसर्वेषांप्रत्येकंद्वारकौकसां ॥ २३ ॥ प.भू.अ.२१ यावरून श्रीविश्वकर्मयाच्या प्रसन्नतेनें पूजकांस दिव्यरत्नादि अलंकार, वस्त्रें, माला, अनुलेपनें सौगंधिक इत्यादि लक्ष्मी सहित नवनिधि अष्टमहासिद्धिही प्राप्त होतात. तस्यधीराः परिजानंतियोनिं ॥ तै. अ. प्र.३ अनु १३ ॥" याश्रुतीवरून आणि श्रुतीस अनुलक्षून असलेल्या-पंचालास्तेसदापूज्याःप्रतिमाविश्वकर्मणःरुद्रया.वास्तु"आणि "आत्मानंचिंतयेद्विष्णुंशिल्पिनंविश्वकर्मकं अग्निपुराण ॥अ॥.४६ ॥ इत्यादि स्मृतींवरून त्या विश्वकर्मयाची साक्षात् प्रतिमा भूविश्वकर्मे पंचालशिल्पीही संतती संपत्यादि कल्याण लक्ष्मी प्राप्तीची इच्छा करणाऱ्या सर्व लोकांहीं पूज्य आहेत. यास प्रमाण

तस्माच्छिल्पिवरान्नित्यं पूजयंति विचक्षणाः ॥ तेहिकांक्षंति
कल्याणं गृहिणां जीवनार्थिनः॥ ३ ॥ पद्मपु०भू० अ० २१

अर्थ--देवादिकही लक्ष्मीप्राप्तीस्तव मन्वादिपांच पुत्रासहित विश्वकर्म याची पूजा करीत होते; ह्मणूनच ब्राह्मणादि सर्व जाणते लोक पंचाल ब्राह्मण शिल्पींची नित्य पूजा करितात; कारण पंचाल हे काया वाचा मनें करून ब्राह्मणादि सर्व वर्णांचें नेहमी कल्याण चिंतन करून आशीर्वाद देतात कीं ज्यांचें शिल्प करून आम्ही जगतो, ते ब्राह्मणादि सर्व वर्ण चिरकाल सर्व संपत्तींनीं युक्त असोत. ह्मणून जे निरंतर सर्वांचें शुभचिंतक व ज्यांचे सदोदित सौभाग्यवासना ते पंचाल ब्राह्मण, निरंतर हिताचिंतक मातापितयाप्रमाणें, शुभाऽशुभप्रतिग्रहाशाबद्ध नित्यातृप्त याज्ञिक ब्राह्मणांच्या पूर्वीं पूज्य आहेत.

शंका--या लोकीं विप्रर्षिवंशस्थ ब्राह्मणांसही विश्वकर्मसंततीय शिल्पी पूज्य असण्याचें कारण काय?

उत्तर—याचें कारण पूर्वोक्त " **तस्माद्ब्राह्मणाद्यपेक्षयाशिल्पिनः पूजनीयाः** " या भाष्यांत सांगितलें असून श्रीतुकाब्रह्मानंदस्वामींनींही आपल्या विश्वकर्ममाहात्म्य ग्रंथांत भारतोक्त व हरिवंशोक्त " **बृहस्पतेस्तु भगिनी** " या विश्वकर्मोत्पत्ति कथित श्लोकांच्या टीकेंत लिहितात—अध्याय १४ प्राकृत ओव्या

**कलौदेव सचेतन ॥ वर्णत्रयासी ब्राह्मण ॥ ब्राह्मणा पूज्य शिलास्वर्ण ॥ प्रमुख निर्माण सुरप्रतिमा ॥ ९ ॥ शिला स्वर्णादि निर्मित ॥ देवमूर्तीसी समस्त ॥ मातृपितृसुभक्तवत ॥ मुख्यदेवत शिल्पी पूज्य ॥ १० ॥ शिलास्वर्णादिसुप्रतिमा ॥ प्रतिष्ठाकालीं शिल्पिसत्तमा ॥ तदर्थपूजावेपूजकोत्तमा ॥ तेणें प्रतिमा सुप्रसन्न॥११॥ शिल्पिद्वारेंशिलादिप्रतिमा॥ पूजितां संपूज्य विश्वकर्मा ॥ शिल्पीविश्वकर्मणःप्रतिमाः ॥ युगत्वधर्मानुरूपतत्कर्म ॥ १२ ॥**

या ओंव्यांचा भावार्थ- ब्राह्मणादि तिन्ही वर्णांस ब्राह्मण हे साक्षात् दैवत आहे आणि त्या ब्राह्मणांस शिला स्वर्णादिक प्रतिमा पूज्य आहेत आणि त्यादेवप्रतिमांचेही निर्माण करणारे जे विश्वकर्मसंततीयपंच'लक्षिल्पी ते मातापितयाप्रमाणें मुख्य दैवत, ब्राह्मणांसही पूज्य आहेत याविषयीं **श्रुतियजुर्वेद अ. ४ प्र. ६ अ. २।३**

**योनःपिताजनिता योविधाता योनः सतो अभ्यासज्जजान ।**

**भाष्यं**—यः विश्वकर्मा नः अस्माकं पिता पालयिता न केवलं पालकः उत्पादकोऽपि । किमनेनास्माकं उत्पादक इति संकोचेन यः विधाता सर्वस्य जगतः उत्पादकः यः विश्वकर्मा नः अस्माकं उत्पन्नानां सत् वर्तमानमिदं भोग्यजातं सतो जजान सदेव सोम्य इति श्रुत्युक्तात् स्वस्वरूपात् उत्पादयामासेति ॥

यांत यज्ञकर्ते ऋषि ह्मणतात,हे विश्वकर्मन् तूं आमचा पिता आहेस एवढेंच नव्हे, तर सर्व जगाचा उत्पन्न कर्ता आहेस. याचअभिप्रायाची आणली **श्रुति ऋग्वेद अ० ८ अ. २ व. ८ ऋक् १० उतमाता बृहद्दिवा शृणोतु-नस्त्वष्टा देवेभिर्जनिभिः पितावचः॥ ऋभुक्षावाजोरथस्पतिर्भगोरण्वः शंसःशशमानस्य पातुनः ॥**

**भाष्यं**—उतापि बृहद्दिवा महद्दिवेतियास्कः महती दिवा दीप्तिर्यस्याः सा माता देवमाता नोऽस्माकमाव्हानं शृणोतु । तथा देवेभिर्देवैरिंद्रादिभिर्जनिर्देवपत्नीभिश्चपिता सर्वेषां त्वष्टा—एतन्नामकोऽस्मदीयं वचः शृणोतु तथर्भुक्षा इंद्रो वाजस्तत्सहायो वाजोनाम सौधन्वः कनीयान् रथस्पतिः रथस्य पति र्भगश्चतथारण्वो रमणीयः शंसः स्तुत्यो मरुद्गणश्च ततः शंसमानस्य शंसमानं स्तोतॄन् नोऽस्मान् पातु रक्षतु।

**अर्थ**—स्तोत्रकर्ते ऋषि यज्ञार्थ देवतांचें आव्हान करितात-मोठी आहे प्रभा जिची ती देवमाता आमचें आव्हान ( यज्ञाकरितां केलेलें बोलावणें ) श्रवण करो. तसेंच इंद्रादि देव आणि देवपत्नी यांसहित सर्वांचा पिता जो त्वष्टा प्रजापति ( विश्वकर्मा ) आमचें आव्हानवाक्य श्रवण करो. तसेंच इंद्र आणि त्या इंद्रास सहाय करणारा रथनिर्माण कर्ता सुधन्व ऋषीचा कनिष्ठपुत्र वाज नामक रथकारदेव आणि सूर्य तसाच स्तवन करण्यास योग्य असा मरुद्गण या सर्वदेवता आम्हा स्तोत्रकर्त्यांप्रत रक्षण करोत.

यावरून स्पष्ट आहे-जसा देवशिल्पी त्वष्टाविश्वकर्मा पूर्वीच्या अग्निहोत्री ऋष्यादिकांना पूज्य असे, तसें सांप्रतही सर्व ऋषिवंशीय ब्राह्मणांलाही त्या त्वष्टाविश्वकर्म याच्या कुलांत उत्पन्न झालेले पंचाल संज्ञक ब्राह्मणजातीय शिल्पी पूज्य आहेत.

कोणी ह्मणतील कीं, हल्लींचे विश्वकर्मसंततीय पंचाल शिल्पी पूर्वीच्या विश्वकर्मयाप्रमाणें सामर्थ्यवान् नाहींत. मग मुख्यत्वें कसें पूजावेत? तर असें ह्मणूं नये; कारण ब्रह्मा,[1] वसिष्ट,[2] विश्वामित्र,[3] गौतमादि[4] प्राचीन ऋषिब्राह्मणा प्रमाणें हल्लींचे त्या ऋषींच्या वंशांतील वेव्हारीजोशी वगैरे ब्राह्मण जसे आपल्या पूर्वज ऋषीप्रमाणें सामर्थ्यवंत नसूनही जसे पूज्य आहेत तसें युगानुरूप कर्म करणारे पंचालही पूज्य आहेत. युगानुरूप असलेल्या ब्राह्मणादिकांना निंदूं नये यास प्रमाण—बृहत्पाराशरस्मृति अध्याय १

**युगे युगेच ये धर्मा स्तेषु धर्मेषु ये द्विजाः॥ तेषां निंदा न कर्तव्या। युगरूपा द्विजोत्तमाः ॥ ३० ॥**

अर्थ—कृतादि युगायुगाचे ठायीं जे धर्म त्या धर्मांचेठायीं जे ब्राह्मणादि द्विज त्यांची निंदा करूं नये, कारण युगानुरूप असलेले ते ब्राह्मण त्या त्या युगाचे ठायीं उत्तमच आहेत ह्मणून प्राचीनाप्रमाणें हल्लींचे पंचालही पूज्य आहेत.

शंका—सर्वशाखांच्या ब्राह्मणांना वास्त्वादि यज्ञांत पंचाल शिल्पी पूज्य आहेत. परंतु विश्वकर्मसंततीय पंचाल ब्राह्मणांच्या गृह्य हव्य कव्यादि स्वधर्मसंबंधीं कर्मांत इतर ऋषिवंशस्थ ब्राह्मणांस उपाध्यायपणा नाहीं याचें कारण काय?

उत्तर—याचें कारण पूर्वीचे श्रुतींत सांगितलेच आहे कीं ब्राह्मणांस पूज्य ज्या देवमूर्ति त्यांचे कर्ते पंचाल ब्राह्मण इतर शाखीय ब्राह्मणांला, मातापितृवत् पूज्य आहेत तथापि कृतयुगामध्यें " **मनुष्यास्तुतदाशांतानिर्वैराः सुहृदः समाः॥ यजंतितपसादेवं शमेन च दमेनच** " भा. स्कं. ११ अ. ५॥ यावरून सर्व परस्परांस परम पूज्य मानीत असत. परंतु जेव्हां पासून " **रजसाघोरसंकल्पाः कामुका अहिमन्यवः॥ दांभिकामानिनः पापा विहसंत्यच्युतप्रियान्॥ स्कं. ११ अ. ५** " या श्लोकाप्रमाणें ब्राह्मण असूयाभिमानी होऊन शाखाभेद झाले तेव्हांपासून स्वशाखीय ब्राह्मणाकडून आपआपलीं गृह्यकर्मे करूं लागले. ह्मणूनच पंचाल ब्राह्मण शिल्पींचे हव्यकव्य करणारे तच्छाखीय पंचाल उपाध्यायच असतात. अन्यशाखीय ऋषीवंशस्थ ब्राह्मणांस स्वधर्मसंबंधीं आपल्या गृह्य कर्मांत उपाध्यायपणाच्या नात्यानें किंवा हक्कानें मानीत नाहींत. व इतर ब्राह्मणही पंचालापासून पूजा घेण्याचें इच्छीत नाहींत. हा प्राचीनपासून असलेला सांप्रदाय उभयपक्षींही कल्याणकारक आहे. कारण " **यत्रसप्तर्षीन्परएकमाहुः** " या वक्ष्यमाण श्रुतीवरून पंचालांचा मूळपुरुष विश्वकर्मा सप्तऋषींहून पर ( श्रेष्ठ ) असून " **वाचस्पतिंविश्वकर्माणमूतये** " या श्रुती-

---

१ ब्रम्हदेवानें ब्रम्हांड निर्माण केलें तद्वंशस्थ आतां करितात काय? २ वसिष्ठानें शेष, सूर्य आणि मेरू आणिला त्या वसिष्ठाचे गोत्रज आतांचे ब्राह्मण तसे सामर्थ्यवान् नाहींत. ३ विश्वामित्रानें प्रतिसृष्टि निर्माण केली त्याचे गोत्रज आतां करतील काय? ४ गौतमानें नित्य साळी पि [illegible] वून दुष्काळांत ब्राह्मण राखिले त्याचे गोत्रज अन्नसत्रांत कां जेवतात.

वरून विश्वकर्मा देवाचा आचार्य असल्यामुळें त्यास बृहस्पति संज्ञा आहे. त्या देवपुरोहित विश्वकर्म बृहस्पतींचे कुलांत उत्पन्न झालेले पंचाल ब्राह्मण शिल्पी "**बृहस्पतिर्ब्रह्मणोऽधिपतिः**" ( बृहस्पतिर्ब्राह्मणजातीनामधिपतिरितिभाष्यं ) या यजुः श्रुतीवरून सर्व प्रकारक ब्राह्मणजातीमध्यें श्रेष्ठ आहेत. ह्मणूनच शिल्पशास्त्रामध्यें शिल्पिपूजन विधींत ह्मटलें आहे श्लोक—

**शूद्रकोटिसहस्राणामेकविप्रः प्रतिष्ठितः ॥ विप्रकोटिसहस्राणा मेकशिल्पीप्रतिष्ठितः ॥ १ ॥**

अर्थ—हजार कोट शूद्रांस भोजन दिल्याचें श्रेय एका सांग वेदाध्ययन करणाऱ्या विप्रास भोजन दिल्यानें मिळतें. आणि हजार कोट विप्रभोजनाचें श्रेय एक विश्वकर्मसंततीय पंचाल शिल्पीच्या भोजनानें मिळतें. म्हणूनच "**भुंजंतस्तेच भुंक्तेऽसौशंकरस्त्रिदशैःसह**" यापूर्वोक्त शिल्पशास्त्रोक्तवचना वरून वास्त्वादि कर्मांत पंचालास भोजन दिलें असतां सर्व देवांसहित शंकर तृप्त होतो. याचें कारण पंचाल हे परशिव विश्वकर्मस्वरूप असून जशा गाईच्या देहावयवांचे ठायीं ब्रम्हादि देवता वास करितात तशाच पंचाल शिल्पीच्या शरीरावयवांचे ठायीं ब्रम्हादि देवता वास करितात यास प्रमाण—

**स्कंदपुराणे प्रभासखंडे सोमनाथमहात्म्ये सोमपुत्रसंवादे शिल्पिनामुत्पत्तिप्रकरणे ॥ ईश्वरउवाच ॥ शिल्प्युत्पत्तिंप्रवक्ष्यामि शृणुषण्मुखयत्नतः॥ विश्वकर्मामहद्भूतं शिल्पिनां शिवकर्मणाम्॥१६॥ मदंगेषुचसंभूताः पुत्राः पंचजटाधराः ॥ हस्तकौसलसंपूर्णाः पंचब्रह्मरताः सदा ॥ १७ ॥ पाणिस्थापक संजाता ममतुल्याश्चशिल्पिनः ॥ संध्यात्रयंप्रकुर्वंति स्नानदानादितर्पणम् ॥ १८ ॥ वैश्वदेवं बलिर्दानं षट्कर्माणीतिशिल्पिनां ॥ शिवार्चनरतानित्यं जपहोमादि कर्मसु ॥ १९ ॥ एवंविधाक्रियाख्याता शिल्पिनांच वशंकर ॥ विश्वकर्मपराणांच ब्रह्मविष्णुशिवात्मनाम् ॥ २० ॥ तत्रसूत्रंसमाख्यातं विश्वसूत्रंस्वयंभुवा ॥ प्रासादभुवनादीनिलिंगस्थापनमेवच ॥ २१ ॥ प्रतिष्ठापंचधाकार्याशिल्पिनाशिवकर्मणा ॥ ब्रह्मस्थानेभवेद्ब्रह्माललाटेचाग्निमादिशेत् ॥२२॥ चंद्रादित्यौनयनयोर्नासायामश्विनौतथा ॥ मुखेब्रह्मासपुत्रश्चकंठेदेवो जनार्दनः ॥ २३ ॥ हृदयेचेश्वरोदेवो नाभौगंधर्वदेवता ॥ गुह्येकामेश्वरोदेवः पादयोर्वायुदेवता ॥ २४ ॥ पादाधोवरुणोरक्षेदंगुलीषुचमातृकाः ॥ भुजयोः कृष्णगोपालावग्रतः शेषतक्षकौ ॥ २५ ॥ मणिबंधेमहामायाचांगुलीर्धीश्वरीकृतिः ॥ एवंविधिः**

---

१ पृष्ठेब्रम्हागले विष्णुर्मुखे रुद्रःप्रतिष्ठितः ॥ मध्येदेवगणाः सर्वे रोमकूपे महर्षयः॥ नागाः पु. इत्यादि.

**समाख्यातः शिल्पिनोंऽगेषुपण्मुख ॥ २६ ॥ इति स्कं. पु. प्र. खंडे सोमनाथमहात्म्ये प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥**

**अर्थ**–कोणे एके काळीं कैलास पर्वताचे ठायीं शंकर, पार्वती, गणपती आणि स्कंद यांसहित अंतराळीं लोंबणाऱ्या झोंपाळ्यावर बसले असतां गणपतीचा रत्नखचित दंत, शिवप्रासाद व निराधारीं झोंपाळा आणि पार्वतीच्या गळ्यांतील मुक्ताहार अवलोकन करून स्कंदानें प्रश्न केला-हे ईश्वरा हे दिव्य पदार्थ कोणीं निर्माणकेले. त्या काळीं ईश्वर विश्वकर्मसंततीय शिल्पीची उत्पत्ति सांगतात–हे स्कंदा देव शिल्पी विश्वकर्मा ही माझीच विभूति ( ऐश्वर्य ) आहे " म्हणूनच पुनः सजीव केलेला दक्षप्रजापति स्वकृत " " शिवस्तोत्रांत म्हणतो–**रूद्राक्षमाल्यांबरधरो गिरिको गिरिकाप्रियः॥ शिल्पीशः" "शिल्पिनांश्रेष्ठः सर्व शिल्पप्रवर्तकः ॥ २५२ ॥ वायुपुराण अ. ३० दक्षकृतशिवस्तुतौ** " ( शिव म्हणतो ) माझ्या पंचमुखापासून जटाधारी पांच पुत्र उत्पन्न झाले, हे हस्तकौशल्य शिल्पकर्मांत निपुण असून सद्योजातादि पंच ब्रम्हध्यानांत तत्पर असतात. म्हणून पांच शिल्पी हे माझ्या मूर्ति जाणाव्या, कारण ते शिवोपासक असून संध्या, जप, होम, वैश्वदेव बलिदानादि कर्मानुष्ठान शिवप्रीत्यर्थच करितात. पंचाल शिल्पी हे ब्रम्हविष्णुशिवात्मक असून विश्वकर्मस्वरूप आहेत. प्रासाद, गृह, लिंग मूर्त्यादि शिल्पसूत्र विश्वकर्म्यानें निर्माण केलें. त्यांनीं आपल्या शिल्पांची पांच प्रकारें स्थापना केली आहे. देव मूर्त्यादि प्रतिष्ठाकालीं पंचालशिल्पींची शिल्पशास्त्रविधानोक्त पूजा करावी. कारण पंचाल शिल्पींच्या शरीराचे ठायीं देवता वास करितात त्या- मूर्धास्थानीं ब्रम्हा, ललाटीं अग्नि, नेत्रांचे ठायीं चंद्रसूर्य, नासिकेच्या ठायीं अश्विनीदेवता, मुखीं सप्तर्षीसहित ब्रम्हदेव, कंठाचे ठायीं विष्णू, हृदयाचे ठायीं महेश्वर नाभीचे ठायीं गंधर्व, गुह्यस्थानीं कामदेव, चरणीं वायु, पदतळीं, वरुणदेवता, अंगुली स्थानीं मातृका, भुजस्थानीं रामकृष्ण पुढें शेष आणि तक्षक, मणगटीं महा माया, हस्तांगुलीं ईश्वरीशक्ति हे स्कंदा याप्रमाणें पंचालशिल्पींच्या सर्वांगीं देवता वसत असतात. " म्हणूनच ते विराट विश्वकर्म प्रतिमा जाणून पूजा करणें. जसें वैदिकाचे चरणांगुष्ठीं सर्व तीर्थें वास करितात तसेंच पंचाल शिल्पींच्या चरणांगुष्ठीं सर्व तीर्थाधिपति वरुण वास करितो; म्हणून इतर ब्राम्हणापेक्षां प्रासाद रथ मूर्त्यादि शिल्पकर्ते पंचालशिल्पी पूजेचें अधिक श्रेय आहे. इतर ब्राम्हणांची पूजा शुभाशुभ कर्मांगभूत सुष्टदुष्ट गोप्रदान वस्त्रदानादि प्रतिग्रहाच्या निमित्तानें होणारी असून हवे त्या ठिकाणीं ( अशुभकर्मस्थानीही ) केली जाते. आणि पंचालशिल्पीची पूजा प्रासाद गृह, यज्ञमंडपमूर्तिप्रतिष्ठादि शुभकर्मांगत्वेकरूनच वास्त्वादि मंगलकार्यनिमित्तानें होणारी असून सोमादि यज्ञमंडपांत आणि राजसभेंत इत्यादि शुभस्थानींच केली जाते. देवरथकर्ता रथकार पंचालशिल्पी तर देवांत गणला आहे. भारत अनुशासन पर्व पहा. पुढें रथकार प्रकरणीं सांगूं.

**आशंका**–एवढें जर शिल्पविद्येचें महत्त्व आहे तर त्याचे कर्तेही महर्षि असले पाहिजेत. शिल्पकर्ते ब्रम्हर्षि आहेत यास प्रमाण काय?

उत्तर–शिल्पकर्म करणारे ब्रम्हर्षि आहेत याविषयीं पूर्वी, वचनें आलीं असून पुनः आणखी वचनें आहेत तीं–

**श्रुति तैत्तिरीय अरण प्रपाठक १ अनु. ७ यतेक्षिल्पंकश्यपः रोचनावत् ॥ इंद्रि०**

या श्रुतीचें भाष्य पूर्वोक्त तैत्तिरीय ब्राह्मण श्रुतीच्या भाष्याप्रमाणेंच असल्यामुळें पुन्हा लिहीत नाहीं. याश्रुतीवरून कश्यपऋषी शिल्पज्ञ होता हें स्पष्ट आहे. आणखी- **शतपथब्राह्मण श्रुति–शिल्पात्कश्यपाच्छिल्पःकश्यपःकश्यपानैध्रुवः कश्यपोनैध्रुविः ॥** यावरून कश्यप, शिल्प, नैध्रुवि इत्यादि ऋषि शिल्पी होते, हें त्यांच्या नांवावरून उघड आहे. मत्स्य पुराणांत तर ब्रम्हर्षि व देवर्षि मिळून १८ आचार्यांनीं मूर्त्यादि प्रासादादि शिल्पशास्त्र उत्पन्न केलें असें म्हटलें आहे मत्स्य पु.अ.२५२

**ऋषय ऊचुः ॥ प्रासादभवनादीनां निवेशंविस्तराद्वद ॥कुर्यात्केनविधानेन कश्चवास्तुरुदाहृतः ॥ १ ॥ सूतउवाच–भृगुरत्रिर्वसिष्ठश्चविश्वकर्मामयस्तथा ॥ नारदोनग्नजिच्चैव विशालाक्षःपुरंदरः ॥ २ ॥ ब्रम्हाकुमारोनंदीशःशौनकोगर्गएवच ॥ वासुदेवोऽनिरुद्धश्च तथाशुक्रबृहस्पती ॥ अष्टादशैतेविख्याताशिल्पशास्त्रोपदेशकाः ॥ संक्षेपेणोपदिष्टंतु मनवे मत्स्यरूपिणे ॥ ४ ॥**

अर्थ–भृगु, अत्रि, वसिष्ठ, विश्वकर्मा,मय,नारद, नग्नजित्, विशालाक्ष, इंद्र,ब्रम्हदेव, कार्तिकस्वामी, नंदी, शौनक, गर्गमुनि, श्रीकृष्ण, अनिरुद्ध, शुक्राचार्य आणि बृहस्पति हे अठरा आचार्य शिल्पशास्त्राच्या संहिता कर्ते होत. असें सविस्तर शिल्पशास्त्र जें तें संक्षेपानें मत्स्यरूपी विष्णूनीं मनूला सांगितलें. यावरून उघड आहे कीं, ब्रह्मादिकांनींहीं शिल्पाविषयीं परिश्रम केले आहेत.

मत्स्यरूप नारायणानें शिल्पाचा उपदेश मनूला केला, तेच शिल्प मनूनें आपल्या नाभानेदिष्ठ नामक पुत्रास उपदेशिलें. नाभानेदिष्ठादिक मोठ मोठे ऋषि शिल्पी होते, याविषयीं आणि शिल्प हें मोठें महत्वाचें कर्म आहे याविषयीं आणखी–

**आथर्वण वेदीय श्रुति–गोपथब्राह्मण उत्तरभाग प्रपाठक ६ वा– शिल्पानिशंसंति । यदेवशिल्पानि । एतेषांवैशिल्पानामनुकृतिर्हि शिल्पमधिगम्यते ॥ हस्तीकं सोवासो हिरण्यमश्वतरीरथाशिल्पं। शिल्पंहास्यमधिगम्यते । यएवंवेद । यदेवशिल्पानि । आत्मसंस्कृतिर्वैशिल्पान्यात्मानमेवास्य तत्संस्कुर्वंति ॥ ७ ॥**

अर्थ– (ऐ. ब्रा. पं. ६।५ च्या भाष्यावरून ) नाभानेदिष्ठ, नराशंस, वालखिल्य, सुकीर्ति, वृषाकपि आणि एवयामरुत् हे पवित्र शिल्पी होते, पैकीं नाभानेदिष्ठ आणि

---

१ जसे शिल्पाच्या संहिताकर्ते १८ आचार्य आहेत तसेंच ज्योतिःसंहिताकर्ते १८ आहेत. ब्रम्हाचार्योवसिष्ठात्रिर्मनुःपौलस्त्यरोमशौ ॥ मरीचिरंगिराव्यासो नारदः शौनकोभृगुः ॥ च्यवनोयवनोगर्गः कश्यपश्चपराशरः ॥ अष्टादशैत० ज्यो० ॥ २ ॥

नराशंस हे स्तोत्रादि सर्व यज्ञसंबंधीं शिल्पकर्मांत फारच कुशल असल्यामुळें. सर्वशिल्पी लोक आपआपलीं शिल्प कर्में उत्पन्न करण्याकरितां नाभानेदिष्ठ आणि नराशंस यांची स्तुति करीत असत. या जगांत देवांस आवडणारीं अशीं कांहीं चमत्कारिक शिल्पकृत्यें आहेत. आणि मानवी शिल्प कला ज्या आहेत त्या देवशिल्पांचीं अनुकरणेंच आहेत, असें वाटतें. सुवर्ण रत्नांनीं जडलेलें हत्तीच्या अंगावरचें भरजरीचें वस्त्र निर्माण करण्याचें शिल्प आणि ज्या रथांना वेगानें धांवणारे घोडे जुंपतात, असे रथ निर्माण करणें इत्यादि चमत्कारिक शिल्पकर्मांचें ज्यांना ज्ञान आहे तेच शिल्पी यज्ञांतील स्तोत्रें करण्यास योग्य आहेत; कारण शिल्पी हे आत्मा ( जीवात्मा-देहाभिमानी अर्थात् पवित्र मूर्ति ) उत्पन्न करितात नंतर त्या जीवात्म्याला स्तोत्रांनीं यजमान व्याप्त करितो; ह्मणून पूर्वोक्त शिल्पें देहसंस्कार करणारीं पवित्र आहेत.

कोणी ह्मणेल कीं शिल्पकर्म करणारे ब्राह्मणास यज्ञांत पौराहित्यादिक पदवी मिळत नसेल; तर अशी शंका मुळींच घेऊं नये; कारण पहा पूर्वोक्त नाभानेदिष्ठ शिल्पी हा सूर्याचा नातू असून आंगिरस ब्रह्मर्षींच्या यज्ञांत आचार्य होता झाला याविषयीं प्रमाण श्रुती—

> येयज्ञेनदक्षिणया समक्ताइंद्रस्य सख्यममृतत्वमानश ॥ तेभ्यो-
> भद्रमंगिरसोवोऽअस्तुप्रतिगृभ्णीत मानवं सुमेधसः॥ ऋग्वेद अ.
> ८ अ. २ व. १

**भाष्यं**—नाभानेदिष्ठः स्वपित्रा मनुनाभ्यनुज्ञातः । सत्रमासीनानंगिरसोऽभ्येत्यमां प्रति गृण्हीत युष्मभ्यंयज्ञं प्रज्ञापयामि—इतियदुक्तवान्—तदुच्यते

**अर्थ**—मनूच्या आज्ञेनें नाभानेदिष्ठ, यज्ञास आरंभ केलेल्या अंगिरोगणास ह्मणाला. यज्ञांत माझा स्वीकार करा. मी तुमचा यज्ञ सांगसिद्धीस नेववीन; असें ह्मटल्यानंतर अंगिरोगणानें नाभानेदिष्ठाचा यज्ञांत स्वीकार केला. यज्ञसिद्धि उत्कृष्ट केल्यामुळें नाभानेदिष्ठास सहस्र गाई दान दिल्या यास प्रमाण—

> सद्विबंधुर्वैतरणोयष्टा सबंधुधेनुमस्वंदुहध्यै ॥ संयन्मित्रावरुणा०
> ऋ. अ. ८ अ. १ व. २९।१७.

असो यावरून स्पष्ट समजेल कीं शिल्पकर्ते ब्रह्मर्षि आहेत. आतां सर्व शिल्पकर्त्यामध्यें प्रसिद्ध जो शिल्पी त्वष्टा विश्वकर्मा ह्मणजे ज्याची संतति या भूलोकीं पंचाल या नांवानें प्रसिद्ध आहे त्या विश्वकर्मयाच्या अवताराचा आपण शोध करूं.

विश्वकर्मा आणि त्वष्टा हे समानाधिकार शब्द आहेत " विश्वकर्मामनुस्त्वष्टा " या नामोक्तीवरून त्वष्टा विश्वकर्मा हे प्रजा निर्माण करण्याकरितां नारायणाचे स्वतंत्र स्वयंभू स्वरूप भेद आहेत. हे प्रजा उत्पन्नकर्ते असल्यामुळें यांना त्वष्टृब्रह्मा आणि विश्वब्रह्मा अशा संज्ञा आहेत. शिल्पकर्मकर्त्या पंचाल ब्राह्मणांचा मूळपुरुष आदि ब्रह्मत्वष्टा विश्वकर्मा हा ब्राह्मण कुलावतीर्ण आहे किंवा कसें याचा आपण शोध केला तर वेदामध्यें त्वष्टा विश्वकर्मा या नामांनीं विराट पुरुष परमेश्वर असें वर्णिलें आहे.

त्या ईश्वराचाच अवतार पुराणामध्यें त्वष्टाप्रजापतीचा पुत्र विश्वकर्मा ह्मणून वर्णिलें आहे. प्रमाण **स्कंदपुराण काशीखंड अध्याय ८६** ( पंचालांचे शिल्पकर्म प्रासादिक याविषयीं )

**पार्वत्युवाच । विश्वकर्मेश्वरंलिंगंयत्काश्यां प्रार्थितंपरं ॥ तस्य लिंगस्यकथयदेवदेवसमुद्भवम् ॥ श्रीमहादेवउवाच ॥ शृणुदेवि प्रवक्ष्यामि कथांपापविनाशिनीं ॥ विश्वकर्मेशलिंगस्य प्रादुर्भावं मनोहरं ॥ २ ॥ विश्वकर्माऽभवत्पूर्वं ब्रह्मणस्त्वपरातनुः ॥ त्वष्टुःप्रजापतेः पुत्रोनिपुणः सर्वकर्मसु ॥ ३ ॥ कृतोपनयनःसोऽथबाल्ये गुरुकुलेवसन् ॥ चकारगुरुशुश्रुषाभिक्षान्नकृतभोजनः ॥ ४ ॥**

अर्थ--शंकर ह्मणतात हे पार्वति, विश्वकर्मेश्वर लिंग कसें प्रकट झालें, ती पापनाशक कथा सांगतों, ऐक. प्रत्यक्ष आदिब्रह्मा असा विश्वकर्मा हा त्वष्टाप्रजापतीचा पुत्र होता झाला. विश्वकर्म याचें त्वष्टयानें उपनयन केल्यावर तो विद्याभ्यास करण्याकरितां गुरूचे ( बृहस्पतीचे ) गृहीं राहिला आणि भिक्षा सेवन करून गुरूची सेवा करिता झाला. विश्वकर्म्यानें विद्याभ्यास पूर्ण केल्यावर गुरूनें विश्वकर्म्यास दक्षिणा मागितली ती[१]--

**कुरूटजं मदर्थंत्वंयथाप्रावृट्नबाधते ॥ ५ ॥ यत्किंचिन्नभज्येतनपुरातनतांव्रजेत् ॥ गुरुपत्न्यात्वभिहितोरेत्वाष्ट्रकुरुकंचुकम् ॥ ६ ॥ गुरुपुत्रेणचाज्ञप्तोममार्थे कुरु पादुका ॥ ६ ॥ गुरुकन्यापितंप्राह त्वाष्ट्रमेश्रवणोचिते ॥ भूषणेस्तेहतस्तेन कुरुकांचननिर्मिते ॥ कुमारीक्रीडनीयानिकौतुकानिचदेहिमे ॥ दंतिदंतमयान्येवस्वहस्तरचितानिच ॥ ११ ॥ गृहोपकरणंदिव्यं मुसलोलूखलादिकम् ॥ तथाघटयमेधावी यथात्रुटति नकाचित् ॥ १२ ॥ अक्षालितान्यपि० ॥ १३ ॥ सूपकर्माण्यपिचमां प्रशाधित्वष्टृनंदन ॥ यथा० ॥ एकस्तंभमयंगेहमेकदारु विनिर्मितम् ॥ तथाकुरुवरंत्वाष्ट्रयत्रेच्छातत्रधारये ॥ १६ ॥ येसहाध्यायिनोप्यस्य वयोज्येष्ठाश्चतेपिहि ॥ सर्वेसर्वं समीहंते कर्मतत्कृतमेवहि ॥ १६ ॥ तथेतिसंप्रतिज्ञाय० ॥**

अर्थ--गुरु ह्मणतो--विश्वकर्मन् मला वर्षाकाल न बाधेल असा आश्रम करून दे. गुरुपत्नी ह्मणत्ये--मला रत्नजडित कंचुकी करून द्यावी. गुरुपुत्र ह्मणतो--मला रत्नजडित सुवर्णपादुका करून द्या. गुरुकन्या ह्मणते--मला सुवर्णरत्नजडित कुंडलें वगैरे अलंकार, हस्तीदंती खेळ आणि एकस्तंभी घरकुलें, स्वयंपाकाची भांडीं सदास्वच्छ असावीं, उखळ, मुसळ वगैरे गृहोपकरण सामग्री करून द्यावी आणि मला स्वयंपाक करण्यास शिकवावें. या प्रमाणें गुरूनें मागितलेल्या वस्तु करून देतों

१ गुरूनीं विश्वकर्म्यास शिल्पकर्मजन्य गृहादि वस्तु मागितल्यावरून स्पष्ट आहे कीं विश्वकर्म्याचा पिता व त्याचें कुळीं शिल्पीच होते.

म्हणून एका तापसाबरोबर विश्वकर्मा काशीस आला, आणि,

अनुक्रोशंसमभ्येतिसत्वाष्ट्रः शांभवःशुचिः ॥ संस्थाप्यलिंगमीशस्याराधयत्स्वस्थमानसः ॥ ६८ ॥ आनीयपुष्पसंभारमार्तवंकाननाद्बहु ॥ स्नात्वात्वभ्यर्च्यचेशानं कंदमूलफलाशनः ॥इत्थं त्वष्ट्रतनूजस्य लिंगाराधनचेतसः ॥ त्रिहायनं प्रसन्नोऽभूत्तस्येशः करुणानिधिः ॥ ७० ॥

अर्थ— शंकराची कृपा होण्याकरितां लिंग स्थापना करून स्वस्थ मनानें आराधना करिता झाला. ती अशी—नित्य ऋतुकालोचित पुष्कळ पुष्पसंभार आणून स्नानादि करून नित्य यथाविधि शंकराची पूजा करी. आणि कंद, मूल फलें, भक्षून व्रतस्थ राहत असे. या प्रमाणें तीन वर्षे तप झाल्यावर त्या त्वष्टृ पुत्रास शंकर प्रसन्न होते झाले.

तस्मादेवहिलिंगाच्च प्रादुर्भूयभवोऽब्रवीत् ॥ वरंवरयतेत्वाष्ट्र दृढभक्त्याऽनयातव ॥ प्रसन्नोऽस्मिभृशंबाल गुर्वर्थकृतमानसः ॥ गुरुणागुरुपत्न्याच गुर्वपत्यद्वयेनच ॥ ७२ ॥ यथार्थितं तथाकर्तुं ते सामर्थ्यं भविष्यति ॥ अन्यान्वरांश्चतेदद्मि त्वाष्ट्रतुभ्यंत्वदर्चया ॥ ७३ ॥ तान्शृणुष्व महाभाग लिंगस्यास्याद्भुतश्रियः ॥ त्वंसुवर्णादिधातूनां दारूणां दृषदामपि ॥ ७४ ॥ मणीनामपिरत्नानां पुष्पाणामपिवाससां ॥ कर्पूरादि सुगंधानां द्रव्याणामप्ययामपि ॥ कंदमूलफलानांच द्रव्याणामधिसत्वचां ॥ सर्वेषांवस्तुजातीनां कर्तुंकर्मप्रवेत्स्यासि ॥ ७६ ॥ यस्ययस्यरुचिर्यत्र सप्तदेवालयादिषु॥तस्यतस्यहि तुष्ट्यैत्वं तथाकर्तुंप्रवेत्स्यसि॥ ७७॥ सर्वनेपथ्यरचनां सर्वरूपस्यसंस्कृतीः ॥ सर्वाणिशिल्पकर्माणि तौर्यत्रिकमथापिच ॥ ७८ ॥ सर्वंज्ञास्यसितत्कर्तुं द्वितीयइवपद्मभूः॥ नानाविधानियंत्राणि नानायुधविधानकं ॥ ७९ ॥ जलाशयानांरचनासुदुर्गरचनास्तथा ॥ तादृक्कर्तुं पुरावेत्तिसयादृङ्नान्योऽधियास्यति ॥ ८० ॥ कलाजातं हिसर्वंत्वमवयास्यसिमेवरात् ॥ सर्वेंद्रजालकीविद्या त्वदधीनाभविष्यति ॥ ८१ ॥ सर्वकर्मसुकौशल्यं सर्वबुद्धिवरिष्ठता ॥ सर्वेषांचमनोवृत्तिं त्वंज्ञास्यसि वरान्मम ॥८२॥ किंबहुत्वेनयत्स्वर्गे यत्पाताले यदत्रच ॥ अतिलोकोत्तरंकर्म तत्सर्वंवेत्स्यसिस्वयं ॥ ८३॥ विश्वेषांविश्वकर्माणिविश्वेषुभुवनेषुच ॥ यतोज्ञास्यसित्वन्नाम विश्वकर्मेतितेऽनघ ॥ अपरः कोवरोदेयस्तवतं प्रार्थयस्वभो ॥ तवादेयं नमेकिंचिल्लिंगार्चनरत-

**स्यहि ॥ ८५ ॥ अन्यत्रापिहियोलिंगंममार्चयतिसन्मतिः ॥ तस्यापि वांछितंदेयं किंपुनर्योऽधिकाशिकां ॥ ८६ ॥**

अर्थ- त्याविश्वकर्म स्थापित लिंगांतून श्रीशंकर प्रगट होऊन विश्वकर्मयाप्रत बोलते झाले, हे त्वष्टृपुत्रा तुझी दृढ भक्ति पाहून मी प्रसन्न झालों आहें; वर माग. गुरूचे मनोरथ पूर्ण करण्याकरितां माझी आराधना केलीस; ह्मणून गुरूनें, गुरुपत्नीनें आणि गुरूच्या दोन अपत्यांनीं जसें मागितलें तसें निर्माण करण्यास तुला सामर्थ्य प्राप्त होईल. हे महाभागा विश्वकर्मन्, मी तुझ्या या अद्भुत ऐश्वर्यमान् लिंगाच्या पूजेनें फार संतुष्ट झालों आहें;ह्मणून याशिवाय आणखीही अनेक वर देतो ते ऐक—तूं सूवर्णादि धातूंच्या मूर्ति, अलंकार इत्यादि वस्तुनिर्माण करशील. तसेंच काष्ठ, पाषाण,रत्नें,मोत्यें,पुष्पें,वस्त्रें, कापूर वगैरे सुगंधि द्रव्य,शुष्क पदार्थ,तसेंच कंद,मूल,फल इत्यादि सर्व वस्तु मात्रांचें कर्म कौशल्य जाणता होशील.ज्याला ज्याला जशा वस्तूंची आवडी असेल त्या त्या देवांना तशा वस्तु सप्तभुवनादिक तूं निर्माण करून देऊन सर्वांस संतुष्ट करणारा होशील.सर्वप्रकारच्या मंडपादिक रचना, सर्व प्राणिमात्रांच्या रूपांचे संस्कार, सर्व प्रकारचीं शिल्पकर्में, नृत्य, गायन, आणि वाद्यें हीं सर्व तूं जाणशील. एवढेंच नव्हे तर सर्व सृष्टि करण्याकरितां तूं एक साक्षात् दुसरा आदिब्रह्मा आहेस. नानाप्रकारचीं शिशुमारादि यंत्रें, नानाप्रकारचीं सुदर्शन,त्रिशूलादि आयुधें,मानस सरोवरादि जलाशय रचना, दुर्गरचना (किल्ले बांधणें)इत्यादि शिल्पें तूं अशीं निर्माण करशील कीं, तीं दुसऱ्या कोणत्याही महापुरुषास करितां येणार नाहींत. माझ्या वरानें सर्व विद्या, सर्व कला, सर्व इंद्रजालविद्या तुझ्या स्वाधीन होतील. सर्व कर्मांत कौशल्य सर्व देवांमध्यें बुध्दिवान् होशील माझ्या वरानें सर्वांचें मनोगत तूं जाणशील. फार काय सांगूं पण स्वर्गांत, पातालांत आणि या मृत्युलोकांत जें कर्म कौशल्य नाहीं, जें त्रैलोक्यांत दुर्लभ असें शिल्प कौशल्यकर्म तूं स्वतः जाणशील. हे निर्मला विश्वकर्मन्, ज्यापेक्षां विश्वभुवनांतील (सर्वभुवनांतील) विश्वांची विश्व (सर्व) कर्में तूं जाणतां होशील त्यापेक्षां तुझें नांव विश्वकर्मा असें प्रसिद्ध होईल. हे वर तूं न मागतां मीं दिले. आणखी कोणता वर पाहिजे तो माग. तुजला लिंगार्चन तत्पराला मजकडून न द्यावें, असें कांहींच नाहीं. माझें सर्व ऐश्वर्य तुला दिलें. तूं स्थापन केलेल्या या लिंगास (मला) विश्वकर्मेश्वर असें नांव प्राप्त झालें. या विश्वकर्मेश्वरनामक माझ्या लिंगाची पूजा करणारा अन्यत्र देशीं जरी असला तरी त्याची वांच्छित कामना पूर्ण होईल. मग नित्य कांशींत राहणाऱ्या पूजकाची तर सर्व कामना पूर्ण होईलच होईल." याप्रमाणें विष्णूस आणि ब्रह्मदेवासही ऐश्वर्य काशी विश्वेश्वराच्या" "अनुग्रहानेंच प्राप्त झालें. **"सृष्टेःकरणसामर्थ्यं सृष्टिरक्षाप्रवीणता ॥ विधिनाविष्णुनाचापि विश्वेशानुग्रहात्परात् ॥ का०"**

असो या पूर्वोक्त स्कंद पुराणोक्तीवरून स्पष्ट आहे कीं, सुवर्णालंकारादि सर्व शि-

१ या ठिकाणीं त्वष्टा रूपाणि विकरोति। त्वष्टारूपाणिपिंशतु। त्वष्टारूपाणामधिपतिः इत्यादि श्रुतींचें अनुसंधान आहे, ह्मणजे याश्रुति विश्वकर्मपर आहेत असी "सर्वरूपस्य संस्कर्ता। सर्वाणि शिल्पकर्माणि" ही स्मृति साक्ष देत आहे. (पृष्ठ ५६ श्लोक ७८ पहा.)

ल्प कर्माचा अधिपति जो विश्वकर्मा हा जर त्वष्टा प्रजापतीचा पुत्र आहे तर तो ब्राह्मण असणें, हें उघड आहे; कारण विश्वकर्म्याचा पिता जो त्वष्टा प्रजापति तो ब्रह्मर्षि देवश्रेष्ठ मुख्य ब्राह्मण आहे यास प्रमाण.—

**भारत उद्योगपर्व श्लोक—त्वष्टाप्रजापतिर्ह्यासीदेवश्रेष्ठोमहातपा ॥ सपुत्रंवैत्रिशिरसमिंद्रद्रोहात्किलाऽसृजत् ॥ ३ ॥**

याभारतोक्तीवरून त्वष्टा हा प्रजापति असून त्यास देवश्रेष्ठत्व आणि 'महातपाः' या पदावरून ब्राह्मण मुख्यत्व आहे. कारण त्वष्टा प्रजापतीचा अवतार भृगु कुलांत झाला यास प्रमाण—

**वायुपुराण अध्याय ४ भार्ये भृगोरप्रतिमे उत्तमेऽभिजनेशुभे ॥ हिरण्यकशिपोःकन्या दिव्यानामपरिश्रुता ॥ पुलोम्नश्चापि पौलोमी दुहिता वरवर्णिनी ॥ भृगोस्त्वजनयद्दिव्या काव्यंवेदविदांवरं ॥ देवासुराणामाचार्यं शुक्रं कविसुतं ग्रहं ॥ ७४ ॥**

अर्थ- हिरण्यकशिपूची कन्या दिव्या नाम्नी आणि पुलोम्याची कन्या पौलोमी अशा उत्तम कुलीन व अप्रतिम दोन स्त्रिया भृगु ऋषीस होत्या. पैकीं दिव्या नामक स्त्रीचे ठायीं भृगु ऋषीपासून शुक्राचार्य उत्पन्न झाला. हा वेदवेत्यांमध्यें श्रेष्ठ असून देवांचा आणि दैत्यांचा आचार्य होता झाला.

**श्लोक—पितृणांमानसी कन्या सोमपानांयशस्विनी ॥ शुक्रस्य भार्यांगी नाम विजज्ञे चतुरःसुतान्॥ ७५ ॥ ब्राह्मणतेजसायुक्ताः सजातो ब्रह्मवित्तमः ॥ तस्यामेवतुचत्वारः पुत्राः शुक्रस्य जज्ञिरे॥ ७६ ॥ त्वष्टावरूत्रीद्वावेतौशंडामर्कौचतावुभौ ॥ ते तदादित्य संकाशा ब्रह्मकल्पाःप्रभावतः ॥ ७७ ॥ वायुपु० अ० ४**

अर्थ- सोमपनामक पितरांची मानसी अंगीनामक कन्या शुक्राचार्याची स्त्री होती झाली. तिच्याठायीं शुक्राचार्यास सूर्यप्रमाणें तेजस्वी ब्रह्मकल्पपर्यंत चिरंजीव असे चारपुत्र झाले. त्यांचीं नांवें त्वष्टा, वरूत्री, शंड आणि अमर्क याचौघांमध्यें त्वष्टा ब्राह्म तेजानें विशेष युक्त होऊन ब्रह्मवित्तम(ज्याचे ठायीं परब्रह्मवस्तुवांचून दुसरी भावनाच नाहीं असा) होता झाला. या वरून भार्गवाचा पुत्र त्वष्टा प्रजापति ब्राह्मण आहे,

**त्रिशिरा विश्वरूपस्तु त्वष्टुः पुत्रोऽभवन्महान् ॥ विश्वरूपानुजश्चापि विश्वकर्मा प्रजापतिः ॥ ८५ ॥ वायुपु० अ० ४**

अर्थ—त्वष्टा प्रजापतीस त्रिमुख विश्वरूप आणि विश्वकर्मा असे दोन पुत्र झाले. "या वायु पुराणोक्त वाक्याची आणि "**विश्वकर्मा भवत्पूर्वंब्रह्मणस्त्वपरातनुः ॥ त्वष्टुःप्रजापतेःपुत्रोनिपुणाःसर्वकर्मसु॥**या स्कंद पुराणोक्तीची एकवाक्यता आहे. यावरून त्वष्टा विश्वकर्मा हे ब्रह्ममूर्ति नारायणाचे स्वरूप भेद भृगु ऋषीचे पुत्र पौत्र आहेत. पूर्वोक्त स्कंद

आणि वायु पुराणोक्तीवरून जरी त्वष्टा विश्वकर्मा हे पिता पुत्रत्वानें भिन्न नामें आहेत तथापि(“भवार्थे लुक्” या अपत्याधिकारांतील वार्तिकावरून त्वष्टृ नामास लुक् प्रत्यय होऊन विश्वकर्मा यासच त्वष्टा ह्मणतात” भाष्यकारांनीं तर श्रुत्यर्थात असें सांगितलें आहे कीं, मंत्रांत ज्या ज्या ठिकाणीं त्वष्टा नाम येईल त्या त्या ठिकाणीं विश्वकर्माच समजावा यास प्रमाण श्रुति–ऋग्वेद अ. २।३।७।३

अभिप्रियं यत्पुरोळा शमर्वता त्वष्टेदेनं सौश्रवसाय जिन्वति ॥

भाष्यं–(यद्यस्मात् कारणात्)सौश्रवसाय (सुश्रवस्त्वाय सुकीर्तये) त्वष्टा। इत् त्वष्टा नाम विश्वकर्मैव । एनमेतमजमर्वता (अश्वेन सहेति)

या मंत्रांतील “ इत् ” हें अवधारणार्थक अव्यय असल्यामुळें त्वष्टा ह्मणजे विश्वकर्माच जाणावा. त्वष्टा ह्मणजे विश्वकर्मा आणि तो शिल्पकर्ता असून सर्व ब्रह्मर्षींमध्यें श्रेष्ठ महा कुलीन आहे याविषयीं प्रमाण–

ऋग्वेद अ० २।२।२४।१

नर्निदिमचमसंयोमहाकुलोऽग्नेभ्रातर्द्रुणऽइद्भूतिमूदिम ॥ १ ॥

भाष्यं–हे अग्ने भ्रातः भ्रातृवद्भागार्ह । भ्राता यथा बलात् स्वकीय भागं स्वीकरोति तद्वत् समानरूपमाश्रित्य बलाच्चमसपानाय प्रवृत्त इति भ्रातरित्युक्तम् । हे तादृशाग्ने चमसं नर्निदिम। अधिकः समागत इतिपानमकृत्वा चमसं न दूषयामः॥ णिदि कुत्सायां । छंदसि वेत्ति वक्तव्यमितिद्विर्वचना भावः ॥ अदूष्यत्वे कारणमाह । यच्चमसो महाकुलः महा कुलोत्पन्नः त्वष्ट्रा निर्मितत्वात् । वक्ष्यतिच त्वष्टाग्नास्वंतन्यानिज इति । अतः कारणात् द्रुणो विकारे प्रकृतिशद्बः। ततश्च तत्स्थेतच्छद्बः । इच्छद्बोऽवधारणे दारूविकारचमसस्य भूतिं प्राप्तिं मूदिमा ब्रूमः । विदेश्छांदसे लिटिवचिस्वपीति संप्रसारणं । ऋादिनियमादिट् । इति ।

अर्थ–एका यज्ञांत ऋभुनामक तीन देव सोमपान करण्या करितां बसले होते.तेथें देवांनीं पाठविलेला अग्नि येऊन त्यानें आपलें रूप पालटून ऋभूसारखाच होऊन त्यातिघांत बंधूप्रमाणें बलात्कारानें सोमपानाकरितां चौथा होऊन बसता झाला. त्या अग्नीला ऋभु ह्मणतात हे बंधुवत् अग्ने,तूं एक अधिक आलास ह्मणून आम्ही सोमपान करण्याचें रहित करून चमसाला दूषण येईल अशी गोष्ट करणार नाहीं. चमसाला दूषण न ठेवण्याचें कारण हें चमसपात्र महा कुलांत उत्पन्न झालें आहे ह्मणजे महाकुल श्रेष्ठ असा जो भगवान् विश्वकर्मा त्यानें स्वतः स्वहस्तांनीं निर्माण केलें आहे. ह्मणून आम्ही दूषण न देतां उलट या काष्टमय चमसाच्याही प्राप्तीस आम्हीं आपलें भाग्य असें समजतों.

यापूर्वोक्त श्रुतीवरून “ शिल्पं स्रुवेक्रियायोगे “ या कोशोक्तीनें स्रुक्, स्रुव, चरुस्थाली चमसाज्यपात्रादि काष्ठमय धातुमय यज्ञपात्रादि सकल शिल्पकर्ता त्वष्टा विश्वकर्मा याचें श्रेष्ठ कुल (ब्रह्मर्षिकुल) आहे. अर्थात् देव ब्राह्मणसंबंधीं स्वर्णादि शिल्पकर्ते विश्वकर्म संततीच पंचाल महाकुल आहेत. त्वष्टा विश्वकर्मा सर्व जगत् उत्पन्न करिता झाला; यास प्रमाण–

**श्रुति यजुर्वेद अष्टक ५ प्रपा० १ अनु० ११ पन्नाशी ३-४**
**त्वष्टावीरं देवकामं जजान त्वष्टुरर्वा जायत आशुरश्वः॥ त्वष्टेदं विश्वं भुवनं जजान बहोः कर्तारमिह यक्षिहोतः ॥ १ ॥**

**भाष्यं**— त्वष्टा (त्वष्टुनामको देवः) देवकामं( देवान् कामयमानं) वीरं ( कर्मसु शूरं ) पुत्रं जजान ( उत्पादयामास ) स त्वष्टुः सकाशात् अर्वा (गमन कुशलः ) आशु ( शीघ्रगामी ) अश्वः जजान ( जनयामास ) हे होतः बहोः ( बहुलस्य जगतः ) कर्तारं (स्रष्टारं) इह (अस्मिन् कर्मणि ) यक्षि ( यज )

**अर्थ**— त्वष्टानामक देव, देवांचीं इच्छितें पूर्ण करणाऱ्या अशा सर्व कर्म कुशल पुत्राप्रत उत्पन्न करिता झाला. तसाच त्वष्टयापासून शीघ्रगामी एक अश्व उत्पन्न झाला. तसेंच त्वष्टा प्रजापती या सर्व जगाप्रत उत्पन्न करिता झाला. यास्तव हे यज्ञकर्त्या त्या त्वष्टयाचें यजन कर. याचप्रमाणें त्वष्टा प्रजापति यास देवांनीं पिता ह्मटलें आहे. **प्रमाण श्रुति ऋग्वेद मंडल १० सूक्त ६४ मंत्र १०**

**शृणोतुनस्त्वष्टा देवेभिर्जनिभिः पिता वचः ॥** आणखी **श्रुति काण्व संहिता अध्याय १५ अनु. ४ त्वष्टुः प्रजानां प्रथमं जनित्रमग्नेमाहि. ँ सीः परमे व्योमन् ॥**

**माधवीय भाष्यं**—त्वष्टुः प्रजापतेः सकाशादुत्पद्यमानानांमध्यें प्रथमं जनित्रं प्रधानत्वेनोत्पन्नमिति॥ इत्यादि अनेक श्रुतिस्मृत्यादि प्रमाणावरून त्वष्टा विश्वकर्मा हा प्रजापति आहे. आतां त्वष्टा विश्वकर्मा व त्याची संतति सोमादि यज्ञ करणारे असून रथ, शस्त्रास्त्रें, अलंकारादि शिल्पकर्मकर्ते आहेत याविषयींच्या **श्रुति—यजुर्वेद अष्ट. १ प्रश्न ४ अनु० २७ प० १ पदे १२-१५ "सजूर्देवेनत्वष्ट्रासोमंपिबस्वाहा "**

**भाष्यं**—हे पत्नीवन्नग्ने त्वष्ट्रादेवेनसजूः सह सोमंपिबस्वाहा स्वाहुतमस्तु ॥

**अर्थ**—सोमयज्ञामध्यें पात्नीवद्देवताक ग्रह घेऊन एक प्रजापशुकाम यजमान म्हणतो—हे पत्नीवन् अग्ने, तूं त्वष्ट्रदेवासहित सोमप्राशन कर. यांत त्वष्टानामक देवासहित ह्मणावयाचें कारण " **सजूर्देवेनत्वष्ट्रासोमंपिबेत्याह त्वष्टावैपशूनांमिथुनानांरूपकृद्रूपमेवपशुषुदधाति ॥ यजुर्वेद अ. ६ प्रपाठक ५ अनु० ८** "

या श्रुतीचा भावार्थ पात्नीवत अग्नीच्या यजनानें पत्नीसौख्य आहे; परंतु तिच्याठायीं उत्पद्यमान गर्भाचीं रूपें ( शिल्पाख्य अवयवें ) स्पष्ट व पुष्ट करणें हें कार्य रूपाधिपति त्वष्टाख्य विश्वकर्मयाचें आहे; म्हणून प्रजाकाम यजमान पात्नीवत अग्नीस त्वष्ट्रदेवासहित सोमपान कर असें म्हणत आहे. याच अभिप्रायाच्या आणखी

**श्रुति—काण्वसंहिता अध्याय ८ अनु. ६ अग्नेवाक्पत्नि सजूर्देवेन त्वष्ट्रासोमंपिबस्वाहा ॥**

**भाष्यं**—हे वाक् ( वागभिमानिनि हे पत्नी ) पत्नीवनग्ने त्वष्ट्रादेवेन सजूः ( समान प्रीतिः ) ससोमंपिबस्वाहा ( सुहुतमस्तु ) आणखी **श्रुति—"ऋग्वेद अ. १।२।५।४**

त्वष्टारंसोमपीतये " आणखी—ऐतरेयब्रा. पं. ६ खं. १० अ. २ त्वष्टारंसोमपी-तयइतींद्रोवैत्वष्टातदेंद्रंरूपंतेनेंद्रंप्रीणाति ' ॥ आणखी यजुर्वेद अ. २ प्र. ४ अनु. १२ प. १–२ आणि प्रपा. ५ अनु. २ प. १

त्वष्टा हत पुत्रोवींद्रꣳसोम माहरत् । तस्मिन्निंद्र उपहव मैच्छत तन्नो पाऽह्वयत पुत्रंमेऽवधीरीति सयज्ञ वेशसं कृत्वाप्रास हासोम मपिवत् ॥

**भाष्यं**—विश्वरूपनाम्नस्त्वष्टुः पुत्रस्य । इंद्रेणकृतोवधः । सचहतपुत्रस्त्वष्टाकोपात् इंद्ररहितं सोमयागं कर्तुमुद्यतः । तस्मिन् यागे मामाऽह्वयेत्येवमिंद्रोऽब्रवीत् । सतुत्वष्टा तंपुत्रंमेऽवधीरित्यवदत् । तमिंद्रंनोपाऽह्वयत । सचेंद्रोयज्ञस्य विघातंकृत्वा बलात्कारेण सोमंपीतवान् ॥

**अर्थ**—विश्वरूप नामक त्वष्टयाचा पुत्र देवाचा पुरोहित असून इंद्रानें त्याचा वध केल्यामुळें त्वष्टा कोपायमान होऊन इंद्राला वर्ज्य करून सोमयज्ञ करण्यास आरंभ केला. तेव्हां इंद्र ह्मणाला मला या यज्ञांत आव्हान कर. त्वष्टा ह्मणाला, तूं माझ्या पुत्रास ( विश्वरूपास ) मारिलेस म्हणून मी तुला यज्ञांत बोलवीत नाहीं. नंतर तो इंद्र त्वष्टयाच्या यज्ञांत बलात्कारानें सोमरस पीता झाला. नंतर त्वष्टब्रह्मयानें इंद्राचा वध करावा या हेतूनें एका पुरुषाची उत्पत्ति केली ती अशी—

**श्रुति**—तस्ययदत्यशिष्यत तत्त्वष्टाहवनीय मुपप्रावर्तयत्स्वाहेंद्रशत्रुर्वर्धस्वेतिसयावदूर्ध्वःपराविध्यतितावतिस्वयमेव व्यरमत यदि वातावत्प्रवण मासीद्यदिवा तावदध्यग्नरासीत्ससंभवन्नग्नीषोमावभिसमभवत् ॥

**अर्थ**—(विद्यारण्य स्वामींच्या भाष्यावरून) इंद्रानें प्राशन करून थोडा शेष उरलेला सोमरस घेऊन त्वष्टा इंद्राचा नाश करण्याच्या उद्देशानें आहवनीय अग्नीजवळ आला आणि विधीनें अग्नि प्रज्वलित करून होम करिता झाला. त्यावेळीं " स्वाहेंद्रशत्रुर्वर्धस्व ' असा मंत्र ह्मटला. त्याचा उद्देशार्थ—" हे अग्ने या हवनानें इंद्रास मारणारा असा कोणी एक पुरुष होऊन वृद्धि पाव ,, असा मंत्र ह्मटल्याबरोबर तो अग्नि ऊर्ध्व ज्वालारूप होऊन इंद्राचा पराभव करण्यास जों तयार होत आहे तों तितक्यांत स्वतः अग्नीच विझून ज्वाला शांत झाल्या. याचें कारण—पूर्वोक्त मंत्रांतील स्वरांचा उच्चार चुकला तो असा—इंद्राचा शत्रु [ घातकरणारा ] हो, अशा उद्देशाविषयीं मंत्रांतील इंद्रशत्रु शब्द तत्पुरुष समासार्थीं अंतोदात्त ( इंद्रशत्रुः ) असा पाहिजे होता. तसें न उच्चारितां चुकीनें मंत्रांत ( इंद्रशत्रुः ) असा आद्युदात्त ह्मटला गेला, त्या-

१ ही कथा भागवत स्कंध ५ अध्याय ६-७ यांत आहे. त्वष्टपुत्र विश्वरूपाचा इंद्रानें वध केल्यामुळे त्या इंद्रास) ब्रह्महत्या प्राप्त होऊन तो इंद्रपदा पासून भ्रष्ट झाला होता. यास प्र० श्रुति यजु० अष्ट.२ प. ५ अ. १ प. २ स्यांजलिना ब्रह्महत्यामुपागृण्हात्ताꣳसंवत्सरमबिभस्तंभूतान्यभ्यक्रोशन्ब्रह्महन्निति ॥ अर्थात् त्वष्टब्रह्माचे वंशज पंचाल हे ब्राह्मण आहेत.

पासून " बहुव्रीहौप्रकृत्या पूर्वपदं ६।२।१ या पाणिनीं सूत्रानें बहुव्रीहिसमासार्थी ह्मणजे इंद्र आहे शत्रु ( घातक ) ज्याचा असा उलट अर्थ उत्पन्न झाला. या मंत्रगत वाक्याचा स्वर चुकल्याबद्दलच्या अपराधामुळें यजमानाची कार्यसिद्धि न होतां विरुद्ध फल होतें, हे सूचित करण्याविषयीं अग्नि ज्वालाहीन झाला, एवढेंच नव्हे तर तो अग्नि पुरुषरूप होऊन होमांगार आणि सर्व सोमादि हविष्यें आपल्या मुखांत टाकून त्या दोघांसमक्ष करकर दांत खाता झाला. त्या पुरुषास वृत्र असें नाम प्राप्त झालें; कारण—

सईषुमात्रमिषुमात्रंविष्वंङ वर्धत सइमाँल्लोकानं वृणोद्यादिमाँ-
ल्लोकानवृणोत्तदृत्रस्य वृत्रत्वं ॥

**अर्थ**— (भाष्यावरून) तो पुरुष बाण जितका लांब जातो तितका दर रोज सर्व दिशेस वाढूं लागला त्यामुळें कांहीं दिवसांनीं त्याच्या शरीरानें त्रैलोक्य आवृत केलें (आच्छादिलें) ह्मणून त्याला वृत्र असें नांव प्राप्त झालें. नंतर त्या वृत्राच्या वधाकरितां त्वष्ट्यानें वज्र निर्माण केलें त्याविषयीं पुढील श्रुति- " **भाष्ये**—अथास्य वृत्रस्य वधाय साधन भूतस्य वज्र स्योत्पत्तिं दर्शयति—"

तस्मादिंद्रोऽबिभेदपित्वष्टा ॥ तस्मै त्वष्टा वज्रमसिंचत्तपोवैस
वज्र आसीत् ॥ तमुद्यंतुं ना शक्नोदथवैतर्हि विष्णुः ॥ २ ॥

**अर्थ**—(भाष्यावरून) त्या सर्व लोकाच्छादक वृत्राला पाहून इंद्र भ्याला, जसा इंद्र भ्याला तसा त्वष्टाही भय पावता झाला. वृत्रानें त्रैलोक्य आच्छादिल्यामुळें इंद्राला आणि त्वष्ट्याला कोठें स्थळ मिळेनासें झालें. नंतर त्वष्ट्यानेंही त्या वृत्रास मारण्याचें मनांत आणून इंद्राबरोबर पुनः मैत्री केली आणि आपल्या शिल्प कौशल्यानें एक वज्र (हिऱ्याचें शस्त्र) निर्माण करून तें आपल्या तपाच्या अभिमंत्रितोदकानें प्रक्षालन करून वृत्रासुरास मारण्याकरितां इंद्रास देता झाला; तों तें तपोमंत्रान्वित वज्र इंद्रास उचलेना! तेव्हां त्यानें श्रीविष्णूचें सहाय घेऊन त्या वज्रानें इंद्र वृत्राप्रत मारिता झाला. या सोमयाजी शिल्पकर्त्या त्वष्ट्यानें वज्र निर्माण केलें याविषयीं आणखी श्रुति-

ऋग्वेद अष्टक १।४।२८।१
अस्मा ऽ इदुत्वष्टा तक्षद्वज्रंस्वपस्तमं स्वर्यं[१] रणाय ॥ वृत्रस्य-
चिद्विदद्येनमर्मं तुजन्नीशानस्तुजताकियेधाः ॥ ६ ॥

**भाष्ये**—शत्रुहिंसनकुशलतमं वज्रं त्वष्टा यन्निर्मितवान् तादिंद्रायैव निर्मितवान् । नत्वन्यस्मै देवाय । तेन वज्रेणच प्रहरन्निंद्रोवृत्रं जघानेति भावः ॥

**अर्थ**—शत्रूंचा पराभव करणारें वज्र त्वष्ट्यानें जें निर्माण केलें तें इंद्राकरितांच केलें दुसऱ्या देवा करितां तर नाहींच. त्या वज्रानें इंद्र वृत्राप्रत मारिता झाला.

याच अभिप्रायाच्या आणखी श्रुति—

---

१ वैदिकमंडळींनी यथोक्त स्वरवर्णयुक्त वेदपठण करण्याकडे लक्ष्य फार ठेवावें. अनक्षर मनायुष्यं विस्वरं व्याधिपीडितम् ॥

ऋग्वेद अ. १।२।३६।२" त्वष्टास्मै वज्रंस्वर्यं ततक्ष" हीच श्रुति

यजुर्वेद तै० ब्रा० अ० २ प्रश्न ५ अ० ४ द० १३ पा० ४

"त्वष्टा स्मैवज्रं२ स्वर्यं ततक्ष"

**भाष्यं**–त्वष्टा ( विश्वकर्मा ) अस्मै ( इंद्राय ) स्वर्यं ( स्वर्गीयहितं ) वज्रं ततक्ष (तीक्ष्णी कृतवान )

**अर्थ**–विश्वकर्मा इंद्राकरितां स्वर्ग लोकांस हितावह अथवा निर्घोष करणारें वज्र प्रखर निर्माण करिता झाला. आणखी श्रुति–"

"मह्यं त्वष्टा वज्रं मतक्षदायसं " ऋ० अ० ८।१।५।२ इत्यादि श्रुतींला अनुसरून

**भागवत स्कंध ६ अध्याय ५**

**दध्यङाथर्वण स्त्वष्ट्रेवर्माभेद्यंमदात्मकं ॥ विश्वरूपाययत्मादात्व-ष्टायत्वमधास्ततः ॥ ५३ ॥ युष्मभ्यं याचितोऽश्विभ्यां धर्मज्ञो ऽगानिदास्यति ॥ ततस्तैरायुधश्रेष्ठो विश्वकर्मविनिर्मितः॥ ५४ ॥**

**अर्थ**—भगवान ह्मणतात-इंद्रा, अथर्वण ऋषीचा पुत्र दधीचीऋषि यानें नारायण कवच त्वष्टा प्रजापतीस सांगितलें. त्वष्टा प्रजापतीनें विश्वरूपास आणि विश्वरूपानें तुला उपदेशिलें. तर त्या नारायण कवच्याच्या जपानें ज्याचें शरीरांतील अस्थि [ हाडें ] हिऱ्याचीं झालीं आहेत. त्या दधीचीला तुह्मी सर्व देव शस्त्राकरितां अस्थि मागा. तुम्हीं ह्मणाल कीं अतिप्रिय देहाचा नाश करून ऋषि अस्थि कसा देईल तर दधीची हा महा ज्ञानी आहे. तो आपला देह जरी तेजःपुंज आहे तरी त्यास नाशवंत अस्थीची मोळी ( फेंकून देण्याची वस्तु !! ) समजत आहे. म्हणून तुह्मा शिष्यांच्या प्रीतीस्तव परोपकार बुद्धीनें, संतोषानें देईल. नंतर त्या हिरकमय अस्थींचें विश्वकर्मा, एक उत्तम वज्र नांवाचें तपोऽभिमंत्रित आयुध निर्माण करील; त्या वज्रायुधानें इंद्र वृत्रासुरास मारील.

**श्लोक १३–'अथेंद्रो वज्र मुद्यम्यनिर्मितं विश्वकर्मणा ॥ भा. स्कं. ६ अ. ५'**

**अर्थ**—यानंतर विश्वकर्मयानें निर्माण केलेलें वज्र इंद्रानें उचलून वृत्रास मारिलें.

आतां विश्वकर्मा देवांना सोमपात्रादि करून देणारा, वेदमंत्रांचा रक्षणकर्ता शिल्पाधिपति असून त्यास बृहस्पति संज्ञा आहे याविषयीं आणि यज्ञादिसंबंधीं पवित्र शिल्प कर्मास ब्रह्मकर्म संज्ञा आहे याविषयीं अथवा जसे स्वर्देवांचा शिल्पी विश्वकर्मा ( त्वष्ट्र ब्रह्मा ) आहेः तसेंच भूदेवांचें ( ब्राह्मणांचें ) यज्ञादि पवित्र शिल्प करण्यास-विश्वकर्म संततीय पंचाल शिल्पीच पाहिजेत. याविषयीं श्रुति–

ऋग्वेद अष्क ८।१।१४।९.

**त्वष्टा माया वेदपसामपस्तमो बिभ्रत्पात्रा देवपानानि शंतमा ॥ शिशीते नूनंपरशुंस्वायसं येनवृश्चादेतशोब्रह्मणस्पतिः॥ ९ ॥**

**भाष्यं**–अयं त्वष्टा देव शिल्पी मायाः । कर्म नामैतत् । कर्माणि पात्र निर्माण विषयाणि । वेत् । वेत्ति । जानाति । सच त्वष्टा । अपसां शोभन कर्मवतां मध्येऽपस्तमोऽ

तिशयेन शोभन कर्मा देवपानानि। देवाः पिबंति येषु तानि पात्राणि सोमपात्राणि बिभ्रत धारयन्वतंत इतिशेषः। सच त्वष्टा नूनमिदानीमग्नौ हविर्वहनायांगीकृतेसति स्वायसं शोभनायः सार भूतं परशुंशिशीते। तीक्ष्णयति। त्वष्टा पात्र संपादनार्थं येन परशुनैतशएतशवर्णो ब्रम्हणस्पतिर्ब्रम्हणोमंत्रस्यपातापात्रादिसंपादनरूपस्यकर्मणः स्वामी वार्वृश्चात् वृश्चति॥

अर्थ—ज्या कालीं यज्ञांत सोमपान करण्याकरितां सर्व देव मार्गानें जाण्यास निघतात त्या कालीं परस्परांस बोलत असतां ते सर्व देव विश्वकर्म्याकडे पाहून ह्मणतात, हा आमचा देव शिल्पी त्वष्टा यज्ञपात्रादि निर्माण करण्याचीं कर्मे जाणतो आणि हा त्वष्टा देवशिल्पी, भृगु अंगिरादि सर्व कुशल शिल्पींमध्यें अतिशय उत्तम शिल्पकर्म करणारा आहे. ज्यामध्यें सर्व देव सोमपान करितात अशीं सोमपात्रें नेहमीं धारण करणारा आहे. स्रुकस्रुवादि यज्ञपात्रें तयार करण्याविषयीं त्वष्टा विश्वकर्मा हा ब्राह्मणवर्ण असून ब्रह्मणस्पति ( वेदमंत्राचा रक्षणकर्ता आणि पात्रादि तयार करण्याच्या शिल्पकर्माचा स्वामी आहे. हा यज्ञपात्रें ज्या परशूनें ( तासणीनें ) छिलतो त्या सुरेख व शुद्ध लोहमय परशूची धारा, विश्वकर्मा आपण ( अग्नीमध्यें हविर्धारा संतत पडावी ह्मणून, विश्वकर्मा आतां आपलीं यज्ञपात्रें छिलण्याकरितां तीक्ष्ण करीत आहे.

या मंत्रांत विश्वकर्मा यास ब्रह्मणस्पति आणि एतश ( ब्राह्मण ) ह्मटलें आहे हें लक्षांत ठेवावें. एतश ह्मणजे ब्राह्मण, यास प्रमाणें—"**इणस्तशन्तशसुनौ। एतशो ब्राह्मणः। सिद्धांतकौमुदी कृदंत प्र० ३ पादे॥ विप्रस्त्वेतशास्तथा॥ १०३॥ एतशोऽपितशन्याद्यः। इति शिवरामकृतौ उणादिकोशे॥**" तसेंच, ब्रह्मणस्पति शब्दाचे व्याख्येंत पात्रादि पवित्र शिल्पकर्मास ब्रह्म ह्मटलें आहे. आणि वेदाचें व शिल्पकर्माचें सामानाधिकरण्य सांगितलें आहे हेंही लक्षांत ठेवावें. विश्वकर्मा हा सर्व शिल्पकर्त्ता असल्यामुळें त्यास व त्याचे संततीय ( पंचाल ) यांस कोणीं शूद्र समजूं नये. आणि देवयज्ञादिसंबंधी पवित्र शिल्प पंचाल ब्राह्मण हस्तनिर्मितच पाहिजेत म्हणूनच मंत्रामध्यें यज्ञपात्रादि शिल्पकर्त्ता विश्वकर्मा हा ब्राह्मण असून त्यास ब्रह्मणस्पति संज्ञा असल्याचें सूचित केलें आहे. अर्थात् पूर्वोक्त ( **विराज्येन विराजतितेनास्मान्ब्रह्मणस्पतेविराजसमिधंकुरु** ) या सूक्तांत सुवर्णालंकार धारण करविणारा, सुवर्णशिल्पकर्त्या पंचाल शिल्पीस विश्वकर्मा समजून त्यास "हे ब्रह्मणस्पते" असें संबोधन देत आहे. याचें कारण स्वर्णकाष्ठादिकांच्या पात्रादि शिल्पकर्मास ब्रह्म असें नांव आहे. त्या ब्रह्मकर्माचा जो पति तो ब्रह्मणस्पति म्हणजे विश्वकर्मा अर्थात् देवांचा पुरोहित जाणावा. या विषयीं '**ब्रह्मणस्पतिरेतासंकर्मारइवाधमत्**' अशी पूर्वीं श्रुति आलीच आहे.

**या पूर्वोक्त प्रमाणावरून पूर्वीं शिल्पकर्ते ब्रह्मर्षि होते आणि सांप्रत पंचाल संज्ञक**

---

१ ओ व्रश्चू छेदने इति धातोः

शिल्पी ब्राह्मण आहेत. असें वाचकांस स्पष्ट समजेल. आतां भृग्वंगिरसादि ब्रम्हर्षींच्या वंशांतील जे शिल्पी होते ते हल्लीं विश्वकर्म संततीय ब्राम्हण रथकार अपरपर्याय नाम पंचाल या नांवानें प्रसिद्ध आहेत. पंचालांचा आदिपुरुष विश्वकर्मा हा देवांचा पुरोहित आहे. यास आणखी प्रमाण श्रुति ( चालू प्रकरण )—

**तैत्तिरीय अरण प्रपाठक ३ अनुवाक १३ दशक १ ला.**

**( अद्भ्यः संभूतः पृथिव्यै रसाच्चविश्वकर्मणः समवर्तताधि ॥ तस्यत्वष्टा-विदधद्रूपमेति ॥ तत्पुरुषस्य विश्वमाजानमग्रे ॥ १ ॥ वेदाहमेतंपुरुषंमहां-तं । आदित्यवर्णंतमसः परस्तात् ॥ तमेवंविद्वानमृतइहभवति । नान्यः पंथा विद्यतेऽयनाय ॥ २ ॥ प्रजापतिश्चरतिगर्भेऽअंतः । अजायमानो बहुधावि-जायते ॥ तस्यधीराः परिजानंतियोनिं मरीचीनांपदमिच्छंतिवेधसः॥३॥* यो देवेभ्य आतपति । योदेवानांपुरोहितः ॥ पूर्वोयोदेवेभ्योजातः । नमो-रुचायब्राह्मये ॥ ४ ॥**

भाष्यं—यस्त्वष्टा देवेभ्यः आतपति ( देवान् अभिव्याप्यतपति ) देवा आदित्याः मनुष्यादीन् भूचरानेव तपति तेषांतेजोहरंति । त्वष्टातु देवानामपि तेजोहरतीत्यर्थः । तथाचमंत्रांतरं—

**त्वष्टादुहित्रेवहतुंकृणोतीतीदंविश्वंभुवनंसमेति । यमस्यमातापर्यूह्य मानामहो जायाविवस्वतोननाश ॥ १ ॥**

भाष्यं—**त्वष्टा** ( विश्वकर्मा: ) **दुहित्रे**( दुहितुः प्रियार्थे ) **वहतुं** ( वहति—अहोरा-त्राणि निर्वहतीति वहतुः सूर्यस्तं ) **कृणोति** ( हिनस्ति दारुवत्शातयति कृशंकरोती-त्यर्थः ) **इति** ( अनेनप्रकारेण ) **इदं** ( सूर्यस्य त्वष्ट्रा शातनंकर्म ) **विश्वंभुवनं** ( सर्वोलोकः ) **समेति** ( सम्यक् जानाति ) कदा-इदमभूदित्याकांक्षायामाहयस्मिन्काले **विवस्वतः** ( सूर्यस्य ) **जाया सैव यमस्य माता** ( संज्ञानाम्नी) **ननाश** ( आद-र्शनं गतवती ) तदा कृणोतीति भूतेर्थेलट् । कृहिंसायामित्यस्यरूपं । कुतोननाशेत्यत आह परीति—विवस्वत इतिपुनः संवध्यते । कीदृशी यमस्य माता। **विवस्वतो** ( भानोः ) **महो** ( महत्तेजः ) **पर्यूह्यमाना** ( परित्याजयंती ) हेतौ शानच् लट् सार्व धातुकत्वाच्चास्यानुदात्तत्वं । एवंहिपुराणेषूपाख्यायते । सौरंतेजोऽसहमाना संज्ञा स्वप्र-तिकृतिं सवर्णाख्यांयोगबलेन निर्मितां सूर्यसमीपंस्थापयित्वा । उत्तरेषुकुरुषु स्वयंवडवा-रूपेण संचचार । सवर्णातु संज्ञापुत्रं कस्मिंश्चिन्निमित्तं शशाप। तत् दृष्ट्वा सूर्य इयं यमस्य माता नभवतीति विज्ञाय त्वष्टुगृहंगत्वा तंसंज्ञामपृच्छत् । सचतेनोक्तस्त्वत्तेजोऽसहमा-नासाउत्तरेषुकुरुषुवडवारूपेण संचरति त्वंचमया शातिततेजाः सन् तामनुसरेति । सत-थेत्युक्ता श्वशुरेण शातितः सनस्वरूपेण तांगत्वाउपयेमे । तस्यामश्विनौजनयामासेति ।

* या तीन ऋचेचें भाष्य व अर्थ पूर्वीं सांगितलीं आहेत. ५ यो देवेभ्यः या ४ थ्या ऋचेचें

"तथाचोक्तं विष्णुपुराणे "शातनं तेजसोमेऽद्यक्रियतामितिभास्करः ॥ तंचाहविश्वकर्माणं संज्ञायाःपितरं द्विजं ॥१॥ संवत्सर भ्रमात्तस्य विश्वकर्मारवेस्ततः ॥ तेजसःशातनं चक्रे स्तूयमानस्य दैवतैः ॥

" **योदेवेभ्य आतपति** ॥ सूर्यवदितरेषामपि तेजोहिनस्तीतिदर्शयति । देवेभ्य इतिबहुवचनेन ॥ यो देवानां पुरोहितः ( देवानांपुरोहितोबृहस्पतिर्विश्वकर्मैव । तथाचमंत्रांतरं—**वाचस्पतिं विश्वकर्माणमूतये । वाचस्पतिर्विश्वकर्माऽभूदिति । ब्रह्मणस्पतिरेतासंकर्मारइवाधमत्** ब्रह्मणः वाचः वागेव ब्रह्म तस्याएव पतिस्तमाहुर्ब्रह्मणस्पतिरिति बृहदारण्यकदर्शनात् ॥ अतएवतत्पुत्रस्यापि देवपुरोहितत्वं श्रूयते तैत्तिरीयके । **विश्वरूपोवैत्वाष्ट्रःपुरोहितोदेवाना मासीत्** ॥ विश्वानि बहूनिरूपाणियस्यासौ) विश्वरूपत्रिभिःशिरोभिरुपेतत्वात् विश्वरूपत्वं । विश्वरूपनायकः त्वाष्ट्रः (त्वष्टुःपुत्रः) सदेवानांपुरोहितः आसीत् । तस्मात् सिद्धमस्ति । विश्वकर्मानामपरमेश्वररूपभेदोरामकृष्णादिवदनंतैश्वर्यसंपन्नः । सर्वशिल्पकरस्त्वष्टा बृहस्पतिरित्यादेशद्वैवेदेषुगीयमानः सर्वेषां देवानामाचार्यइतिभाष्यकारः

**प्राकृत अर्थ**—विश्वकर्मा सर्व देवांमध्यें बहुतेजस्वी आहे. तो सर्व देवांचीं तेजें हरण करण्यास समर्थ आहे. सर्व देव मनुष्यादि सर्व भूलोकस्थ चराचरांचीं तेजें हरण करितात. परंतु विश्वकर्मा देवांचींही तेजें हरण करितो. यास अन्य श्रुतीचें प्रमाण—ऋ० अ० ७ अ० ६ व० २३ मं० १ " **त्वष्टादुहित्रे** " याचा **अर्थ**—त्वष्टा ह्मणजे विश्वकर्मा आपल्या कन्येच्या प्रीतीस्तव आपला जामात सूर्य यास लांकडासारखा छाणून बारीक करता झाला. ही कथा सर्वांस माहीत आहे, विशेष वर्णन करण्यास नको. परंतु ही गोष्ट कोणत्या कालीं झाली? अशी आशंका असेल तर सांगतात. ज्या वेळेस यमाची मातोश्री ह्मणजे संज्ञा नाम्नी सूर्याची पत्नी सूर्यापासून नाहींशी होती झाली. त्या वेळेस सूर्यास छाणून लहान केला. " या अर्थी कृणोति या लट् (वर्तमान ) रूपाचा अर्थ ( प्रत्युत्तर आहे म्हणून ' **ननौपृष्टप्रतिवचने** ३।२।१२० आणि **नन्वोर्विभाषा** ३।२।१२१ या सूत्रावरून भूतकालीं होतो ) आतां ती सूर्याची स्त्री काय कारणास्तव नाहींशी झाली ? अशा प्रश्नाचें उत्तर—सूर्याचें तेज मोठें प्रखर तिला सोसेना म्हणून सूर्यापासून नाहींशी झाली. ( **पर्यूह्यमाना**= परि ( **त्यागे** )+ ऊह ( **वितर्के** )= **पर्यूह** या सोपपद आत्मनेपदी धातूस " **दिवादिभ्यःश्यन्** ३।१।६८१ या सूत्रानें सार्वधातुक ' य ' प्रत्यय होऊन ' **लक्षण हेत्वोः क्रियायाः** ३।२।१२६ ' या सूत्रानें वर्तमानकालवाचक **हेत्वर्थाशानच्** ( **आन्** ) प्रत्यययुक्त झालेल्या स्त्रीलिंगीं पर्यूह्यमाना या शब्दाचा अर्थ परित्याग ( करीत होत्साती असा पदशः जाणावा. ")

या प्रमाणें पुराणामध्यें ही कथा आहे.— सूर्याची पत्नी संज्ञा ही आपल्या पतीचें तेज सहन होईना ह्मणून तिनें योगबलानें हुबेहूब आपल्याच स्वरूपासारखी सवर्णा नामक एक स्त्री निर्माण करून सूर्याजवळ ठेविली, आणि आपण उत्तर कुरुक्षेत्राचेठायीं जाऊन अश्विनीच्या रूपानें विचरती झाली. पुढें सूर्याजवळ ठेविलेल्या सवर्णेनें सं-

ज्ञेचा पुत्र जो यम त्याला कांहीं एक निमित्तानें शाप दिला. हें सूर्यानें पाहून मनांत समजला कीं, ही यमाची माता नव्हे, असें जाणून तो विश्वकर्म्यापाशीं गेला आणि संज्ञेची ( स्वस्त्रीची ) वार्ता पुसता झाला. तेव्हां विश्वकर्म्यानें सांगितलें कीं, संज्ञेला तुझें तेज सहन होईना ह्मणून ती उत्तर कुरुक्षेत्रीं अश्विनीरूपानें राहिली आहे. यास्तव मजकडून तूं आपलें तेज लहान करून घे. नंतर तिजकडेस जा. असें ऐकतांच सूर्यानें "विश्वकर्मा हा देवाचार्य जगद्गुरु व आपला सख्खा सासरा आहे असा विचार करून" ती गोष्ट मान्य केली. मग तो सूर्य विश्वकर्म याच्या शिल्पकृतीनें कृष्टतेजाः ( तासून बारीक केलेला ) असा होत्साता संज्ञेकडेस जाउन तिला आलिंगन देता झाला. त्या अश्विनीरूप संज्ञेला अश्विनीकुमार नामक दोन पुत्र होते झाले. ही कथा विष्णु पुराणामध्यें सविस्तर आहे. त्यांत विश्वकर्मयाप्रति सूर्योक्ति—तुह्मीं माझ्या तेजाचें आजच अल्पीकरण करा. याप्रमाणें सूर्यानें संज्ञेचा पिता जो विश्वकर्मा यास सांगितलें. तेव्हां विश्वकर्मा, देवाही स्तवन करण्यास योग्य जो सूर्य त्याच्या तेजाचें कृशीकरण दरवर्षी करीत असतो. असो सांगण्याचें कारण कीं, "**योदेवेभ्य आतपाति**" या श्रुतीवरून विश्वकर्मा हा जसें सूर्याचें तेज हरण करितो तसें सर्व देवांचेंही हरण करितो असें समजावें. कारण मंत्रांत "देवेभ्य" हें पद बहुवचनांत आहे. याप्रमाणें "**योदेवेभ्य आतपति**" या श्रुतीनें विश्वकर्म्याचें शिल्पकर्म सामर्थ्य वर्णन करून तो शिल्पकर्ता विश्वकर्मा देवांचा पुरोहित आहे, याविषयीं पुढील श्रुति— "**योदेवानां पुरोहितः**" या श्रुतीचा अर्थ—विश्वकर्मा हा देवांचा पुरोहित आहे. म्हणून बृहस्पति ह्मणजे विश्वकर्माच जाणावा. यास प्रमाण श्रुति—"**वाचस्पतिर्विश्वकर्माऽभूत्**" या बृहदारण्यक श्रुतीवरून आणि **ऋग्वेद** अ० ८।३।१।२ **ब्रह्मणस्पतिरेतासंकर्मारइवाधमत्**। या पूर्वोक्त श्रुतीवरून आणि **यजुर्वेद** अ. ४।५।२।५।पदें ४८।५० **वाचस्पतिं विश्वकर्माणमूतये** हीचश्रुति **ऋग्वेद** अ० ८।३।३६ **विश्वकर्मसूक्ते ऋक्७ पाद १ वाचस्पतिंविश्वकर्माणमूतये**। तात्पर्य कीं, ब्रह्म ह्मणजे सरस्वती वागीश्वरी तिचा जो पति तो वाचस्पति त्वष्टाविश्वकर्मा जाणावा. सरस्वती वागीश्वरीं ही विश्वकर्म स्वरूपिणी आहे. यास प्रमाण—

**त्वष्टारूपाणिसमनुजज्ञेत्वष्टृस्वरूपधृक् ॥ त्वष्टासर्वज्ञरूपोऽयंत्वाष्टृ**

---

१ ही कथा वायुपुराणामध्येंही आहे. वायुपुराण उत्तरभाग अध्याय २२ विवस्वानथतच्छुत्वाक्रुद्धस्त्वष्टारमभ्यगात् । त्वष्टातुतंयथान्यायमर्चयित्वाविभावसुं ॥ ६६ ॥ निर्दग्धुकामंरोषेणसांत्वयामासवैशनैः ॥ तयानितेजसायुक्तमिदंरूपंनशोभते ॥ ६७ ॥ असहंतीतुनत्संज्ञावनेचरतिशाद्वले ॥ द्रक्ष्यतेतांभवानद्यस्वांभार्याशुभचारिणीं ॥ ६८ ॥ + + रूपंविवस्वतस्त्वासीतिर्यगूर्ध्वमधस्तथा ॥ ७० ॥ तेनासौपीडितोदेवोरूपेणतुदिवस्पतिः ॥ तस्मात्वष्टांसचक्रंतुबहुमेनेमहातपाः ॥ ७१ ॥ अनुज्ञातस्ततस्त्वष्टारूपनिर्वर्तनायतु ॥ ततोभ्युपगमात्वष्टामार्तंडस्याविवस्वतः ॥ ७२ ॥ भ्रामिमारोप्यतत्तेजः शातयामासतस्यवै ॥ तत्तुनिर्भासितं तेजस्तेजसापद्दतेनतु ॥ ७३ ॥ त्वष्टातुतेनरूपेणविष्णोःश्चक्रंप्रकल्पयत् ॥ महाप्रतिहतंयुद्धेदानवप्रतिवारणे ॥ ८३ ॥ यावायुपुराणोक्तकथेचाभावार्थ कीं, विश्वकर्माशिल्पीकर्तामहातपस्वी, यानें आपल्याजामाताचे ( सूर्याचें ) विश्वतोव्यापी तेजोमंडलचक्रावर ठेवून सूर्यास गोलाकार लहान केला. आणि विश्वकर्म्यानें काढून घेतलेल्या किसून निघालेल्या तेजाचें एकचक्र नामक आयुधकरून दैत्यमारण्याविषयीं विष्णूस दिलें

**रूपासरस्वती ॥ २३ ॥ इति स्कंदपुराणे नागरखंडे अध्याय ५ विश्वकर्मोपाख्याने ॥**

अर्थ—त्वष्टा विश्वकर्मा हा शिल्पाधिपतिरूपें ( शिल्पें ) उत्पन्न करिता झाला. विश्वकर्मा सर्व रूपसमुदाय जाणणारा होय म्हणून सरस्वती नाम वागीश्वरी ही विश्वकर्म स्वरूप जाणावी. " म्हणूनच विश्वकर्म संततीय पंचाल ब्राह्मण वागीश्वरी[1] ( बागीश्वरीची[2] ) उपासना करितात. एवंच वाचस्पति ब्रह्मणस्पति शब्द वाच्य विश्वकर्मा देवांचा पुरोहित आहे. या पूर्वोक्त श्रुतीला अनुसरून आणखी प्रमाण—

**वायुपुराण उत्तरभाग अध्याय २२**

**बृहस्पतेस्तुभगिनी वरस्त्री ब्रह्मचारिणी ॥ योगसिध्धाजगत्कृत्स्नमसक्ताचरतेसदा ॥ १५ ॥ प्रभासस्यतुसाभार्या वसूनामष्टमस्यतु ॥ विश्वकर्मा सुतस्तस्यांजातः शिल्पिप्रजापतिः ॥ १६ ॥ त्वष्टाविराजोरूपाणां धर्मपौत्र उदारधीः ॥ कर्ताशिल्पसहस्राणां त्रिदशानांचवास्तुकृत् ॥१७॥ यः सर्वेषां विमानानि देवतानांचकल्पह ॥ मानुषाश्चोपजीवंति यस्यशिल्पं महात्मनः ॥ १८ ॥ देवाचार्यस्यमहतोधीमतोविश्वकर्मणः ॥ विश्वकर्मात्मजश्चैवविश्वकर्ममयः स्मृतः ॥१९॥ सरेणुरितिविख्यातास्वसातस्ययवीयसी ॥ त्वाष्ट्री सासवितुर्भार्यापुनःसंज्ञेतिविश्रुता॥ २० ॥**

अर्थ—बृहस्पतीची योगसिध्धा नामक बहीण प्रभास नामक आठव्या वसूची धर्मपत्नी होती झाली. हिच्याठायीं शिल्पी प्रजापति असा विश्वकर्मा उत्पन्न होता झाला. त्यासच त्वष्टा असें ह्मणतात. हा धर्म ऋषीचा नातू झालेला त्वष्टा विश्वकर्मा सर्व रूपाचा अधिपति असून अनंत शिल्पांचा कर्ता आणि देवांचीं देवालयें व विमानें करणारा होय. याच्या शिल्पानें मृत्यु लोकीं मानव आपली उपजीविका करतात. हा विश्वकर्मा बुद्धिमान् महान् देवांचा आचार्य ( पुरोहित ) आहे. याचा पुत्र विश्वरूप महा तपस्वी आणि कन्या[3] त्वाष्ट्री ( विश्वरूपाची वडील बहीण ) सरेणु नाम्नी होती ती सूर्याची धर्मपत्नी झाली तिचेंच संज्ञा हें प्रसिद्ध नाम आहे.

यांत प्रभावसूचे पोटीं विश्वकर्मा अवतरला ह्मणून वसुपुत्र विश्वकर्मा[4] ऋ० अ० १।३।२६।५ " **श्रेष्ठोदेवानांवसुः** " या श्रुतीवरून आणि ,, **त्वष्टाप्रजापतिर्ह्यासीद्देवश्रेष्ठो महातपाः** " ह्या भारतउद्योगपर्वोक्त वचनावरून विश्वकर्मा देव श्रेष्ठ

१ वागीश्वरी नामक पवित्र यज्ञकुंडांत विश्वकर्मसूक्त मंत्रांनीं होम करितात. पंचाल ब्राह्मणाचे वागीश्वरीला वागेसरी असा अपभ्रंश, अग्निहोत्रीला आगीनधोत्री ह्मटल्यासारखा अवाच्य जाणावा.

२ वकार बकारयोः सावर्ण्यं वाच्यं व्यवहारे.

३ भागवतस्कंध ५ अ० १ अथच दुहितरं प्रजापतेर्विश्वकर्मणः उपयेमे बर्हिष्मतीं नामतस्या पुह्वाव आत्मजानात्म समानशील गुणकर्मरूपवीर्योदारान्दशभावयां बभूवकन्याचयवीयसीं यूर्जस्वतीं नाम.

४ वसोरांगिरासीपुत्रोविश्वकर्माकृतिपतिः । ततोमनुश्चाक्षुषोभूद्विश्वेसाध्यो मनोः सुताः ॥ भा० स्कं० ६ अ० ६ आकृतिपतिः शिल्पाचार्यः इति श्रीधरः

आहे ह्मणूनच तो पूर्वोक्त श्रुतीवरून आणि " **देवाचार्यस्यमहतो धीमतोविश्वकर्मणः** ।। या वरील वायु पुराणोक्त वचनावरून विश्वकर्मा देवांचा पुरोहित आहे. तसेंच विश्वकर्मा याचा पुत्र जो विश्वरूप तोही देवांचा पुरोहित आहे. यास प्रमाण श्रुति यजु० अ० २ पन्न ५ अ० १ " **विश्वरूपोवैत्वाष्ट्रः पुरोहितो देवानामासीत्** ,, विद्यारण्यभाष्य—विश्वानि बहूनिरूपाणियस्यासौ विश्वरूपः त्रिभिः शिरोभिरुपेतत्वात् विश्वरूपत्वं । विश्वरूपनामकः त्वाष्ट्रः ( त्वष्टुः पुत्रः ) **स देवानांपुरोहितः आसीत्** । या श्रुतीचा भावार्थ—विश्वरूपनामा विश्वकर्म याचा पुत्र देवांचा पुरोहित असता झाला. तस्मात् सिद्धच आहे कीं, जसे विष्णूचें स्वरूपभेद रामकृष्णादिक; त्याप्रमाणें अनंत ऐश्वर्यवान् सर्व शिल्पकर्मकर्ता विश्वकर्मा परमेश्वराचाच स्वरूपभेद त्वष्टा, बृहस्पति इत्यादि शद्बांनीं सर्व वेदांमध्यें वर्णिलेला विश्वकर्मा सर्व देवांचा आचार्य आहे; असा भाष्यकारांचाही सिद्धांत जाणावा.

## पूर्वार्ध समाप्त.

---

---

१ या श्रुतीला अनुसरून स्मृति—भागवतस्कंध ६ अध्याय ७ ब्रह्मोवाच देवान्मतद्विश्वरूपं भजताशुविप्रं तपस्विनं त्वाष्टमथात्मवंतम् ॥ सभाजितोऽर्थान्सविधास्यतेवोयदिक्षमिष्यध्वमुतास्य कर्म ॥ ॥ शुकउवाच ॥ तएवमुदिताराजन् ब्रह्मणाविगतज्वराः ।।ऋषिंत्वाष्ट्रमुपव्रज्यपरिष्वज्येदमब्रुवन् ॥ २६ ॥ पुढें—ऋषिरुवाच ।। अभ्यार्थतासुरगणैः पौरोहित्येमहातपाः ।। सविश्वरूपस्तानाह प्रसन्नः श्लक्ष्णयागिरा ॥ ३४ ॥

शुकउवाच ॥ वृतःपुरोहितेंस्त्वाष्ट्रोमहेंद्रायानुपृच्छते ॥ नारायणाख्यंवर्माहतदिहैकमनाः श्रणु अध्याय ८ शुकउवाच—एतांविद्यामधिगतो विश्वरूपांच्छतक्रतुः ॥ त्रैलोक्यलक्ष्मीं बुभुजे विनिर्जित्यमृधेऽसुरान् ॥

# अथ उत्तरार्धः

या उत्तरार्धात मुख्यत्वें वाचस्पति, विश्वकर्म कुलोत्पन्न रथकारप्रकरण, आंगिरसाचें शिल्पित्व, आणि सर्व वाक्यांला अनुलक्षून अनुक्रमानें पंचाल ब्राह्मणांचे समूल वर्णन इत्यादि विषय आहेत.

**प्रश्न**—यज्ञसंबंधी देवसंबंधी शिल्पकर्म जर ब्राह्मणाची वृत्ति आहे आणि त्या पवित्र शिल्पाचे कर्ते विश्वकर्म संततीय पंचाल जर ब्राह्मण आहेत तर त्यांचीं नामें अगर उल्लेख अमरकोशाचे ब्रह्मवर्गांत असला पाहिजे तो कोठें आहे दाखवा?

**उत्तर**—अमरकोशांतील ब्रह्मवर्गांत विश्वकर्मसंततीय पंचाल शिल्पि ब्राह्मणांस स्थपति अशी संज्ञा आहे. प्रमाण अ. **ब्रह्मवर्ग—सगीष्पतीष्ट्यास्थपतिः ॥ अर्थ**—बृहस्पतिसंज्ञक इष्टि ( यज्ञ ) करणारास स्थपति म्हणतात. बृहस्पतीष्टि म्हणजे विश्वकर्मेष्टीच होय. कारण, **वाचस्पतिं विश्वकर्माणमूतये**, आणि **ब्रह्मणस्पतिरेता संकर्मार इवाधमत्** ' या श्रुतींचा भावार्थ भाष्यावरून विश्वकर्मा हाच बृहस्पति आणि बृहस्पतीष्टि करणारा जो स्थपति म्हणजे तो विश्वकर्मा होय प्रमाण— " **स्थपति विश्वकर्मास्यादिति " भागवते ३ स्कंधे—स्थापत्यंविश्वकर्मशास्त्रं** " स्थपतेः ( विश्वकर्मणाइदं ) स्थापत्यं ॥ यावरून स्थपति संज्ञा विश्वकर्म यास आहे. आणि विश्वकर्म बृहस्पतीच्या ऐक्यतेविषयीं आणखी प्रमाण—**श्रुति—यजु० अष्ट० ६ ४। १० सप्रथमः संकृतिर्विश्वकर्मासप्रथमोमित्रो वरुणोऽग्निः सप्रथमोबृहस्पति श्चिकित्वान् ॥ भाष्यांश**—समीचीनाकृति निर्माणं यस्यासौसंकृतिः। तादृशोविश्वकर्मनामको देवोऽपिइंद्रएव.

**अर्थ**—उत्तम आहे कृतिनाम निर्माण कर्म ज्याचें तो संकृति विश्वकर्मा १ मित्र, वरुण, अग्नि, आणि बृहस्पति यांसही देवेंद्र अशी संज्ञा आहे. या श्रुतीनें विश्वकर्म यास संकृति ह्मटलें आहे. आणि एकपक्षीं संकृति हा अंगिरा ऋषीचा पुत्रही होता; यास प्रमाण—**मत्स्यपुराण** अध्याय १९५ **अंगिराः संकृतिश्चैवगौरवीतिस्तथैवच ॥ ३० ॥ अर्थ**—अंगिराऋषीचा पुत्र संकृति त्याचा पुत्र गौरविति असे त्रिप्रवर होतात. यावरून बृहस्पतीस विश्वकर्मा संकृति ही पर्याय नामें होतात. आतां बृहस्पतीष्टि म्हणजे विश्वकर्मेष्टि अथवा बृहस्पतीष्टि करणारास शिल्पवेत्ता ब्राम्हण ह्मणण्यास बृहस्पतीच शिल्पकर्म करणारा असला पाहिजे, अशी शंका घ्याल तर— " **सगीष्पतीष्ट्या स्थपतिः** ,, यांतील स्थपति या त्याच्या नामावरून बृहस्पति शिल्पकार होता असें स्पष्ट आहे. कारण **क्लीबंतुलक्षणोपेतेस्थपतिः कंचुकिन्यपि ॥ जीवेष्टियाजके शिल्पिभेदेनासत्तमेत्रिषु ॥ इति मेदिनी ॥ स्थपतिः शिल्पिभेदे ऽपीतिनानार्थवर्गः ॥** याप्रमाणावरून कोणी म्हणेल कीं, एका प्रकारच्या शिल्पिविशेषासही स्थपति म्हणतात. त्या स्थपति शद्बाचा संबंध विश्वकर्मसंतती पंचाल

लिपिकडे असण्यास काय प्रमाण म्हणाल तर " **स्थापत्यंचासृजद्वेदंक्रमात्पूर्वादिभिर्मुखैः ( स्थापत्यंविश्वकर्मशास्त्रं** ) या भागवतोक्तीवरून स्थपति हें विश्वकर्मवाचक पर्याय नाम आहे म्हणून " **यस्कादिभ्यो गोत्रे** " आणि **अत्रि भृगु कुत्स वसिष्ठ गौतमांगिरोभ्यश्च** २।४।६५ यापा० सूत्रावरुन विश्वकर्मा भृग्वांगिरस असल्यामुळें त्याच्या स्थपति या पर्यायनामास लुक् प्रत्यय होऊन विश्वकर्मा व त्याची पुत्रपौत्रादि संतति ( पंचाल यांसही स्थपति संज्ञा आहे. संकर रथकारादिक शूद्रशिल्पी शूद्रवर्गांत पुष्कळ सांगितले आहेत; त्यांत कोणत्याही प्रकारच्या संकर शूद्र शिल्पी भेदास अगर सर्व शूद्र वर्गांत देखील स्थपति शब्दच नाहीं. ज्यापेक्षां शूद्रवर्गांत शिल्पिभेदवाचक स्थपति शब्द नाहीं आणि ब्रम्हवर्गांत आहे; त्यापेक्षां अमरकोशकर्त्यानेंही " **सगीष्पतीष्ट्यास्थपतिः** " या संज्ञेनें विश्वकर्मसंतति ब्रम्हरथकारापरपर्यायनाम पंचाल हे ब्राम्हण असल्यामुळें त्यांचें नाम, नामलिंगानुशासनांतर्गत ब्रम्हवर्गांतच दिलें आहे.

**प्रश्न**–( **सगीष्पतीष्ट्यास्थपतिः** ) हें वाक्य, कोशकारानें या ब्रम्हवर्गांत ( स्थपति ) हें नाम केवळ एक बृहस्पति संज्ञक यज्ञ करणाऱ्या ब्राम्हणांनांच उद्देशून दिलें आहे; तेथें रथकारांचा रथकर्मसंबंध मुळींच सांगितला नाहीं. आतां हा बृहस्पति संज्ञक यज्ञच जर रथकर्मार्थक व श्रेष्ठत्वसंपादक, बृहस्पति हा रथादि शिल्पकर्ता आणि बृहस्पति जसा आंगिरस आहे तसा विश्वकर्माही आंगिरस या तिहींविषयीं जर प्रमाणें असतील तर मात्र ( **सगीष्पतीष्ट्यास्थपतिः** ) हें वाक्य विश्वकर्मसंततीय ब्राम्हणजातीय पंचाल रथकार ब्राम्हणांच्या संबधाचें आहे असें म्हणणें निःसंशय होईल. ब्राम्हण जातींत रथकार आहे काय?

**उत्तर**–बृहस्पति यज्ञ म्हणजे कोणता याचा विधि कसा आणि तो काय कारणास्तव करावा लागतो; याचा आपण प्रथम शोध करूं– " **सगीष्पतीष्ट्यास्थपतिः** " याजवर महेश्वर कृत टीका ( " **वाजपेयेनेष्ट्या बृहस्पतिसवेनयजेतेतितद्विधिः** " ) म्हणजे वाजपेय नामक यज्ञ प्रथम बृहस्पतीनें केला म्हणून वाजपेय यज्ञासच बृहस्पतिसव म्हटलें आहे; यास प्रमाण **श्रुति**–तै० **ब्राह्मण** अ० १ प्र० ३ अनु० ६ **योवाजपेयेनयजतेबार्हस्पत्य एषचरुः ॥** **अर्थ**– जो वाजपेयानें हवन करितो, तें त्याचें हवन बार्हस्पत्य जाणावें.

आतां वाजपेय यज्ञ हा रथकर्मविषयक आहे. याविषयीं श्रुति–**यजुर्वेद अष्टक** १ प्र० ७ अ० ७ **देवसवितःप्रसुवयज्ञंप्रसुवयज्ञपतिं भगायदिव्योगंधर्वः ॥ केतपूःकेतंनःपुनातुवाचस्पतिर्वाचंमद्यस्वदातिनः ॥ इंद्रस्यवज्रोऽसिवार्त्रघ्नस्त्वयायंवृत्रंवध्यात् ॥ वाजस्यनुप्रसवेमातरंमहीमदितिंनामवचसाकरामहे । यस्यामिदंविश्वंभुवनमाविवेशतस्यांनोदेवःसविता धर्मसाविषत् । अप्सुः ॥ १ ॥**

**भाष्यम्**— यजुर्वेद प्रथमाष्टके सप्तमप्रपाठके सप्तमानुवाके देवसवितः प्रसुवेत्यादिषु षट्सुवाजपेयविषया आध्वर्यमंत्रा उच्यंते ॥ तत्र आस्मिन् सप्तमानुवाके रथविषया मंत्राः कथ्यंते ॥ तेषां वाजपेय मंत्राणां व्याख्यानं ब्राह्मण ग्रंथे प्रथम कांडे तृतीय प्रपाठके द्वितीय मारभ्य नवमांतेष्वष्टस्वनुवाकेषु आम्नातं ॥ तत्र वाजपेयविधिर्ग्रहविधिः पशुविधिश्चाद्येषु त्रिष्वनुवाकेषुक्रमेणाम्नाताः ॥ अनयोर्वाजपेय विषयोर्मंत्र ब्राह्मणयो रत्यंत विप्रकृष्टदेशवर्तित्वेन बुद्धि सान्निध्यभावाच्छ्रोतृणांप्रतिपत्तिसौकर्याय पूर्वोक्त दार्शिक सौमिक कांडवद्ब्राह्मणेन सहैव मंत्रा व्याख्यायंते । तस्यच ब्राह्मणस्य प्रथमानुवाके वाजपेयंविधातुं प्रस्तौति ॥

**अर्थ**— यजुर्वेदाचे अष्टक १ प्र० ७ अनु० ७ यांत "**देवसवितः प्रसुव०** इत्यादि वाजपेय यज्ञाविषयींचें अध्वर्युसंबंधीं ६ मंत्राचें व्याख्यान केलें जात आहे; त्या रथकर्मविषयक वाजपेय मंत्राचे व्याख्यान तै० ब्राह्मणाच्या ३ कांडांतील ३ प्रपाठकांत दुसऱ्या अनुवाकापासून ( २।३।४।५।६।७।८ आणि ९ ) व्या अनुवाकापर्यंत सांगितले आहे. पैकीं २।३ आणि ४ या तीन अनुवाकांत वाजपेयविधि, ग्रहविधि, आणि पशुविधि, हे तीन अनुक्रमानें वर्णिले आहेत. या वाजपेय विषयाचे मंत्र आणि ब्राह्मण यांचें अतिशय दूरत्व असल्यामुळें या मंत्राचे ब्राह्मण अमुक; असें समजत नाहीं, म्हणून याज्ञिकांस वाजपेय मंत्रांचा आणि त्यांच्या ब्राह्मणाचा लवकर बोध होण्याकरितां पूर्वोक्त दर्शसंबंधीं व सोमसंबंधीं कांडाप्रमाणें "**देवसवितः प्रसुव**" या रथविषयक वाजपेय मंत्रांची व्याख्या त्याच्या ब्राह्मणासहित करितों. या वाजपेय संबंधीं ब्राह्मणाच्या प्रथमानुवाकांत वाजपेयविधानाची आरंभीं प्रस्तावना केली जात आहे.

पूर्वोक्त भाष्यकारोक्तीवरून स्पष्ट समजेल कीं, बृहस्पति संज्ञक वाजपेय यज्ञ देवरथनिर्माणार्थक आहे; ह्मणजे पूर्वीं हा यज्ञ देव, ब्राम्हण आणि क्षत्रिय, हे मुख्यत्वें अश्व आणि आयुधासहित रथ निर्माण करण्याकरितां करीत होते. हें आणखी पुढील मंत्रावरूनही स्पष्ट समजेल.

आतां हा दिव्य रथ कर्मविषयक वाजपेय यज्ञ आरंभीं बृहस्पतीने करण्याचें कारण काय झालें तें. "देवसवितः प्रसुव"—या वाजपेय मंत्रांच्या ब्राम्हणोक्त प्रस्तावनेवरून पहा.

**तैत्तिरीय ब्राह्मण. अ० १ प्र० ३ अनु० २ देवावैयथादर्शंयज्ञानाहरंत । योऽग्निष्टोमायउक्थ्यं । योऽतिरात्रं । तेसहैयसर्वैवाजपेयमपश्यन्ते । अन्योन्यस्मैनातिष्ठंत अहमनेनयजामेति । तेऽब्रुवन् । आजिमस्यधावाइति ॥ १ ॥ तस्मिन्नाजिमधावन् ॥ तंबृहस्पतिरुदजयत् ॥ तेनाजयत् । सस्वाराज्यमगच्छत् ॥ तमिंद्रोऽब्रवीत् ॥ मामनेनयाजयेति । तेनेंद्रमयाजयत् । सोऽग्रंदेवतानांपर्यैत् । अगच्छत्स्वाराज्यम् ॥ अतिष्ठंतास्मैज्यैष्ठ्याय ।**

**अर्थ**—( भाष्यावरून ) पूर्वीं, कोणी अग्निष्टोम, कोणी उक्थ्ययज्ञ, कोणी अति-

रात्र, असे अनेक प्रकारचे यज्ञ सर्व देव आपआपल्या अभिरुचीप्रमाणें करीत असत. कोण्याएके काळीं सर्व देवांनीं वेदांतील वाजपेय यज्ञ अवलोकन करून " या यज्ञापासून रणांत जय देणारा रथ निर्माण होत असल्यामुळें " जो तो देव ह्मणे कीं, मीच अगोदर या वाजपेय यज्ञानें यजन करीन, याप्रमाणें ते सर्व देव परस्पर विवाद करूं लागले. ह्मणून हा यज्ञ अगोदर करण्याचें श्रेष्ठत्व, कलह भीतीमुळें, कोणींच पत्करीनात. नंतर सर्व देवांनीं मिळून एक नियम ठरविला; तो असा कीं, एक औदुंबरी शाखा ठेवून, आजि ( धांवत जाण्याचें एक मर्यादास्थान ह्मणजे हद्द ) करून ठेविली. आणि एकमेकास ह्मणूं लागले कीं, आह्मां देवांमध्यें जो कोणी या आजीप्रत उत्कर्षानें अगोदर जय पावेल तोच आमचा अधिपति होवो. असा ठराव करून सर्व देव त्या आजीकडे मोठ्या वेगानें धांवत सुटले. त्यांत बृहस्पतीनें तें आजिस्थान सर्वांच्या अगोदर जिंकिलें. ( त्या औदुंबरी शाखेला स्पर्श केला. ) याचें कारण बृहस्पति हा महान् वेदवित् असल्यामुळें त्यानें रथविषयक वाजपेय यज्ञ अनुष्ठिला होता. ह्मणून तो अश्वासहित रथ देवतेच्या अनुकूलतेनें इतर देवांच्या अगोदर आजीला जिंकिलें. अर्थात् प्रथम रथविषयक वाजपेय यज्ञानुष्ठानानें बृहस्पति हा सर्व देवाधिपति होता झाला. नंतर इंद्रानें बृहस्पतीला पुरोहित करून त्यास प्रार्थना केली कीं, हे गुरो, मजकडून तो वाजपेय यज्ञ करवा. मग बृहस्पतीनें तो इंद्राकडून वाजपेय यज्ञ करविल्याबरोबर त्यास दिव्य रथ प्राप्त झाला. आणि सर्व देव इंद्रास आपला राजा असें ह्मणूं लागले. ह्मणजे बृहस्पतीला ब्राह्मणमुख्यत्व आणि इंद्रास देवाधिपतित्व या रथविषयक वाजपेय यज्ञापासून प्राप्त झालें आहे.

वाजपेय यज्ञ आदौ बृहस्पतीनें केला ह्मणून वाजपेयास बृहस्पतिसव हें पर्याय नाम आहे. आणि हा यज्ञ रथविषयक असल्याविषयीं वर भाष्यकारानें सुचविलेंच आहे. तथापि या यज्ञानें शिल्पजन्य रथ कसा तयार करितात याविषयीं सविस्तर माहिती पाहिजे तर यजुर्वेद अष्टक १ प्रपाठक ७ वा व आठवा यामध्यें आणि तै० ब्राम्हण अष्टक १ प्रपाठक ३ अनुवाक २ पासून ९ पर्यंत या श्रुति सभाष्य अवलोकन कराव्या, ह्मणजे रथाचीं चक्रें, आंख, दांड्या, रज्जु, अश्व वगैरेची समंत्रक रथनिर्माण कृति सांगितली आहे ती कळेल. उदाहरणार्थ संक्षेपेकरून कांहीं प्रमाणें देतों. पूर्वोक्त श्रुति—**देवसवितः प्रसव यज्ञं० ॥ केतपूः केतंनः पुनातुवाचस्प० ॥** याचें भाष्यांत " **केतान् पुनाति प्राणिनांविज्ञानानि शोधयति । सोऽस्माकं केतं वाजपेय विज्ञानं पुनातु शोधयतु ॥** अर्थ—वाजपेय यज्ञ हा रथविषयक असल्यामुळें शिल्परूप आहे; ह्मणून यज्ञाच्या आरंभीं पुरोहित म्हणतो, हे सूर्या, स्वर्गभव गंधर्व, सर्व प्राण्यांच्या विज्ञानास ( शिल्पास ) पवित्र करणारा आहे ह्मणून तो या वाजपेय विज्ञानास ( वाजपेय संबंधी रथ ) शिल्पास पवित्र करो. तसाच वाचस्पति हा आमच्या वाजपेय मंत्राच्या वाणीसही शुद्ध करो. वाजपेय यज्ञ आणि अश्वमेध यज्ञ हे

१ केत ह्मणजे गृहमूर्ति इत्यादि शिल्प ( शब्दरत्नाकर )

२ विज्ञानं शिल्पशास्त्रयोः ॥ ( अमरकोशः )

शिल्पवेदानुबंधी आहेत. कारण या यज्ञाची आणि अथर्वणशिल्पवेदाची उत्पत्ति ब्रह्मदेवाच्या उत्तर मुखापासून झाली आहे. प्रमाण—**षोडश्युक्थ्यौपूर्ववक्त्रात्पुरीष्यग्निष्टुतावथ ॥ आप्तोर्यामातिरात्रौचवाजपेयंच गोसवम् ॥ भा० स्कंध० ३ अ० १२ ॥** अर्थ—पूर्वमुखापासून षोडशी आणि उक्थ्य, दक्षिणमुखापासून चयन आणि अग्निष्टोम पश्चिममुखापासून आप्तोर्याम आणि अतिरात्र, उत्तर मुखापासून वाजपेय आणि अश्वमेध उत्पन्न झाला. तसेंच **ऋग्यजुःसामाथर्वाख्यान्वेदान्पूर्वादिभिर्मुखैः ॥ स्थापत्यंचासृजद्वेदंक्रमात्पूर्वादिभिर्मुखैः ॥ भा० स्कं० ३** या प्रमाणावरून अथर्वण वेद आणि वैश्वकर्मण शिल्पवेद हेही उत्तरमुखापासून झाले. तेव्हां अथर्वण वेद स्थापत्य शिल्पवेद आणि वाजपेय अश्वमेध यांचें उत्पत्तिस्थान एक उत्तरमुखच आहे. आणि श्रुतीही “ **विश्वकर्मावआदित्यैरुत्तरतउपदधताम्** ,, अथर्वण वेदाच्या स्थापत्य नामक उपवेदाचा कर्ता स्थपति विश्वकर्मा होय. बृहस्पति हा विश्वकर्माच जाणावा; कारण स्थपति हें नाम विश्वकर्म्यास व बृहस्पतीस एकवाक्यतेनें आहे. आणि दुसरें कारण जसा भागवतांमध्यें अथर्वण वेदोपवेदाचा कर्ता विश्वकर्मा ह्मटलें आहे तसा त्याचा कर्ता बृहस्पति असेंही ह्मटलें आहे. प्रमाण—**अमरकोश कांड १ “ अन्वीक्षिकी दंडनीतिस्तर्कविद्यार्थशास्त्रयोः ,, महेश्वरीटीका—अन्वीक्षिकीत्येकंतर्कविद्यायांगौतमादिप्रणीतायां ॥ दंडनीतिरित्येकंअर्थशास्त्रेबृहस्पत्यादिप्रणीते**

यावरून तर अर्थशास्त्रसंज्ञक अथर्वणोपवेदाचा कर्ता बृहस्पति आहे. बृहस्पतिकृत अर्थशास्त्रासच शिल्पविद्यात्मक अथर्वण वेदाचा उपवेद ह्मणावें. यास प्रमाण—**चरण व्यूहखंड ४ स्थापत्यवेदोऽर्थशास्त्रंविश्वकर्मादिशिल्पशास्त्रं अथर्ववेदस्योपवेदः ॥** आणखी प्रमाण—**आथर्वणीश्रुति—“द्वेविद्येवेदितव्येहि ’** या श्रुतीची द्योतक स्मृति **अग्निपुराण अ० १ द्वेब्रह्मणीवेदितव्येशब्दब्रह्मपरंचयत् ॥ द्वेविद्येवेदितव्येहि इतिचाथर्वणीश्रुतिः ॥** अर्थ—दोनही ब्रह्म जाणावीत. एक शब्द ब्रह्म आणि दुसरें परब्रह्म.

शब्दब्रह्म ह्मणजे ( **ऋग्यजुःसामाथर्वाख्या वेदांगानिच षट्द्विज ॥ शिक्षा कल्पोव्याकरणं निरुक्तं ज्योतिषांगतिः ॥ छंदोभिधानंमीमांसा धर्मशास्त्रंपुराणकम् ॥ न्यायवैद्यक गांधर्व धनुर्वेदोर्थशास्त्रकम् ॥ अग्नि पु० अ० १** ) यावरून ही शिल्पात्मक अथर्वणोपवेदास अर्थशास्त्र ह्मणतात, ह्मणून स्थापत्य शिल्पशास्त्र अपरपर्यायनाम अर्थशास्त्राचा जो कर्ता तोच रथविषयक वाजपेय यज्ञाचा कर्ता स्थपति शब्दवाच्य बृहस्पति शिल्पी होय; कारण बृहस्पति हा अथर्वांगिरस ( अथर्वा नामक अंगिरा ऋषीचा पुत्र ) असल्यामुळें आणि अथर्वण वेदास अथर्वांगिरसी संज्ञा असल्यामुळें बृहस्पति हा आथर्वण होय. आणि अर्थात् ज्यापेक्षां “ **अथर्वण वेदस्योपवेदः शिल्पवेदः प्रकीर्तितः ॥ तस्मादाथर्वणाः प्रोक्ताः सर्वेशिल्पिनएवच** ” या शैवागम स्मृतीवरून ज्यास अथर्वण संज्ञा ( शिल्पोपवेद ), “ **सगीष्पतीष्टयास्थपति** ,, यावरून स्थपति ( शिल्पीपर्याय ), आणि “ **वाचस्पतिंविश्वकर्माणमूतये** ,, या श्रुतीवरून विश्वकर्मा ( सर्व शिल्पकर्ता ) अशा सर्व शिल्पसंबंधी संज्ञा

आहेत; तो बृहस्पति देवरथादि शिल्पकर्ता आहे हें त्याच्या वाजपेय यज्ञकर्मावरून स्पष्ट आहे. कारण वाजपेय हा रथकर्मसंबंधी आहे. हें त्याच्या वाजपेय या नामावरूनच पहा—वाजनामक देवतेचें आहे पेय ह्मणजे प्राशनीय हविः ज्याचे ठायीं तो वाजपेय यज्ञ होय. वाजदेव हे, ऋभु, विभ्वा, वाज या तीन प्रकारच्या सौधन्व ऋभूमध्यें कनिष्ठ ऋभूचें नांव आहे. जरी तिन्ही प्रकारचे ऋभु सर्व शिल्प करणारे आहेत, तथापि पूर्वोक्त ( पृष्ठ ४७ ओळ २३ ) मध्यें " **ऋभुक्षावाजो रथस्पति.** ,, या श्रुतीवरून वाजदेव रथशिल्पाचेच कर्ते रथस्पति असल्यामुळें वाजपेय यज्ञ रथशिल्पविषयक होय. आतां वाज ह्मणजे ऋभुदेवच होत, यास आणखी श्रुतिप्रमाण—

**ऋभून्वाजान्मरुतः सोमपीतये** ।।ऋ० अ. १ अ-७ वर्ग ३२ मं.४

**भाष्यांश**—ऋभून-विभ्वावाजयुक्तंऋभुं तथैववाजान्ऋभु विश्वयुक्तंवाजमेतन्नामकं देवम् ।।

या श्रुतीवरून वाज ह्मणजे ऋभुदेव होत. हे वाजदेव रथादि शिल्प करणारे आहेत. याविषयीं ऋग्वेद श्रुतीही आहे. ती—

**इंद्रोहरीयुयुजेअश्विनारथंबृहस्पतिर्विश्वरूपामुपाजत** ।। ऋभुर्विभ्वा **वाजोदेवा अगच्छतस्वपसोयज्ञियंभागमैतन** ।। ६ ।।

**भाष्यं**—इंद्रोहरी युयुजे । ऋभुभिर्निर्मितौहरिद्वर्णावश्वौस्वरथेयोजयति । अश्विना।। आश्विनौयुयुजाते । ऋभुभिःकृतंरथंयोजयतः । बृहस्पतिः विश्वरूपामेतन्नामिकामृभुभिः कृतांगामुपाजतस्वी करोति ।अतः। ऋभुर्विभ्वावाजइति ऋभवोदेवानागच्छतद्देवत्वंप्राप सुअपसः सुकर्माणोऽश्वरथगवादिपरमाद्भुतकर्मणांकर्तारोयूयंयाज्ञियंभागमैतनयज्ञेनप्रापितस्यहाविषो भागंप्राप्तवंतःस्थ ।।

**अर्थ**—इंद्र—ऋभूंनीं निर्मिलेले पिंवळ्या रंगाचे घोडे रथास जुंपिता झाला. अश्विनी देवही ऋभूंनीं केलेल्या रथास योजिते झाले. तसाच बृहस्पती हा ऋभूंनीं निर्माण केलेल्या विश्वरूपा नामक गायीला, स्वीकारिता झाला. या कारणास्तव ऋभु, विभ्वा, वाज या नांवाचे ऋभु देवत्व पावते झाले. असें अश्वरथादि मोठें आश्चर्यकारक चमत्कारिक शिल्पकर्म करणारे तुह्मीं ऋभुदेव, यज्ञामध्यें अर्पण केलेला हविर्भागाप्रत प्राप्त झाल्या आहांत.

यावरून वाजपेययज्ञ, ऋभुसंज्ञक वाजदेवतासंबंधीं असल्यामुळें रथविषयक निःसंशय आहे; आणि **आर्भवेचोदकादुक्थ्यासक्तिभ्यांतदनंतरः ।। श्रुतिबाधस्तदा तस्मात्तृतीयोविकृतित्वतः ।। पूर्वमीमांसा** अ० ११ **पाद** ३ ". आणि **वाजपेये तृतीयसवनेप्रथमंआर्भवःपवमानइति भाष्यकारः** ।।" या मीमांसा आणि भाष्यकारोक्तीवरून वाजपेययज्ञामध्यें तृतीयसवन होम करतेवेळीं, ऋभुदेवताकपवमानसोम आरंभी ग्रहण केला आहे, ह्मणजे ऋभुदेवतांना अगोदर सोम हवन करितात. या **वाजपेय यज्ञाचा** उपयोग रथकर्माकडे असण्याचे कारण—श्रुति— " **सोमोवैवाजपे-**

१ ऋभु आणि वाज हे बृहस्पतीचे पुतणे होत.

यः। योवैसोमंवाजपेयंवेदवाज्येवैनंपीत्वा भवति। आऽस्यवाजीजायते" तै० ब्रा० अ० १ प्र० ३ अ० २॥

**अर्थ**—सोमयज्ञ आणि वाजपेय यज्ञ हे अभेद ( एकरूप आहेत. ) कारण वाजपेय यज्ञांत सोम हविष्यही आहे; म्हणून वाजपेय संबंधीं सोमादि हविष्य जो प्राशन करितो तो स्वतः वाजीच ( महावीर्यवान् महाचपल बलिष्ट) होऊन या वाजपेय यज्ञापासून मोठा वेगवान् वाजी म्हणजे घोडाही उत्पन्न होतो. नंतर त्या अश्वास रथाशीं योजना करितात. " म्हणूनच बृहस्पती, वाजपेय यज्ञानें आपण बलिष्ठ होऊन रथ निर्माण करून सर्व देवांचे अगोदर आजिस्थान जिंकिलें, आणि सर्व देवांचा गुरु झाला. " असो, या श्रुतीवरून सोम आणि वाजपेय अभेद असल्यामुळें सोमयज्ञाचा जो कर्ता त्वष्टा त्यानें अश्वरथोत्पादक वाजपेय यज्ञही केला हें उघड आहे. कारण जसा वाजपेयापासून अश्व उत्पन्न झाला; तसा " त्वष्टुरवांजायत आशुरश्वः ,, या श्रुतीवरून त्वष्ट्यापासूनही उत्तम अश्व उत्पन्न झाला; अशी श्रुती आहे तसेच आणखी त्वष्टा विश्वकर्मा वज्रनिर्माण कर्ता असल्यामुळें तो वाजपेय कर्तादेवपुरोहित होय. कारण रथासवज्र संज्ञा आहे " इंद्रस्यवज्रोऽसिवार्त्रघ्नइतिरथमुपावहरतिविजित्यै ,, ( तै. ब्रा. ) **अर्थ**—याश्रुतींत रथाच्या एका काष्ठविशेषाची ( देव किंवा राजे ज्यावरून चढून रथांत बसतात, त्याची ) स्तुति आहे.—" हे रथा, शत्रुघातकरणारा जो इंद्राचा वज्र, तो तूंच आहेस, असें म्हणून रथी रथांत बसून जय पावतो. ,, या श्रुतीवरून आणि वज्रोवैरथः। वज्रेणैवदिशाऽभिजयति॥ तै. ब्रा. अ. १ प्र. ३ अ. ६ ,, यावरून त्वष्टाही रथविषयकवज्रसंज्ञक वाजपेय यज्ञकर्ता असल्यामुळें त्वष्टा आणि बृहस्पति यांचें सामानाधिकरण्य आहे.

आतां वाजपेय यज्ञकांडांत रथविषयकमंत्र आहेत. त्याविषयींच्या श्रुति—

सप्तदशः प्रजापतिः। प्रजापतेराप्त्यै। अर्वासिसप्तिरसि। वाज्यं सीत्याह। अग्निर्वाअर्वा। वायुःसप्तिः। आदित्योवाजी। एताभिरेवास्मैदेवताभिर्देवरथंयुनक्ति। प्रष्टिवा हैनंयुनक्ति। प्रष्टिवाहीवैदेवरथः। देवरथमेवास्मैयुनक्ति॥ (तै. ब्रा. )

याश्रुतींत वैदिकमंत्रांनीं देवाचा रथ तयार करण्याचें विधान सांगितलें आहे. या संबंधीं **संग्रह श्लोक**—

देवहोमोऽत्रकर्मादाविंद्रस्यरथमाहरेत्॥ वाजस्यवेदिमध्येतमध्या वर्तयतेरथम्॥ अप्स्वश्वान्प्लावयद्वायुर्युनक्तितुरगंरथे॥ अपांतदश्वपृष्ठानिमार्ष्टिविष्णोरथंव्रजेत्॥ अंकौरथेमृशेत्पक्षावष्टौमंत्राइहोदिताः॥

या संग्रह श्लोकांत रथाविषयीं —इंद्रस्य०, वाजस्य०, अप्सु० वायु०, अपां० विष्णो०, अंकौ० २ इत्यादि ८ मंत्र आहेत. या आठमंत्रानीं अनुक्रमें रथस्वीकार, रथवेदी व स्थापन करून प्रादक्षिण फिरविणें[२], अश्वधुणें[३], रथास जुंपणें, अश्वांच्या

पाठी पुसणें[5], रथांत बसणें[6], आणि रथाचे दोनी चाकांस स्पर्श करणें ७, ८ अशीं आटकर्में रथविषयक सांगितलीं आहेत. विस्तारभयामुळें सभाष्य समंत्र वर्णनकरीत नाहीं देवरथास अश्व जुंपणें व अलंकृत करणें याविषयींचे मंत्र यजुर्वेद अ० ३ पन्न ९ अनुवाक ४ यामध्यें आहेत हें " **चतुर्थेश्वरथयोजनालंकारादयो विधीयंते** " या भाष्यकारोक्तीवरून उघड आहे. तसेंच " **केतुंकृण्वन्नकेतवे०** " या मंत्रानें रथाचे ठायीं ध्वज स्थापन करितात. याचप्रमाणें तै० ब्रा० अ० २ प्र० ७ अनु० ८ यांत ओदनसव नामक यज्ञामध्यें राजाच्या रथारोहणाचे मंत्र आहेत.

**संग्रह श्लोकाः ॥ अभीतिरथमभ्येतिह्यातिष्ठेत्वभिमंत्रणम् ॥ अंकौचक्रेस्पृशेदातिमंत्रयेद्रथसंस्थितम् ॥ पंचभिश्चैवमंत्रोक्ता अष्टौमंत्राः क्रमादमी ॥ अभिप्रेहि वीरयस्व । उग्रश्चेतासपत्नहा ॥**

**भाष्य**–हे यजमान रथं आभिलक्ष्य प्रेहिप्रकर्षेण गच्छागत्वाच वीरयस्व ।

**अर्थ**–पंचाल रथकार ह्मणतो, हे यजमान रथाला आभिलक्षून जा, आणि जाऊन पराक्रम कर. २ रा मंत्र–**आतिष्ठ मित्रवर्धनः तुभ्यंदेवाऽअधिब्रुवन् ॥** या मंत्रानें रथकार, राजास रथामध्यें बसा म्हणतो. ३ रा मंत्र–**अंकौन्यंकावभितः आतिष्टद्द इत्रथं** इत्यादि पांच मंत्रांनीं रथांच्या चाकांना स्पर्श करून राजा रथांत बसतो. नंतर रथांत बसलेल्या राजाप्रत, तुझे शत्रूंचा पराभव होऊन तुला अखंड जय प्राप्त असो. इत्याद्यर्थक मंत्रांनीं अभिषेक करितात. यजुर्वेद अष्ट० १ प्र० ७ यांतील अ० ७ यामध्यें रथाविषयींचे मंत्र असून अनु० ८ यामध्यें रथधावनासंबंधीं मंत्र सांगितले आहेत ते–**देवत्याह॒ सवितुः प्रसवे बृहस्पतिनावाजजितावाजंजेषमिमित्याह । सवितृप्रसूत. एवब्रह्मणावामुज्जयाति** ॥यजु० अ० १ प्र० ७ अ० ७ या याजुष मंत्रासंबंधीं ब्राह्मण–" **चात्वाले रथचक्रंब्रम्हारोहति** " रथ चालू करण्याचे पूर्वी रथसंबंधीं वाजपेय यज्ञकुंडाच्या उत्तरेस चात्वाल(एक खळगा)खणून तो सुलिप्तकरून त्यांत काष्ट रोवावें. त्या काष्ठाचे अग्रावर औदुंबर रथचक्र ठेवून त्याजवर ब्रह्मा ( यज्ञमंडपाच्या उत्तरद्वारींचा अथर्वण देवी चवथा आचार्य अर्थात् पंचाल रथकार शिल्पी) यानें बसावें. नंतर त्या रथचक्रारूढ ब्रम्हयासहित तें रथचक्र तीन वेळ प्रदक्षिण फिरवावें. व चक्रारूढ ब्रम्ह्यानें वाजपेय संबंधीं साम (रथंतरसूक्त ) सतरा वेळ पठण करावें. मग तीं चाके रथास बसवावीं. नंतर बाण जितका लांब, ज्या ठिकाणीं जाऊन पडतो त्या ठिकाणास प्रव्याध म्हणतात. अशा सतरा प्रव्याधापर्यंतच्या प्रमाणावर औदुंबरी शाखा स्थापून जी आजि ( मर्यादा ) करितात तेथपर्यंत राजानें किंवा ब्राम्हणानें रथास जुंपलेल्या अश्वाना प्रथम ( **वाजेवाजेवतवाजिनोनो॰** ) या मंत्रानें देव भाताची पेया ( पेज ) पाजून आणि पंचाल रथकारांची अशीच आज्ञा घेऊन रथ न्यावा.

---

१ अथर्वोऽगिरसंतद्वन्मौलरौद्रंतथैवच ॥ २८ ॥ तथापराजितादेवीसप्तसूक्तं सरौद्रकम् ॥ तथैवशांतिकाध्यायमथर्वाचोत्तरेजपेत् ॥ २९ ॥ मत्स्यपुराण अ. २६५ यावरून उत्तरद्वार अथर्वण पंचालशिल्पीचें होय.

एवं पूर्वोक्त रथविषयक वाजपेय यज्ञविधिवरून स्पष्ट समजेल कीं, बृहस्पतिसव हा रथादिविषयक आहे. अर्थात् बृहस्पतीलाही शिल्परथकारत्व आहे. म्हणूनच "**वाचस्पतिंविश्वकर्माणमूतये**" या श्रुतीनें विश्वकर्मा हा बृहस्पति होय, म्हणून बृहस्पतिसव करणारे स्थपति म्हणजे विश्वकर्मसंततीय स्वर्णकारादि पंचाल ब्राह्मण जाणावेत. म्हणूनच **वाग्वैवाजस्यप्रसवः । वाचᳪ सारस्वत्या । तै० ब्रा० अ० १।२।३** या श्रुतीवरून वाजपेययज्ञजन्य वाचस्पतीची जी वाग्देवता वागीश्वरी तिचे वागीश्वरी देवताक ( वागीश्वरी नामक वाजविशेष ऋभु–यज्ञरूप अग्निकुंड विश्वकर्मसंततीय पंचाल शिल्पींचे घरीं नित्य असतें. ) आतां वागीश्वरी हें वाग्देवतेसंबंधीं नाम शिल्पसंबंधी अग्निकुंडास असण्याचें कारण—**त्वष्टारूपाणिसमनु० त्वाग्ररूपा सरस्वती**" पृष्ट ७७ पं० ७ यावरून सरस्वती ही विश्वकर्मस्वरूप असून "**वाग्देवतामेवदनेप्रसन्ना**" या अथर्वण रहस्योक्तीवरून आणि "**मुखादिंद्र श्चाग्निश्च**" या श्रुतीवरून आणि या श्रुतीस अनुसरून असलेल्या "**मुखादग्निः प्रजायत ।। मुखमग्निरिद्धः ।।**" या भागवतोक्तीवरून स्पष्ट आहे कीं, वाग्देवतेचें आणि अग्नीचें अधिष्ठान आणि उत्पत्तिस्थान मुखच आहे. कारण वाग्देवतेचा आणि अग्नीचा कार्यकारणयोग आहे तो असा—"**मनःकायाग्निमाहंतिसप्रेरयतिमारुतं ।। मारुतस्त्ररसिचरन्मंद्रंजनयतिस्वरस्रु ।।**" **शिक्षा वेदांग. अर्थ**—विवक्षा ( बोलण्याची इच्छा करणारें ) मनप्राजापत्य अग्नीप्रत ( शरीरस्थ अग्नीप्रत ) आघात करितें. तो अग्नि वायूच्या उरःस्थळीं संचार करीत होत्साता प्रथम मंद्रस्वरउत्पन्नहोऊन जिव्हेचेठायीं वाग्देवता स्पष्ट होते. यांत अग्नीच्या शिल्परूप कर्मकौशल्यापासून मुखामध्यें वाणी उत्पन्न होते, म्हणूनच स्वर्णादि शिल्पकर्मांचे अग्नि कुंडमुखाकृति असून त्यास वागीश्वरी ( वागीश्वरी ) म्हणतात. आणि अग्नीस जातवेदा असें नांव आहे. जातवेदस् जायते वेदसमुदायोयस्मात् सजातवेदाः ) म्हणजे ज्यापासून वाग्देवात्मक वेदसमुदाय उत्पन्न झाला तो जातवेदाः ( अग्नि ) होय. आणि **जातवेदसेसुनवाम०" ऋग्वेद अ. १ अ० ७ व. ७** या जातवेदाग्नि देवतेच्या मंत्रानेंच देवीचें आवाहन करितात, याचें कारण अग्नीची आणि देवीची एकात्मता आहे, म्हणून विश्वकर्म संततीय पंचाल रथकारांना ज्यांत वाजऋभुदेवताक-हवन करावें लागतें तें वाजपेय अग्निकुंड ( वागीश्वरी ) "**पावकानः सरस्वती वाजेभिर्वाजिनीवती ।। यज्ञं वष्टुधियावसुः ।। ऋ० अ० १ अ १ व० ६** या मंत्रानें आवाहनीय सरस्वतीचें स्वरूप आहे. कारण "**पद्मावती सुवस्त्राच प्रबुद्धाच**

---

१ ब्रह्मा वेत्वान् सृजन् लोकान् महदाद्यान् महाद्युतीन् ।। सृष्टोऽग्निर्मुखतः पूर्वं लोकानां हितकाम्यया वृद्ध गौतमस्मृति

२ वेदशब्द जरी अदंत आहे तरी त्यास समुदायार्थी तद्धितप्रत्यययुक्त वेदस् असा पुल्लिंग शब्द सांतसर्व वेदार्थी होतो हें कोशप्रसिद्ध आहे.

३ देवीवाच मजनयंत देवास्ता० ऋ. अ. ६ अ. ७ व. ५ मं. १ ( देवाअग्नितत्वात्मकाः )

४ जातवेदसे मारीचःकश्यपोऽग्निस्त्रिष्टप् ।। याठिकाणीं जातवेदसे कश्यपोदुर्गात्रिष्टप् असा पाठ आहे.

**सरस्वती ॥ कुंडासना जगद्धात्री बुद्धमाता जनेश्वरी १० ॥ मूलाधारा निराकारा वन्हिकुंडकृतालया ॥ वायुकंड सुखासीना निराधारा निराश्रया ॥ पांचाली कालिका बाला बालक्रीडा सनातनी ॥"** या रुद्रयामलोक्त देवी सहस्र नामोक्तीवरून, उघड आहे कीं, जर देवीचें आसन किंवा अधिष्ठान अग्निकुंड आहे, तर शिल्पसंबंधीं अग्निकुंडास वागीश्वरी हें नाम उचित आहे याविषयीं विषयांतरानें भागवताचेंही प्रमाण आहे ( सांख्यविषय ब्रह्मांडोत्पत्ति)—**हिरण्मयादंडकोशादुत्थाय सलिलेशयात् ॥ तमाविश्यमहादेवोबहुधानिर्बिभेदखं ॥ ५३ ॥ निरभिद्यतास्य प्रथमं मुखं वाणी ततोऽभवत् ॥ वाण्यांवन्हिरथोनासे प्राणोऽतो घ्राणएतयोः ॥ ५४ ॥ भा० स्कंध ३ अध्याय २६ अर्थ**—भगवान कपिलमुनि ह्मणतात हे मात, परमात्मा विराट्पुरुष हिरण्मय अंडकोशास छिद्र करिता झाला, त्या छिद्रास प्रथम मुख अशी संज्ञा होऊन, त्या मुखापासून वाणी उत्पन्न झाली. मुखोत्पन्न वाणीचे ठायीं अग्नि प्रगट होता झाला. या भागवतोक्तीवरून वाचकांस स्पष्ट समजेल कीं, अंगिरस विश्वकर्मसंततीय स्वर्णकारादि पंचाल ब्राह्मणांचें वागीश्वरी नामक अग्निकुंड सच्छिद्र हिरण्मय अंडरूप अर्थात मुखाकृति असणें, आणि या वागीश्वरीचे उपासक पंचाल ब्रह्मणांला " **ब्राह्मणोस्यमुखमासीत्** ,, या श्रुतिपदावरून मुखोद्भूत ब्राम्हण अशी संज्ञा असणें हीं दोन्ही उचित आहेत. आतां वागीश्वरी कुंडांत अंगार ( निर्धूम अग्नि ) असण्याचें कारण—वागीश्वरी याजक बृहस्पति विश्वकर्मा याचा पिता जो अंगिरा ऋषि हा अंगारापासून ( अग्नीच्या निखाऱ्यांपासून उत्पन्न झाला आहे, यास प्रमाण—**मत्स्यपुराण अध्याय १९४ " अंगारेष्वंगिराजातोह्यर्चिभ्योऽत्रिस्तथैवच ॥ मरीचिभ्यो मरीचिस्तु ततोजातो महातपाः ॥** " यावरून अग्नीपासून अंगिरा ऋषि उत्पन्न झाला आणि **भागवतोक्ति—" अंगिरामुखतोजज्ञे** " यावरून अंगिराऋषि ब्रह्मदेवाच्या मुखापासून उत्पन्न झाला, असें ह्मटलें आहे. ह्मणूनच अंगिरस वाचस्पति विश्वकर्मसंततीय स्थपति संज्ञक पंचालशिल्पी ब्राह्मणांच्या अग्निकुंडास वागीश्वरी ह्मणतात अर्थात् त्यांच्या अग्निकुंडास जर वागीश्वरी संज्ञा आहे तर " **सगीष्पतीष्ट्यास्थपतिः** " हें अमराच्या ब्रह्मवर्गातील वाक्य वाचस्पति विश्वकर्म संततीय शिल्पिब्राह्मणांला उद्देशून दिलें आहे हें उघड आहे.

**शंका—" सगीष्पतीष्ट्या स्थपतिः "** या ब्रह्मवर्गोक्त वाक्यानें विश्वकर्मसंततीय पंचाल ब्राह्मणच समजावेत अशाविषयीं प्रत्यक्ष प्रमाण रथविषयक वाजपेय यज्ञावरून आणि त्यांच्या कर्माग्नि कुंडाच्या वागीश्वरी नांवावरून दाखविता खरें, परंतु वागीश्वरी हें नांव फक्त महराष्ट्र देशांतील पंचालच वापरतात. कर्नाटक, द्रवीड आंध्र एतद्देशीय पंचाल आपल्या अग्निकुंडास वागीश्वरी म्हणत नाहींत 'आगेष्टि' असें म्हणतात. मग '**सगीष्पतीष्ट्या स्थपतिः**' या वाक्याचा संबंध पंचाल ब्राम्हणांकडेस कसा होतो?

१ पूर्वीं सुवर्णाचीं वागीश्वरी कुंड करीत असत. हल्लीं ताम्रधातूचीं किंवा मृत्तिकेचीं करितात. ' कलौ पार्थिवमेवच. '

२ मुखाकृतीचीं उपलक्षणें हल्लीं आहेत तीं— किंवा असीं जाणावीं. अग्निर्वैदेवानां मुखं'

उत्तर—ही शंकाच मुळीं समाधानरूप आहे. पहा. जसा वागीश्वरी नांवाचा अपभ्रंशोच्चार 'वागेसरी' असा झाला आहे. तसाच 'आग्नेयेष्टि' या नांवाच 'आगेष्टि' हा अपभ्रंश झाला आहे; म्हणून सुज्ञ लोकांनीं, आगेष्टि या शद्वाबद्दल ( आग्नेयेष्टि ) असा शुद्ध शद्व उच्चारावा. आग्नेयेष्टि या शद्वाचा अर्थ—**आग्नेयानां इष्टिः। आग्नेयेष्टिः॥** प्राकृत **अर्थ**—आग्नेय आहे संज्ञा ज्यांस, असे जे आंगिरसवाचस्पत्यादि विश्वकर्मसंततीय ऋषी, त्याची जी इष्टि ह्मणजे यज्ञ अथवा यज्ञ कुंड, ती आग्नेयेष्टि ह्मणावी. आतां वाचस्पत्यादि आंगिरसांना आग्नेय संज्ञा आहे, यास प्रमाण **भारत अनुशासन पर्व अ० ८३ अष्टौचांगिरसः पुत्रा आग्नेयास्तेऽप्युदाहृताः॥ बृहस्पतिरुतथ्यश्च पयस्यः शांतिरेवच॥ घोरोविरूपःसंवर्तःसुधन्वाचाष्टमः स्मृतः॥**

**अर्थ**—अंगिराऋषीचे जे आठपुत्र, त्यांना आग्नेय अशी संज्ञा आहे. त्यांचीं नांवें—बृहस्पति, उतथ्य, पयस्य, शांति, घोर, विरूप, संवर्त आणि सुधन्वा हे आंगिरस आग्नेय संज्ञक जाणावेत. यावरून आग्नेय संज्ञा आंगिरस वाचस्पतीस होत असल्यामुळें '**सगीष्पतीष्टयास्थपतिः**' हें वाक्य कर्नाटकादिदेश प्रसिद्ध आग्नेयेष्टि या वागीश्वरीच्या पर्यायनामावरूनही विश्वकर्मसंततीय शिल्पी ब्राह्मणांसच लागू आहे; कारण हल्लीचे आग्नेयेष्टियाजक, वागीश्वरी याजक हे पंचालशिल्पी पूर्वीं नियमानें रथादि शिल्पसिद्ध्यर्थ वाचस्पतीष्टि नाम रथविषयक वाजपेय यज्ञ करीत होते. ह्मणूनच द्रविडकर्नाटकादिदेशांत विश्वकर्मसंततीय पंचाल शिल्पीस ( **वाजर, आचार्य**[2,3] ) अशावाचस्पतीष्टिरूप वाजपेय यज्ञकर्तृत्व ब्राम्हणत्वबोधक नांवानें पाचारण्याची रीति आहे.

सर्व श्रुतीमध्यें बृहस्पति आणि विश्वकर्मा हे एकच समजावेत असें म्हटलें आहे, आणि पुराणामध्यें प्रायः बृहस्पति आणि विश्वकर्मा ह्या दोन समानैश्वर्य व्यक्ति समजाव्या. असें जरी ह्मटलें आहे, तरी हें पुराण संमत श्रुतीला विरुद्ध आहे, असें कोणीं समजूं नये, कारण जसा बृहस्पति देवांचा पुरोहित असून आंगिरस शिल्पी आहे, तसा विश्वकर्माही देवांचा पुरोहित असून आंगिरस शिल्पी आहे " या विषयीं पूर्वार्ध पृष्ठ ७८ पंक्ति १० वी पहा. " कारण पूर्वोक्त ( **अष्टौचांगिरसः पुत्रा आग्नेयास्तेऽप्युदाहृताः॥ बृहस्पति० सुधन्वाचाष्टमः स्मृतः॥** या भारतोक्तीवरून जसा बृहस्पति अंगिरा ऋषीचा पुत्र आहे तसा ( **सुधन्वाविश्वकर्मणि** ) या विश्वमेदिन्यादिकोशवाक्यावरून विश्वकर्माही अंगिरा ऋषीचा पुत्र आहे. रथादि शिल्पांत विश्वकर्मा परम निपुण, ह्मणून विश्वकर्म्यासच सुधन्वा नांव आहे. अर्थात् जसा विष्णूचा अवतार वासुदेव आणि वासुदेवाचा पुत्र प्रद्युम्न आणि नातू अनिरुद्ध अश्या पृथक व्यक्ति असूनही वासुदेव, प्रद्युम्न, अनिरुद्ध या नांवांनी एक

---

१ तैत्तिरीय संहिता भाष्ये कांड २।३।३ हिरण्यकामः कुर्वीत ह्याग्नेयादिहविस्त्रायं॥

२, ३ एकप्रवासी ह्मणतात—ह्मैसुरशहरांत वाजर आणि त्रिनावल्ली शहरांत आचार्य ह्मटलें कीं, लोकं स्वर्णकाराचें घर दाखवितात.

४ उत्तरार्थ पृष्ठ ७३–७४ पाहून " ब्रह्मणस्पतिरेतासंकर्मा र० " ही श्रुति पहा.

विष्णूच वर्णिला जातो, तसा विराट् विश्वकर्म्याचा अवतार ब्रह्मदेव ब्रह्मदेवाचा पुत्र अंगिरा आणि नातू वाचस्पति, सुधन्वा अश्या पृथक् व्यक्ति असूनही ब्रह्मा, अंगिरा, वाचस्पति, सुधन्वा या नांवांनीं एक विश्वकर्माच वार्णिला आहे असें श्रुतिस्मृतिपुराण संमत जाणावें.

असो आतां बृहस्पत्यादि सुधन्वादि आंगिरसांना आग्नेय संज्ञा असण्याचें कारण अंगिरा ऋषीची उत्पत्ति अग्नीपासून आहे ह्मणून; प्रमाण—**वायुपुराण अध्याय ४ प्रजापतिवंशानुकीर्तने—हिरण्यगर्भस्तंदृष्ट्वा ज्वालांभित्वाविनिःसृतं ॥ भृगु स्त्वमितिहोवाच यस्मात्तस्मात्सवै भृगुः ॥ ३७ ॥ महादेवस्तथोद्भूतं दृष्ट्वाब्रह्माणमब्रवीत् ॥ ममैषपुत्रकामस्यदीक्षितस्य त्वयंप्रभो ॥ ३८ ॥ विजज्ञेऽथ भृगुर्देवोममपुत्रोऽभवत्त्वयम् ॥ द्वितीयंतुततः शुक्रमंगारेष्वपतत्प्रभुः ॥ अंगारेष्वंगिरोंऽगानिसंहितानिततोंऽगिराः ॥ ४१ ॥ संभूतिंतस्यतांदृष्ट्वावन्हिर्ब्रह्माणमब्रवीत् ॥ रेतोधास्तुभ्यमेवाहं द्वितीयोऽयंममास्त्विति ॥ एवमस्त्वितिसोऽप्युक्तो ब्रह्मणासदसस्पतिः ॥ तस्मादंगिरसश्चापि आग्नेया इतिनःश्रुतम् ॥ ४२ ॥**

**अर्थ**—ब्रह्मदेवानें आपल्या वीर्याचे हवन केलें त्या वारुणयज्ञाच्या ज्वालेपासून प्रथम उत्पन्न झालेला भृगु पाहून शंकर ब्रम्हदेवास म्हणाला, हा पुत्र मला दे ब्रह्मदेवानें तथास्तु ह्मटल्यानंतर भृगुऋषीस शिवपुत्र अशी संज्ञा झाली. नंतर पुनः दुसरी आहुति समृद्ध अंगाराग्नींत दिल्याबरोबर ते सर्व अंगार ( समृध्द निखारे ) अवयवरूपयथासंहित एकवट होऊन त्यापासून जो तेजःपुंज पुरुष उत्पन्न झाला तो (**अंगिराः**) अशा नांवांत पावता झाला. अग्नीनें तो आत्मतुल्य तेजस्वी पुरुष पाहून ब्रम्हदेवास म्हणाला, मी तुझें वीर्य धारण करणारा आहे, करितां हा दुसरापुत्र मला दे. त्यावरून ब्रम्हदेवानें अग्नीस तथास्तु ह्मणून अंगिरा दिला; म्हणून अंगिरा ऋषीस आणि त्याचे परंपरा बृहस्पत्यादि संततीस आग्नेय अशी संज्ञा आहे. या अंगिरा ऋषीच्या आणि आंगिरसांच्या आग्नेय संज्ञेवरून व स्थपति संज्ञेवरून अंगिरा आणि आंगिरस हे सुवर्णादि शिल्पकर्ते आहेत हें उघड आहे कारण जसे अग्निरूप अंगारक नांवाच्या मंगळ ग्रहास सुवर्णकार अशी शिल्पकर्तृसंज्ञा आहे. तशीच आग्नेयसंज्ञक अंगिरादिकांसही स्वर्णादि शिल्पकर्तृसंज्ञा आहे. अंगारकास(मंगळास)“**स्वर्णकारः क्षितिसुतः**” अशी स्वर्णकारसंज्ञा असण्याचें कारण सुवर्णादि धातु आणि अंगारक हे भूमीपासून उत्पन्न झाल्यामुळें जर त्यां ( सुवर्णाला आणि अंगारकाला ) भौम नांव आहे तर त्याना आग्नेय संज्ञा असणें योग्य आहे, कारण भूमिद्वारा अग्नि प्रगट होतो अशी श्रुति आहे—“ **दिवार्यातिमरुतो भूम्याऽग्निरयंवातो अंतरिक्षेणयांति ॥ ऋ० अ० २।३।६** ”

**अर्थ**—स्वर्गापासून मरुद्गण, भूमीपासून अग्नि, आणि अंतरिक्षापासून वायु प्रगट होतात. या श्रुतीवरून आग्नेय आणि भौम हीं नामें एकार्थक असून जसा अग्निरूप अंगारक ग्रह भूमिसंभूत असल्यामुळें त्यास भौम ह्मणतात; तसे अलंकारादि

१ “ विश्वकर्मा ह्यजनिष्टदेवा० ” यावक्य० श्रुतीवरून.

शिल्पकर्मोपयोगि सुवर्ण, लोह, रत्नादिकांसही भौम असें आग्नेय संज्ञक नांव आहे. सुवर्ण आणि मंगळ अंगाराग्निरूप असल्यामुळें " **अंगारमुल्मुके नस्त्री पुल्लिंगस्तु महीसुते** " या विश्वकोशोक्तीवरून भौमास अंगार म्हणतात आणि " **अग्नेरतः सुवर्णस्याद्यतोवन्हिसमुद्भवम् ॥ सुवर्णस्यकृतौदक्षः स्वर्णकार इतिस्मृतः ॥** या अग्निपुराणस्थ वचनावरून सुवर्णाची आणि सुवर्णकाराची उत्पत्ति अग्नीपासून आहे तसेंच सुवर्णालंकारादि शिल्पकर्महीं अंगाराग्नीवांचून ( निर्धूम निखाऱ्याच्या अर्थात् कोळशाच्या अग्नीवांचून ) होत नाहीं. ह्मणून अंगारकास सुवर्णकार ( सोनार ) म्हटलें आहे. आणि अंगाराग्नि संबंधानें जसा अंगारक सुवर्णकार आहे तसाच अंगाराग्निपासून उत्पन्न झालेला अंगारवर्ण अंगिरा ऋषि आणि वाचस्पति सुधन्वादि अंगिरस हेही सुवर्णकारादि शिल्पी आहेत, कारण ज्यास सोनार संज्ञा आहे असा अंगारक मंगळ ग्रहही आग्नेयाख्य आंगिरस कुळांतच उत्पन्न झाला आहे " कशावरून म्हणाल तर अंगारकाचे भारद्वाज गोत्र आहे ह्मणून; अर्थात्—**अंगिराः प्रथमस्तेषां द्वितीयश्चबृहस्पतिः ॥ तृतीयश्च भरद्वाजः प्रवराः परिकीर्तिताः ॥ मत्स्यपु० अ १९५ अर्थ**—अंगिरा ऋषीचा पुत्र बृहस्पति, बृहस्पतीचा पुत्र भरद्वाजऋषि. भरद्वाजगोत्रोत्पन्न अंगारक हा पंचाल सोनार आहे. असो, भरद्वाज आंगिरस पुत्र असल्यामुळें जर स्वर्णकार संज्ञेय अंगारकासही आंगिरसत्व आहे तर अंगिराऋषि सुवर्णादिशिल्पाधिपति असणें हें स्पष्ट आहे. अंगिरा ऋषि हा शिल्पकर्ता आहे असें त्याच्या अथर्वांगिरस आणि आथर्वण अश्या शिल्पवेदविषयक नामावरून स्पष्ट आहे. तसेंच आग्नेयेष्टि रथविषयक वाजपेय यज्ञ कर्मावरून, आणि ' **वाचस्पतिं विश्वकर्माणमूतये** ' या श्रुतीवरून ज्याच्या आग्नेयेष्टि पर्यायनाम गीप्पतीष्टिकर्मानें कर्त्यास स्थपति ( शिल्पी ) म्हणतात. तो बृहस्पतीही स्वर्णरथादि शिल्पकार आहे. तसेंच " **सुकर्माग्रहयोगेस्यात्सुकर्मादेवशिल्पिनि ॥ सुधन्वाप्रौढधानुष्के सुधन्वाविश्वकर्मणि ॥** ,, या विश्वकोशावरून आणि मेदिनीकोशावरून आंगिरस सुधन्वा हाही सुवर्णादि सर्व शिल्पकर्मांत इतका निपुण आहे कीं, देवांनीं सुधन्वा हा विश्वकर्मा असें ह्मटलें आहे. ह्मणून ( सगीप्पती० ) या वाक्यावरून आग्नेयेष्टिवागीश्वरी याजक आंगिरस पंचाल स्वर्णकरादिक शिल्पी ब्राम्हण जाणावें. कारण ज्यास पंचालस्वर्णकार आणि स्थपति अश्या संज्ञा आहेत तो आंगिरस मंगळ, स्वर्णकार असून ब्राह्मणवर्ण आहे. पहा ग्रहांच्या जाती विषयीं श्लोक (**ज्योतिः शास्त्र**

**अवनीशोदिनमणिस्तपस्वी रोहिणीप्रियः ॥ स्वर्णकारः क्षितिसुतो ब्राम्हणस्तुगुरुः स्मृतः ॥ वणिकबुधः कविर्वैश्योवृषलः सूर्यनंदनः ॥ संहिकेयोनिषादश्च सर्वकार्येषु चिंतयेत् ॥ ८ ॥**

**अर्थ**—सूर्य हा क्षत्रिय, चंद्र तपस्वी, मंगळ पंचालसोनार, गुरु ब्राम्हण, बुध वाणी, शुक्र वैश्य, शनि शूद्र आणि राहु केतु भिल्ल या ग्रहांच्या जाति त्यांच्या लक्ष-

१ इंद्रियंनयनं वन्हिस्वर्णादिर्विषयोमतः । इतिन्यायसिद्धांतमुक्तावलौ ॥ गुणकिरणावलिभाष्येपि ॥ आणखी पूर्वार्ध पृष्ठ १८ पंक्ति २८ वी पहा.

णावरून आहेत. या नवग्रहांच्या क्षत्रियादि जातीपैकीं कोणती जाति कोणत्या वर्णांत गणावी. हें, ज्या राशीचा जो ग्रहस्वामी असेल त्या राशीच्या वर्णावरून स्पष्ट कळेल. राशीच्या वर्णाविषयीं श्लोक—

**मीनालिकर्कटाविप्रानृपाः सिंहाजधन्विनः ॥ कन्या नक्र वृषावैश्याः शूद्रायुग्मतुलाघटाः ॥ १ ॥**

**अर्थ**—मीन, वृश्चिक, आणि कर्क यांचा विप्रवर्ण. सिंह, मेष आणि धनु यांचा क्षत्रिय वर्ण, कन्या, मकर आणि वृषभ यांचा वैश्यवर्ण, मिथुन, तूळ आणि कुंभ यांचा शूद्रवर्ण जाणावा. स्पष्ट समजण्याकरितां कोष्टक—

| जाति. | पं.सो | वैश्य | वाणी | तपस्वी | क्षत्रिय | वाणी | वैश्य | पं.सो. | ब्राह्मण | शूद्र | शूद्र | ब्राह्मण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्ण | क्षत्रिय | वैश्य | शूद्र | ब्राह्मण | क्षत्रिय | वैश्य | शूद्र | ब्राह्मण | क्षत्रिय | वैश्य | शूद्र | ब्राह्मण |
| ग्रह | मंगळ | शुक्र | बुध | चंद्र | रवि | बुध | शुक्र | मंगळ | गुरु | शनि | शनि | गुरु |
| राशि | मेष | वृषभ | मिथुन | कर्क | सिंह | कन्या | तुल | वृश्चिक | धन | मकर | कुंभ | मीन |

या कोष्टकावरून स्पष्ट आहे कीं, जसें जात्या ब्राम्हण ह्मणविणाऱ्या धनमीनस्वामीचा ( गुरु ग्रहाचा ) क्षत्रियब्राह्मणवर्ण आहे. तसेंच पंचाल सोनार ह्मणविणाऱ्या मेष वृश्चिक स्वामीचा ( मंगळग्रहाचा ) ही क्षत्रिय ब्राम्हणवर्ण आहे. म्हणूनच स्थपति संज्ञक पंचाल सोनारांचा उल्लेख ( **सगीष्पतीष्ट्यास्थपतिः** ) या वाक्यानें अमराच्या ब्राम्हणवर्ण संबंधीं ब्रम्हवर्गातच आहे. कारण पंचाल सोनारजातीचा मंगळ. बार्हस्पत्यगोत्रोत्पन्न आंगिरस असल्यामुळें त्यास गीष्पतीष्टिकर्तृत्व आहे आणि स्वर्णादि पवित्र शिल्पकर्म कर्ते ब्राम्हणच आहेत. पहा रथास लागणाऱ्या काष्ठमय इंद्रध्वजाला अलंकार देवब्राह्मणांनींच स्वतः आपल्या हातांनीं करून दिले आहेत. प्रमाण—

**बृहत्संहिता अध्याय ४३ रक्ताशोकनिकाशंचतुरस्रं विश्वकर्मणा-प्रथमम् ॥ रशनास्वयंभुवा शंकरेणंचानेकवर्णधरी ॥ ( अग्रेपि ) द्वादशमपिच नीवंशं मुनयो नीलोत्पलाभासं ॥ किंचिदध उर्ध्व निर्णतमुपरि विशालं त्रयोदशं केतोः ॥ शिरसि बृहस्पतिशुक्रौ लाक्षारस सन्निभंददतुः ॥ ४८॥**

**अर्थ**—इंद्रध्वजाला पद्मरागमय अशोक पुष्पवत् आरक्त चतुष्कोण अलंकार प्रथम विश्वकर्मा देता झाला. नंतर अनेक रंगी कंबरपट्टा ब्रह्मदेवानें आणि शंकरानें दिला. याचप्रमाणें नीलरत्नमय बारावा अलंकार सर्व ऋषि देते झाले. लाखेच्या रसाच्या रंगासारिखा छत्राकृति तेरावा अलंकार बृहस्पति आणि शुक्र देते झाले. याचप्रमाणें भार्गव हे ब्राह्मण असून खड्गादि शस्त्रास्त्रें निर्माण करण्याच्या शिल्पामध्यें फार कुशल असत. पहा त्यांचें खड्गाला पाणीं देण्याचें चातुर्य ! **इदमौशनसंच शस्त्रपानं रुधिरेणश्रि-**

---

१ ब्राह्मण क्षत्रिय यादोन वर्णाचा ( सत्रा एष ब्राह्मणस्यचैवराजन्यस्यच यज्ञः ॥ नतुवैश्यस्य ) (तै. ब्रा. अ. १ प्र. ७ अ. ७) या श्रुतिभाष्यावरून समानाधिकार असल्या मुळें हे दोन वर्ण विश्वामित्र परशुरामादिका प्रमाणें ब्राह्मणांतच गणतात.

२ मंगळ हा पंचाळच कशावरून ह्मणाल तर तो आंगि० वाचस्पति विश्वकर्म कुलोत्पन्न भरद्वाजगोत्री आहे ह्मणून.

**यमिच्छतः प्रदीप्तां ॥ हविषा गुणवत्सुताभिलिप्सोः सलिलेनाक्षयमिच्छत-श्चवित्तं २३ बृहत्संहिता अ० ५०**

**अर्थ**–हे शस्त्राला पाणीं देण्याचें शिल्प कौशल्य शुक्राचार्यांनीं सांगितलें आहे.–शस्त्र करविणाऱ्या यजमानास शिल्पीनें विचारावें. आपणास इच्छा कोणती आहे? ज्यास लक्ष्मी प्राप्तीची इच्छा आहे त्याचे शस्त्रास रुधिर पाजावें. ज्यास गुणवान् पुत्र प्राप्तीची इच्छा आहे त्याचे शस्त्रास दुग्ध घृत पाजावें. आणि ज्यास द्रव्यप्राप्तीची इच्छा असेल त्याचे शस्त्रास शुद्ध उदक पाजावें. शस्त्रशिल्पाचा औशनस नामक ग्रंथ आहे " याचप्रमाणें त्रिशूल,चक्रबाण, चक्र,खड्गादि शस्त्रास्त्रें निर्माण करण्याचें शिल्प आणि त्यांचे संस्कारकर्म याविषयीं अग्निपुराण अध्याय २४४ यांत वर्णन सविस्तर आहे. " तसेंच आणखी स्वर्णादि रथशस्त्रास्त्रादि शिल्पकर्मांत कुशल असे पंचाल रथकारशिल्पि आंगिरस आहेत. प्रमाण श्रुति—**चात्वाले रथचक्रं निमित्त ँ रोहति । अतो अंगिरस उत्तमाः सुवर्गं लोकमायन् ॥ तै० ब्राह्मण** ) या श्रुतींत रथकर्म संबंधीं यज्ञ करणारे रथकारशिल्पिब्राह्मणांस आंगिरस अशी संज्ञा आहे म्हणूनच वाचस्पति विश्वकर्म यास व त्याचे संततीस देवरथकारकत्व आहे यास प्रमाण श्रुति—

**अनवस्ते रथमश्वायतक्षन्त्वष्टा वज्रं पुरुहूत द्युमंतं ॥ ब्रह्माण इंद्रं महयंतो अर्कैरवर्धयन्नहयेहंतवाउ॥४॥**ऋग्वेद अ० ४ अ०१व०३१ऋ०४

**भाष्यं**–हे पुरुहूत बहुभिराहूतेंद्र ते त्वदीय रथमश्वायाश्वाभ्यां संयोगार्हं मनवो मनुष्या ऋभवोस्तक्षन् । अतक्षन् । अकुर्वन् । त्वष्टाचत्वदीयं वज्रं द्युमंतंदीप्तिमंतमकरोत्। उ अपिच महयंत इंद्रं पूजयंतो ब्रह्माणोऽगिरसः परिवृढामहतोवा । अहयेऽहिं वृत्रं । हंतवे हंतुं । अर्कैः स्तोत्रैः । अवर्धयन् वर्धितवंतः ॥

**अर्थ**–( यजमान इंद्राची स्तुति करितो. ) हे इंद्रा, तुला पुष्कळ यजमान यज्ञार्थ आव्हान करीत आले आहेत. आंगिरस विश्वकर्म पुत्र ऋभु, अश्व जुंपण्यास योग्य असा रथ तुजकरितां निर्माण करिते झाले. आणि विश्वकर्मा तुजकरितां तेजःपुंज वज्र निर्माण करितां झाला याप्रमाणें रथशस्त्रास्त्राची तयारी करून देऊन ते **ब्रह्माणः** ( आंगिरस----विश्वकर्मा, सौधन्व ऋभु इत्यादि रथकार) वृत्रवधाकरितां लवकर निघण्याविषयीं तुझी प्रार्थना अनेक स्तोत्रांनीं करिते झाल. या श्रुतींतील( **ब्रह्माणः** ) यापदावरून आंगिरस विश्वकर्म संततीय रथकारांना ब्राम्हणत्व असून देव रथायुध कारकत्व आहे. आणखी प्रमाण—

**कल्की पुराणे तृतीयांशे अध्याय ४ रथौ नानमणिव्रात घटितौ कामगौ पुरः॥ समायातौ ज्वलद्दिव्य शस्त्रास्त्रैः परिवारितौ ॥ ३२ ॥ ददृशुस्ते सदोमध्ये विश्वकर्म विनिर्मितौ ॥ भूपा मुनिगणाः सभ्याः सहर्षाः किमितीरिताः ॥ ३३ ॥**

**अर्थ**–कल्की अवतार धारण करून भगवंतानें बौद्ध, म्लेंच्छ आणि कुथोदरी राक्षसी इतक्यांचा वध केल्यानंतर सूर्यवंशीय मरु आणि चंद्रवंशीय देवापि या दोन क्षत्रिय राजांना पृथ्वीमध्यें धर्मसंस्थापनार्थ राज्याभिषेक केला, तेव्हां त्याच्या करितां विश्वक-

र्मा यांनीं दैदीप्यमान शस्त्रास्त्रासहित अनेक रत्नांनीं जडलेले असे दोन दिव्य रथ निर्माण करून पाठविले; ते पाहून सर्व राजे ऋषि सभासद आनंदित होत्साते काय हे चातुर्य !! असें आश्चर्ययुक्त बोलते झाले इत्यादि अनेक प्रमाणावरून विश्वकर्मा हा रथादि सर्व शिल्पकर्ता आहे, हें प्रसिद्ध आहे पूर्वी जरी अनेक ब्रम्हर्षींनीं शिल्पें केलीं आहेत तथापि शिल्पकर्माविषयीं विश्वकर्मा व त्याची संतति विशेषज्ञ आहेत. पहा—**दिवि भुव्यंतरिक्षेवा पाताले वापि पार्वति ॥ गृहंयंत्रं रथो भूषा प्रतिमा वसनादिकं ॥ यत्किंचिदृश्यते शिल्पं तत्सर्वं विश्वकर्मकम् ॥** ( इति प० पु० भू० ) आणखी ( **शिल्पाचार्याय देवाय नमस्ते विश्वकर्मणे ॥ इतिब्रह्मपुराणेवत्सरारंभ विधौ** ) हीं प्रमाणें विश्वकर्म याचे सर्व शिल्पकरत्व दर्शक आहेत. एवंच बृहस्पतियज्ञ हा रथकर्मात्मक व बृहस्पतीस रथकर्तृत्व असल्यावरून आणि वाचस्पति विश्वकर्मा यांचे अभेदत्व श्रुतिप्रोक्त असल्यावरून, विश्वकर्म यास आंगिरसत्व आणि रथकारकत्व असल्यावरून ( **सर्गोष्पतीष्ट्या०** ) हें वाक्य विश्वकर्मसंततीय पंचाल ब्राम्हणाचेच द्योतक आहे, कारण त्यांच्या आग्नेयेष्टि वागीश्वरी अग्निकुंडाच्या उपासनेवरून त्याना अग्निहोत्री संज्ञा असल्यामुळें पंचालास जीवेष्टियाजकत्व अनुभवसिद्ध आहे यास प्रमाण सिद्धपुरुषमहायोगि चांगदेवकृत मूळस्तंभ ग्रंथ अध्याय १८ ओंवी ७८ पासून—

**पंचाल अग्निहोत्री ब्राह्मण ॥ तेथें षट्कर्माचा अधिकार जाण ॥ नित्य कर्म सदाचरण ॥ दया सर्वाभूतीं असावी ॥ ७८ ॥ ऋषीश्वर अग्निहोत्र घेती ॥ तेही कर्मे चालविती ॥ स्वतः सिद्ध अग्नि प्रदीप्ती ॥ स्थापिताती तेधवां ॥ ७९ ॥ परी न चाले त्यांची कर्म स्थिती ॥ बहुतापरीची कुंडें स्थापिती ॥ यज्ञादि कर्मे चालविती ॥ आणीकही होती ब्रह्मकर्मे ॥ ८० ॥ पंचाल मुळींच अग्निहोत्री ॥ ते युगायुगांची परीसपत्री ॥ तें कुंड जाणा वागीश्वरी ॥ युगायुगांतरी असें॥ ॥ ८१ ॥ कृतयुगींते ब्रह्मेश्वरी ॥ त्रेतायुगीं कामेश्वरी ॥ द्वापारीं ते वागीश्वरी वागीश्वरी[१] ॥ कलियुगीं ॥ ८२ ॥** याप्रमाणें विश्वकर्म संततीय पंचालाचे आग्नेयेष्टि वागीश्वरीयजनरूप अग्निहोत्रत्व वर्णिले. आतां विश्वकर्म संततीयाच्या स्थपतिसंज्ञेविषयीं थोडें वर्णन करितों. विश्वकर्मसंततीय स्थपति संज्ञक शिल्पी ब्राह्मण आहेत कारण त्याना वैदिक होमासिद्ध चरुप्राशन करण्याचा आणिवेदबीजप्रणव (ॐकार) व स्वाहास्वधाकार उच्चार करण्याचा अधिकार आहे, प्रमाण

**अग्निपु० अ०४३ प्रतिमार्थशिलानयनविधि—रक्षांकृत्वा नृसिंहेन मूलमंत्रेणपूजयेत् ॥ हुत्वापूर्णाहुतिं दद्यात्ततो भूतबलिंगुरुः।१८। अत्रयेसंस्थिताः सत्वा यातुधानाश्चगुह्यकाः ॥ सिद्धादयोवायेचान्ये तान्संपूज्यक्षमापयेत् ॥ १९ ॥ विष्णुबिंबार्थमस्माकं या-**

---

१ ब्रह्मणः ( वाचः ) वाङ्देवी ब्रह्म संशिता ॥ या आथर्वण श्रुतीवरून आणि चत्वारिवाक्० या श्रुतीवरून ब्रह्मेश्वर्यादि नांवें परापश्यंती इत्यादि चारी वाचा स्वरूपानें वागीश्वरी या मुख्यार्थक नांवालाच अनुलक्षून आहेत.

त्रैपाकेशवाज्ञया ॥ विष्णवर्थंयद्भवेत्कार्यंयुष्याकमपितद्भवेत् ॥ २० ॥ अनेनबलिदानेन प्रीताभवथसर्वथा ॥ क्षेमेणगच्छतान्यत्रमुत्क्कास्थानमिदंत्वरात् ॥ २१ ॥ एवंप्रबोधिताः सत्वायांति तृप्तायथासुखं ॥ शिल्पिभिश्चचरुं प्रश्यस्वप्नमंत्रं जपेन्निशि ॥ २२ ॥ मंत्र—ॐनमः सकललोकायविष्णवे प्रभविष्णवे ॥ विश्वायविश्वरूपाय स्वप्नाधिपतये नमः॥ आचक्ष्वदेवदेवेश प्रसुप्तोऽस्मितवांतिकं ॥ स्वप्नेसर्वाणिकार्याणित्दृदिस्थानितुयानिमे ॥ ॐ ॐ ऱ्हूंफट् विष्णवेस्वाहा ॥ शुभे स्वप्नेशुभंसर्वं ह्यशुभेसिंहहोमतः॥ प्रातरर्ध्यंशिलायांतु दत्वास्त्रेणास्त्रकं यजेत् ॥

अर्थ—विष्ण्वादि मूर्ति घडविण्याकरितां शिला आणण्यास जावें ज्या शिलेंतून कांस्य धातूप्रमाणें नाद निघून ठिणग्या निघतात ती शिला देवमूर्ति करण्यास योग्य समजून तिच्या संस्कारार्थ त्या वनांतच कुंडमंडपादिपूर्वक नृसिंह होम करावा. पूर्णाहुतीनंतर मूर्ति करणाऱ्या शिल्पीनें होम शेषचरु प्राशन करून( ॐनमःसकल०ॐॐ ऱ्हुंफट् विष्णवे स्वाहा ) असा मंत्र जपून रात्रौ शुचिर्भूत निद्रा करावी. शिल्पीस शुभ्र स्वप्न झाल्यास ती शिला मूर्तिप्रासाद कर्त्यास कल्याणदायक होईल असें समजावें यावरून स्पष्ट आहे कीं जर शिल्पीस ज्यास ब्रह्मौदन संज्ञा आहे असा होम शेषचरु प्राशनाचा आणि ॐकारस्वाहाकारोच्चारणाचा अधिकार आहे, तर मूर्त्यादिशिल्प कर्म करणारे स्थपति संज्ञक विश्वकर्म संततीय शिल्पी ब्राम्हणच असले पाहिजेत. म्हणून हल्लीं बेलदार गवंडी, वडारी, यवन वगैरे शूद्रादि हस्तनिर्मित मूर्ति करवितात हें अविधिकर्त्यांचें अशास्त्र, विकर्म पूर्वोक्त्याअनुभवसिद्ध आहे. तस्मात् ज्याना कर्तव्य कर्मांचें यथोक्त फल प्राप्त होण्याची इच्छा असेल त्यांनीं प्रसादमूर्ति, देवरथ, वधूचें अलंकार, देवाची उपकरणी, यज्ञपात्रें, देवागार, यज्ञकुंड, मंडपादि पवित्र शिल्पें विश्वकर्म संततिय शिल्पी ब्राम्हणाकडूनच करणें सशास्त्र आहे. आतां विश्वकर्मसंततीय पंचाल शिल्पीब्रम्हणांचीं ब्राम्हणत्वानें अग्रपूजा करावी यास प्रमाण—

**बृहसंहितां अध्याय ६० प्रतिमाप्रतिष्ठापनविधौ ॥ स्थापकदैवज्ञद्विजसभ्य स्थपतीन् विशपेताभ्यर्च्य ॥ कल्याणानां भागीभवतीहपरत्रचस्वर्गी ॥ १८ ॥**

अर्थ—सिंहासनाचे खळग्यांतमूर्तिविधिपूर्वक बसविल्याबरोबर स्थापक,शिल्पवेदवेत्ते दैवज्ञ अर्थात् पंचालांचें उपाध्याय, आणि स्थपति ( मूर्त्यादि कर्तें विश्वकर्म संततीय शिल्पी) इतक्या ब्राह्मणांची भूदेवत्वानें विशेषेंकरून पूजा करावी तेणेंकरून प्रतिष्ठा करणारास इहलोकीं सर्व कल्याण आणि परलोकीं स्वर्ग सौख्य प्राप्त होतें. आणखी प्रमाण—

अग्निपुराण अध्याय ४० प्रासादगृहार्थभूपरीक्षणविधौ—अर्ध्यदानं विनिष्पाद्य गोवस्त्रादीन् ददेद्गुरौ॥कालज्ञायस्थपतये वैष्णवादिभ्य अर्चयेत् ॥ २९ ॥

अर्थ—प्रासाद गृहादिकर्त्यानें आरंभीं भूमीची परीक्षा करतेसमयीं अर्ध्यदान विधिकरून गुरूला गोवस्त्रादिक देऊन दैवज्ञ आणि स्थपति यांची गोवस्त्रादिदानपूर्वक

पूजाकरून वैष्णवशैवादिकांची पूजा करावी नंतर पाया खाणावा. स्थपति शिल्पी अग्रपूज्य ब्राम्हण आहेत याविषयीं आणखी प्रमाण—

**बृहत्संहिताअ०५३ वास्तु प्रकरणें—भक्ष्यैर्नानाकारैर्दध्यक्षतसुरभिकुसुमधूपैश्च॥ दैवतपूजांकृत्वास्थपतीनभ्यर्च्य विप्रांश्च॥९९॥**

अर्थ—नानाप्रकारचीं भक्ष्य, पक्वान्नें, दहिं, अक्षत, उत्तम सुवासिक पुष्पें, धूप, दीप इत्यादि उपचारांनीं वास्तुदेवतांची पूजाकरून स्थपतींची (विश्वकर्मसंततीय पंचाल शिल्पिब्राम्हणांची) पूजा करावी नंतर वैदिकादि भिक्षुक ब्राम्हणांची पूजाकरावी.

शिल्पिवाचक स्थपति यांना ब्राम्हणत्वबोधक विशेषण आहे यास प्रमाण— त्याच बृहत्संहितेच्या ५६ व्या अध्यायांत आहे.—

**भुमिकांलिमानेन मयस्याष्टोतरंशतम् ॥ सार्धं हस्तत्रयंचैव कथितंविश्वकर्मणा ॥ प्राहुः स्थपतयश्चात्रमतमेकं विपश्चितः ॥ कपोत पालिसंयुक्तान्यूनागच्छंतितुल्यतां ॥ ३८ ॥**

अर्थ—मयाच्या शिल्पशास्त्रांत शिखराची भूमि १०८ अंगुलें असावी असें ह्मटलें आहे आणि श्रीविश्वकर्मकृत शिल्पशास्त्रांत ३॥ हात असावी असें ह्मटलें आहे. परंतु विद्वान, स्थपति (शिल्पवेदवित् पंचालब्राम्हण) दोन ही मतें एकरूपच समजतात. कारण कमीमान, कपोतपक्षिगृहाच्या मानानें युक्त केलें असता दोन्ही बरोबर हेतात. यावरून स्पष्ट आहे कीं जर विश्वकर्मवंशस्थ शिल्पिवाचक स्थपति शद्ब ब्रम्हवर्गीत गणण्यास योग्य नसतां तर वेदशास्त्रज्ञ विद्वान् ब्राम्हणांसच योग्य असें (विपश्चितः) हें ब्रम्हवर्गोक्त विशेषण त्या स्थपतिसंज्ञक शिल्पींस वराहमिहिरांनीं कधीं दिलें नसतें. ज्यापेक्षां " **विद्वान विपश्चिद्दोषज्ञः** " असें ब्रह्मवर्गीत असलेलें ब्राम्हण जातींचेंच (विपश्चितः) हें विशेषण " **प्राहुः स्थपतयश्चात्रमतमेकं विपश्चितः** " यांत शिल्पिवाचक स्थपतीप्रत दिलें आहे. आणि " **दैवतपूजांकृत्वास्थपतीनभर्च्य विप्रांश्च**, यांत त्या स्थपतीप्रत वैदिक विप्रांच्यापूर्वीं अग्रपूजा आहे; त्यापेक्षां पूर्वोक्त सर्व श्रुत्यादि वचनावरून (सगीष्पतीष्टयास्थपतिः) या अमरकोश वाक्यांत आग्नेयेष्टिवागीश्वरीयाजक विश्वकर्मसंततीय पंचाल ब्राह्मणशिल्पींचें स्थपति हें पर्याय नाम ब्रम्हवर्गीतच वर्णिलें आहे हें निश्चयेकरून जाणावें. कारण शिल्पजन्य रथकर्मसंबंधीं वाजपेययज्ञ आदौ बृहस्पतीनें अनुष्ठिल्यावरून वेदविद्येप्रमाणें रथादिशिल्पविद्याही ब्रह्मकर्मरूप आहे पहा रथकर्मात्मक वाजपेयकर्ता बृहस्पति " **ब्रह्मवैदेवानांबृहस्पतिः) तै० ब्रा० अ० ३ अ० ८** " या श्रुतीवरून ब्राम्हण श्रेष्ठ आहे. जशा वेदमंत्रांच्या आधीन देवता असतात तशा रथ, ग्रह, प्रासाद, मूर्ति, अलंकार, यज्ञपात्रें, कुंडमंडप शस्त्रास्त्रें या वैदिक शिल्पांच्या ठायीं ही देवता अवश्य राहतात यास प्रमाण श्रुति—

**वैश्वदेवोवैरथः । अंकौन्यंकावभितोरथं यावित्याह । याएवदेवतारथेप्रविष्टास्ताभ्यएवनमस्करोति ॥ (तै० ब्रा०)**

**भावार्थ**—सर्व देव रथाचे ठायीं प्रविष्ट असतात ह्मणून एका देवरथास नमस्का

र केला असतां सर्व देवतांस नमस्कार केल्याचें श्रेयः प्राप्त होतें. आतां रथकर्मांत पंचाल स्वर्णकारकर्तृत्व आहे याविषयीं रथकर्मास सुवर्णादि धातुकर्माचा किंवा रत्नांचा संबंध कोठें आहे ? आणि रथाचे ठायीं कोणत्या देवता असतात ? असें म्हणाल तर त्याविषयीं प्रमाण--

**मत्स्यपुराण अध्याय १३२ चक्रश्चंद्रंचसुर्यंच चक्रेकांचनराजते ॥ शुक्लपक्षं कृष्णपक्षं पक्षद्वयमपीश्वराः ॥ १८ ॥ रथनेमिद्वयं चक्रुर्देवाः ब्रह्मपुरः सराः ॥ कृतं द्विजिव्हनयनं त्रिवर्णं शातकुंभिकं ॥ मणियुक्तेंद्रनीलैश्च वृतं हृष्टमुखैः सुरैः ॥ वरूथं गगनं चक्रुश्चारुरूपं रथस्यते ॥ २१ ॥ ऋग्वेदः सामवेदश्चयजुर्वेद स्तथापरः ॥ वेदाश्चत्वार एवैतेचत्वारस्तुरगाभवन् ॥ प्रतोदौंकार एवासीत्त-ग्रंच वषट्कृतं ॥**

अर्थ--रथाचीं दोन चक्रें ( एक सुवर्णमय, एक रौप्य मय ) त्यांचे ठायीं सूर्य, चंद्र देवतां; चक्रांच्या धावांच्या ठायीं शुक्ल पक्ष, कृष्णपक्ष; सुवर्ण पत्रानें युक्त करून रत्नांनीं जडलेलें तीन वेळूचें जूं बाधण्याचें मध्यकाष्ठ त्याचे ठायीं गंगा, सिंधु, शुतुद्रि या तीन देवता; ऋग्वेदादि चारी वेद अश्वांचे ठायीं स्थापन होतात; प्रतोदाचे ( चाबुकाचे ) ठायीं ओंकार आणि त्याचे अग्रभागीं वषट् कार राहता झाला. याप्रमाणें सर्व देवांचा समुदाय रथस्वरूपानें मूर्तिमंत सर्वांस दृष्टिगोचर होतो. तसेंच आणखी सांगवेद ही रथरूपानें चिंतन करण्यास सांगितले आहेत प्रमाण

**श्रुति-- सोऽब्रवीत्प्रजापतिश्चच्छंदा ँसिरथोमे भवत । युष्माभिरहमेतमध्वानमनुसंचराणीति । तस्यगायत्रीच जगतीचपक्षावभवतां । उष्णिक्त्रिष्टुप्चप्रष्ठ्यौ । अनुष्टुप्चपंक्तिश्चधुर्यौ । बृहत्येवोद्धिर भवत् । सएतंछंदोरथमास्थाय । एतमध्वानमनुसमचरत् । एतँह-वैछंदोरथमास्थाय । एतमध्वानमनुसंचरति । येनेष एतत्संचरति । यएवंविद्वा न्त्सोमेनयजते । यउचैनमेवंवेद इति ॥ तै०ब्रा०)**

अर्थ--तो प्रजापति आदित्यरूपानें आकाशमार्गीं जाण्याकरितां सर्व छंदाना असें बोलता झाला--अहो गायत्रीप्रभृति छंदांसि हो, तुह्मी मजसाठीं रथाकृति व्हा. तुह्मी रथाकृति झाल्यानें मी आकाशमार्गाप्रत संचार करीन. याप्रमाणें सांगितल्यानंतर त्या प्रजापतीच्या गमनार्थ गायत्री आणि जगती रथांचीं चाकें झालीं. उष्णिक् आणि अनुष्टुप् हे रथाच्या दोन लांब लांब दांड्या अनुष्टुप् आणि पांक्ति हे अग्रभागींचे दोन अश्व होत. बृहती ही रथमध्यपीठ होती झाली. तो प्रजापति त्या छंदोरथावर बसून नित्य या मार्गानें संचार करितो. ह्मणून जो पुरूष याप्रमाणें रथास अनुसंधान करितो आणि वेदास रथरूपानें ध्यातो, त्यास सोमयज्ञाचें फल प्राप्त होतें. यावरून वेद रथा-

१ आणखी श्लोक आहेत ते.यदांच्छतमया दग्धुं तत्पुरं सहदानवं ॥ रथमौपयिकं मह्यं सज्जयध्वं किलास्वते ॥ १५ ॥ दिग्वाससातथोक्ताःस्ते सपितामहकाःसुराः ॥ तथेत्युक्त्वा महादेवं चक्रुस्ते रथमुत्तमम् ॥ १६ ॥

रूपानें जर ध्येय आहे, तर रथादि शिल्प ब्रह्मकर्मरूप आहे. रथ हा युद्धांत जयदायक बलदायक आणि मनाला उत्साह प्रसन्नता देणारा असल्यामुळें इंद्रादि देवांना रथापेक्षां अधिक प्रियवस्तु दुसरी कोणतीही नाहीं. ह्मणून मंत्रद्रष्टे ऋषि वेदोक्तसूक्तात्म हा रथ आहे असें देवांना सांगून त्यांना या वेदोक्तसूक्तरूप रथावर बसून लवकर हविः प्राशनार्थ यज्ञास या अशी प्रार्थना करीत असत. प्रमाण—

**अस्मा इदुस्तोमंसंहिनोमि रथं नतष्टेवत तसिनाय ॥ गिरश्चगिर्वाहसे सुवृक्तींद्राय विश्वमिन्वंमेधिराय ॥** ऋ. अ. १।४।२७

**भाष्यं**—स्तोतृभिः प्रेषितानिस्तोत्राणि रथवदिंद्रमानयंति ॥ अतःकारणाद्रथेच्छांकुर्वते रथकारो रथं करोति तद्वदहमिंद्रायैव नरवन्य देवाय स्तोत्रं रचयामि । यत्स्तोत्रं रथवत्सुवृक्ति सुसंस्कृतमिति ॥ ”

या मंत्रावरून स्पष्ट आहे कीं “रथाची इच्छा करणारे इंद्रादिक देव जसे रथकर्त्या रथकारावर प्रीति ठेवितात तसेंच मी केलेलें स्तोत्र हाच रथ समजून या स्तोत्ररूपरथांत बसून इंद्र येवो आणि रथकाराप्रमाणें आम्हा स्तोत्रकारावरही प्रीति टेवो.” असें जर स्तोत्रकर्ते (मंत्रद्रष्टे ऋषि ) म्हणतात तर रथकारादि शिल्पकर्ते ब्राम्हण देवांला फार प्रिय आहेत कारण रथांत बसण्याची देवांला फार आवड आहे. म्हणूनच गांवोगांवीं ग्रामदेवतांकरितां रथ करून ठेविले आहेत. प्रतिवर्षी स्पर्शास्पर्शादि न कळून येणाऱ्या अनेक क्षुद्र व्यभिचारापासून देवता क्षुभित होतात त्यामुळें प्रतिष्ठित मूर्तींतील दैवतशक्ति कमी होते म्हणून देवमूर्तीमध्यें सुप्रतिष्ठित्व आणि सुप्रसन्नत्व नित्य नवें यथास्थित राहण्याकरितां प्रतिष्ठांगभूत रथोत्साह ( देवमूर्तीला रथांत बसवून ग्रामासभोंवते वाद्यादि आनंदोत्सवानें मिरवून आणणें ) प्रतिवर्षी करावा. त्यावेळीं देवमूर्तीला घेऊन रथांत बसण्याचा अधिकार पंचालब्राह्मण शिल्पिचा आहे यास प्रमाण—

**मत्स्यपुराण २६५ प्रतिष्ठाविधौ—उत्थापयेत्ततोदेवमुत्तिष्ठब्रह्मणस्पते ॥ आमूरजेतिच तथा रथेतिष्ठेतिचापरः ॥ रथेब्रह्मरथेवापि धृतांशिल्पिगणेनतु ॥ आरोप्यच ततोविद्वानाकृष्णेनप्रवेशयेत् ॥**

**अर्थ**— ‘ उत्तिष्ठ ब्रम्हणस्पते० ’ या मंत्रानें मूर्ति देवपूजक किंवा स्थापक ब्राम्हणानें उचलून पंचालशिल्पिब्राम्हणाजवळ द्यावी त्या पंचालशिल्पीनें ‘ **रथेतिष्ठ०** ’ या मंत्रानें अथवा ‘ **रथेब्रह्म०** ’ या मंत्रानें ती देवमूर्ति रथांत मध्यस्थानीं स्थापून तिला धरून बसावें. या ( मूर्ति उचलून रथांत बसवितें) वेळीं ‘**आसूरजमत्यावर्तये०** ‘ हा मंत्र पंचाल शिल्पीनें म्हणून दुंदुभिआदि वाद्यें वाजविण्यास सांगावें. या प्रमाणें वाद्यघोषयुक्त देवरथ गांवातून फिरवून आणल्यानंतर स्थापकानें ‘**आकृष्णेनरजसावर्त०**’या मंत्रानें ती देवमूर्ति रथांतून शिल्पिकडून घेऊन देवालयांत न्यावी. याप्रमाणें देवाना रथ अति प्रिय आहे. एवढेंच नव्हे तर जसे इंद्रादि देवाकरितां मंत्रद्रष्टे ब्रम्हर्षि सूक्तें व यज्ञ करितात तसेंच रथ ही देवता समजून त्या प्रीत्यर्थ ब्रम्हर्षि आणि देवही रथसंबंधीं स्तोत्रें आणि यज्ञ करिते झाले पहा **ऋग्वेद अष्टक ४ अ० ७ वर्ग ३५** मंत्र १ ला, २ रा, आणि ३ रा यांत ( **हविषारथंयज** ) इत्यादि जाणावें.

असो जसें देवांना रथ अतिप्रिय आहेत तसें त्याना रथदेवमूर्त्यादिकर्ते विश्वकर्म संततीय शिल्पीही अतिप्रिय आहेत याविषयीं आणि पूर्वोक्त देवरथमूर्त्यादिकर्मास शिल्पी विश्वकर्मसंततीयच पाहिजेत यास प्रमाण—

**शिल्पिनां देवकर्तृत्वं वंश्यानां विश्वकर्मणः ॥ अहं विश्वस्यकर्ताच कर्तारोमम शिल्पिनः ॥१॥ शिल्पिगर्भाणि लिंगानि लिंगगर्भाश्च-शिल्पिनः ॥ शिल्पिरूपं तुमद्रूपं नभेदः शृणुपार्वति ॥ २ ॥ इति स्कंदपुराणे प्रतिष्ठाखंडे ॥**

**अर्थ**—शंकर म्हणतात हे पार्वति, शिवलिंगादि देवमूर्ति करणें, हें कर्म विश्वकर्म संततीय शिल्पींचेंच आहे. मी सर्व जगाचा कर्ता आहे आणि माझे कर्ते विश्वकर्म० शिल्पी आहेत. म्हणून माझे वास्तव्य शिल्पींचें ठायीं आणि शिल्पींचे वास्तव्य माझे ठायीं आहे. म्हणून माझी लिंगप्रतिष्ठा करतेवेळीं मूर्त्यादिकर्ते पंचाल शिल्पी साक्षात् मद्रूपभावनेनें पूज्य आहेत. याचप्रमाणें रथमूर्त्यादिकर्ते रथकार पंचाल शिल्पींची देवांतच गणना केली आहे यास आणखी प्रमाण-

**भारत अनुशासन पर्व अध्याय १६५—पितामहो जगन्नाथःसावित्रीब्रह्मणःसती ॥ वेदभू रथकर्ताच विष्णुर्नारायणःप्रभुः ॥ १ ॥ उमापतिर्विरूपाक्षःस्कंदःसेनापतिस्तथा ॥ विशाखोहुतभुग्वायुश्चंद्रसूर्यौप्रभाकरौ ॥ २ ॥ शक्रःशचीपतिर्देवो यमोधूमोर्णयासह ॥ वरुणःसहगौर्याच सहरुध्द्याधनेश्वरः ॥३॥ सौम्यागौःसुरभिर्देवीविश्रवाचमहानृषिः ॥ ३ ॥ संकल्पःसागरोगंगास्रवंत्योऽथमरुद्गणः ॥ आदित्यावसवोरुद्राःसाश्विनःपितरोऽपिच४धर्माःश्रुतंतपोदीक्षा व्यवसायःपितामहः ॥ शर्वर्योदिवसाश्चैवमारीचःकश्यपस्तथा ॥ शुक्रोबृहस्पति भौमोबुधोराहुःशनैश्चरः ॥ ५ ॥ नक्षत्राण्यृतवश्चैवमासाःपक्षाश्चवत्सराः॥ वैनतेयाःसमुद्राश्चकद्रुजाः पन्नगास्तथा ॥ ६ ॥**

**अर्थ**—जगन्नाथ, ब्रह्मदेव, सावित्री ( ब्रह्मदेवाची पत्नी ) वेदभू ( वेदगर्भयज्ञपुरुष ) रथकर्ता ( रथकार त्वष्टा विश्वकर्मा ) नारायण, विष्णु, विरूपाक्ष—उमापति (शंकर ) सेनापति कार्तिक स्वामी, विशाख, अग्नि, वायु, चंद्र, सूर्य, इंद्र, यम, ऊर्णेसहित धूम, गौरीसहितवरुण, रुद्धीसहित कुबेर, सौम्या ( शांत) गाय, कामधेनु, विश्रवा ऋषि, संकल्प ( धर्मऋषीचापुत्र ) महासागर गंगाआदिनद्या, मरुद्गण, द्वादशादित्य, अष्टवसु, एकादशरुद्र, अश्विनौदेव २ , पितर, धर्म, वेद, तपस्, दीक्षा, व्यवसाय, पितृपिता, रात्री, दिवस, मरीचिपुत्र, कश्यप, शुक्र, बृहस्पति, मंगळ, बुध, गुरु, राहु, शनि, अश्विन्यादि नक्षत्रें, वसंतादि ऋतु, मास, पक्ष, संवत्सर, पक्षी, उपसमुद्र आणि सर्प यांना देव ह्मणतात. कारण हे सर्व देव वंशांत झालेले आहेत. यावरूनच लोकांमध्यें वेदपुरुषाची प्रजा वेदभू (वैदिक ब्राह्मण आणि रथकर्ता विश्वकर्मा याची प्रजा पंचाल र-

थकार याना भूदेव ह्मणतात कारण ते यज्ञकर्मानें आणि शिल्पकर्मानें देवप्रिय होतात
जरी कश्यपादि अनेक सृष्टि कर्ते प्रजापति ह्मणवितात तथापि कश्यपादि सर्व प्रजापतीसहित सर्व त्रैलोक्यभर ज्यांची प्रजा आहे असे मुख्य आद्य प्रजापति भृगु आणि अंगिरा असे दोन आहेत प्रमाण—

भारत अनुशासनप० अ० ८३ आग्नेय स्त्वंगिराःश्रीमान् कविर्ब्राह्मो महायशाः ॥ भार्गवांगिरसौ लोके लोकसंतानलक्षणौ ॥

अर्थ—आग्नेय संज्ञक अंगिरा आणि ब्राह्मण संज्ञक भार्गव या दोन प्रजापतीची प्रजा सर्व त्रैलोक्य आहे. विश्वकर्म संततीय रथकार पंचाल ब्राह्मण जरी आंगिरस आहेस. तरी आंगिरसाच्या वंशमालिका ( भरद्वाजांगिरस, गौतमांगिरस, भृग्वांगिरस इत्यादि ) अनेक आहेत आणि केवलांगिरस पर्यायनाम अथर्वांगिरस वंशांतील ऋषिप्रायः रथादि शिल्पी होते आणि कित्येकदा प्राचीनकालीं सर्व ब्रह्मर्षींनीं शिल्पकर्में केलीं आहेत तथापि विश्वकर्मा, बृहस्पति, सुधन्वा, शुक्राचार्य, भुवन, भौवन, संवर्त, अंगिरा, ऋभु, सनग इत्यादि जे जे ब्रह्मर्षि, रथ, वास्तु, अलंकार, मूर्ति, यज्ञपात्रें, शस्त्रास्त्रें इत्यादि शिल्पकर्में नित्य करण्याविषयीं प्रवृत झाले, त्यांचा एक पृथक् ( रथकार ) या आद्युदात्तपद संज्ञेनें ब्राह्मण वर्णहोता झाला, निरंतर शिल्प कर्मोपजीवनासासाठीं नित्यत्वें रथकर्म कर्त्या रथकार संज्ञक ब्राह्मणादि वर्णत्रयास आधानादि कर्मांत मंत्र देवता आणि आधान कालहीं श्रुतींनें विशेष सांगितली आहेत. वेदोक्त कर्माचा अधिकार तिन्हींवर्णास आहे ह्मणून हें वैदिक आधान संबंधीं रथकर्म करण्याचा अधिकार जसा ब्राह्मणास आहे तसा क्षत्रिय वैश्यासही आहे. त्रैवर्णिकाचे सामान्य आधानाच्या आणि त्रैवर्णिक रथकाराच्या विशेष मंत्रदेवता श्रुतीनें सांगितल्या आहेत त्या.

श्रुति-तै० ब्रा० अ० १ प्रश्न १ अ. ५ यस्यवा अयथादेवतमग्निराधीयते । आदेवताभ्योवृश्च्यते । पापीयान्भवति । यस्ययथादेवतं । नदेवताभ्य आवृश्च्यते । वसीयान्भवति । भृगूणांत्वांगिरसांव्रतपते व्रतेनादधामीतिभृग्वंगिरसामादध्यात् । आदित्यानांत्वादेवानांव्रतपते व्रतेनादधामीत्यन्य।सांब्राह्मणनांप्रजानां । वरुणस्यत्वाराज्ञोव्रतपते व्रतेनादधामीतिराज्ञः । इंद्रस्यत्वेंद्रियेणव्रतपते व्रतेनादधामीति राजन्यस्य । मनोस्त्वाग्रामण्यो व्रतपते व्रतेनादधामीति वैश्यस्य । ऋभूणांत्वादेवानांव्रतपतेव्रतेनादधामीति रथकारस्य ॥

भाष्यं—हेव्रतपते कर्म स्वामिन् अग्ने भृगूणामांगिरसांच संबंधिना व्रतेन कर्मविशेषेण निमित्तभूतेन । त्वामादधामि । इहायतने स्थापयामीति मंत्रार्थः । एवमुत्तरत्रापि

अर्थ—ज्याची जी देवत्ता असेल त्या समुदायानें त्या देवतेला सोडून आधान कर्म केलें असतां देवताद्रोह आणि दरिद्र प्राप्त होते. आणि आपलें यथा देवत आधान

केलें असतां देवता प्रसाद आणि धन संपत्ति प्राप्त होते. ह्मणून ब्राह्मणादिकांच्या आधान देवता श्रुतींनीं सांगितल्या आहेत त्या.-भृगुदेवता संबंधी आधान ( अग्निहोत्रादि कर्म ) भृगुकुलोत्पन्न ब्राह्मणांनीं करावें ( भृगुदेव १२ आहेत त्यांचीं नांवें. ) **भुवनोभौवनश्चैवसुजन्यःसुजनस्तथा॥ शुचिःक्रतुश्चमूर्धाच त्याज्यश्चवसुदश्चह ॥ प्रभवश्चात्ययश्चैवदक्षोऽथद्वादशस्तथा ॥ १३ ॥ इत्येतेभृगवोनामदेवाद्वादशकीर्तिताः ॥ मत्स्यपु.** अ० २०३) आंगिरस देवता संबंधीं आधान अंगिराकुलोत्पन्न ब्राह्मणांनीं करावें. आंगिरसदेव १० आहेत. त्यांची नांवें. ( **औदार्यायुर्दनुर्दक्षोदर्भः प्राणस्तथैवच ॥ हविष्मांश्चिहविष्णुश्चऋतुः सत्यश्चतेदश वायु पु० अ. ४** )

या अंगिराच्या कुलांतच उत्पन्न झालेले आणखी रथकारांगिरस तीन ऋभु देव आहेत त्या ऋभु देवतासंबंधीं आधान रथकारसंज्ञक वैदिकरथशिल्प करणाऱ्या भृग्वांगिरस विश्वकर्म कुलोत्पन्न ब्राम्हणांनीं करावें. या प्रमाणें भृग्वांगिरस कुलोत्पन्न ब्राम्हण जातीचें सामान्य आधानसंबंधीं मंत्रदेवता आणि नित्य देवरथकर्मसंबंधीं विशेष आधानमंत्र देवता सांगितल्या. भृग्वांगिरस गोत्राखेरीज इतर ब्राम्हणांनीं आदित्य देवताकच आधान करावें यांत कोणी रथ करतील तर पूर्वोक्त ऋभुदेवताकच आधान करावें. वरुण देवताक आधान अभिषिक्त क्षत्रियांनीं करावें. आणि इंद्र देवताक आधान अनभिषिक्त सर्व क्षत्रियांनीं करावें. यांत कोणी रथ करील तर ऋभु देवताकच आधान. ग्रामाधिपति मनुदेवताक आधान वैश्यांनीं करावें आणि वैश्यांतही कोणी रथ करील तर पूर्वोक्त ऋभुदेवताकच आधान करावें.

**शका**–पूर्वोक्त श्रुतींत ( ऋभूणांत्वा० )हा मंत्र तिन्ही वर्णांच्या मंत्राचे शेवटीं असल्यामुळें हें आधान, वर्णत्रयाहून अन्य जातीचें असल्यासारखें वाटत असून ब्राम्हणादि प्रत्येक वर्णाच्या पुढें विशेषाधानरूपानें काय म्हणून सांगितलें?

**उत्तर**–रथकर्मसंबंधीं विशिष्ट विधानाचें आधान तिन्ही वर्णांचें असल्यामुळें एका ब्राम्हणवर्णाच्या आधानापुढेंच जर असतें तर क्षत्रिय वैश्य वेदोक्तकर्माधिकारी असूनही त्यांना त्या रथकर्म संबंधीं ऋभुदेवताक आधानाचा अधिकार नाहीं असें झालें असतें. यामुळें ऋभुदेवताक विशिष्ट आधान तिन्ही वर्णांचेंच परिशिष्ट ह्मणून शेवटीं दिलें आहे. परिशिष्टरूप आहे ह्मणून त्रैवर्णिक बहिर्भूताचें आहे असें समजूनये. कारण–**वसंते ब्राह्मणोऽग्निमादधीत ग्रीष्मे राजन्य आदधीत । शरदि वैश्य आदधीत । तैं. ब्रा. अ१।१।२** याश्रुतीवरून ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे तीनच वर्ण आधानाधिकारी आहेत ह्मणून पूर्वोक्त श्रुतींत सांगितलेला विशिष्ट आधानाधिकारी रथकार त्रैवर्णिकच होय.

---

१ भृग्वंगिरो विश्वकर्म संतति द्रविडदेशांत प्राय: आहे. २हे सौर, पंचाल संज्ञेने प्राय:सर्व देशांत आहेत, या भृग्वंगिरादि सर्व विश्वकर्म संततीय ब्राह्मण रथकारांचींआधानें चालू आहेत. ३ योकार हेमकाराणा जाति नित्यं समाश्रिताः ॥ या भारतोक्तीवरून परशुरामाच्या भयानें पंचाल ब्राह्मण रथकाराच्या आश्रयानें जगलेले क्षत्रिय रथकार जाणावें याविषयीं प्रसिद्ध ह्मण-पांच पंचाल ब्राह्मण सहावा भूपळ ( क्षत्रिय ) परंतु हल्लीं क्षत्रिय वेदभ्रष्ट आहेत. ४ वैश्यरथकारास हल्लीं वैश्य सोनार ह्मणतात.

**प्रश्न**—जर रथकार त्रैवर्णिकच आहे तर पूर्वोक्त श्रुतीच्याभाष्यांत " रथकारस्य संकीर्ण जातीयस्य " असें व्याख्यात करून पुढें आणखी " मैवं ( त्रैवर्णिक रथकार नव्हे) विप्रादिर्नैवरथकृद्दन्योवा० या मीमांसेवरून आणि (माहिष्येण करण्यांतु रथकारः प्रजायते ) या याज्ञ०स्मृतीवरून संकीर्ण रथकार समजावा" असें कांह्मटलें ?

**उत्तर**—वेदाच्या चार संहिता, ब्राह्मण, अरण, सूत्रें यास श्रुति ह्मणतात या श्रुति ग्रंथांत मत भेद मुळींच प्रायःनसतो.परंतु या श्रुतीच्या ग्रंथावर भाष्यकार, मीमांसक, वृत्तिकार जे अनेक झाले आहेत. त्यांचे कित्येक तर्क श्रुति विरुद्धही झाहेत. या माधवीय भाष्यकाराचे ( संकर रथकारास आधानाचा अधिकार आहे ) हें लिहिणें श्रुतीच्या आणि आपस्तंबादि प्राचीन सूत्रांच्या, व सायण, शांकरादि भाष्यांच्या विरुद्ध आहे. माधवांनीं असें विरुद्ध अनुमानकां केलें ह्मणाल तर, अर्वाचीन मीमांसक प्रायः तार्किकानुगत झाले आहेत. परंतु स्वसांप्रदायी एकाद्या विषयांत चुकलेल्या मार्गानें जर गेला असला तरी त्याचमार्गानें सर्वांनीं जावें हें अपवादक होतें. कारण गतानुगत वर्णन होत गेलें ह्मणजे श्रुत्यादि प्राचीन ग्रंथाला आणि पूर्वापर लोकाचारानुभवाला विरोध येऊन सर्वांचे धर्मांत बखेडा होतो. ह्मणून श्रुतीला आणि श्रुति प्रोक्त पूर्वापर लोक धर्माला विरोधन येतां जे तर्क आहेत तेच तर्क निरपवाद सर्वमान्य होतात. असो प्रस्तुत रथकाराधिकरणाविषयीं माधविय भाष्य गतानुगत कसें ? तर माधवीय भाष्यकाराचा फक्त कांहीं एका मीमासकांच्याच मताला अनुसरून लिहिण्याचा बाणा आहे. तेव्हां त्या कांहीं मीमांसकांनींच हें त्रैवर्णिक रथकाराचें आधान असून केवळ तार्किक मताभिमानानें, हें आधान संकर रथकाराचें आहे असें अनुमान केलें असावें हें अनुमान श्रुतीला व न्यायाला सुटतें. बरें पूर्वोक्त मीमांसकांचा तर्क कांहीं स्मृतीला अनुसरून केला आहे ह्मणून खरें मानावें तर स्मृति स्मृतीमध्यें परस्पर विरुद्धता आहे. पहा—**विज्ञानेश्वर जातिविवेके— " क्षत्रियेण वैश्यायामुत्पादितो माहिष्यःवैश्येन शूद्रायामुत्पादिता करणी तस्यां माहिष्येणोत्पादितो रथकारो नाम जात्या भवति । तस्यचोपनयनादिसर्वं कार्यं वचनात्**

**अर्थ**—क्षत्रियानें वैश्यस्त्रीचे ठायीं उत्पन्न केलेला माहिष्य ( संकर जाति ) आणि वैश्यानें शूद्रस्त्रीचे ठायीं उत्पन्न केलेली करणी ( संकर जातिस्त्री ) होय. या करणीच्या ठायीं माहिष्यानें उत्पन्न केलेला जो मुलगा त्यास रथकार असें ह्मणतात. या संकीर्ण संकर रथकारास उपनयनादि सर्व वैदिकमंत्र.नीं कर्म करण्याचा अधिकार आहे. या विज्ञानेश्वर जातिविवेकाविरुद्ध बृहज्जातिविवेकाचें वाक्य पहा—**बृहज्जातिविवेके—माहिष्येणकरण्यांतु रथकारः प्रजायते ॥ नैवोपनयनं तस्य शूद्रधर्माद्बहिष्कृतः ॥**

**अर्थ**—माहिष्यानें करणीच्या ठायीं उत्पादित रथकार संकीर्णसंकर असल्यामुळें शूद्रापेक्षां नीच आहे त्यास उपनयन करण्याचा अधिकार नाहीं. याप्रमाणें स्मृति स्मृतींत किंवा श्रुति स्मृतींत विरोध आल्यास ( **विरोधेत्वनपेक्षंस्यादसतिह्यनुमानं** ) या जैमिनि सूत्रावरून श्रुतीच प्रमाण होय ह्मणून ज्या भाष्यकाराचे अगर मीमांसाकाराचें ज्या प्रकरणाविषयीं जेवढें बोलणें श्रुतिन्यायविरुद्ध तर्कित असेल तेव-

त्यावर भरंवसा ठेवूं नये. असा दोष टाकून गुण ग्रहण करावेत. कारण " दृष्टव: " **किमपिलोकेऽस्मिन्ननिर्दोषंननिर्गुणम्॥शूपर्वत्त्यजंतेदोषान्गुणान्गृण्हंति साधवः॥** अशीं वृद्ध वचनें आहेत. आतां(**वर्षासुरथकारोऽग्नीनादधीत**) या श्रुतीचा अर्थ प्रत्येक वर्षाऋतूचे ठायीं रथकारानें तिन्ही अग्नीप्रीत्यर्थ यज्ञ करावा. असा असल्यामुळें या श्रुतींतिल रथकार त्रैवर्णिक असून,प्रस्तुत माधवीय भाष्यकार ज्या मीमांसावाक्यावरून हें वर्षाऋतूंत करावयाचें त्रैवर्णिकपर आधान, संकीर्णसंकर रथकाराला करण्यास सांगतात त्या मीमांसावाक्याचा आपण विचार करूं. **मीमांसाधिकरणरत्नमालायां षष्ठाध्याये ६ प्रथमपादे १ विप्रादि नैंवरथकृदन्योवायस्तुयोगतः ॥ रूढेर्वर्णांतरं प्राप्य तस्य वर्षर्तुरिष्यते ॥ १ ॥**

**अर्थ**—हल्लीं ब्राम्हणादि वर्णत्रयांत रथादि शिल्पकार दिसत नाहींत म्हणून वर्षास्वाधानाधिकारी रथकार हा ' **अन्योवा** , ( विकल्पेंकरून त्रैवार्णिकाहून अन्यही घ्यावा. ) ' यांत **नवेतिविभाषा** या पाणिनीसूत्रावरून मीमांसकांनीं कारिकेंत [ **वा** ] हें विकल्पार्थक पद घालण्याचें कारण हेंचकीं वर्णत्रयाहून बहिर्भूत संकीर्ण संकर रथकाराची शूद्रवर्गांत गणना असल्यामुळें त्यास आधानाचा ( अग्निहोत्राचा ) अधिकार नाहीं; म्हणून आधानाधिकारी ब्राम्हणादि वर्णत्रयांत रथादि शिल्पकर्मानें रथकार ही संज्ञा ( **रथंकरोतीति रथकारः** ) अशा योगशक्तीनें प्राप्त होऊन त्या त्रैवर्णिक रथकाराच्या परंपरा प्राप्त प्रवृध्द समुदाय शक्तीनें वर्णांतरत्व ( त्रैवर्णिकांतर्गत जातिविशेषत्व ) ज्या समुदायाला प्राप्त झालें आहे त्याचा हा वर्षार्तु आधान काल जाणावा. ' तेव्हां हें मीमांसावाक्यच अन्योवा ( अन्य रथकार घ्यावा अगर त्रैवर्णिक घ्यावा ) असें विकल्पित करण्याचें कारण ( **वर्षासुरथकारोऽग्नीना दधीत** ) या श्रुतीवर जितक्या मीमांसा आहेत त्यांतून कित्येकांनीं त्रैवर्णिक रथकारच ऋभ्वाधानाधिकारी आहे संकीर्णसंकर नाहीं; असा पूर्व पक्ष केला असून त्याच्या [ रथकाराच्या ] ऋभुदेवतांवरून एका हीन जातीचा अयथार्थ ग्रह भ्रांतीनें मनांत येऊन ऋभुदेवताक आधान संकीर्णसंकर रथकाराचें असावें असा उत्तरपक्ष केला आहे. आणि कित्येक मीमांसकांनीं व सर्व सूत्रकारांनीं ऋभ्वाधानाधिकारी रथकार त्रैवर्णिकच आहे. संकीर्णसंकर रथकार नाहीं, असा सिद्धांत निश्चित केला आहे. म्हणून ( **उभयत्रप्रयोगदर्शनात्संदेहः । कर्क०** ) अशी भाष्योक्ति असल्यामुळें मीमांसकांनीं पूर्वोक्त वाक्यांत ( **अन्योवा** ) असें म्हटले आहे एवं ( **वर्षासुरथकार आदधीत** ) या श्रुतीचे अर्थाविषयीं मीमांसा आणि स्मृति ह्या परस्पर विकल्पित आणि विरुद्ध आहेत; म्हणून स्मृत्यादि ग्रंथांस विरोध आला असतां श्रुति प्रमाण मानावी, यास प्रमाण—**बहुत्वादिह शास्त्राणां धर्ममूलंश्रुतिः स्मृतिः ॥ श्रुति स्मृतिपुराणानां विरोधोयदि दृश्यते ॥ श्रौतं तत्रप्रमाणं स्याद्द्वयोर्द्वैधे श्रुतिर्वरा ॥ श्रुतिद्वैधंतुयत्रस्यात्तत्र धर्मावुभौ स्मृतौ ॥ पाद्मे** ॥ या लोकीं हल्लीं अनेक शास्त्रें असल्यामुळें धर्माचा मूळ शोध श्रुति आणि स्मृतिवरून करावा. परंतु श्रुति, स्मृति आणि स्मृतिरूप पुराणें यांत परस्पर वि-

रोध दिसेल तर स्वधर्म जिज्ञासूनें श्रुतीच प्रमाण मानावी. आणि ज्या प्रकरणीं श्रुति श्रुतींतही दोनमतें असतील तेव्हां तेथें दोनही धर्म "उदितानुदित होमासंबंधीं विकल्पाच्या व्यवस्थेप्रमाणें" व्यवस्थितपणानें नित्य चालू राहतात.

शंका—श्रुति स्मृतींत विरोध असतां श्रुतीच प्रमाण मानावी हें खरें आहे मग मीमांसा आणि भाष्यें हीं केवळ श्रुत्यर्थालाच प्रकाशित करणारीं असल्यामुळें पूर्वोक्त ( **वर्षासु०** या श्रुतीसंबंधीं मीमांसावाक्याचा विकल्पित आणि माधवीय भाष्याचा ( **संकीर्ण जातीयस्य** ) हाच अर्थ श्रुतिसंमत मानला पाहिजे. आणि माधवी यांनीं "**माहिष्येण करण्यांतु रथकारः प्रजायते**" हें याज्ञवल्क्य स्मृतिवाक्यही त्याला प्रमाण दाखविलें आहे.

उत्तर—ब्राह्मणादिकांच्या वर्णधर्माची उपदेशक जी श्रुति आहे, ती श्रुति एकच अर्थाची असून, ज्या पेक्षां त्या एकार्थक श्रुतीवर अनेक मीमांसाकार आणि भाष्यकार आप आपल्या तार्तिकमतांनीं जर एका श्रुतिपदाचे अनेक भिन्न भिन्न अर्थ करितात तर त्या प्रसंगीं श्रुतीच्या बरोबरीनें मीमांसा आणि भाष्येोक्ति वगैरे मानतां येत नाहींत. एक उदाहरण—( **ते सौधन्वनाः** ) हें श्रुतिवाक्य, याजवर सयाणाचार्यांचें भाष्य— ( **सुधन्वन आंगिरसस्य सुधन्वनः ऋषेः पुत्राः** ) ह्मणजे अंगिरा ऋषीचा पुत्र सुधन्वा ब्रह्मर्षि असें ह्मटलें आहे. दुसरें या ( **सौधन्वनाः** ) श्रुतिपदाचा अर्थ, एक पार्थ सारथि मिश्र नामक मीमांसक ( **सुधन्वनः वैश्यायां व्रात्यतो जातः कश्चित् सुधन्वा नामको हीन जातिः तस्य** ) ह्मणजे भ्रष्ट झालेल्या व्रात्यवैश्यापासून वैश्या दासीचे ठायीं झालेला हीनजाति लेकावळा असा सुधन्वा जो त्याचे पुत्र) असा करितात. आणि माधवीय भाष्यकार—**सौधन्वनः(सुधन्वन इंद्रस्य संबंधिनः** ) यांत सुधन्वा ह्मणजे इंद्र असा अर्थ केला आहे. पहा एका ( **सौधन्वनाः** ) या श्रुतिपदावर तिघांचे तीन अर्थ भिन्न भिन्न होऊन कोणांशीं कोणाचा मेळ नाहीं त्याचें कारण वैदिकांच्या परंपरा पाठमालिन्यानें वेदाच्या संहितेंतील मंत्राच्या स्वरवर्णाचे विपर्यास झाले आहेत. तेव्हां असे भिन्नार्थक मीमांसादि ग्रंथ श्रुत्यर्थ प्रकाशक नामधारी असूनही सत्यधर्मोपदेशक श्रुतीच्या सत्यार्थाला व्याकुळ करणारे आहेत. हें मी आपलें मतानें बोलत नाहीं. वेदांचा सत्य अर्थ प्रकाश करण्याकरितां जो प्रत्यक्ष नारायणाचा अवतार त्या वेद व्यासांनींच म्हटलें आहे; प्रमाण—

**मत्सपुराण अध्याय १४३ द्वापरे व्याकुली भूत्वाप्रणश्यति कलौपुनः ॥ वर्णानां द्वापरे धर्माः संकीर्यंते तथाश्रमाः ॥ ६ ॥ द्वैधमुत्पद्यते चैव युगेंतस्मिन् श्रुतौ स्मृतौ॥द्विधाश्रुतिः स्मृतिश्चैव निश्चयो नाधिगम्यते ॥ ७ ॥ अनिश्चयावगमाद्धर्मतत्वं नविद्यते ॥ धर्मतत्वह्यविज्ञाते मतिभेदस्तु जायते ॥ ८ ॥ परस्परंविभिन्नास्ते दृष्टीनांविभ्रमेणतु ॥ अतो दृष्टि विभिन्नैस्तैः कृतमत्याकुलंत्विदं ॥ ९ ॥ एकोवेद श्चतुष्पादः संहृत्यतुपुनःपुनः ॥**

**संक्षेपादायुषश्चैव व्यस्यते द्वापरे त्विह ॥ १० ॥ वेदश्चैक श्चतुर्धातु व्यस्यते द्वापरादिषु ॥ ऋषिपुत्रैः पुनर्वेदा भिद्यंतेदृष्टिविभ्रमैः ॥ ११ ॥ तेतुब्राह्मणविन्यासैः स्वरक्रमविपर्ययैः ॥ संहृता ऋग्यजुः साम्नांसंहितास्तैर्महर्षिभिः॥ १२ ॥ सामान्याद्वैकृताच्चैव दृष्टिभिन्नैः क्वचित् क्वचित् ॥ ब्राह्मणं कल्पसूत्राणि भाष्य विद्या स्तथैवच॥ १३ ॥ अन्येतु प्रस्थिता स्तान्वै केचित्तान्प्रत्यवस्थिताः ॥ द्वापरेषुप्रवर्तंते भिन्नार्थैस्तत्वदर्शनैः ॥ १४ ॥ एकमाध्वर्यवं पूर्वमासीद्वैधंतु तत्पुनः ॥ सामान्य विपरीतार्थैः कृतं शास्त्राकुलं त्विदं ॥ १५ ॥ दुरिष्टैर्दुरधीतैश्चदुराचारै र्दुरागमैः ॥ १६ ॥ विप्राणां कर्मदोषैस्तैः प्रजानां जायते भयं ॥ १६ ॥**

अर्थ–द्वापारयुगाचे ठायीं वेद व्याकुळ होऊन कलियुगाचेठायीं नाश पावतो. तसेंच वर्णाश्रमसंबंधीं धर्मांचा संकर होतो त्या द्वापरयुगाचेठायीं श्रुतिस्मृतीमध्यें द्वैध (दोन मतभेद)उत्पन्न होतात. श्रुतिस्मृतीत द्वैध उत्पन्न झाल्यानें धर्माचें ज्ञान निश्चयानें होत नाहीं त्या निश्चयहीन शंकित ज्ञानापासून सत्य धर्म कोणास कळून येत नाहीं. सत्यधर्माच्या ज्ञानाचा लोप झाला असतां ब्राह्मणादि सर्व वर्णांत मतभेद होत मतभेद झाल्यापासून परस्परांचे धर्माविषयीं विद्वान् लोकही शुद्धवेदाला अनेक भिन्न दृष्टीनें पाहतात. त्या भिन्न दृष्टीनें पाहणाऱ्या ऋष्यादि विद्वज्जनांनीं या श्रुत्यादि प्राचीन ग्रंथाला अतिव्याकुळ केलें आहे. पहा कृतत्रेता युगाचेठायीं ऋग्यजुः सामथर्वणरूप चार पादाचा एकच वेद होता. त्या निर्विकल्प एकावेदाच्या, द्वापरयुगाचेठायीं आयुष्य थोडें असल्यामुळें, निरनिराळ्या अनेक शाखा करून वेदाचें ग्रहण करिते झाले. पुनः त्या विभित्र कृत वेदांस भिन्न दृष्टीनें पाहणारे पाठक लोक विद्वत्तेच्या दर्पजन्यप्रमादानें वेदाक्षरांच्या स्वरांचे आणि वर्णांचे विपर्यास करून ब्राम्हणादि ग्रंथरूपानें निरनिराळ्या अनेक पद्धति बसवून ऋग्यजुः साम अशा शुद्धसंहितात्रयाची मोठमोठ्या ऋषींनीं सारी व्यस्तता करून टाकली आहे. एवढेंच नव्हे तर त्या ऋषींनीं सामान्य आणि विशेष दृष्टी संबंधीं असलेल्या श्रुतीवर कोठें कोठें भिन्न भिन्न भ्रमयुक्तदृष्टीनें ब्राह्मण, कल्प, सूत्र, स्मृति, भाष्यें. अनेक रचून ठेविलीं आहेत कित्येकांनीं त्या पूर्वोक्त कल्पादि ग्रंथांला अनुसरून ग्रंथ केलें आहेत कित्येकांनीं त्याच्या उलट निबंध केले आहेत. याप्रमाणें द्वापरयुगाचेठायीं श्रुत्यादि प्राचीन ग्रंथांचे भिन्नार्थ करणारे ऋष्यादि विद्वजन उत्पन्न झाले. पूर्वी यज्ञ कर्म एक असून त्यांत दोन प्रकार केले. पुनश्च आणखी ग्रंथकारांनीं सामान्य श्रुतीचे अनेक विपरीतार्थ करून हें श्रुतिशास्त्र व्याकुळ करून टाकिलें आहे. या विपरीतार्थक ग्रंथावरून ब्राम्हणादिक, दुष्टयज्ञ, दुष्ट अध्ययन, दुष्टाचरण, दुष्टशासनें करूं लागल्यामुळें प्रजेला अनेक उपद्रव, भयें उत्पन्न होतात. याचप्रमाणें आणखी प्रमाण—

**वायुपुराणें चतुर्युगाख्याने अध्याय ५८ आद्येकृतेचधर्मोऽस्तित्रेतायांसंप्रपद्यते ॥ द्वापरेव्याकुलीभूत्वाप्रणश्यतिकलौयुगे ॥ ५ ॥**

वर्णानांविपरिध्वंसः संकीर्यंते तथाश्रमाः॥द्वैधमुत्पद्यतेचैवयुगेतास्मि
न् श्रुतौस्मृतौ ॥६॥ द्वैधात्श्रुतेः स्मृतेश्चैवनिश्चयोनाधिगम्यते॥अ-
निश्चयाधिगमनाधर्मतत्वंनिगद्यते॥धर्मतत्वंतुभिन्नानांमातिभेदोभवे
न्नृणां॥परस्परविभिन्नैस्तै दृष्टीनांविभ्रमेणच॥८॥ अयंधर्मोह्ययंने-
तिनिश्चयोनाधिगम्यते॥मतिभेदेच तेषांवैदृष्टीनांविभ्रमोभवेत् ॥
॥ ९ ॥ ततोदृष्टिविभिन्नैस्तैः कृतं शास्त्राकुलंत्विदम् ॥ ऋषिपुत्रैः
पुनर्वेदाभिद्यंतेदृष्टिविभ्रमैः ॥ १० ॥ मंत्र ब्राम्हणविन्यासैःस्वर-
वर्णविपर्ययैः ॥ संहिताऋग्यजुःसाम्नासंहन्यंतेश्रुतर्षिभिः॥ ११ ॥
सामान्याद्वैकृताच्चैवदृष्टिभिन्नैः क्वचित्क्वचित् ॥ ब्राम्हणं कल्पसू-
त्राणि मंत्रप्रवचनानिच ॥ १२ ॥ अन्येतुप्रहितास्तान्वैकेचित्ता-
न्प्रत्यवस्थिताः॥ द्वापरेषुप्रवर्ततेभिन्नवृत्ताश्रमाद्विजाः॥१३॥ एक-
माध्वर्यवं० ॥ तेषांविपर्ययाश्चैवभवंतिद्वापरेपुनः ॥ १४ ॥ अवृ-
ष्टिर्मरणंचैवतथैवव्याध्युपद्रवाः ॥ वाङ्मनः कर्मजैर्दुःखैर्निर्वेदो-
जायते पुनः ॥ १५ ॥ उत्पद्यंतेहिशास्त्राणांद्वापरेपरिपंथिनः ॥
आयुर्वेदविकल्पाश्च अंगानांज्योतिषस्यच ॥ १६ ॥ अर्थशास्त्रवि
कल्पश्चहेतुशास्त्रविकल्पनं ॥ स्मृतिशास्त्रप्रभेदाश्चप्रस्थानानिपृथक्
पृथक् ॥ १७ ॥ द्वापरेष्वभिवर्तंते मतिभेदास्तथानृणां ॥ २४ ॥

( अर्थ स्पष्ट आहे ) यावरून स्मृति, मीमांसा, भाष्यादि ग्रंथ जरी वेदार्थप्रकाशक आहेत तथापि ते ग्रंथकाराच्या मतिभ्रमानें भिन्नार्थक असल्यामुळें वैकल्पिक पदार्थाविषयीं श्रुत्यादि अनुभवावांचून यथार्थ मानले जात नाहींत; कारण ( **श्रुतिर्लिंगंसमाख्याच वाक्यंप्रकरणंतथा ॥ पूर्वपूर्वबलियस्यादिति** ) या परिभाषेवरून श्रुति सूत्रे, स्मृति, पुराणें, मीमांसा, भाष्यें इत्यादि ग्रंथ अनुक्रमानें पूर्व पूर्वतर बलिष्ठ आहेत. ह्मणून माधवीय भाष्यकारानीं ( **संकीर्ण जातीयस्य** ) या आपल्या व्याख्येला ( **वर्षासु० त्रभूणां० रथकारस्त्रैवर्णिक एव** ) हें आपस्तंवसूत्र बाध आणील या भयानें त्या व्याख्येखालीं ( **विप्रादि०** ) ही मीमांसोक्ति आणि ( **माहिष्येण०** ) हेंस्मृतिवाक्य जोडून देऊन पूर्वोक्त आपस्तंबसूत्राचा जो निषेध केला आहे तो असत् ( त्यांचा भ्रम जाणावा! ) कारण तें मीमांसावाक्य वैकल्पिक असूनही त्याच्यानें श्रुतिरूप प्राचीन अशा आपस्तंबसूत्राचा निषेध होत नाहीं कारण मीमांसे पेक्षां सूत्रग्रंथ श्रुतीप्रमाणें बलिष्ठ आहेत प्रमाण-

अष्टादशसुविद्यासुमीमांसाऽतिगरीयसी ॥ ततोऽपितर्कशास्त्राणि
पुराणं तेभ्यएवच ॥ ततोऽपिधर्मशास्त्राणि तेभ्योगुर्वी श्रुतिर्द्विज
॥ ५० ॥ ततोऽप्युपनिषच्छ्रेष्टा गायत्रीच ततोऽधिका ॥
काशी०अ० ३८

**अर्थ**—सर्व विद्येंत मीमांसा श्रेष्ठ आहे आणि त्या मीमांसेपेक्षां न्यायशास्त्राचे ग्रंथ अधिक मान्य आहेत; न्यायशास्त्रापेक्षां पुराणग्रंथ अधिक मान्य आहेत पुरा-

णापेक्षां धर्मशास्त्रें ( स्मृति ) आणि धर्मशास्त्रापेक्षां श्रुति ( सूत्रें, वेदांगें, ब्राह्मण, संहिता ) आणि श्रुतीपेक्षां उपनिषद् (वेदांतपर श्रुति) आणि त्यापेक्षां श्रेष्ठ गायत्रीचमंत्र आहे. एवं पूर्वमीमांसाकार जैमिनिऋषींचे गुरु व्यासच जर आपले मत्स्य, वायु स्कंदादिपुराणांत ऋषिपुत्रवेदार्थाला तार्किक मतानें विकल्पित करणारे असल्यामुळें त्या ऋषिपुत्रांच्या मीमांसा ग्रंथाची मान्यता जर न्यायापेक्षांहीं कनिष्ठ प्रतीची मानतात तर ( **विप्रादिनैंवरथकृदन्योवा** ) या अर्वाचीन विकल्पितमीमांसा वाक्यानें कल्पारंभीं उत्पन्न झालेला फार प्राचीन अशा आपस्तंबऋषीच्या ( **वर्षारथकारस्य त्रयाणां त्रर्णानामेतत्कर्म कुर्युस्तेषामेषकालः** ) या सूत्रोक्तीचा निषेध होत नाहीं. मीमांसावाक्यें वेदांचा निर्विकल्पार्थबोध करीत नाहींत. म्हणूनच [ **वेदार्थाभिरुक्तव्याकरणादि श्रवणेनाधिगच्छेत्–इतिमिताक्षरायां**] वेदाचा निश्चयात्मक अर्थ निरुक्तव्याकरणादि सूत्र ग्रंथावरून जाणणें प्रशस्त आहे. असें ह्मटलें आहे. त्यावरून स्पष्ट आहे कीं, व्याकरणमीमांसादि ग्रंथ बहुश्रुतत्व येण्याकरितां अभ्यस्तमात्र अवश्य केले पाहिजेत परंतु स्वधर्मनिर्णय श्रुतिप्रमाणावरूनच करावा. असें मनूचें वचनही आहे– ( **सर्वंतुसमवेक्ष्येदं निखिलं ज्ञानचक्षुषा ॥ श्रुति प्रामाण्यतोविद्वान्स्वधर्मोनिविशतवै ॥ ८ ॥ म. अ. २** ) **हरिःओम् अथैतस्यसमाम्नायेति** या ब्रह्मयज्ञोक्त पाठावरून आपस्तंब, आश्वलायनादि सूत्रग्रंथांचीं श्रुत्यर्थबोधक निरुक्तादि वैदिक ग्रंथांत गणना असल्यामुळें ते सूत्रग्रंथही वेदांगस्वरूप आहेत; ह्मणून ते ( सूत्रग्रंथ ) स्मृतीपेक्षां विशेष मान्य आहेत. कारण ( **शाखादिसूचना ग्रंथे सूत्रं** ) या मेदिनीकोशोक्तीवरून सूत्रग्रंथ हे मनुयाज्ञवल्क्यादि सर्वस्मृतीचे आदि ( मूळग्रंथ ) अर्थात् श्रुतिरूप आहेत. ह्मणजे सूत्रावरून स्मृति केल्या आहेत ह्मणून स्मृतीपेक्षां सूत्र बलिष्ठ, यास प्रमाणही आहे–**स्मृतयश्च पुराणानि सूत्राण्यपिततोमता॥न्यपिचाधुनिकैर्मर्त्यै र्विज्ञातव्यंततःपरं॥ विद्याभूषणे प० २**)

अर्थ–आधुनिक मानवांनीं श्रुतीला अनुसरून असणारीं स्मृति आणि पुराणें प्रमाण मानावीं आणि त्या स्मृतीपेक्षांही सूत्रग्रंथाचे प्रमाण अधिक मान्य आहे, ह्मणून कोणत्याही स्मृतीचें वाक्य सूत्राचा निषेध करण्यास समर्थ होत नाहीं. असें असूनही आपस्तंबसूत्र निषेधार्थ जरी माधवीयांनीं ( **माहिष्येण करण्यां०** ) असें याज्ञ०स्मृतीचे वाक्य भाष्यांत दिलें आहे तरी तें ब्राह्मणाद्याधानाधिकारश्रुतिप्रसंगीं अगदीं विसंगत अनान्वित आहे कारण पूर्वोक्त ब्राह्मणादि समर्थ त्रैवर्णिकांच्याच यज्ञाधिकारश्रुतिप्रकरणीं ( **ऋभू० रथकारस्य** आणि **वर्षासु०** ) या आपस्तंब श्रुतीला अनुसरून जसा " **वर्षा त्रयाणां वर्णानांमंतर्भूतस्य रथकारस्य** " या आपस्तंबसूत्राचा सान्वय ऐक्य संबंध आहे तसा या श्रुतिप्रसंगीं ( **माहिष्येण करण्यांतु०** ) या याज्ञवल्क्य स्मृतिवाक्याचा कांहीं संबंध नाहीं. कारण याज्ञवल्क्यांनीं ( **माहिष्येण०** ) या वाक्यांत फक्त अनुलोम प्रतिलोमादि संकर जातिप्रकरणीं रथकार म्हणून एका संकीर्ण संकर जातीची उत्पत्ति मात्र सांगितली आहे; परंतु त्या संकीर्णसंकर रथकारानें वर्षाऋतूंत ऋभुदैवत अ-

ग्निहोत्र घ्यावा असें कांहीं एक बिलकुल सांगितलें नाहीं. अर्थात् सूत्र निषेधार्थ दिलेलें ही स्मृतिवाक्य सूत्राला विरुद्ध नाहीं असें समजावें. यास आणखी दुसरें प्रमाण—याज्ञवल्क्य स्मृति ज्या स्मृतीला अनुसरून आहे आणि जी स्मृति ( **यद्वैहवावभेषजं तन्मनुरब्रवीत्** ) या छांदोग्य श्रुतीवरून आणि ( **वेदार्थोपनिबंधत्वात्प्राधान्यंहि-मनोःस्मृतं ॥ मन्वर्थविपरीतातु यास्मृतिःसानशस्यते ॥ तावच्छास्त्राणिशोभंते तर्कव्याकरणानिच ॥ धर्मार्थमोक्षोपदेष्टामनुर्यावन्नभाषते ॥** अर्थ—वेदार्थास अनुसरून असलेली मनुस्मृति सर्वधर्मशास्त्रांत मुख्य आहे. मनुस्मृतीला विरुद्ध जें अन्यस्मृतीचें वाक्य तें प्रशस्त नाहीं फार तर काय, पण न्याय व्याकरणमीमांसादि ग्रंथ सुद्धां मनुस्मृतीपुढें प्रतीष्ठा पावत नाहींत. ) या बृहस्पति वाक्यावरून वेदमान्य श्रुतिप्रोक्त जी मनुस्मृति तिजमध्यें अनुलोमप्रतिलोमादि सर्व संकीर्णसंकरजातींचा सुध्धा धर्मनिर्णय केला असूनही ज्यापेक्षां त्या सविस्तर मनुस्मृतीं-मध्यें संकीर्णसंकरजाति सर्व ( **हीनाहीनान्प्रसूयंतेवर्णान्पंचदशैवतु ॥** ) अर्थ—मूर्धाभिषिक्तादिकरणांत सहा अनुलोम हीन संज्ञक होत या हीनापासून उत्पन्न झाले-ले१५ संकीर्णसंकर जाती ह्या हीनापेक्षां हीन शूद्रधर्मी जाणाव्या, कारण(**सजातिजा-नंतरजाःषट्सुताद्विजधर्मिणः । शूद्राणांतुसधर्माणः सर्वेपध्वंसजास्मृताः ॥ ४१ ॥ म. अ. १०** ) या मनुस्मृत्युक्तीवरून सजातीय विवाहित स्त्रीयांच्या ठायीं झालेले तीन पुत्र ( ब्राह्मण क्षत्रिय वैश्य ) आणि अनंतरज ( अनुलोमत्वानें विवाहित स्त्रियांच्या ठायीं झालेले मूर्धाभिषिक्त, अंबष्ठ आणि माहिष्य हे तीन पुत्र ) एकूण हे सहा पुत्र द्विजधर्मी जाणावेत ह्मणजे यांचे उपनयन करावे. याहून अन्य अनुलोम संकर जे निषाद, उग्र करण आणि सर्व संकीर्ण संकर व प्रतिलोम वगैरे शूद्र धर्मी जाणावे ह्मणजे यांच उपनयन करूनये कारण, "**शूद्राजातत्वेन जातिवैगुण्या दनुपनेयाः। उत्तरे प्रतिलोमश्च**"॥( निषाद उग्र, करण, रथकारादिक अनंतरजांना शूद्राजातत्वानें शूद्रजाति विशेषत्व आहे ह्मणून अनुलोमानंतरज रथकाराचें उपनयना-दि करावें असें जो कोणीं समजेल, तो त्याचा भ्रम जाणावा असें पूर्वोक्त श्लोकाचे टीकेंत कुल्लूक भट्ट ह्मणतात—**ताननंतरजास्त्विति यदुक्तं तत्तज्जातिव्यपदेशार्थं। संस्कारार्थमिति कस्यचिद्भ्रमःस्यादिति॥** अर्थ—शंखादि अन्य स्मृतीमध्यें संकीर्ण संकरादि अनुलोमानंतरजांना द्विजधर्मत्व आहे असें जें ह्मटलें आहे, तें त्या जातीच्या व्यपदेशाकरितां ह्मटलें आहे, उपनयनादिसंस्कारार्थ ह्मठलें नाहीं ह्मणून संस्कारार्थ जो कोणी ह्मणतो ती भ्रांति होय. याप्रमाणें मनुस्मृतीची अन्यस्मृतींशीं एक वाक्यता होते ह्मणूनच **बृहज्जातिविवेके-माहिष्येणकरण्यांतु रथकारःप्रजायते ॥ नैवोपन-यनं तस्य शूद्रधर्माद्बहिष्कृतः ॥** असें ह्मटलें आहे. तस्मात् अग्निहोत्राद्यधिकारी रथकार त्रैवर्णिकच आहे कारण **विद्याशिल्पं भृतिःसेवा गोरक्ष्यं विपणिःकृषिः ॥ धृति भैक्ष्यं कुसीदंच दशजीवनहेतवः॥ ११६॥म.अ.१०** या मनुवचनावरून देव ब्राह्मणसंबंधी यज्ञसंबंधी आणि राजसंबंधी शिल्पकर्मानें ब्राह्मणास उपजीवन करण्यास सांगितले आहे. ह्मणून आपस्तंबाप्रमाणें मनुस्मृतीचेंही प्रमाण जाणावें. आतां ( **अस-**

त्संतस्तुविज्ञेयाःप्रतिलोमानुलोमजाः ॥ जात्युत्कर्षोयुगे ज्ञेयःपंचमेसप्तमेपिवा ॥ कर्मणा व्यत्ययेसाम्यं पूर्ववच्चाधरोत्तरं ) अर्थ—प्रतिलोम वाईट, आणि अनुलोम चांगलें, असें ह्मणण्याचें कारण अनुलोम संकर जर सुशीलतेनें पांचसात पिढ्यापर्यंत सारखे वागतील तर ते जात्युत्कर्षत्व ( स्वजातीमध्यें श्रेष्ठत्व ) पावतात. या याज्ञवल्क्य स्मृतीवाक्यारून जर कोणी संकीर्णसंकर रथकारास ( वर्षासु० ऋभुणां० ) या श्रुतीला लागू कराव्यांत असें ह्मणतील तर संकीर्णसंकररथकाराचें पूर्वज जे मुख्य संकर अंबष्ठ, माहिष्य, उग्र, निषाद, करण यांच्या नांवांनींही " वर्षासु० ऋभुणां० " अशीं यज्ञाद्यधिकारविधायक श्रुतिवाक्यें अवश्य असलीं पाहिजेत, तीं तर नाहींत. एवढेंच नव्हे तर मूर्धाभिषिक्तादि पूर्वअनुलोमांनाही सर्वसंस्कार्यत्व नाहीं असें मनूचें वचन आहे—विप्रस्य त्रिषुर्णेपुनृपतेर्वर्णयेर्द्वयोः ॥ वैश्यस्यवर्णेचैकस्मिन्षडेतेऽपसदाः स्मृताः ॥ म. अ. १० अर्थ—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार वर्णांचे ठायीं अनुलोमत्वानें उत्पन्न होणाऱ्या मूर्धाभिषिक्त,अंबष्ठ,पारशव,माहिष्य,उग्र, करण या सहा अनुलोम संकराना अपसद(नीच)अशी संज्ञाआहे अर्थात्(विवर्णःपामरोनीचःप्राकृतश्चपृथक्जनः । विहीनोऽपसदोजाल्मःक्षुल्लकश्चेतरश्चसः ॥ या अ० शूद्रवर्गोक्तिवरून आणि ( अपकृष्टं नीचत्वं सीदतीत्यपसदः ) या व्युत्पत्तीवरून अपसदास शूद्रत्व आहे परंतु या सहापैकीं मूर्धाभिषिक्त हा ( क्षत्रंहिब्रह्मसंभवं ) यामनूक्तीवरून आणि ( क्षत्रिया विप्रसंयोगाज्जातोमूर्धाभिषिक्तकः ॥ राजन्यःक्षत्रधर्मेभ्योभ्यधिकःसंप्रकीर्तितः ॥ ) या उशन उक्तीवरून मूर्धाभिषिक्तास क्षत्रियत्व प्राप्त आहे तें ( मूर्धाभिषिक्तोराजन्यो बाहुजःक्षत्रियोविराट् ) या क्षत्रियपर्यायोक्तीवरून स्पष्ट आहे. तसेंच निषादसंकरापैकीं एकाविशेष भेदाविषयीं. शूद्रायां ब्राह्मणाज्जतःश्रेयसाचेत्प्रजायते । अश्रेयान्श्रेयसींजातिंगच्छत्यासप्तमाद्युगात् ॥ आणि यस्माद्बीजप्रभावेणतिर्यग्जा ऋषयोऽभवन् ॥ यामनूक्तीवरून आणि ( निषादस्थपतिंयाजयेत् ) या श्रुतीच्या बलवत्तरत्वावरून ब्रह्मबीजप्रभावानें आणि विद्यावाप्तिहेतुक ब्राह्मणशुश्रूषावृत्तीनें फक्त एक निषाद ( ब्राह्मणापासून विवाहित शूद्र स्त्रीचेठायीं सातपिढयापर्यंत स्त्रीरूप अपत्यत्वाने आणि ब्राह्मणोद्वाहानें झालेला निषादांची स्थपति ( स्वामी ) हा श्रुतिस्मृतिवाक्यपावल्यानें शूद्रवर्गात नसून त्रैवर्णिकांत गणण्यास योग्य झालेला जो निषाद तो सामान्य ( पुमपत्यत्वानें झालेल्या शूद्रधर्मीशूद्रोद्वाही निषादाहून भिन्न समजावा. याप्रमाणें एक मूर्धाभिषिक्त आणि निषादस्थपतिखेरीज करून बाकींचे ( शूद्राश्चावरवर्णाश्चवृषलाश्चजघन्यजाः ॥ आचंडालातुसंकीर्णा अंबष्ठकरणादयः ॥ ) या अमरकोशोक्तीवरून अंबष्ठ, उग्र, करण,मागध माहिष्य, क्षत्तृ, सूत, वैदेहक, रथकार, पारसव, चंडालाख्याः ह्या अकरा संकर जाति शूद्र जाणाव्या. ह्मणून माहिष्येण करण्यांतु रथकारःप्रजायते ॥ असत्संतस्तुविज्ञेया प्रतिलोमानुलोमजाः ॥ जात्युत्कर्षा० या याज्ञवल्क्यवाक्यांतिल प्रतिलोमानुलोमसंबंधीं असत्त्व, सत्त्व आणि जात्युत्कर्षत्व शूद्रधर्मव्याप्यवृत्ति ( अनुलोमसच्छूद्र आणि प्रतिलोमअसच्छूद्र ) अशा अर्थाचे आहेत. ह्मणूनच बृहज्जाति

विवेकांत ( **नैवोपनयनं तस्य शूद्र धर्मात्०** ) असें म्हटलें आहे आणि हें अनुभूत असल्यामुळें पूर्वोक्त आपस्तंबसूत्राला मीमांसा वाक्य आणि याज्ञवल्क्यस्मृतिवाक्य बाधक नाहीं.

शंका—( **निषादस्थपतिं याजयेत्** ) या श्रुतिवाक्यबलानें जसें स्त्रीरूपब्राह्मणोद्वाही संकरनिषादस्वामीस अग्निहोत्र यज्ञकर्मकरणक्षमत्व प्राप्त झालें आहे. तसेंच ( **वर्षासु० ऋभू०** ) या श्रुतिबलानें संकीर्णसंकररथकारासही त्रैवर्णिकत्व प्राप्त कां झालें नसावें ?

**उत्तर**—स्त्रीरूप निषादाप्रमाणें संकीर्णसंकररथकारासही जर त्रैवर्णिकत्व प्राप्ति झाली असते अथवा होण्यास योग्य असता आणि जर ( **वर्षा० ऋभूणां०** ) ह्या श्रुति त्याच्या ( संकीर्णसंकरांच्या ) संबंधानें असता तर मूर्धाभिषिक्त आणि स्त्रीरूप ब्राह्मणोद्वाही निषादस्थपति यांस जसें शूद्रवर्गांतून काढून ब्रह्मक्षत्रियवर्गांत त्यांचा उल्लेख केला आहे. तसेंच या संकीर्णसंकर रथकाराचा ही ब्रह्मादिवर्गांत उल्लेख केला असता ज्या पेक्षां ( **रथकारस्तु माहिष्यात्करण्यां यस्यसंभवः** ) असा शूद्रवर्गांतच उल्लेख केला आहे त्यापेक्षां निषादस्थपतीप्रमाणें संकीर्णसंकररथकारास त्रैवर्णिकत्व नाहीं आणि ( **वर्षा० ऋभूणां०** ) या श्रुतीही त्याच्यासंबंधीं बिलकूल नव्हेत.

शंका—( **वर्षा० ऋभु०** ) या आधानाचा अधिकारी रथकार जर कुलीन त्रैवर्णिकच ( ब्राह्मणच ) आहे तर हिरण्यकेशिसूत्रप्रकाश वैजयंती ग्रंथांत ( **त्रैवर्णिक व्यतिरिक्तयोरप्याह** ) असें म्हणून पुढें ( **निषादरथकारयोराधानादग्निहोत्रं दर्शपूर्णमासौचानियम्येते** ) या हिरण्यकेशी सूत्रांत निषाद आणि कुलीनब्राह्मण रथकार हे दोघे साहचर्यानें ( एकत्र स्थितिरूपानें ) कां सांगितले ?

**उत्तर**—हिरण्यकेशीसूत्रांत निषादकारांचें साहचर्यास वैजयंतीकारानें दाखविलेला त्रैवर्णिकव्यतिरिक्तत्वाचा उल्लेख, संकरजातींच्या उद्देशानें बिलकूल नाहीं. त्रैवर्णिकांच्याच विशेष धर्मानें आहे; असें त्याच हिरण्यकेशीसूत्रावरून आणि वैजयंती व्याख्येवरून स्पष्ट समजेल. रुच्यपत्यब्राह्मणोद्वाहजनिषाद हा व्यास ऋष्यश्रृंगासारिखा तपोबीजप्रभावानें झालेला बीज्यसंज्ञकब्राह्मण योनिसंभव कर्शितत्वानें त्रैवर्णिकव्यतिरिक्त आहे. आणि रथकारही सवर्णविवाहित ब्रह्मर्षिकुलोत्पन्न ब्राह्मण महाकुल असूनही त्यानें रथादिशिल्पकर्मसंबंधीं विकृतेष्टि ( आधानविशेषयज्ञ ) धर्म स्वीकारल्यामुळें कालांतरानें अवकीर्णीवत् झालेला स्ववृत्तीच्या कर्शितत्वानें त्रैवर्णिक व्यतिरिक्त आहे. एवंच त्रैवर्णिकास योनिकर्शितत्वानें आणि वृत्तिकर्शितत्वानें प्राप्त झालेले त्रैवर्णिकव्यतिरिक्तत्व, सामान्य प्रकृत त्रैवर्णिकापेक्षां त्रैवर्णिक विशेषधर्मधारीबोधक असल्यामुळें सूत्रोक्त निषादाचे आणि रथकाराचे ठायीं, वै० व्याख्याकारानें दर्शविलेल्या व्यतिरिक्तत्वावर, साकल्येंकरून आदित्रैवर्णिकत्वाची सधर्मव्याप्ती आहे. तसेंच विशेषविधाननिरूपणप्रकरणास्तव, जरी एकाच सूत्रांमध्यें संकर निषाद आणि कुलीन रथकार एकत्र सांगितलें तरी निषादाचे आणि रथकाराचे कुल व धर्म सारखेच आहेत, असें कोणी समजूं नये. पहा **राजबीजी राजवंशी बीज्यस्तु कुलसंभवः । महा-**

**कुलकुलीनार्य०** ) या श्लोकांतील प्रथम अर्धांत सामान्य ब्राह्मणांचीं नांवें सांगून दुसरें अर्धांत कुलीन आर्य ब्राह्मणांचीं नांवें सांगितलीं असल्यामुळें, जसें राजबीज्यादिकांपेक्षां महाकुलादिक श्रेष्ठ समजले जातात, तसेंच स्वयोनिकर्शित संकरनिषादा पेक्षां स्ववृत्तिकर्शित महाकुल रथकारसत्कुलत्वानें समर्थ आहे. म्हणून न पूर्वोक्त ( **निषादरथकारयो०**) हा हिरण्यकेशिसूत्रोक्त रथकार संकर नाहीं. कुलीन ब्राह्मण आहे असें त्याच सूत्रावरून आणि त्याच्या व्याख्येवरून पहा—

> **हिरण्यकेशि सूत्र—निषादरथकारयोराधानादग्निहोत्रंदर्शपूर्णमासौ चनियंम्येते ॥ वैजयंतीव्याख्यायां--वर्षासुरथकारोग्नीनादधीतेतितथाऋभूणांत्वा देवानां व्रतपते व्रतेनादधामीति रथकारस्येतिचदर्शनादाधानं रथकारजातेः । आधानोत्पन्नाग्नीनां परार्थत्वादग्निहोत्रदर्शपूर्णमासौनियमस्तथाचैतया निषादस्थपतिंयाजयेदिति ॥ निषादश्चासौस्थपतिश्चेतिकर्मधारयाभिप्रायेण निषाद इत्युक्तं तेन आपस्तंबसूत्रे निषादानांस्थपतिस्त्रैवर्णिक एवेतितन्निराकृतमेतन्न्यायशास्त्रसिद्धं । तस्येष्टिविधानादाधानमाचार्यो मन्यते । एकस्याधानमात्रं नियतं । परस्यविकृतेष्ट्युपक्षिप्तमाधानं । द्वयोरप्यग्निहोत्रंदर्शपूर्णमासौचनियम्येते । न्यायमतेन निषादस्याधानं-तस्यलौकिकाग्निषु ॥ विकृतेष्टिमात्रमवकीर्णिनोब्रह्मचारिणइवगर्दभस्येति ॥**

अर्थ—( **वर्षा० ऋभु०** ) या श्रुतीवरून, रथकारसंज्ञकब्राह्मण जातिविशेषसमुदायाचें आधान आहे. आधानापासून उत्पन्न झालेल्या अग्नीस परार्थत्व (वाजपेयादि पुढील यज्ञकर्महेतुत्व ) असल्यामुळें नित्य अग्निहोत्र आणि दर्शपूर्णमासांत इष्टि त्रैवर्णिक ( ब्राह्मणजातीय ) रथकारास नित्य आहे. तसेंच आणखी ( **निषादस्थपतिं याजयेत्** ) या श्रुतीवरून तत्पुरुषसमासानें निषादांतून सातव्या पिढीस ब्राह्मणत्व पावलेला निषादांचा स्थपति ( स्वामी ) जो प्राप्तत्रैवर्णिक निषाद त्याजकडून यज्ञ करवावा; अशी आपस्तंबसूत्रोक्ति सत्यार्थक जाणावी " नूतन न्यायशास्त्री ( **निषाद एवस्थपतिः** ) असा कर्मधारयसमास करून अविशेषात् शूद्रधर्मी निषादांनींही वेदाध्ययन पूर्वक यज्ञकरावा म्हणतात. यावरून आपस्तंवसूत्राचें खंडण होतें असें कोणीं समजूंनये; कारण नैय्यायिक कर्मधारय समासाभिप्रायानें निषाद हाच स्थपति मानून जर त्यास अविशेषेकरून शूद्र समजूनही श्रुति लागू करतील, तर ( **निषादस्थपतिं याजयेत्** ) या श्रुतींतील स्थपति, या श्रौतपदास आणि ( **शूद्रायां ब्राह्मणाज्जातःश्रेयसाचेत्प्रजायेत** ) या मनूक्तीस वैय्यर्थ्य येतें; एवढेंच नव्हे; तर शूद्रनिषादास यज्ञाद्यधिकार मानण्यांत ( **स्त्रीशूद्रौनाधियातां** ) या प्रत्यक्ष श्रुतीचा अनादर होऊन सर्व शूद्रांनाही तत्प्रसक्ती होत असल्या मुळें गौरव आहे. आणि निर्विकल्प आधान शक्यर्थक त्रैवर्णिकत्व बोधक तत्पुरुषसमासानें भासणारी लक्षणा गौरव दोषास कारण न होतां सप्रमाण स्त्रीरूप ब्राह्मणोद्वाहज त्रैवर्णिक निषाद समजण्यांत श्रु-

तिस्मृतीचा अविरोध आणि लौकिकनिरपवाद असल्यामुळें लाघव आहे. त्यांतही श्रुतिवाक्य विचाराविषयीं ( **पूर्वं पूर्वं बलीयःस्यात्** ) या परिभाषेवरून कल्पारंभींचा फार प्राचीन आपस्तंबऋषि नूतन नैय्यायिकांच्या पूर्वींचा असून त्याचा लाघव ज्ञापक तत्पुरुष समास पूर्वींच झालेला असल्यामुळें फल मुख्य झालें आहे. आणि सूत्रोक्ति बलिष्ठ असून त्या सूत्रोक्त पूर्वभूतफलाचा प्रतिबंध करण्यास अनंतरोत्पन्न तर्कसमर्थ नाहींत. हें न्यायानेंच स्पष्ट असल्यामुळें नैय्यायिकांसही मान्य आहे. कारण त्यास इष्टि असल्यामुळें आचार्यही मान्य करितात. आतां निषाद आणि रथकार यांच्या कुल, आधान धर्म संबंधीं असलेला भेद दाखविणारी **वैजयंती व्याख्या—एकस्येति०** निषाद आणि रथकार या दोघापैकीं निषाद हा अनार्य असल्या मुळें यास फक्त नुसत्या आधानाचा मात्र अधिकार आहे दुसरा रथकार हा महाकुल ( आर्य ) असूनही त्याचें आधान त्याच्या विकृतेष्टीमुळें ( भृग्वंगिरस देवताक आपली स्वाभाविक प्रकृतेष्टि कृष्ट करून रथादिशिल्पकर्मसंबधीं ऋभुदेवताक विशेषकाम्येष्टीमुळें ) उपक्षिप्त ( सामान्यप्रकृत आधान करणाऱ्या त्रैवर्णिकाच्या आधानांतून पृथक् काढून त्यांच्या ( त्रैवर्णिकाधानांच्या ) समीपच विशेषरूपानें ठेविलेलें किंवा अलंकृत केलेलें ) आहे. या दोघांनाही अग्निहोत्र आणि दर्शपूर्णमासांत इष्टि नित्यत्वें आहे. परंतु निषादाचें आधान लौकिकाग्नीचे ठायीं ( वेदमंत्रावाचून सिद्ध केलेल्या तांत्रिक अग्नीचे ठायीं ) द्विजतःकारयितव्य आहे आणि रथकाराचे आधान विकृतेष्टिरूप ऋभु देवताक नित्य श्रौताग्नीचे ठायीं ( वेदमंत्रानें सिद्ध केलेल्या अग्नीचे ठायीं ) त्यानें स्वतः करावयाचें आहे. विकृतेष्टिरूप ऋभुदेवताक आधानकर्ता त्रैवर्णिक रथकार हा जरी महाकुल ब्राम्हण आहे तरी पूर्वगृहीत सामान्येष्टीचा उपकर्षकारक विकृतेष्टीच्या विशेष धर्मधारणेमुळें शिल्पोपाधीनें, स्वकीय षट्कर्मरूप मुख्य ब्रम्हकर्म व्रत नियमाचा शनैः शनैः भंग पावण्यास योग्य आहे म्हणून ऋभ्वाधानाधिकारी आर्यकुलोत्पन्न रथकार हा अवकीर्णी ब्रम्हचारी प्रमाणें ( ब्रम्हचर्यव्रतभंगकर्त्या वैदिक ब्राम्हणाप्रमाणें ) प्रायश्चित्तस्वरूप गर्दभेष्टि करीपर्यंत त्याच्यांशीं ब्राम्हणांनीं व्यवहार करूं नये. अर्थात् ऋभ्वाधानाधिकारी रथकारास जर अवकीर्णी संज्ञा आहे तर तो ब्राम्हण आहे कारण **गर्दभेनावकीर्णी निर्ऋतिं पाकयज्ञेन यजेत्** ।। या आपस्तंब धर्मसूत्रावरून आणि ( **कामतोरेतसः सेकं व्रतस्थस्य द्विजन्मनः । अतिक्रम व्रतस्याहु धर्मज्ञाब्रह्मवादिनः ।। मारुतं पुरुहूतंच गुरुंपावकमेवच ।। चतुरोव्रतिनोऽभ्येति ब्राह्मंतेजोऽवकीर्णिनः ।। १ ।। ते भ्योलब्धेन भैक्षेण वर्तयन्नेककालिकं ।। उपस्पृशं स्त्रिषवणं त्वद्धेन सविशुध्यति ।।** अर्थ—वेदाध्ययन करणारा ब्रम्हचारी ब्राम्हण जर स्त्रीच्या इच्छेनें रेतःस्राव करील तर तो अवकीर्णी होतो. वेदाध्ययनापासून प्राप्त झालेले त्याचें ब्राम्हतेज, मरुत्, इंद्र, ब्रृहस्पति आणि अग्नि हरण करितात ह्मणून तो दोषी अवकीर्णी ब्राह्मण रात्रौ चतुष्पथावर गर्दभेष्टीनें निर्ऋभियजन करून मरुत् आदि चार ४ देवतांस घृताहुति देऊन अद्ब भैक्ष्यप्रायश्चित्तानें शुद्ध होतो यावरून अवकीर्णीप्रमाणें असलेल्या रथकार शद्रा-

चेठायीं जसी ब्राह्मण शद्वाची शक्ती सापेक्षता आहे. तशी निषाद शद्वाचेठायीं ब्राह्मण शद्वाची शक्ती नाहीं. कारण अवकीर्णीवत् रथकार जसा प्रायश्चित्तानें शुद्ध होतो तसा निषाद शुद्ध होण्यास मुळीं प्रायश्चित्तच नाहीं. निषाद हा कुलानें हीन परंतु वृत्ति ( द्विजातिशुश्रूषा ) प्रशस्त असल्यामुळें अनार्यातून निवून आर्यांत शिरल्याप्रमाणें दिसतो परंतु त्याचा आर्यांशीं अन्नोदकादि व्यवहार नसल्यामुळें आर्य झाला नाहीं आणि त्रैवर्णिक रथकार हा महाकुल आर्य असल्यामुळें कुलानें श्रेष्ठ, परंतु कालांतरानें तपोऽनुष्ठानाला मंदत्व आणणाऱ्या राजस शिल्पवृत्तीनें अप्रशस्तशील होण्याचा संभव असल्यामुळें आर्यांतून निघून अनार्यांत शिरल्या प्रमाणें दिसतो परंतु त्याचा अनार्यांशीं अन्नोदकादि व्यवहार नसल्यामुळें अनार्य झाला नाहीं ह्मणून कूलहीन संकीर्ण निषाद आणि महाकुल रथकार यांचें साहचर्य जरी हिर०सूत्रकारानें केलें आहे, तरी निषादाप्रमाणें रथकार संकर नाहीं. रथकार महाकुल ब्राह्मण आहे.

**शंका**—वरील वैजयंती व्याख्येंत रथकार हा मूळचा ब्राम्हण आहे असा सामान्य बोध होत असून रथकार हा महाकुलांत उत्पन्न झालेला ब्राम्हण आहे असें जें दर्शविलें यास प्रमाण काय ?

**उत्तर**—ब्राम्हणजातीचे साकल्यतः मुख्य तीन भेद केलें आहेत. विश्वामित्रादि राजर्षिगोत्रोत्पन्न जे ब्राम्हण ते राजबीजी, राजवंशी या नावांनीं प्रसिद्ध आहेत. दुसरे ऋष्यशृंगादि तिर्यग्योनिज ऋषिगोत्रोत्पन्न जे ब्राम्हण ते बीज्य आणि कुलसंभव या नामांनीं प्रसिद्ध आहेत. तिसरा—त्वष्टा भृग्वंगिरादि ब्रह्मर्षिगोत्रोद्भव जे ब्राम्हण ते महाकुल, कुलीन, आर्य अशा नामांनीं प्रसिद्ध आहेत; पैकीं महाकुल जो त्वष्टा विश्वकर्मा त्याच्या कुळांत रथकार उत्पन्न झाले असल्यामुळें रथकार महाकुल आहेत; कारण देवशिल्पी त्वष्टा प्रजापति ब्रह्मर्षि असल्यामुळें त्या त्वष्टयासच महाकुल असें प्रत्यक्ष श्रुतीनें ह्मटलें आहे ती श्रुति ऋग्वेद **अष्टक २। २। २४। १ ननिंदिमचमसंयो महाकुलोऽग्ने भ्रातर्द्रुणऽइद्भूतिमूदिम ॥ १ ॥** या श्रुतीतील ' **महाकुल**, , हें पद देवशिल्पी जो त्वष्टा विशकर्मा त्याचें विशेषण आहे; पूर्वार्ध पृष्ट५९ पंक्ति १३ मध्यें पहा. आणि त्वष्टाविश्वकर्मा हा रथकार आहे याविषयीं श्रुत्यादि प्रमाणें उत्तरार्ध पृष्ठ ८४ मध्यें पहा.

एवंच महाकुलरथकार संकीर्णनिषादाच्या साहचर्यानें हि० सू० नें सांगितल्यामुळें दोघानांही अग्निहोत्रादि यागाधिकार सारखा आहे असा वाचकास भास होईल तर होऊं नये, कारण निषादाचें आधान अमंत्रक लौकिकाग्निगुणक आहे आणि रथकाराचें आधान समंत्रक श्रौताग्निगुणक आहे. आतां शिल्पोपजीवी रथकार ब्राम्हण " **अवकीर्णिनो ब्रम्हचारिण इव** ,, असें म्हटलें असल्यामुळें त्रैवर्णिकरथकार साक्षात

---

१ द्विजातिशुश्रूषा धनधान्याध्यक्षता राजसेवांतःपुररक्षाच पारशवोग्रकरणानाम् । मन्वर्थमुक्तावलिः । यावरून पारशव संज्ञक निषादाची ब्राह्मण शुश्रुषा वृत्ति ( गुरुशुश्रूषयाविद्या ) ह्मणुन प्रशस्त, याज्ञिकांच्या मूर्धाभिषिक्तादिकांच्या वृत्ति अविद्यारूप आहेत. याहून अन्य मत्स्यघातजीवीनिषाद ' शूद्रान्निषादोमत्स्यघ्नःक्षत्रियायां व्यतिक्रमत् या हारीतोक्तीवरून जो प्रातिलोम, तो हा नव्हे.

अवकीर्णीच आहे असा कांहीं सूत्रकाराचा आणि व्याख्याकाराचा अभिप्राय नाहीं कारण अवकीर्णी ( प्रायश्चित्तीविशेष) या शद्बाचा संबंध व्यक्तिवाचक शद्बावर आहे. महाकुल त्वष्टृब्रह्मकुलोत्पन्न रथकारब्राम्हण या जातिवाचक शद्बावर नाहीं. कारण ब्राम्हण, प्राणायामादि ब्रम्हकर्माचरणानें नित्य प्रायश्चित्तांतच आहेत. अतएव ( **तेषां तेजोविशेषात्प्रत्यवायोनदृश्यते** ) या आपस्तंबधर्मसूत्रावरून ब्राम्हणजाति ही सर्वांमध्यें विशेष तेजस्वी असल्यामुळें उपजीविकादियोग्यकारणपरत्वें एकादा विशेष धर्म जरी त्यांनीं स्वीकारिला, तरी त्यांच्या तेजस्वीपणानें आणि समुदायशक्तीनें त्यांचेठायीं प्रत्यवाय दिसत नाहीं. म्हणूनच मनु म्हणतो—**श्मशानेष्वपितेजस्वीपावकोनैवदुष्यति ॥ हूयमानश्चयज्ञेषु भूयएवाभिवर्धते ॥ एवंयद्यप्यनिष्टेषु वर्तते सर्वकर्मसु ॥ सर्वथा ब्राह्मणाः पूज्याः परमं दैवतं हि तत् ॥ म० अ० ९ अर्थ**— जसा अग्नि सर्वभक्षक असून पवित्र आहे तसे ब्राम्हण हे उपजीविकेसाठीं जरी अनेक निषिद्धकर्में करितात तरी ते सर्वप्रकारें पूज्य आहेत कारण ब्राम्हण हें मोठें दैवत आहे. यावरून अनिष्टहीनकर्मकर्त्या ब्राम्हणासही जर ब्राम्हण्यदूषक प्रत्यवाय नाहीं तर देवब्राम्हणादि सृष्टीच्या उपयोगार्थक काशीविश्वेश्वरवरप्रसादलब्ध मूलपुरुष महाकुल विश्वकर्मपरंपराप्राप्त असें ईश्वरदत्त धर्मस्वरूप पवित्र शिल्पकर्म करणारे रथकार ब्राम्हण समुदायाचेठायीं अवकीर्णीप्रमाणें प्रत्यवाय नाहीं असें उघड आहे. आतां रथकाराचें आधान ब्राम्हणविशेषत्वबोधक आहे आणि त्याना दृष्टफलगुणक आधानामुळेंच त्रै० व्यक्तिरिक्तत्व आहे याविषयीं पुढील त्याच हिरण्यकेशिसूत्रावरून स्पष्ट आहे.

हिरण्यकेशीसूत्र—( **तत्कारितत्वाद्ब्राम्हणराजन्ययोर्वैश्यस्यचवेदाध्ययनंतान्नियतम् ॥** ) वै० व्याख्यांश—**उपनयनं वसंतादिकालेषुत्रैवर्णिकानामेव ॥ अतस्तैर्विनाभूतमध्ययनमपितेषामेवेति । एवंवर्णत्रयस्याधानंनियतमित्युक्तं । तेनप्रसंगेन मोक्षाद्विना फलार्थिनामपि त्रैवर्णिकानामपि नसर्वकर्मानुष्ठानमितिदर्शयितुमधिकारिनियममाह ॥ भावार्थ**—अध्यापकांनीं ब्राम्हण क्षत्रियवैश्य हे वसंतादि कालाचेठायीं अध्ययनार्थ संस्कार केलेले असल्यामुळें त्या तिन्हींवर्णासच अध्ययन आहे, तसेंच नित्यत्वें आधानही ब्राम्हणादित्रयासच आहे त्यायोगानें मोक्षादि अदृष्टफलावांचून दृष्टफलार्थी त्रैवर्णिकांसही सर्वकर्मानुष्ठानाचा अधिकार पोंचत नाहीं, हें दर्शविण्याकरितां पुढील सूत्र—( **तेषामेवब्राह्मणविहितायज्ञायेषुयज्ञकात्स्न्यमविप्रतिषिद्धं** ॥ या सूत्राची व्याख्या मीमांसारूप विस्तीर्ण आहे म्हणून मुख्य वेंचे घेऊन भावार्थ लिहितो—“ **येषु त्रैवर्णिकेषु यस्य सांगस्य कात्स्न्येंविद्वत्तार्थवत्तासवर्णस्त्रीपरिग्रहऋत्विगादिसंपत्तिः बाह्या समग्रा ॥ तेषामेव यज्ञानतुपरमुखेन पृष्टवापि कर्तारो भवंति ॥ + + एवकारः फलकामिनामपि शूद्राणां अग्न्याधानादि प्रापकलिंग निरासार्थः ॥ ब्राह्मणेनेति स्मार्तधर्माणां शूद्रेऽपि प्राप्तिनिवारणार्थं ॥ ब्राह्मणेन विहिताः श्रौता एतदेव स्फुटयितुं यज्ञा इत्युक्तं यज्ञ शद्बेन श्रौतत्वेनोपलक्षिता आधानादयः । अयमर्थः श्रूयते वसंते ब्राम्हणोऽग्नीनादधीत ग्रीष्मेराजन्यः शरदि वैश्य इति तेनाधानाऽभावादनग्निः शूद्रः**

**सोऽग्निसाध्ये कर्माणि कथं प्रवर्तिष्यते । आत्मार्थंचाधीयंतेऽग्नयो न परार्थो आत्मनेपदंह्यत्रभवत्यादधीतेति । तेन ब्राह्मणादयएवाधानेग्निमुत्पादयितुं समर्थाः। आधानाभावाच्छूद्रस्यानधिकारः । यानि पुनर्दर्शनान्युक्तानितानि रथकारविषयाणि रथकारस्यही शूद्रसंबंधात् शूद्रत्वमुच्यते करण्यांहिसजातः करिणी शूद्रीदुहितेति तथानिषादविषयाण्यपि तस्यापि शूद्रत्वात् ॥ अतएव ब्राह्मणराजन्यवैश्यानामेवाध्ययनं श्रूयते–वसंते ब्राह्मणमित्यादि ॥**

**भावार्थ**–सवर्णविवाहितस्त्रीसंभूत जे ब्राह्मणादिवर्णत्रय त्यांसच वेदाध्ययन श्रौताधानादि ब्रह्मकर्माधिकार आहे. सूत्रांतील [ एव ] हें पद शूद्रधर्मी निषादादिकांस अग्न्याधानोपदेशक स्मृत्यादि प्रमाणांच्या खंडणार्थ आहे. ( यावरून संकीर्णसंकरजातीय शूद्रधर्मी रथकारास अग्न्याधानाद्याधिकारप्रतिपादन करणारे स्मृतिकारादिकही निरस्त होतात. ) तसेंच सूत्रांतील '**ब्राह्मणविहिताः**' या पदावरून श्रौतत्वोपलक्षणभूत स्मार्तधर्म असल्यामुळें स्मार्ताग्न्याधान धर्माचाही अधिकार शूद्रास अगदीं प्राप्त होत नाहीं. हें पुढील श्रुतीवरून स्पष्ट आहे. वसंत ऋतूचे ठायीं ब्राह्मणानें, ग्रीष्मऋतूचे ठायीं क्षत्रियानें, शरदृतूचे ठायीं वैश्यानें अग्नीप्रत आधान करावें, त्यायोगानें ज्यास आधानच नाहीं तो शूद्र अग्निसाध्य कर्माचे ठायीं प्रवृत्त होत नाहीं. जसें वेदाध्ययन आपल्याकरितांच असते तसे अग्नीही आपल्याकरितांच आहित करावे लागतात म्हणून ज्याचें अग्न्याधानकर्मास '**आदधीत**' असें आत्मकर्तृक आत्मनेपदी क्रियापद असेल ते श्रुत्युक्त आधानाधिकारी त्रैवर्णिकच जाणावें. ( यावरून **वर्षासुरथकारोऽग्नीनादधीत** या श्रुतींतील आदधीत या आत्मनेपदी क्रियेवरून हा श्रुत्युक्त रथकार ब्राम्हणादि वर्णत्रयांतर्भूतच निश्चयेंकरून आहे. ) एवंच ब्राम्हणादि तीन वर्ण श्रौतस्मार्ताधानानें अग्नि उत्पन्न करण्यास समर्थ आहेत. ( यावरून '**निषादस्थपतिं याजयेत्**' या श्रुतींतील ( **याजयेत्** ) हें क्रियापद परस्मैपदी असल्यामुळें हा निषादस्वामी सुद्धां त्रैवर्णिक बहिर्भूतच जाणावा. ) तस्मात् त्रैवर्णिकाहून अन्यास ( शूद्रास ) आधानाचा अभाव असल्यामुळें शूद्र अनाधिकारी होय. संकीर्णसंकररथकार आणि निषादजाति वगैरे शूद्रसंबंधीं असल्यामुळें शूद्रच ते आहेत म्हणून पूर्वोक्त ( **वर्षासु० ऋभूणां० इत्यादि विशेषाधानश्रुति** ) त्रैवर्णिकाचीच जाणावी. असा सूत्राचा अभिप्राय आहे. आतां ऋभ्वाधानाधिकारी रथकार ब्राम्हण आहे कारण त्यास ब्राम्हणत्वबोधक ऋषि मंत्र लिंगें आहेत या विषयीं पुढील सूत्रें पहा—

**येषांच प्रकृति लिंगानियज्ञाः श्रूयंते त्रीन् वृणीते यथर्षिमंत्रकृतोवृणीतइति विज्ञायते । वै. व्याख्यायां-ब्राह्मणोविज्ञायते इतिदार्ढ्यार्थं प्रकृतिर्जातिःतस्य-निर्णायकानि लिंगानियज्ञायज्ञसाधनानि । नहिप्रवरमन्येषामस्ति ब्राह्मणादित्रयव्यतिरिक्तानां तत्र पुरोहितादि प्रवरेण राजन्यवैश्ययोर्ब्राम्हणस्यस्वतः प्रवरं स्पष्टं । त्रयाणां लिंगान्याह गायत्र्याब्राम्हणस्यपरिदध्यात्त्रिष्टुभा-राजन्यस्य जगत्या वैश्यस्येति । इति शद्धः प्रकारे एवं प्रकाराण्यन्या-**

न्यपि वेदितव्यानीत्यर्थः ॥ एवमाग्निकारं संभाव्येदानीकर्मसु नियतान्याह ॥ तेषामग्निहोत्रं दर्शपूर्णमासौचानियतौ ॥

**भावार्थ**—समंत्रक श्रौताग्न्याधानाचा अधिकार त्रैवर्णिकांसच आहे हें त्यांच्या ऋषि मंत्रादि लिंगावरून स्पष्ट आहे अमुक आधान त्रैवर्णिकाचेंच आहे असें ज्ञान होण्यास साधन प्रवर ( ऋषि ) मंत्र आणि छंद इत्यादि लिंगेआहेत. कारण त्रैवर्णिकाहून अन्य जातीस प्रवर आर्षेय गोत्रें नाहींत. ज्याचे स्वतःचेप्रवर आहेत तो ब्राह्मण जाणावा. जे पुरोहितांच्या प्रवरानें व्यवहार करितात ते क्षत्रियवैश्य जाणावे. याप्रमाणें ऋषिलिंगें आहेत. तसेंच मंत्रलिंगाविषयीं सूत्र—गायत्रेति० ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य याना अनुक्रमें गायत्री, त्रिष्टुप्, आणि जगती या छंदाच्या मंत्रांनीं आधानादि करण्यास अधिकार आहे. इत्यादि आणखीही लिंगें आहेत. ( **तेषामग्निहोत्रं दर्शपूर्णमासौचनियतौ** ) त्रैवर्णिकांना अग्निहोत्र दर्शपूर्णमासेष्टि नियत आहे. नियम्यते ही क्रिया ( **सोमेज्याब्राह्मणस्यानियम्यते** ) या सूत्रावरून त्रैवर्णिकांचीच जाणावी (**आधानदाग्निहोत्रंदर्शपूर्णमासौचानियतौ** ) या सूत्रानें आणि ( **अभ्यासान्नियतत्समुच्येत तथासाभ्यासा आराब्धाश्चेन्नत्याज्या इति** ) या व्याख्येवरून ज्याच्या विशेष विधानास्तव '**नियम्यते**' अशी क्रिया आहे, त्यासच अभ्यासार्थक अग्निहोत्र दर्शपूर्णमासाचेंही नियतत्व आहेच. आणि (**काम्यारंभे सत्यसत्यांकामनायामत्यागार्थमिदं भविष्यति** ) या व्याख्योक्तीवरून काम्यारंभाची, कामना पूर्ण झाली तरी त्याग करूं नये. असो पूर्वोक्त त्रैवर्णिक लिंगबोधक सूत्रावरून स्पष्ट आहे कीं, रथकारास ब्राह्मणत्वबोधक **जर** आर्षेय गोत्र आणि मंत्रलिंगादि आहे. आणि निषादास आर्षेयप्रवरगोत्रमंत्रलिंगादि नाहीं तर ( **निषादरथकारयो०** ) या सूत्रांतील साहचर्य ( **कपिज्ञात्योर्ढक्** ) या पाणिनिसूत्रांतील कपि [ वानर ] आणि ज्ञाति [ मनुष्य ] यांचें साहचर्य जसें एका ढक् प्रत्यया पुरतेंच आहे **दुसरा** कांहीं संबंध नाहीं, तसेंच एका विशेष विधानापुरतेंच आहे, दुसरा कांहींच बिलकूल संबंध नाहीं, हें स्पष्ट आहे.

पूर्वोक्त सूत्रांत ज्याचें समंत्र ऋष्याधान आहे तो त्रैवर्णिक निश्चयानें समजावा अर्थात् ज्यास मंत्र नाहीं ऋषि नाहीं असे अनृष्याधानाचे निषादादिक संकर समजावेत. असें त्याच हिरण्यकेशी सूत्रावरून स्पष्ट पहा—**सूत्र आधान प्रश्न ३ पटल ४ भृगूणांत्वादेवानांव्रतपतेव्रतेनादधामितिभार्गवस्य यथार्ष्याधानं भार्गवगोत्रस्य यजमानस्य ॥ अंगिरसा० त्यांगिरसस्य । गतं ॥ आदित्यानां त्वा० दधामीत्यन्यासां ब्राह्मणीनां प्रजानां ॥ भार्गवांगिरसरिक्तानां ब्राम्हणानां ॥ वरुणस्यत्वारा० मीति राज्ञः । स्पष्टं ॥ इंद्रस्यत्वे० मीति राजन्यस्य ॥ क्षत्रियजातिमात्रो राजन्यो राज्ञो जातौ यदिति प्रत्ययः ॥ पूर्वस्तुराज्याधिपतेरभिषिक्तस्येत्यर्थः ॥ मनोस्त्वाग्रा० मीति वैश्यस्य ॥ ऋभूणांत्वा देवानां व्रतपते व्रतेनादधामीति रथकारस्य । त एते मंत्रा यथर्ष्या**

**धानानीत्याभिधीयंते ॥ निषादस्यानर्ष्याधानं अन्यैरेवमंत्रैरवशिष्टैरिज्ञेयंगोत्राभावादनुपदेशाच्चमंत्रस्य ॥**

अर्थ--भृग्वंगिरस ब्राम्हणांनीं भृग्वंगिरस आधान करावें इतर गोत्री ब्राम्हणांस आदित्यदेवताक आधान, अभिषिक्त क्षत्रियास वरुण देवता, इतर क्षत्रियास इंद्रदेवता वैश्यास ग्रामनिर्वाहक मनुदेवता आणि या तिन्हीवर्णांतून ज्या कांहीं त्रैवर्णिकांस रथादि शिल्पकर्मकर्तव्य आहे त्यानें ऋभुदेवताक आधान करावें. यांत ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य यानंतर रथकार सांगितल्यामुळें हा संकररथकार कां नसावा ? असा संशय येण्याचा संभव येतो, ह्मणून ही शंका निःशेष दूर होण्याकरितां सूत्रकार सांगतो---**तएतइति०**---ब्राम्हण क्षत्रिय वैश्य आणि त्रैवर्णिक रथकार यास आर्षेय सप्रवर गोत्रें ( ब्राम्हणांस भृग्वंगिरस काश्यपादि अनेक आर्षेय गोत्रें क्षत्रियास पौरूरव गोत्र आणि वैश्यास भालंदल गोत्र किंवा पुरोहित गोत्रें. त्रैवर्णिक रथकारास त्वष्टा, अथर्वा, आंगिरस, सुधन्वा आभव, सानग, सनातन, वामदेवादि अनेक सप्रवर आर्षेय गोत्रें असल्यामुळें आणि त्यांच्या आधानांचे मंत्र विधानासह वेदोक्त असल्यामुळें भृग्वादि रथकारांत केलेल्यासह्रसमुच्चयरूप वर्णत्रयाच्या मंत्रांस यथर्ष्याधानें असें म्हणयात आतां सर्व संकरजातीवर शूद्रत्वाची व्याप्ति असल्यामुळें कोणत्याही संकरजातीचा वरील ७ समुच्चयरूप वर्णत्रयाच्या ७ देवताक ( भृगु अं० आदित्य,वरुण, इंद्र, मनु, ऋभु या ७ देवतांच्या) आधानांत समावेश होत नाहीं. अर्थात् निषादाविषयीं जी ( निषादचस्थपतिंयाजयेत् ) अशी श्रुति आहे तिचा अर्थ---निषाद स्थपतीप्रत यंजन करवावें इतकाच आहे म्हणून त्याचा समावेश पूर्वोक्त ७ देवताक आधानांत बिलकूल होत नाहीं. कारण वरील ७ आधानें फक्त त्रैवर्णिक असून यथार्षि मंत्रदेवताधानें आहेत. **निषादस्थपतिंयाजयेत्** । या श्रुतीनें सांगितलेलें निषादाचें आधान अनार्षेय अमंत्रक आहे कारण निषादास गोत्रें नाहींत आणि वेदमंत्राचा उपदेश नाहीं. ह्मणून निषादाचें आधान पूर्वोक्त ७ देवताशिवाय अन्य यथोक्त देवतेच्या श्रुतीहून **अवशिष्ट** अशा मंत्रांनीं याजयेत् ह्मणजे सवर्णज त्रैवर्णिक अधिकाऱ्याकडून करवावें. स्वतः करण्यास अधिकार नाहीं. असें श्रुतींतील याजयेत् या प्रयोजकविध्यर्थी परस्मैपदी ( पराधीनकर्तृत्वबोधक ) क्रियापदावरून स्पष्ट आहे. " अर्थात् जर ब्रह्मबीजोत्पन्न संकरजातीयनिषादाचाही जेथें अगदीं समावेश होत नाहीं, तेथें **माहिष्येणकरण्यांतुरथकारः प्रजायते नैवोपनयनं तस्यशूद्रधर्माद्बहिष्कृतः** ॥ या उपनयनहीन संकीर्णसंकरशूद्रजातीय रथकाराचा समावेश अगदीं नाहीं हें निःशंक जाणावें, ह्मणून **ऋभूणांत्वा० वर्षासुरथकारोऽग्नीनादधीत** या श्रुति त्रैवर्णिकरथकारपर आहेत असें श्रुतींतील **आदधीत** क्रियापद आणि **भृगूणां० वसंते ब्राह्मणोऽग्नीनादधीत** या ब्राम्हणपर श्रुतींतील आदधीत क्रियापद एकच असल्यामळें स्पष्ट समजतें, कारण **आदधीत** ही क्रिया साक्षात्कर्तृत्वस्वयंकर्तृत्वबोधक आत्मनेपदी ( **स्वातंत्र्येण आत्मार्थक** ) विधिलिङ्प्रत्यययुक्त आहे ह्मणून वर्षर्तुविहित ऋभुदेवताक आधान त्रैवर्णिकरथकाराचें आहे. एवंच **ऋभूणां०** याश्रुतींतील **(रथकारस्य)** या पदाचा ( **संकीर्ण**

**जातीयस्य** ) असा अर्थ करणें हा माधवाचार्यांचा प्रमदितानुगत प्रमाद आहे. आणि जशी भाष्यकारास सूत्रप्रमाणाची अपेक्षा आहे तशी सूत्रकारास भाष्याची अपेक्षा नाहीं, म्हणून प्राचीनतर आपस्तंबसूत्रोक्त श्रुत्यर्थ अभ्रांत अबाध्य आहे. याप्रमाणें त्रैवर्णिक रथकाराविषयीं माधवीय भाष्यासंबंधीं आलेल्या शंकेचें समाधान मन्निमित्त मात्रकरून श्रीमद्देवणसिद्धेश्वरांनींच केलें. आतां **रथकारस्याधानें । नियतंच । ना भावादितिवात्स्यः ।** ) या कात्यायनसूत्रावर मीमांसारूप असलेल्या कर्कस्वामीनां-वांच्या भाष्यकारांस आलेल्या शंकेची समाधानोक्ति, स्वकीय वत्सवत्सलत्वास्तव बोल-विते श्रीमद्देवणसिद्धच समर्थ आहेत.

**शंका**---रथकारशद्बाची जसी ( **माहिष्येणकरण्यांतुरथकारःप्रजायते** ) या वाक्यावरून संकरजातीयरथकाराचेठायीं शक्ति आहे, तसी ब्राम्हणादित्रैवर्णिकाचे ठायीं रथकारशद्बाची शक्ति नाहीं. म्हणून रथकार असा संकरच घ्यावा !

**उत्तर**---अमुक शद्बाची शक्ति अमुक ठिकाणीं आहे असें ज्ञान होण्यास व्याकर-णादि आठ कारणें आहेत ती---**शक्तिग्रहंव्याकरणोपमान कोशाप्तवाक्याद्व्यवहार-तश्च । वाक्यस्यशेषाद्विवृतेर्वदंति सान्निध्यतःसिद्धपदस्यवृद्धाः ॥ अर्थ**---पदा-च्या अर्थाकरितां व्याकरण उपमान, कोश, आप्तवाक्य, व्यवहार, वाक्यशेष, विवरण आणि प्रसिद्ध पदाचे सान्निध्य अशा आठ कारणापासून शक्तिज्ञान होत असते. रथ-कारशद्बाची शक्ति ब्राम्हणवर्णाचेठायीं आहे, हें पूर्वोक्त आठ कारणांनीं सिद्ध आहे. प्रथम व्याकरणापासून होणारा शक्तिग्रह पहा “ **धातुप्रकृतिप्रत्ययादीनांशक्तिग्रहो व्याकरणाद्भवति** ” **सि० मु०** ,, धातु, मूळ शद्ब आणि प्रत्यय यांच्या व्याकर-णापासून शक्तिग्रह होतो. ) **कुर्वादिभ्योण्यः ( पा० सूत्र ४ । १ । १५१ )** हें गणसूत्र आहे ह्मणून गणपाठामध्यें **कुरु, गर्ग, मंगुष, अजमार, रथकार, वावदू-क, कवि, मति, कापिंजल इत्यादि** ४७ शद्बाच्या कुर्वादिगणांत हा रथकार शद्ब पठित असल्यामुळें रथकारशद्बाचेठायीं ब्राम्हणशद्बाची शक्तिसापेक्षता आहे कारण हा रथकारशद्ब पठित कुर्वादिगण ब्राम्हणजातिबोधकच ( आर्षेयगोत्रापत्याधिकारांती-लच ) असल्यामुळें तत्रोक्त होणाऱ्या [ **ण्य** ] या प्रत्ययावरून---**कौरव्याः** ( कुरु कुलांतील ब्राम्हण ) **गार्ग्याः** गर्गकुलोत्पन्नब्राम्हण ( **मंगुष्या** ) भृगुकुलोत्पन्नब्राम्हण **आजमार्याः** [ अजमारकुलोत्पन्नब्राम्हण **राथकार्याः** [ रथकारकुलोत्पन्नब्राम्हण ] या-चप्रमाणें **वावदूक्याः । मात्याः । काव्याः । कापिंजल्याः । [ ब्राम्हणाः ]** इत्या-दि नियमावरून त्याचप्रमाणें रथकार ह्मणजे ब्राम्हणजातिविशिष्टपुरुष आहे.

कोणी ह्मणतील कीं,पूर्वोक्त **कौरव्याः**इत्यादि शद्बावरून ब्राह्मणच कां समजावेत? तर हें सूत्र आर्षेयगोत्रापत्याधिकारांतील असल्यामुळें, भट्टोजीं दिक्षित आपल्या वृ-त्तींत स्पष्ट ह्मणतात **११७५ कुर्वादिभ्योण्यः ।४।१।१५१ अपत्ये कौरव्या ब्राह्म-णाः । वावदूक्याः** इत्यादि ह्मणजे कुरु, गर्ग, मंगू, अजमार, रथकार वावदूक श-ब्दांना ब्राह्मणजातिसूचकच ( **ण्य** ) प्रत्यय होतो इतरार्थीं ण्य प्रत्यय होत नाहीं. त-सेंच **रथकार शब्दानें** ब्राह्मणविशेषाचाच बोध होतो याविषयीं त्याच कौमुदींत आणखी

उदाहरण—सूत्र—**शिल्पिनिचाकृञः । ६ । २ । ७६ शिल्पिवाचिनि समासेऽण्णन्तेपरे पूर्वमाद्युदात्तं सचेदण्कृञः परोनभवति । तंतुवायः । शिल्पिनिकिं । कांडलावः। अकृञःकिम् । कुंभकारः । अर्थ**—शिल्पिवाचक समास असून पुढील पद अण् प्रत्ययांत असेल तर पूर्वपद आद्युदात्त होतें; जर तो अण् कृञ्धातूंपुढे न होईल तर उदाहरण—तुंतुवायः(सुतेराकोष्टी ) यांत शिल्पी असतां, असें कां म्हटलें ? तर कांडुलावः । ( पीक कापणारा ) या कृषिकर्मी नावास आद्युदात्त होत नाहीं. अकृञः असें कां म्हटलें ? तर ( कुंभकार )या शब्दांत उत्तर पद ( कार ) हें कृञ् धातूवरून अण् प्रत्ययांत असल्यामुळें आद्युदात्त होत नाहीं. तसेंच **संज्ञायांच ६ । २ । ७७ अण्णंते परे । तंतुवायो नाम कृमिः । अकृञ इत्येव । रथकारो नाम ब्राह्मणः ।** (सि० ३८११ ) **अर्थ**—पूर्वोक्त अण् प्रत्ययात शद्ब संज्ञावांचक असतांही शिल्पिवाची शद्ब आद्युदात्त होतात. उदाहरण-**तंतुवायः** ( एकप्रकारचा कोष्ठयाप्रमाणेंच तंतुरचना करणारा कृमिजातिविशेष) कृञ् धातू पुढें अण् नसेल तरच. कारण कृञ् धातूवरून अण असेल तर संज्ञार्थक शिल्पिवाचकशद्ब असूनही ते अंतोदात्तच होतात उदाहरण—**रथकारः** (वाजपेयचयनादि यज्ञसंबंधी देवसंबंधी कांहीं एक प्रकारचें रथादि पवित्रशिल्पकर्म करणारा रथकारसंज्ञक ब्राह्मणजातिविशिष्ट ) ब्राह्मणच जाणावा. नाम हें अव्ययप्राकारयार्थी आहे.

एवंच व्याकरणावरून रथकार शद्बाची ब्राह्मणवर्णाचेठायीं शक्ति आहे. आतां उपमानानें होणारा शक्तिग्रह सांगतो—उपमान ह्मणजे सारखेपणा. रथकर्मशिल्पोपलक्षण जसें) **अशूद्रकृतांत्रैवर्णिकेनैवकृतामग्निहोत्रस्थालीं** ) या वक्ष्यमाणश्रुतीवरून सर्वत्र अग्निहोत्री दीक्षितादिकब्राह्मण यज्ञपात्रादिमृच्छिल्प, काष्टशिल्पादि करणारे आहेत " पूर्वार्ध पृष्ट ४२ पंक्ति २७ पा० पृष्ठ ४३ पर्यंत पहा. तसें अथवा आयुधोपजीवन ब्राह्मणास निषिद्ध असूनही वाहीक ह्मणजे पंजाबदेशांत गोपालव आणि शालंकायन संज्ञेचे आयुधजीवी असून त्यांस जसें अन्यजाति न समजतां ब्राह्मणजातींतीलच एक विशेष भेदाचे ब्राह्मण, असें ह्मटलें आहे. तसेंच हल्लीं रथादिशिल्पोपजीवन जरी निषिद्ध मानतात, तरी वैदिक अग्न्याधानाधिकारी रथकारसंज्ञेचे शिल्पकर्मोपजीवी ब्राह्मणच आहेत. याप्रमाणें उपमान शक्तिज्ञान विस्तारभयामुळें संक्षिप्त सांगितलें. आतां रथकार ह्मणजे ब्राह्मण असा बोध होण्यास कोशवाक्यें आहेत तीं—**रथकारस्तक्षणिस्यान्माहिष्यात्करणीसुतेः ॥ इति विश्वमेदिनीहेमचंद्राः** अर्थ—रथकार ह्मणजे तक्षा नाम विश्वकर्मा. " **शिरः पशोस्तेदास्यंतिभागंयज्ञेषुमानवाः । एषतेऽ** " " **नुग्रहस्तक्षन्क्षिप्रंकुरुमप्रियं ॥ अर्थ**—इंद्र ह्मणतो, हे तक्षन् ( विश्वकर्मन् ) कृपा करून माझें प्रिय " कार्य लवकर कर. तुला यज्ञामध्यें ब्राह्मण यज्ञाचा मुख्यभाग देतील." या भारतोक्तीवरून विश्वकर्मा आणि " **शिवेमनुर्मयस्त्वष्टातक्षाशिल्पीचपंचमः** " या पाद्मोक्तीवरून व " **तक्षन्रथंसुवृतंविद्मनापसस्तक्षन्हरींइंद्रवाहावृषण्वसू ॥ तक्षन्पितृभ्यामृभवो० ऋ. अ. १ । ७ । २२** " या श्रुतीवरून विश्वकर्मसंततीय ऋभ्वाबा-

नाधिकारी पंचालब्राह्मण यांचेठायीं तक्षा हें नाम प्रसिद्ध आहे. ह्मणून **रथकारस्तक्षणिस्यात्०** या कोशवाक्यावरून रथकार ह्मणजे विश्वकर्मसंततीय ब्राम्हण. दुसरा अर्थ— रथकार असें माहिष्यापासून करणीच्याठायीं झालेल्या पुत्राचेंही नांव आहे, तसेंच रथकारांच्या '**स्थपति**' या पर्यायनामावरूनही '**सगीष्पतीष्टयास्थपतिः**' आणि विश्वकर्मकुलोत्पन्न ब्राह्मणांच्या श्रुत्युक्त महाकुलत्वसंबंधीं '**महाकुलकुलीनार्य**' इत्यादि कोशवाक्यांनीं रथकार शब्दाचेठायीं ब्राह्मणजातिविशेषाचा बोध करण्याची शक्ति आहे.

**शंका**—कोणी म्हणेल पूर्वोक्त कोशवाक्य द्व्यर्थबोधक असल्यामुळें विश्वकर्मकुलोत्पन्नब्राम्हणजाति आणि माहिष्यकरणीसुतसंकीर्णसंकरजाति या दोघांचेठायीं रथकार शब्दाची शक्ति आहे असें मानून ) वर्षासुरथकार आदधीत। ही श्रुति देहलीदीपन्यायानें दोहींकडे लागू करावी.

**उत्तर—गोधातलनिहायकोः**, या मेदिनीकोशावरून ( गोधा ) या शब्दाची, रानांतील घोरपड आणि पाण्यांतील सुसर या दोहींचेठायीं ही शक्ति असून जसें **नद्यां गोधा निमज्जति**, (नदीमध्यें गोधा बुडते ) या वाक्यांतील गोधाशब्दानें जसी जलगोधिका (सुसरच)सजमली जाते तसें **वर्षासुरथकारोऽग्नीनादधीत**, या श्रुतिवाक्यांतील रथकार या पदानें विश्वकर्मकुलोत्पन्नब्राम्हण जातीय रथकाराचाच स्पष्ट बोध होतो, ह्मणून येथें देहलीदीपन्याय समजूं नये. कारण **जात्याकृतिव्यक्तयः पदार्थः** २।१३१ या गौतमसूत्रावरून श्रौतादिवाक्यांतील पदाचा अर्थ समजण्यास जाति ( आश्रय ) आकृति ( स्वरूप ) आणि व्यक्ति अशी तीन कारणें असतात. म्हणूनच ब्राह्मणाद्याधानप्रकरण श्रुतीच्या अव्यवहितत्वानें त्रैवर्णिकजातिबोधक 'ऋभूणां० वर्षासु' या यज्ञोपयोगिमंत्रकालज्ञापकपदावरून आणि 'आदधीत' या केवल त्रैवर्णिक संबंधींच यज्ञक्रियास्वरूप विधिवाक्यावरून '**वर्षासुरथकारोऽग्नीनादधीत**' या श्रुतिवाक्यांतील रथकार या जातिमान् व्यक्तिवाचक पदाचा अर्थ-अग्निहोत्रादि ब्राह्मण धर्माला समुचित असें पवित्र देवरथादिशिल्प ज्या ब्राम्हणजातिविशेषास मूलपुरुषप्रसादलब्ध परंपरा कर्तव्य आहे, असा ब्राह्मण जातिविशिष्ट पुरुष अर्थात् विश्वकर्मकुलोत्पन्नरथकार जाणावा याप्रमाणें कोशानें होणारें शक्तिज्ञान वर्णिलें.

आतां आप्तवाक्यानें शक्तिज्ञान होत आहे तें-'**आप्तस्तुयथार्थवक्ता**, आप्त ह्मणजे वेदाधारें सत्य बोलणारा. रथकार हे त्रैवर्णिक [ ब्राह्मण ]आहेत; अशाविषयीं एकाप्राचीन प्रसिद्ध यथार्थवक्त्यापुरुषाचें वाक्य पाहिजे; तर यथार्थवक्ता आपस्तंब ऋषि होय. कारण याची गणना सूत्रकारामध्यें आणि स्मृतिकारामध्यें असून, हा सर्व सूत्रस्मृतिकारापेक्षां फार प्राचीन आहे.कल्पारंभीं भृगुऋषीच्या कुळांत उत्पन्न झालेला असून कश्यपऋषीच्या पुत्रकामेष्टींत हा पुरोहित होता यासप्रमाण मत्स्यपु० अ. ७ (**आपस्तंवस्ततश्चक्रे पुत्रेष्टिंद्रविणाधिकां** ॥ या आपस्तंबकृत इष्टीपासून मरुद्गणदेव उत्पन्न झाले" या प्राचीन यथार्थ वक्त्याचें सूत्रवाक्य—आपस्तंबसूत्रे **आधाने आथाधाननक्षत्राणि। कृत्तिकासु ब्राह्मण आदधीतमग्रुख्यो ब्रम्हवर्चसीभवति० वसंतोब्राह्मणस्य ग्रीष्मोराजन्यस्य हेमंतोवा शरद्वैश्यस्य वर्षारथकारस्य ये-**

त्रयाणां वर्णानामेतत्कर्मकुर्युस्तेषामेषकालः ॥ याजवर धूर्तस्वामींचें भाष्य—इदानींत्वयाभिप्रायःसूत्रकारस्य० त्रयाणामंतर्भूतायेकुर्वंति रथकरणं ते रथकाराः सोमाय क्षमाःसर्व कर्मभ्यइति अर्थ—या आपस्तंबसूत्रभागांत आधाननक्षत्रें सांगितलीं आहेत नंतर ब्राह्मणादिकांच्या आधानास ऋतु सांगितले ते-ब्राह्मणास वसंत ऋतु आधानकाल, क्षत्रियास ग्रीष्म अथवा हेमंत, वैश्यास शरदृतु रथकारास वर्षाऋतु आधानकाल जाणावा. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तीन वर्णांतीलच ब्राह्मणादि जे कोणी रथकरण्याचें कर्म करितात, ते सोमयज्ञादि सर्व ब्रह्मकर्मास समर्थ रथकार वर्षाधानाधिकारी जाणावें.

**शंका**—कात्यायनसूत्राचे भाष्यांत त्रैवर्णिकरथकारच नाहीं ह्मणून संकररथकाराकडेसच या आधानाचा अधिकार लावून द्यावा असें ह्मटलें त्याचें कारण काय ?

**उत्तर**—कात्यायनमुनि हा यथार्थ वक्ता आहे परंतु कात्यायन सूत्राच्या ज्या कर्क भाष्य व देवयाज्ञिक नांवाच्या व्याख्या आहेत त्यांचे कर्ते मात्र या रथकाधिकरणाच्या मीमांसेंत थोडे भ्रांतीनें बोलले आहेत पहा—**रथकरास्याधाने । नियतंच । नाभावादितिवात्स्यः** ॥ यांत '**रथकारस्या धानेनियतं**' या का० सूत्रावरून भाष्यकारानें आधानाधिकारी रथकार त्रैवर्णिकच आहे असानिःसंशय पूर्वपक्ष सिद्धांत करून पुढील' च, नाभावादितिवात्स्यः, या सूत्रावरून त्य.नीं तार्किक शंका घेउन उत्तरपक्ष सूत्रविरुद्ध केला आहे; त्या शंकेंचीं समाधानें श्रुत्यादि प्रमाणांनीं झालीं आहेत तीं असीं

**शंका**—भाष्यकार ( **नियतंच** ) या सूत्रांतील ( **च** ) या अव्ययाच्या ( **वा** ) अशा विकल्पित अर्थानें पूर्व पक्षाचा निषेध मानून, त्रैवर्णिक रथकार नाहीं ह्मणतात कारण त्रैवर्णिकाला शिल्पकर्मोपजीवन निषिद्ध आहे; ह्मणून त्रैवर्णिकबहिर्भूतसंकरजातीय रथकाराचें हें आधान असावें.

**समाधान**—सामान्य शिल्पोपजीन, आधुनिकांनीं जरी निषिद्ध मानलें आहे, तथापि देवब्राह्मणप्रिय असें रथायुधयज्ञपात्रादि पवित्रशिल्प कांहीं त्रैवर्णिकाला निषिद्ध नाहीं, कारण पूर्वो आधानें स्वर्गादि अदृष्टफलक स्वधर्मरूप आहेत. पवित्रशिल्पकर्म जर निषिद्ध असतां, तर निषिद्ध कर्मोपजीवीत्रैर्णिकास आणि त्रैवर्णिक बहिर्भूतांस श्रुतीनें विधियुक्त आधानादि ब्रम्हकर्माधिकार कधींच सांगितला नसता. निषिद्धकर्मोपजविनानें ब्राह्मण द्विजत्वापासून भ्रष्ट होऊन पातित्य पावणारे असल्यामुळें जसें श्रुतीनें लाक्षालवणरसादिनिषिद्धोपजीवीद्विजाकरितां मूळ आधानच सांगितलें नाहीं. तसें द्विजास देवरथादिपवित्रशिल्पकर्म जर द्विजत्वापासून भ्रष्टच करणारें असतां, तर रथकर्मकर्त्या रथकारद्विजाला श्रुतीनें विधियुक्त आधानादि ब्रह्मकर्म कधींच सांगितलें नसतें. ज्यापेक्षां ( **ऋभूणां० वर्षासु०** ) अशी स्वयंकर्तृक अनेक श्रुतींचीं रथकाराविषयीं यज्ञकर्तृत्व रथकर्तृत्वबोधक प्रत्यक्ष इत्यादि वाक्यें स्पष्ट आहेत त्यापेक्षां रथादि पवित्र शिल्पकर्म द्विजातीसच ब्रम्हकर्माप्रमाणें उक्त णाहे.

**शंका**—ब्राम्हणादि वर्णत्रयास अनुक्रमें तप, प्रजापालन, आणि कृषिवाणिज्य हींच कर्मे सांगितलीं आहेत त्रैवर्णिकास शिल्पकर्म कोठें सांगितलें आहे ?

**समाधान**—ब्राह्मणादि वर्णत्रयास तपश्चर्या, प्रजापालन, आणि कृषिवाणिज्य या वृत्ति नित्यत्वें सांगितल्या आहेत, आणि यांना रथादिशिल्प जरीं नित्यत्वें सांगितलें नाहीं; असा भास होतो, तथापि त्रैवर्णिकांस यज्ञयागादिकर्म नित्यकर्तव्य असल्यामुळें रथादिपवित्रशिल्पकर्म त्रैवर्णिकांना अवश्य नित्य केलें पाहिजे. कारण रथादि पवित्रयज्ञकर्मरूप शिल्पकर्मावांचून यज्ञ होत नाहीं, आणि यज्ञकर्मावांचून रथ, प्रासाद, मूर्तिवगैरे शिल्पही सिद्ध होत नाहीं; हें पूर्वींच वर्णिलें आहे. ब्राह्मणास आणि क्षत्रियास रथावांचून गति नाहीं. रथ, मूर्ति, यज्ञपात्रें, कुंड, इष्टकोपधान इत्यादि पवित्र रथादिशिल्पकर्में तर ब्राह्मणांनीं करावीत अशा श्रुति आहेत—तै० ब्रा० अ.१प्र.७अ०७ **सवाएष ब्राह्मणस्य चैवराजन्यस्यचयज्ञः। तंवा एतं वाजपेय इत्याहुः । भाष्यं—सबृहस्पतिना अनुष्ठित एष इंद्रेणानुष्ठितः। देवानांमध्ये बृहस्पतिर्ब्राम्हणजात्यभिमानी । इंद्रःक्षत्रिय जात्यभिमानी । ताभ्यामेवानुष्ठितत्वान्मनुष्येष्वपि ब्राम्हणराजन्ययोरेवात्राधिकारो नतुवैश्यस्य ॥ भा. अर्थ**—रथविषयक वाजपेययज्ञ ब्राम्हण जात्यभिमानी बृहस्पति आणि क्षत्रियजात्याभिमानी इंद्र यांनीं अनुष्ठिल्यामुळें मनुष्यामध्येंही हा रथ विषयक यज्ञ करण्याचा अधिकार ब्राम्हणांस व क्षत्रियांसच आहे. वैश्यास नाहीं. म्हणून वैश्यवर्णांत रथकार नाहींत. रथकार ब्राम्हणांत किंवा क्षत्रियांतच आहेत प्रमाण—

> **हिरण्यकेशिसूत्रे प्रकाशैवजयंतीव्याख्यायां आधानप्र०—वसंतो ब्राम्हणस्याधानकालः । ग्रीष्मो हेमंतश्चराजन्यस्य। वर्षा रथकारस्य ॥ शरद्वैश्यस्य । सर्वेषांशिशिरः। वै० व्या० वसंतो ब्राम्हणस्याधानकालः। चैत्रवैशाखौ मीनमेषयोर्वादित्यस्तिष्ठतिसवसंतः । मुखंवाएतदृतूनांयद्वसंतइतिमुखंवा एतत्संवत्सरस्य । यत्फल्गुनीपूर्णमासइति ग्रीष्मो०वसंतादनंतरं मासद्वयं ग्रीष्मः । हेमंतौ मार्गशीर्षपौषौ । वृश्चिकधनुषोर्वारविः । वर्षारथकारस्य श्रावणभाद्रपदौ मिथुनकर्कटयोरविर्वा । शरद्वैश्यस्य । आश्विनकार्तिकौ कन्यातुलयोर्वारविः। अथवा मेषादिवसंतप्रवृत्त्या सर्वेप्यृतवो ज्ञेया ज्योतिःशास्त्रात् ॥ सर्वेषां शिशिरः ब्राम्हणादीनामित्यर्थः ॥**

**अर्थ**-- या सूत्रांत ब्राह्मणादि तिन्हीवर्णांच्या आधानास काल सांगितले आहेत. ( आधान ह्मणजे अग्निहोत्र घेण्याचे आरंभीं करितात जें होमपूर्वक अनुष्ठान तें. ) ब्राम्हण, क्षत्रिय, रथकार आणि वैश्य या त्रैवर्णिकात्मक चार भेदांस अनुक्रमें वसंत, ग्रीष्म, वर्षा, आणि शरत् हे चार आधानकाल आहेत. कोणी क्षत्रियास आणखी हेमंतही असून सर्व आधानाधिकाऱ्यांना शिशिरऋतु विशेष आहे असेंही ह्मणतात. या सूत्र निर्देशावरून स्पष्ट आहे कीं वैश्याच्या आधानकालाच्या पूर्वीं रथकाराचा वर्षाऋतु आधानकाल जर आहे तर रथकरणारे ब्राम्हण आणि क्षत्रिय असे दोनच वर्ण आहेत तथापि ' **शरदिवाजपेयेनयजेतब्राम्हणोरा-**

जन्योवृद्धिकामः । ' या आपस्तंबसूत्रावरून रथकारास त्रैवर्णिक असें सामान्य नाम प्राप्त आहे; परंतु या रथविषयकवाजपेययज्ञाचे ब्राह्मण व क्षत्रिय अधिकारी असून, तो यज्ञ वैश्याधानकाल जो शरदृतु त्यांत करण्यास सांगितल्यामुळें रथकारास जरी त्रैवर्णिक असें सामान्यनाम दिलें आहे; तथापि रथकरणारे प्रायः वैश्य नाहींत कारण वैश्यास रथाचें कारणच पडत नाहीं. ब्राम्हणास अग्निहोत्रादि यज्ञकर्माचेठायींही ब्राम्हणहस्तनिर्मित रथ अवश्य पाहिजे आहे. प्रमाण श्रुति–तै ब्रा. अ. १ प्र. १ अनु. ६ रथचक्रं प्रवर्तयति । मनुष्यरथे नैवदेवरथं प्रत्यवरोहति ॥ भाष्यं—गार्हपत्यादाहवनीयंप्रत्यग्नेः प्रणयनकाले रथचक्रस्य प्रवर्तनं । अनेन मनुष्य रथप्रवर्तनेन नीयमानाग्न्यर्थं देवरथ एव प्रवर्तितो भवति ॥ अर्थ–या सहाव्या अनुवाकांत देवयजन यज्ञभूमीचे ठायीं पवमानहविष्यें आणि दक्षिणा कोणकोणती लागतात, हें सविस्तर सांगितलें आहे. त्यांत गार्हपत्यकुंडांतून आहवनीयकुंडांप्रत अग्नि नेतेवेळीं, दक्षिणेकडील ब्रम्हाचार्यानें अग्निरथारूढ करून, रथाचें प्रवर्तन करावें या मनुष्यरथ प्रवर्तनानें न्यावयाच्या अग्नीकरितां, देवरथच चालविल्याचें फल मिळतें" ह्मणजे अग्निहोत्राच्या यज्ञसंभारात धातुमयरथ पाहिजे ' तसें क्षत्रियासही यज्ञशिल्पनिर्मित रथशस्त्रास्त्रादि ब्राम्हणांनीं आणि देवांनीं दिलेली आहेत. जसें रथादिकर्म शिल्पजन्य आहे, तसें ' शिल्पंस्रुवे क्रियायोगे , या कोशोक्तीवरून स्रुक्, स्रुव, स्थाली इत्यादि शिल्पजन्य पात्रें हीं ब्राम्हणहस्त निर्मितच पाहिजेत. याविषयीं प्रमाण—

> हिरण्यकेशिसूत्र–आधानस्य ३ तृतीयप्रश्ने ७ पटले । वैजयंतीव्याख्यायांच । अग्निहोत्रपात्राणिप्रयुनक्ति । खादिरंस्रुवमग्निहोत्रहवणींवैकंकतीमचक्रवर्तीमशूद्रकृतामूर्ध्व कपालामग्निहोत्रस्थालीं । दर्शपूर्णमास स्रुचव्यतिरिक्तत्वख्यापनायाग्निहोत्रपात्राणीत्युक्तं स्रुवाग्निहोत्र हवण्यौ व्याख्यातौ । कुलालचक्रभ्रमणनविद्यते आवर्तोभ्रमणंयस्याःसंतिशूद्रव्यतिरिक्तनत्रैवर्णिकेनैवकृतामित्यर्थः॥

अर्थ–अग्निहोत्रास लागणारीं यज्ञपात्रें–स्रुव ही खैराची असावी. अग्निहोत्रहवणी ( वेहळीच्या काष्टाचें हस्ताकृति एक हस्तपरिमित असें पात्रविशेष ) कपालें ( फुटलेल्या नूतन मृद्भांडाच्या अर्धकवचीसारखीं पात्रें ) अग्निहोत्रस्थाली ( चरुश्रपणोपयोगी एकप्रकारचें धातुमय किंवा मृण्मय पात्रविशेष ) इत्यादि यज्ञपात्रें शूद्रांनीं केलेलीं नसावीत. ब्राम्हण, क्षत्रिय किंवा वैश्य अशा त्रैवर्णिकांनींच केलेलीं असलीं पाहिजेत. सूत्रांतील [ एव ] हें अव्यय यज्ञपात्रादि पवित्रशिल्पकर्माचे ठायीं ब्राम्हणाचा मुख्य अधिकार व शूद्राचा अत्यंत निषेध सूचवीत आहे. याप्रमाणें आपस्तंबकात्यायनादि सूत्रांची ही उक्ति आहे.

म्हणून यज्ञसंबंधीं रथादिपवित्रशिल्पकर्मवृत्ति त्रैवर्णिकाचीच असल्यामुळें त्रैवर्णिकाचें रथादियज्ञसंबंधीं पवित्रशिल्पकर्म करण्याकरितां विश्वकर्ममुखोत्पन्न पंचालब्राह्मणजातीयशिल्पीचा एक पृथक् वर्गच आहे त्यास त्रैवर्णिकरथकार हें

सामान्यनाम आहे. ब्राम्हणजातीयरथकार ह्मणजे विश्वकर्मसंततीयपंचालच जाणावे; हें पूर्वीं वर्णिलें असून विषयक्रमानें पुढेंही वर्णन चालूच आहे; पहा चरुस्थाली हें यज्ञपात्र विश्वकर्मनिर्मित आहे याविषयीं श्रुति **काण्वसंहिता अध्याय १३ अनुवाक ४ मंत्रपाठः—मातेवपुत्रंपृथिवींपुरीष्यमग्निंस्वेयोनौअभारुख । तांविश्वैर्देवैर्ऋतुभिःसंविदानः प्रजापतिर्विश्वकर्माविमुंचतु । भाष्यं—यथालोके मातापुत्रंबिभर्ति तदा पृथिवीरूपेयं मुखास्वेयोनौ स्वकीयगर्भस्थानेपुरीष्यमेतमग्निंअभाऽअभार्षीत्। धारितवतीइमृन्प्रथमपुरुषस्यरूपं बिभर्तिताउखांप्रजापतिर्विमुंचतुशिक्यपाशान्मुक्तांकरोतु । कीदृशःप्रजापति विश्वैर्देवैर्ऋतुभिश्चसंविदानएकमत्यंगतः विश्वसृष्टिरूपंकर्मयस्यासौविश्वकर्मा ॥** या श्रुतीवरून चरुस्थालीचा निर्माण कर्ता जसा प्राचीनकालीं विश्वकर्मा तसेंच हल्लीं तत्कुलोत्पन्न पंचाल जाणावें. एवं सर्वयज्ञपात्रांचे कर्ते विश्वकर्मसंतती ब्राम्हणच आहेत. याविषयींची श्रुति पूर्वार्ध पृष्ठ ६३ पं. ३० पहा. एवंच रथादिपवित्रशिल्पकर्मोपजीवन ब्राम्हणादि त्रैवर्णिकास निषिद्ध नाहीं. जर निषिद्ध असता, तर प्रजापति ब्रम्हर्षि विश्वकर्मा हा आदिशिल्पी असल्यामुळें प्राचीन ब्रम्हर्षींनीं त्याच्याशी संबंध ठेविला नसता. ज्यापेक्षां विश्वकर्मा शिल्पी असूनही ब्रम्हादिकांस उपास्यमान अशा सूर्यनारायणाचा श्वशुर आहे, ( **पूजयंतिचयंनित्यंविश्वकर्माणमव्ययं** ) या भा. आदिपर्वोक्तीवरून सर्वपूज्य आहे आणि तत्कुलोत्पन्न शिल्पी जर ब्राम्हण आहेत तर शिल्पोपजीवन त्रैवर्णिकास निषिद्ध नाहीं.

**शंका**—‘ **रथंकरोतीति रथकारः** ’ अशा अवयवार्थानें त्रैवर्णिकाचे ठायीं रथकार शद्ब यौगिक आहे आणि संकीर्णजातीयाचें रथकार असें नामच असल्यामुळें त्याचे ठायीं रथकारशद्ब रूढ आहे तस्मात् योगशक्तीपेक्षां रूढिशक्ति बलिष्ठ असल्यामुळें योगरूढ अशा संकीर्णरथकाराकडेसच ‘ वर्षासु० हा पूर्वोक्त आधानाधिकार लावून द्यावा.

**समाधान**—योगशक्ति किंवा रूढिशक्ति यांचा विचार करणें तो प्रकरणवशें करून योग्य अन्वयाच्या धर्ममर्यादेंत केला पाहिजे; यास उदाहरण—‘ **पयःस्यात्क्षीरनीरयोः** ’ या मे० कोशोक्तीनें दुधास आणि उदकास पयस् असें एकच नाम आहे. तेव्हां ( **पयसाजुहोति** ) पयानें होम करितो, या वाक्यांत जसें **जुहोति** [ होम करितो ] या क्रियेवरून ‘पयस्’ या नामानें दुग्ध अशा अर्थाचेठायीं रूढिशक्ति आहे. कारण पाण्यानें होम करीत नाहींत; म्हणून ‘ उदक ’ या रूढ्यर्थास अन्वयाची अनुपपत्ति असल्यामुळें अप्राबल्य आहे. तसेंच ( **वर्षासुरथकारोऽग्नीनादधीत** ) या श्रुति वाक्यांतील **आदधीत** या यज्ञविधायक क्रियेवरून रथकार शद्बानें त्रैवर्णिकरथकार अशा अर्थाचे ठायींच रूढिशक्ति आहे कारण शूद्रांतर्गत संकीर्णसंकररथकारास **आदधीत** अशा यज्ञविधायक क्रियेची अनुपपत्ति आहे म्हणून ( **भृगूणां०** ) या प्रस्तुत श्रुतींतील ब्राम्हणादि त्रैवर्णिकाच्याच आधान विषय प्रकरणांत असमर्थ संकीर्णसंकरजातीच्या रूढ्यर्थाचे प्राबल्यच नाहीं.

**शंका**—हें आधान जर त्रैवर्णिकांचें आहे तर ब्राम्हणादि तिन्हीवर्णापैकीं कोणत्या वर्णांत रथकार आहेत तें सप्रमाण सांगा?

**समाधान**—( **ब्रम्हणस्त्वपरा तनुः** ) प्रत्यक्ष दुसरा ब्रम्हा असा त्वष्टृब्रम्हा विश्वकर्मा पंचमुख जो त्याच्या मुखांपासून उत्पन्न झालेले रथकार ब्राम्हण आहेत; यास प्रमाण प्रत्यक्ष व्यासोनारायणाचें,—**सद्योजातादिपंचभ्योमुखेभ्यः पंचनिर्ममे ॥ विश्वकर्मसुताह्येते रथकारास्तुपंचच॥तास्मिनकालेमहाभागोपरसोममरूपभाक् ॥ पाषाणदारकंटंकं सौवर्णंदशकंतदा ॥ काष्टंचनवलोहानि रथकृद्भ्योददौविभुः ॥ रथकारास्तदाचक्रुः पंचकृत्याणिसर्वदा॥ षड्दर्शनाद्यनुष्ठानं षट्कर्मनिरताश्रये ॥ स्कंदपुराणेनागरखंडे अध्याय ६ ॥** **अर्थ**—शंकर ह्मणतात, हे स्कंदा. सद्योजात, वामदेव, तत्पुरुष, अघोर आणि ईशान या पंचब्रह्मसंज्ञक विश्वकर्मयाच्या पंचमुखापासून उत्पन्न झालेले विश्वकर्मपुत्र यांस रथकार संज्ञा आहे माझेंच रूप धारण करणारा तो महापुरुष विश्वकर्मा त्या रथकार संज्ञक स्वपुत्रांस टंकादि दहा शिल्पायुधें सौवर्णादि नवधातु आणि काष्ठपाषाण देता झाला नंतर ते यज्ञादि षट्कर्मनिरत रथकार सृष्टिकार्यार्थं पंचविधपवित्र शिल्पकृत्यें करिते झाले ह्मणून त्यास पंचालरथकार असें ह्मणतात. विश्वकर्ममुखोद्भूत रथकाराचें पंचाल हें पर्यायनाम देशसंबंधानें नाहीं. शिल्पकर्मसंबंधानें आहे ( **उणादिषु १ पादे—तमिविशिविडिमृणिकुलिकपिपलिपंचिभ्यः कालन् ॥ पचि व्यक्तीकरणे इति धातोः । पंचंति शिल्पाचारं स्फुटीकुर्वंति ते पंचालाः ॥ ' येषांविज्ञानमात्रेणशिल्पाचारःस्फुटीभवेत् । '** असें वचनही आहे. एवं शिल्पिवाचक पंचालशब्द पचिधातूवरून नित्य बहुवचनी कृदंत आहे. देशवाचीपंचालशब्द ( **यत्रस्थप्रजारक्षणे पंचराजानः अलं इतिपंचालोनामदेशः** ) या भारतनिर्देशावरून एकवचनी तद्धित आहे. असो, कोणी ह्मणेल कीं, **रथंकरोतीतिरथकारः** , अशा व्युत्पत्तीनें या विश्वकर्मपुत्राचेठायीं पंचालरथकार शब्द यौगिकच असेल, तर असें नाहीं. ( **विश्वकर्मसुतानेतान्विद्धिशिल्पप्रवर्तकान् ॥ एतेषां पुत्रपौत्रायेतएतेशिल्पिनोभुवि ॥ पंचाला नामविज्ञेयाः पंचभेदाहितेमताः ॥ इति पद्मपुराणे भूखंडे ॥** **अर्थ**—हे मन्वादि पंचविश्वकर्मपुत्र जे रथकार यांची पुत्रपौत्रादि परंपरा जी संतति ती **पंचाल**, या पर्यायनामानें या पृथ्वीमध्यें सर्वत्र प्रसिद्ध आहे. यावरून पंचालरथकारांचेठायीं जर समुदायशक्ति आहे तर ( **समुदायशक्तिः रूढिः** ) या तर्कदीपिकोक्तीवरून पंचाल रथकारशब्दाचेठायीं रूढिशक्ति आहे. आणि या ब्राह्मणवर्णांतील पंचालरथकारांच्या सर्वत्र समुदायाचेठायीं ब्रह्मकर्मयुक्त शिल्पकर्माचा परंपरा प्राप्त सामान्यविशेषधर्म असल्यामुळें जरी जातित्व आहे तरी ( **यच्चकेषांचिद्भेदंकुतश्चिद्भेदंकरोतितत्सामान्यविशेषोजातिः** ) या वात्स्यायनाच्या भाष्योक्तीवरून आणि **ब्राह्मणेतद्विशेषग्रहणं । सि० २०६७** ) या भट्टोजीदीक्षितांच्या परिभाषेवरून पंचालरथकारांचे ब्राह्मणजातिविशेषत्व" शालंकायन खांडवायनाप्रमाणें ,, ब्राम्हणवर्णांतच आहे.

**शंका**—( **वर्षासुरथकारोऽग्नीनादधीत** ) या श्रुतीवरून आधानाधिकारी रथकार

त्रैवर्णिकच असले पाहिजेत आणि असावेच असें सर्व पार्थसारथिमिश्रादि मीमांसक स्वकृत निबंधांत आपली अपेक्षा असल्याचें दाखवितात. परंतु ( **ऋभूणांत्वा०** ) या श्रुतीनें त्या रथकारास ऋभुदेवताक आधान सांगितलें असल्यामुळें मीमांसकांनीं सर्व पूर्वपक्ष सिद्धांतिक आपला खरा हेतु मनाचें मनांतच ठेवून त्यांना, हें रथकाराचें आधान त्रैवर्णिकबाहिर्भूतशूद्रवर्णांतर्गत संकीर्णसंकररथकाराचें असावें असें लोकांत प्रसिद्ध केलें, त्यांचा असा समज आहे कीं, रथकारास जर ऋभुदेव आहेत तर रथकार संकरजातीचाच घेतला पाहिजे, कारण ऋभुदेव हे( **सौधन्वनाऽऋभवःसूरचक्षस** ) या श्रुतीच्या सामानाधिकरण्यनिर्देशावरून सुधन्व्याचे पुत्र जर ऋभु आहेत तर( **व्रात्यात्तुजायते वैश्यात्सुधन्वाचार्यएवच। भारुषश्चविजन्माचमैत्रः सात्वतएवच ॥** या मनुस्मृतीवरून आणि ( **व्रात्योत्पन्नाः शूद्रसमाः ॥** ) या स्मृत्यंतरावरून सुधन्वा हा हीनजातीचा त्रैवर्णिक बहिर्भूतसंकर असल्यामुळें त्याचे पुत्र हे ऋभुदेव असावेत अर्थात् या हीनजातीय ऋभुदेवांचें आधान जर रथकारास आहे तर ते रथकारही हीनजातीचे असावेत परंतु त्या रथकारास उपनयनाचा अभाव असल्यामुळें विद्या नाहीं म्हणून आधानाचा लोपच समजावा. एक ह्मणतात आधान मात्र करावें. एक ह्मणतात नित्यादिकर्में करूं नयेत एतावता, मीमांसारूप भाष्यव्याख्यादि निबंधकाराचा या रथकाराधिकरणाविषयीं असलेला तार्किकवाद सप्रमाण आहे कीं नाहीं कोण जाणें !!

**समाधान**—( **सौधन्वनाऋभवः सूरचक्षसः** ) या श्रुतीवरून ज्या सुधन्व्यास ऋभुनामक पुत्र होते तो सुधन्वा व्रात्यवैश्यपुत्र ( हीनजातीय ) आहे असें जें त्यांनीं ह्मटलें आहे तें सत्य नाहीं. भ्रांतीनें-ह्मटलें आहे. **सौधन्वनाः** या श्रुतिपदांत अमुक सुधन्वा घ्यावा असें ह्मटलें नाहीं, तेव्हां श्रुतींत सुधन्वा शब्दाचें अविशेषत्व असल्यामुळें व्रात्यवैश्य सुत सुधन्व्याचे पुत्र ऋभु असें ह्मटल्यास काय प्रत्यवाय आहे? असें ह्मणाल तर त्या व्रात्यवैश्यपुत्र अशा हीन जातीच्या सुधन्व्यास **ऋभुदेव** नांवाचे पुत्र असल्याविषयीं, कोणत्याही श्रुति, स्मृति, पुराणादि ग्रंथांत कोठेंच प्रमाण नाहीं. कारण, हीनजातीयव्रात्यवैश्यपुत्र सुधन्व्यास मूळ ऋभु नांवाचें पुत्रच नाहींत; म्हणून ( **तद्भाववति तत्प्रकारकानुभवोऽयथार्थःसएवभ्रमइत्युच्यते** ) या न्यायानें व्रात्यवैश्योत्पन्नसुधन्व्याचे पुत्र ऋभुदेव ' हें मीमांसकाचें बोलणें भ्रांतीचें आहे, म्हणून प्रमाण मानू नये. ( **अग्निनासिंचेदितिवत् नप्रमाणंयोग्यताविरहात्**)कोणी ह्मणतील ग्रंथकार प्रमाणांवाचून कसें लिहितील तर जसें त्यांनीं आपल्या भाष्यव्याख्येंत, सुधन्वा हा व्रात्यवैश्यपुत्र आहे याविषयींचें '**व्रात्यात्तुजायतवैश्यात्सुधन्वा०** ' इत्यादि कित्येक स्मृत्यादिवाक्यें कारणपरत्वें घेतलीं आहेत, तसें त्या हीनजातीच्या सुधन्व्यास ऋभु नांवाचें पुत्र होते, अशाविषयीं एकादें वाक्य लिहिणें अवश्य योग्य असून कां घेतलें नाहीं? ज्यापेक्षां एवढ्या मोठमोठ्या सविस्तर सप्रमाण व्याख्या करूनहीं त्यांत, व्रा० वै० हीनजातीच्या सुधन्व्यास ऋभु नांवाचें पुत्र असल्याविषयीं वाक्य नाहीं, आणि आंगिरस ब्रह्मर्षि सुधन्वा ऋषीस ऋभु नांवाचें पुत्र आहेत, असीं श्रुति, स्मृति, पुराणादि ग्रंथांत सर्वत्र प्रसिद्ध प्रत्य

क्ष प्रमाणें आहेत तर पूर्वोक्त पार्थसारथिमिश्र, कर्क, देवयाज्ञिक व्याख्याकारांचे " व्रात्यवैश्यपुत्रहीन सुधन्व्याचे पुत्र ऋभु असें ह्मणणें " केवळ तार्किक मताचें प्रमाणरहित असून यथार्थानुभवाचे नसल्यामुळें त्यांचा तो भ्रमच सिद्ध होतो. असें मोठमोठ्या ग्रंथांतही क्वचित् क्वचित् भ्रम असल्याची उदाहरणें—( **तिदृधातुः अनिदृसन् क्षीरस्वामीतु अयंसेट् इतिबभ्राम**)तसेंच ( **संस्कारार्थमितिकस्यचिद्भ्रमः स्यात्** ) इत्यादि पुष्कळ आढळतात. तथापि ग्रंथावर दूषण येत नाहीं, याचें कारण गुणबाहुल्य आहे; म्हणून धान्यराशींतील हरळ टाकून दिल्याप्रमाणें दोष टाकून गुण स्वीकार करावा. असो, आतां ( **सौधन्वना ऋभवः सूरचक्षसः** ) या श्रुतीचा यथार्थानुभविक योग्य अर्थ ( अंगिराऋषीचा पुत्र जो सुधन्वा ब्रह्मर्षि त्याचे पुत्र ऋभुदेव ब्रह्मकुलोत्पन्न आहेत ) असें जाणावें. अंगिराऋषीस सुधन्वा नामक पुत्र आहे यास प्रमाण—भारतंपंचमोवेदः, अशी ज्यास वेदसंज्ञा आहे त्या भारतांतील प्रमाण—( **अष्टौचांगिरसः पुत्राः० सुधन्वाचाष्टमस्मृतः ॥ ) भारतेअनुशासनपर्वणि ८३ अध्याये** इत्यादि उत्तरार्द्ध पृष्ठ ८० पंक्ति ८ मध्यें पूर्वीं दिलेलेंच आहे, पहा. आतां हा सुधन्वा ऋषि अंगिराऋषीचा पुत्र असल्यामुळें ब्राह्मण कोठें ह्मटलें आहे, अशा विषयीं प्रमाण पाहण्याविषयीं कोणाची अपेक्षा नसेलच. आणि कदाचित् असेल तर त्याच भारतांत उद्योगपर्वामध्यें—**किं ब्राह्मणाःस्विच्छ्रेयांसो दितिजाःस्विद्विरोचन ॥ अथकेनस्मपर्यंकं सुधन्वा नाधिरोहति ॥ ८ ॥ नीलकंठी टीकायां सुधन्वा ब्राह्मणःपर्यंकं अधिरोहत्येव त्वंतुनीचोदैत्यःसन् किमर्थंप्रत्याख्यानं करोषीतिभावः ॥ प्रल्हाद उवाच ॥ मत्तःश्रेयानंगिरावै सुधन्वा त्वत्तएवच ॥ मातास्य श्रेयसीमातुस्तस्मात्त्वं तेनवैजितः ॥ नी. टी. ॥ अंगिराः सुधन्वनःपिता ॥ श्लोक—विरोचन सुधन्वाऽयंप्राणानामीश्वरस्तव ॥ सुधन्वन्पुनरिच्छामि त्वयादत्तंविरोचनं ॥ ३४ ॥ सुधन्वोवाच-एष प्रल्हाद पुत्र स्तेमयादत्तो विरोचनः ॥ पादप्रक्षालनंकुर्यात्कुमार्याःसन्निधौमम ॥**

**भावार्थ**—यात अंगिरापुत्र सुधन्वाऋषि आणि प्रल्हादपुत्र विरोचन यांचा,परस्परांच्या श्रेष्ठत्वाविषयीं वाद होऊन शेवटीं सुधन्व्यानें विरोचनास जिंकिलें,नंतर महावैष्णव सत्यवक्ता प्रल्हाद यानेंही आपल्या पुत्रास सांगितलें; हे पुत्रा विरोचना, जसा माझ्यापेक्षां या सुधन्व्याचा पिता अंगिरा श्रेष्ठ आहे,तसा तुझ्यापेक्षां सुधन्वा ब्राह्मण श्रेष्ठ आहे. यावरून सुधन्वा हा ब्राह्मण आहे हें सप्रमाण सांगितलें. आतां या आंगिरस ( अंगिरा ऋषीचा पुत्र ) सुधन्वा ऋषि यालाच ऋभु नांवाचे पुत्र होते यास प्रमाण-काय ह्मणाल, तर पूर्वोक्त ज्या ( **सौधन्वना ऋभवःसू०** ) श्रुतींतील ( सुधन्वा, शब्दाचा भीमांसारूप व्याख्याकारांनीं' व्रात्यवैश्य पुत्र सुधन्व्याचे पुत्र ऋभु, असा अर्थ केला आहे, त्याच श्रुतीचें प्रमाण. **विष्ट्वीशमी० सौधन्वना ऋभवःसूरचक्षसः संवत्सरे समं पृच्यंत धीतिभिः ॥** ऋ. अ. १।७।३०।४ याश्रुतीवर, मंत्राचा सत्यार्थोपदेशक यास्कमुनिप्रणीत वेदांग निरुक्त उत्तरषट्क अध्याय ५ ऋक् १६ **कृत्वाकर्माणिक्षिप्रत्वेनवोढारोमेधाविनोवामर्तासःसतोऽमृतत्वमानशिरे सौधन्वनाः**

ऋभवःसूरख्याना वासुरप्रज्ञावा संवत्सरेसमपृच्यंत धीतिभिःकर्मभिऋभु- र्विभ्वावाज इति सुधन्वन आंगिरसस्यत्रयःपुत्रा बभूवुस्तेषां प्रथमोत्तमाभ्यां- बहुवन्निगमा भवंति नमध्यमेन तदेतदृभोश्च बहुवचनेन चमसस्यच संस्तवेन- बहूनिदशतयीषुसूक्तानिभवंत्यादित्यरश्मयोप्यृभव उच्यंते ॥ अर्थ—या श्रुतीचा सभाष्य अर्थ पूर्वार्ध पृष्ठ २६ पंक्ति ४ मध्यें पहा. तोच अभिप्रायार्थ या निरुक्ताचा आहे तो-चमसादि शिल्पकुशलकर्मे लवकर करणारे बुद्धिवंत जे मानव असून देव झाले आणि एक वर्षांत सूर्याप्रमाणे तेजस्वी होऊन यज्ञादिकर्मांनीं उपासना करण्या- ण्यास योग्य झालें, ते ऋभु, विभ्वा, वाज असे सुधन्वा नामक अंगिराऋषीच्या पुत्रांचे तिघे पुत्र होत. या तिघांतून पहिला वडील पुत्र ऋभु आणि धाकटा पुत्र वाज या दोघांच्या नामांचे प्रायः निगम [ मंत्रसूक्तें ] आहेत मध्यमाची ( विभ्व्याची) नाहींत. त्यांत ' ऋभवः ' या बहुवचनानें आणि चमसरथादि शिल्पा- च्या प्रशंसेनें वेदामध्यें जी पुष्कळ सूक्तें आहेत तीं तिघांचीही समजावींत. " आणि त्यांच्या दिव्यतेजोरूपत्वामुळें ऋभु असें सूर्याच्या किरणासही ह्मणतात. यावरून ऋ- भु हे आंगिरस सुधन्वा ऋषीचे पुत्र आहेत. 'या श्रुतिवचनप्राबल्यानें" रथकार अव- कीर्णावत् तेजोहीन आहेत असें प्रतिपादन करणारे वैजयंतीकाराचे मताचा निरास हो- त आहे ' आणखी प्रमाण ( ऋभु हे आंगिरस देव असून ते ब्रह्मर्षि आहेत याविषयीं) ऋग्वेद अ०३ अ०७ व.१ ऋ.१ **पुनर्येचक्रुः पितरायुवाना सनायूपेव जरणाशया- ना । तेवाजोविभ्वाँऋभुरिंद्रवंतोमधुप्सरसोनोऽवंतुयज्ञं ॥ ३ ॥**

**भाष्यं**—यऽऋभवःपितरा मातापितरौ यूपेव छिन्न स्थाणू इवजरणा जीर्णौ शयानौ पुनः सना सदा युवानौ चक्रुः नित्य तरुणावकुर्वन् । ते वाजो विभ्वाऋभुश्चएतन्नाम- कास्त्रयः । सुधन्वनः आंगिरसस्य पुत्रा ऋषयः। इंद्रवंतोऽनुग्राहकेनाऽस्मदीयं यज्ञमवंतु॥

अर्थ—यज्ञकर्ते प्रार्थना करितात-जे ऋभु स्वकीय शिल्पक्रिया शक्तीनें आपल्या वृद्धमातापितयास सदा तरुण करिते झाले, ते वाज, विभ्वा, आणि ऋभु या नांवाचे तीन आंगिरस सुधन्वा ऋषीचे पुत्र ब्रह्मर्षि इंद्राचे प्रियकर असे ऋभु हे पूर्वी मनुष्य असून शिल्पकर्मानें देवत्व पावते झाले, ( असें ह्मटल्यावरून त्याना मनुष्यत्व कोण- त्यासंबंधानें होते ? असा जर प्रश्न असेल तर त्याना मनुष्यत्व ब्रह्मर्षीच्या पर्याय ना- मावरून ऋषित्वसंबंधानें आहे ह्मणजे पूर्वी त्याना ऋषित्व असून नंतर देवत्व पावले असें समजावें यास प्रमाण—

ऋग्वेद अ. ३।४।७।२ **इंद्रस्यसख्यमृभवःसमानशुर्मनोर्नपातो अ- पसो दधन्विरे ॥ सौधन्वनासोअमृतत्वमेरिरे । विष्ट्वीशमीभिःसु- कृतःसुकृत्यया ॥**

**भाष्यं**—मनोर्नपातो मनुष्यस्यांगिरसःपुत्राः अपसो यागादि लक्षण कर्मवंत ऋभव इंद्रस्य

सख्यं समान ख्यानत्वं समानशुः । सम्यक्प्राप्नुवन् तथेंद्रस्यसख्यंप्राप्ताःतऽऋभवो दधन्विरे। पूर्वमनुष्यत्वेन मरणयोग्या अपीदानींद्रस्य सख्येन प्राणान्धारयंति। तथामंत्रः। आधारयंत वन्हयः (ऋ.अ.१।२०।८ ) इतिसौधन्वनासःसुधन्वनामकस्यर्षेःपुत्रा ऋभवः सुकृतः[1]शोभन कर्माणःसंतःप्रभूतैःशमीभि दैवत्वप्राप्ति प्रतिबंध निवारणेहेतुभिःकर्मभिः[2]सुकृत्ययाशोभनेन कर्मणाच विष्टीव्याप्यामृतत्वमेरिरे । देवत्वंप्रापुः ।

यांतील तात्पर्य हें चक्रीं(मनोःनपातःऋभवः)ह्मणजे मनु हें पर्याय नाम अंगिराऋषीस आहे. त्या मनूचे पुत्रपौत्र ऋभु आहेत ह्मणून आंगिरसांस मनुष्य ह्मणतात. आणखीप्रमाण (ऋभुदेव हे आंगिरस पुत्र ब्रह्मर्षि,अशी त्याच आंगिरस कुळांतील एक प्रसिद्ध मंत्रद्रष्टा कुत्सनावाचा ऋषि आपली साक्ष देत आहे याविषयीं आणि आंगिरसपुत्र ह्मणून जे ऋषि सांगितले त्याच ऋभूंना सूर्यांचे किरण ही संज्ञा असल्यानें श्रुति स्मृतींची एकवाक्यता आहे याविषयीं )

**ऋग्वेद अ. १।७।३०।२ आभोगयंप्रयदिच्छंतऐतना पाकाःप्रांचोममकेचिदापयः। सौधन्वनासश्चरितस्य भूमनागच्छतसवितुर्दाशुषोगृहं ॥ २ ॥**

**भाष्यं**—हे सौधन्वनासः आंगिरसस्यसुधन्वनः पुत्राः ऋभवः हे ममपूर्वभूता यदा आसहविष्कं देवत्वं जिगमिषवो यूयं सुचरितमाचरितुं प्रवृत्तस्तदामहांति चरितानि । पित्रोः पुनर्यौवनदानादि रूपाणि कृत्वासूर्यलोकं गता इति भावः ।

**अर्थ**—या मंत्राचा ऋषी अंगिरा कुलोत्पन्न कुत्स आहे तेव्हां कुत्स ऋषि ऋभूंची स्तुति करितो—हे माझ्या पूर्वजानो अंगिरापुत्र सुधन्व्याच्या पुत्रांनों)ऋभुदेवहो ज्यांत यज्ञांतील सोमादि हविष्याची प्राप्ति आहे अश्या देवत्वाची प्राप्ति होण्याच्या इच्छेनें जेव्हां तुह्मी आपल्या वृद्ध मातापितरांना तरुण केलें,अश्वीदेवास रथकरून दिला,एकाचमसपात्राचीं चार पात्रें केलीं; इत्यादि उत्तम शिल्पकर्में करून तुह्मी सूर्य लोकांप्रत गेलात. असा भावार्थ जाणावा. ( आणखीप्रमाण ( ऋभुदेव ब्रह्मकुलोत्पन्न आहेत याविषयीं ) श्रुति ऋ० **ऐतरेयब्राह्मणपंचिका—प्रजापतिर्वैपित ऋभून्मर्त्यासतोऽमर्त्यान्कृत्वातृतीयसवनमाभजत् ॥ अस्यार्थस्तु विद्यारण्यचरणैः ॥ ऋभूनप्रतिपिता जनक प्रजापतिः सतः मर्त्यान् प्रति तृतीयं सवनं कारयित्वा । अव्ययानामनेकार्थत्वात् । कृत्वे त्यस्यकारयितृत्वं संपद्यतेतथाचकारयित्वा अमर्त्यान् देवान् कृत्वाच अनुषंगात्कृत्वेतिपदमुभयत्राप्यन्वेति । आभजत् । धृतवान् ॥** अर्थ—ऋभूंचा पिता प्रजापति ( विश्वकर्मा ) मानव अशा ऋभूंप्रत तृतीय सवन करवून देवत्व दिलें आणि आत्मस्वरूपीं धारण करितां झाला. यावरून ऋभुदेव ब्रह्मर्षि आहेत. ब्रह्मर्षिमध्येंही मंत्रद्रष्टे ब्रह्मर्षींचा महिमा विशेष आहे. ऋभुकुलोत्पन्न सूनुनामक ब्रह्मर्षि मंत्रद्रष्टा आहे. प्रमाण ऋ० **मंडल १० अनुवाक १२सूक्त १७६ प्रसूनवऋभूणां । इतिचतसूणां सूनुः। आर्भवऋषिः।आद्यस्यऋभवोदेवता अग्निश्च । अनुष्टप्गायत्री छंदः ।**

---

१ सुकृतःहें पद ( सुकर्मा विश्वकर्मणि ) यां वरून विश्वकर्मद्योतक आहे. २ कर्मभिःयाचा अर्थ 'शिल्पैः' असा जाणावा.

यावरून विश्वकर्मकुलोत्पन्नशिल्पिब्राम्हण रथकाराचे पूर्वज ऋषि वेदमंत्रकर्ते होते, हें स्पष्ट आहे आतां हे आंगिरस सौधन्वन ब्रह्मर्षिकुलोत्पन्न ऋभुदेवताचें आधान जरत्रैवर्णिकरथकारास सांगितलें आहे, तर त्या ऋभुदेवांस रथादि शिल्पकर्म आणि रथकार नाम अवश्य असलें पाहिजे, ते तर प्रसिद्धपणें आहेच हें पूर्वोक्त श्रुतीवरून स्पष्ट असून त्या ऋभूना ब्राम्हणत्व असून रथकारत्व आहे याविषयीं श्रुत्याद्यनेकप्रमाणें आहेत. पैकीं उत्तरार्ध पृष्ट ७५ पंक्ति १५ यांत एक श्रुतिप्रमाण आहे तें पहावें. आणखी प्रमाण श्रुति—ऋग्वेद अ० ३ । ७ । २ । ८ **रथंयेचक्रुः सुवृतं० ॥ अस्यार्थः यऋभवः सुवृतं शोभनंरथं चक्रुः** ॥ आणखी श्रुति—**तक्षन्रथं०** ॥ एवं ऋभु हे रथकार असून प्राप्तदेवत्व ब्रम्हर्षि ( ब्राह्मण ) आहेत याविषयींच्या पूर्वोक्त श्रुतींला अनुसरून साक्ष देणारी स्मृति—

**वायुपुराण अध्याय ४—श्रृणुतांगिरसोवंशमग्नेः पुत्रस्यधीमतः । यस्यान्ववाये संभूताः भारद्वाजाः सगौतमाः ॥ ९६ ॥ देवाश्चांगिरसो मुख्याइषुमंतोमहौजसः ॥ सुरूपाचैवमारीचीकार्दमीचतथास्वराट् ॥ ९७ ॥ पथ्याचमानवीकन्यातिस्रोभार्यास्त्वथर्वणः ॥ इत्येतांगिरसः पत्न्यस्तासुवक्ष्यामिसंततिम् ॥ ९८ ॥ अथर्वणस्तु दायादास्तास्तुजाताः कुलोद्वहाः ॥ उत्पन्ना महताचैवतपसाभावितात्मनाम् ॥ ९९ ॥ बृहस्पतिः सुरूपायां गौतमःसुषवेस्वराट्। अबंध्यंवामदेवंचैवोतथ्यमुशिजंतथा ॥ १०० ॥ धिष्णुः पुत्रस्तु पथ्यायां संवर्तश्चैवमानसः ॥ विचितश्चतथायास्यः शरद्वाश्चाप्युतथ्यजः ॥ १०१ ॥ अशिजोदीर्घतमाबृहदुकथ्योवामदेवजः ॥ धिष्णुः पुत्रः सुधन्वास ऋभवश्चसुधन्वनः ॥ १०२ ॥ रथकाराः स्मृतादेवा ऋषयोयेपरिश्रुताः ॥ बृहस्पतेर्भरद्वाजोविश्रुतः सुमहायशाः ॥ १०३ ॥ अंगिरसस्तुसंवर्तोदेवानंगिरसः श्रृणु ॥ बृहस्पतेर्यवीयांसोदेवाह्यंगिरसः स्मृताः ॥ १०४ ॥**

**अर्थ**—आता ज्याच्या कुळांत भरद्वाज,गौतम इत्यादि अनेक वंशमालिका उत्पन्न झाल्या आहेत, असा अग्नीचा पुत्र जो विद्वान् अंगिराऋषि त्याचा वंश सांगतो. आंगिरसदेव बाण, धनुष्य धारण करणारे आहेत. मरीचिकन्या सुरूपा,कर्दम कन्या स्वराट्, मनूची कन्या पथ्या या तिघी अथर्वाख्य अंगिराऋषीच्या स्त्रिया होत. अंगिराऋषीपासून त्याच्या सुरूपास्त्रीचेठायीं बृहस्पति आणि स्वराट्स्त्रीचेठायीं गौतम, अबंध्य, वामदेव, उतथ्य आणि उशिज. पथ्यास्त्रीचेठायीं धिष्णु संवर्त, विचित, अयास्य, अशिज, दीर्घतमा, सुधन्वा, हे पुत्र उत्पन्न झाले. पुढें आणखी, उतथ्यऋषीपासून शरद्वान, वामदेवापासून बृहदुकथ्य आणि सुधन्वा ऋषीपासून ऋभु, विभ्वा आणि वाज असे तीन ऋभुपुत्र उत्पन्न झाले हे ऋभु रथादि करणारे रथकाराख्य देव जाणावे; तथापि यांची ऋषींतही गणना आहे. बृहस्पतीपासून भरद्वाज उत्पन्न झाला. पूर्वोक्त आंगिरस देव बृहस्पतीपेक्षां वडील आहेत. या वायुपुराणादि प्रमाणावरूनच सायणाचार्यांनीं

( **उदतस्वमा अकृणोतन** ) या ऋग्वेदीमंत्राच्या भाष्यांत- " **पुराणप्रसिद्धान् आंगिरसस्य सुधन्वनःपुत्रान् कर्मणादेवत्वं प्राप्तवंतऽऋभून् स्तुत्वा** " असें ह्मटलें आहे." एवंच रथकारसंज्ञक ऋभुदेव हे सप्रमाण प्रसिद्ध पणें ब्रह्मकुलोत्पन्न असल्यामुळें त्यांचे आधानकर्ते रथकार ब्राह्मणच आहेत. हें " **सौधन्वनानांहीनत्वात्** " असें भ्रांतीनें ह्मटलेल्या कर्कदेवयाज्ञिक, पार्थसारथिमिश्रादिकांसही निःशंकपणें संमत आहे, असें समजावें.

येथें कदाचित् कोणी अशी शंका घेतील कीं, जसे ऋभु ब्रह्मकुलोत्पन्न असून रथादि कर्ते शिल्पी आहेत तसा त्यांचा पिता आंगिरस सुधन्वा हाही रथशस्त्रास्त्रादि कर्म कुशल असला पाहिजे. तर सुधन्वा हा रथादि शिल्पज्ञ आहे हें त्याच्या सुधन्वा (**सुष्ठु धन्व धनुष्य तदुपलक्षणं रथबाणादि कर्म रूप शास्त्रं यस्यस इति** ) अश्या नामावरूनच स्पष्ट आहे, इतकेंच नव्हे,तर सुधन्व्याचा पिता अंगिरा ऋषि हाही रथादि शिल्पवेत्ता आहे हे पूर्वी उत्तरार्ध पृष्ठ ८०-८१ मध्यें वर्णिलें असून प्रसंगवशात् आणखी प्रमाणें आहेत **भारते उद्योग पर्वणि अध्याय १८ ततःसभगवांस्तत्र अंगिराःसमदृश्यत ॥ अथर्ववेदमंत्रैश्च देवेंद्रं समपूजयत् ॥ ५ ॥ ततस्तुभगवानिंद्रः संहृष्टःसमपद्यत ॥ वरंचमददौ तस्मै अथर्वांगिरसे तदा ॥ ६ ॥ अथर्वांगिरसो नामवेदोऽस्मिन्वैभविष्यति ॥ उदाहरणमेतद्धि यज्ञभागंच लप्स्यसे ॥**

**अर्थ**–इंद्र सिंहासनारूढ झाल्यानंतर अंगिरा ऋषीनें अथर्ववेद मंत्रांनीं इंद्राची स्तुति केली. तेणेंकरून इंद्र संतुष्ट होऊन अंगिरा ऋषीस अथर्वांगिरस असें नाम देता झाला, या मंत्रस्तोमाचे ठायीं अथर्वांगिरस ( आथर्वण नामक ) चतुर्थवेद प्रसिद्ध होईल. आणि तूं उत्तर दिशेचा आचार्य होऊन तुला यज्ञभाग प्राप्त होईल यावरून अंगिराऋषीस आथर्वण नाम असून त्याच्या आथर्वणवेदासही ( अथर्वांगिरसी ) असें ह्मणतात. प्रमाण ( **अथर्वांगिरसीनामस्वशिष्यायसुमंतवे** ॥ ५३ ॥ **भाग० स्कं० १२ अ० ६** यावरून स्पष्ट आहे कीं जर अंगिरा ऋषि आथर्वण वेदाचा कर्ता आहे तर तो शिल्पाचार्य जाणावा कारण, " **आथर्वणस्योपवेदःशिल्पवेदःप्रकीर्तितः ॥ तस्मादाथर्वणाःप्रोक्ताःसर्वेशिल्पिनएवच ॥ पंचालानांच सर्वेषां शारवास्यात् शौनकायनी ॥ कौसलागम अध्याय ३** यावरून पंचालब्राह्मणांचा आथर्वण वेद आणि शारवा शौनकायनी आहे तथापि (' **बव्हृचःशौनकोऽब्रवीत्, भा. स्कंध १** ) यावरून शौनकऋषि ऋग्वेदद्रष्टा ऋग्वेदी असल्यामुळें, ऋक्संहितोद्धृत आथर्वण असल्यामुळें, " **सामगाथर्वणैःस्वगृह्यानुपलंभबव्हृचोक्तरीत्योपनयनादिसंस्काराः पंचमहा यज्ञादयश्चकार्याः ॥ धर्माब्धिसारे ३ परिच्छेदेपूर्वार्धे ॥** " यावरून विश्वकर्मसंतति पंचाल ब्राह्मण ऋग्वेदी आश्वलायन शाखेनें नित्य नैमित्तिक कर्में करितात )" एवंच ऋभूंचा पितामह अंगिरा ऋषि सर्वशिल्पकर्मकुशल असून त्याचा पुत्र सुधन्वा ऋषि हाही रथशस्त्रास्त्रादि शिल्पविद्येंत किती निपुण आहे, याविषयी आपण शोधकरूं गेलों तर वाल्मीक रामायणामध्यें सर्ग १०० श्लोक १४ **इष्वस्त्रवरसंपन्नमर्थशास्त्रविशारदम् ॥ सुधन्वानमुपाध्यायंकच्चित्त्वंतातमन्यसे ॥**

अर्थ—भरत रामाचे भेटीस चित्रकूटपर्वतावर आल्यावर रामांनीं भरतास अयोध्येंतील सर्व मंडळी सुखी आहेत? असे प्रश्नकरीतकरीत ह्मणाले बा भरता, आपणाला बाणशस्त्रास्त्रादि धारण, रथारोहणादि विद्या शिकविणारा, रथशस्त्रास्त्रादि अर्थशास्त्र ( शिल्पशास्त्र ) कुशल जो सुधन्वा ऋषि उपाध्याय तो सुखी आहे ? यावरून श्रीरामचंद्राचा उपाध्याय जर सुधन्वा आहे तर तो रथादि आथर्वण शिल्पांत परिपूर्ण आहे, हें उघड आहे.

शंका—त्रैवर्णिकास जसीं मंत्रादि लिंगें आहेत तसीं रथकारास लिंगें नाहींत.

उत्तर—रथकार जर त्रैवर्णिक आहे तर त्रैवर्णिकास जी गायत्र्यादि मंत्रलिंगें आहेत तींच रथकाराची जाणावी. यवाग्वादि अन्य लिंगेंही मंत्रलिंगानुरूपच असतात. ऋभुनामक रथकार देवतांची सूक्तें ब्राह्मणजाति लिंगज्ञापक गायत्री छंदांतही आहेत. पहा ऋग्वेद मंडल १ अनुवाक ५ यांतील २०वें ऋभु देवताचे सूक्त "अथंदेवा इत्यस्य अष्टर्चस्य सूक्तस्यमेधातिथिःकाण्व ऋभवो गायत्री" या सर्वानुक्रमावरून ऋभुदेवताक सूक्ताचा जर गायत्री छंद आहे तर त्या ऋभूंचें आधान करणाऱ्या त्रैवर्णिक रथकाराची जाति ब्राह्मण आहे. कारण "गायत्र्या ब्राह्मणस्य परिदध्यात्त्रिष्टुभा राजन्यस्य जगत्यावैश्यस्येति । हि० सूत्र आहे.

शंका—ब्राह्मणादि तिन्ही वर्णांतीलच जर रथकार आहेत तर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांचे अनुक्रमें भृगु, आंगिरस आदित्य, वरुण, इंद्र, मनु ह्या देवता आणि वसंत, ग्रीष्म, शरदृतु हे विहित आधान काल सांगितले असून त्याच त्रैवर्णिक रथकारा करितां आणखी ऋभुदेवता आणि वर्षा ऋतु निराळे सांगण्याचें कारण काय ?

उत्तर—ज्याला ज्या कर्माची इच्छा असेल त्यानें त्या कार्याची जी विहित देवता असेल तिची उपासना केली पाहिजे; ह्मटलें आहे श्लोक भागवत स्कंध २ अ० ३ (ब्रह्मवर्चसकामस्तु यजेतब्रह्मणस्पतिं ॥ इंद्रमिंद्रियकामस्तु प्रजाकामःप्रजापतीन् ॥ अर्थ—ब्रह्मतेजाची इच्छा असेल तर वेदपतीप्रत यजनकरावें. गृहस्थाश्रमांत गृहादि शिल्प जन्य इंद्रिय सुख भोगाची इच्छा असेल. तर इंद्राचें यजन करावें. प्रजा उत्पन्न होण्याची इच्छा असेल तर त्वष्टा, विश्वकर्मा, अंगिरा, भृगु कश्यप, कर्दम इत्यादि एकवीस प्रजापति देवता आहेत त्यांतून आपल्या कुल सांप्रदायाचा जो प्रजापति असेल त्याचें यजन करावें. याचप्रमाणें ज्याना रथ यज्ञपात्रादि. पवित्र शिल्पकर्माची इच्छा असेल त्यांनीं शिल्पविद्या कुशल स्वर्गस्थ जे ऋभुदेव त्यांचें यजन करावें; मग तो शिल्पकर्ता यजमान ब्राह्मण असो; अगर क्षत्रिय असो. मात्र त्रैवर्णिक ( ब्रह्मकर्मसमर्थ असला पाहिजे. ऋभुदेव हे रथादि शिल्प कौशल्याभिज्ञ आहेत हें प्रसिद्धच आहे. श्रुति प्रमाणही—आहे—

ऋ. अ. १।७।३२ तक्षन्रथंसुवृतंविद्मनापसस्तक्षन्हरींइंद्रवाहावृषण्वसू ॥ तक्षन्पितृभ्यामृभवोयुवद्वयस्तक्षन्वत्सायमातरंसचाभुवं ॥ १ ॥

अर्थ—( सायणाचार्याच्याभाष्यावरून ) कुत्सऋषि ह्मणतो, ऋभुदेव मोठे शिल्प-

कौशल्य प्रवीण आहेत. या ऋभूंनीं अश्विनीदेवांस उत्तम फिरणारा रथनिर्माण करून दिला, इंद्रास दिव्य पिवळ्या रंगाचे दोनघोडे निर्माण करून दिले. आपल्या वृद्ध मातापितयास तरुण केले. वासराकरितां गाय निर्माण केली. एवंच ऋभुदेव, देवांचे मोठेकारागीर शिल्पी आहेत. तसेंच ( **एकंचमसंचतुरःकृणोतन** ) ऋ अ.२।३।४ या श्रुतीवरून ऋभूंनीं यज्ञपात्रेंही निर्माण केली आहेत. या ब्रह्मकुलोत्पन्न आंगिरसऋभुदेवांनीं शिल्पवेदाचें अध्ययन विश्वकर्म्याजवळ केलें अर्थात् ऋभूंचा गुरु श्रीविश्वकर्मा आहे यास प्रमाण—

**श्रुति ऋ. अ. ३ अध्याय ७ वर्ग २ ऋक् ६ ज्येष्ठआहचमसाद्वाकरेतिकनीयान्त्रीनृकृणवामेत्याह । कनिष्ठआहचतुरस्करेतित्वष्टऽऋभवस्तत्पनयद्वचोवः ।**

**भाष्यं**—एकंचमसंचतुरःकृणोतन ऋ १।१६१।२ इतियदादेवदूतोऽग्निर्ऋभूनाहदेवत्वप्राप्त्युक्थेन तदातेषुमध्ये देवत्वप्राप्त्युक्त एकोज्येष्ठऋभुरितरावाह किमिति उच्यते । चमसाद्वाकरेति । एकमेवसंतं द्वौ कृणवामेति । कनीयान् तदनंतरोविभ्वात्रीनृकृणवाम करवामेत्याह । तदवरःकनिष्ठो वाजश्चतुरःकर। चतुर्थाकरवामेत्याह । तदेवचतुष्करणरूपं हे ऋभवः त्वष्टायुष्मद्गुरुःपनयत् अस्तौत् । अंगीचकारेत्यर्थः ॥

**अर्थ**—ज्याकाळीं देवानीं पाठविलेला अग्नि ऋभूंना ह्मणाला कीं, यज्ञपात्रें केल्यानें देवत्वप्राप्त होतें तेव्हां ज्येष्टऋभु इतर दोन ऋभूंस ह्मणाला आपण या एका चमसांचीं दोन पात्रें करूं नंतर विभ्वा ह्मणाला आह्मीं तीन पात्रें करूं. नंतर वाजनामक कनिष्ठ ऋभुह्मणाला चार करूं. एवंच हे० ऋभुदेवहो या पात्रचतुष्करणरूप कर्मकौशलास पाहून तुमचा गुरु त्वष्टा ( विश्वकर्मा ) संतोष पावता झाला. तसेंच विश्वकर्म्याचे शिष्य ऋभुदेव आहेत यास आणखी प्रमाण—

**श्रुति ऋग्वेद अ. ८ अ. १ व. १४।१० सतोनूनंकवयःसंशिशीतवाशीभिर्याभिरमृतायतक्षथ । विद्वांसःपदागुह्यानिकर्तनयेनदेवासोअमृतत्वमानशुः ॥**

**भाष्यं**—हे कवयो मेधाविनस्त्वष्टुर्मम शिष्या ऋभवः सतः । संत इत्यर्थः । प्रशस्तायूयं नूनमिदानीं संशिशीत । अत्यर्थं तीक्ष्णीकुरुतवाशीः । याभिर्वाशीभिः पात्राण्यमृतायसोमाय । तत्पानायेत्यर्थः । यद्वायुष्माकममृतत्वाय तदर्थंतक्षथ । संपादयथ । हे कवयोविद्वांसो यूयं गुह्यानि गोपनीयानि पदापदानि निवासस्थानानि कर्तनकुरुत । येनस्थानकरणेन देवासो देवायूयममृतत्वमानशुः । प्राप्तायूयं । एवंस्वशिष्यानाह ॥

**भावार्थ**:—यांतही यज्ञपात्रसंबंधींच विषय असून विश्वकर्मा ह्मणतो, तुह्मी ऋभुदेव माझे शिष्य आहात; त्यापेक्षां, आपण यज्ञपात्रें तीक्ष्ण परशूकरून तयारकरा. वगैरे अभिप्राय आहे. एवंच ऋभुदेव विश्वकर्माचे शिष्य जर आहेत तर ते शिल्पीच जाणावे ह्मणून ऋषींना ज्या ज्या काळीं रथयज्ञपात्रादि शिल्पकर्मे करण्याचा प्रसंग येत असे, तेव्हां तेव्हां बहुतकरून आंगिरस कुळांतील ऋषि ऋभुसूक्तांनीं त्यांचें यजन करीत असत ह्मणून ज्यांनीं अखंड शिल्पकर्मकरण्याचें स्वीकारिलें आहे, अश्या विश्वकर्मसंततीयादि ब्राह्मण जातीय रथकारांना ( **ऋभूणांत्वा० रथकारस्य** ) या श्रुतीनें

ऋभुदेवताक आधानाची दीक्षा घ्यावयास सांगितली आहे. आतां ब्राह्मणादिकांस व संतादिकाल सांगितला असून आणखी वर्षाऋतु कां सांगितला असा प्रश्न आहे, तर वर्षाऋतु हा ऋभुदेवतासंबंधीच आहे. एक उदाहरण '**शरदिवाजपेयेनयजेतब्राह्मणोराजन्योवृद्धिकामः**' या सूत्रावरून ब्राह्मणाचा आणि क्षत्रियाचा वसंत आणि ग्रीष्मऋतु असूनही जसा त्यांना वृद्धिकामनेस्तव वाजपेययज्ञ शरदृतूंतच कर्तव्य आहे तसेंच ज्यांना ऋभुदेवताक आधान सांगितलें आहे, त्यांनावर्षाऋतूंचविहित आहे. व र्षाऋतूमध्येंचऋभुदेवता संतोष पावतात. वर्षाऋतुऋभुसंबंधीं आहे यासप्रमाण श्रुति ऋग्वेद अष्टक २ अ. ३ **वर्ग ६ उद्वत्स्वस्मा अकृणोतनातृणंनिवत्स्वपाःस्वपस्ययानरः ॥ अगोह्यस्ययदसस्तनागृहेतदद्येदमृभवोनानुगच्छत ॥**

**भाष्यं**—पुराण प्रसिद्धान् सुधन्वनःपुत्रान् कर्मणादेवत्वंप्राप्तवंतऋभूंस्तुत्वावेदप्रसिद्धच्यासूर्यरश्मिरूपानिदानींस्तौति । हे ऋभवःउरुप्रभूतंभासमाना ऋतेनादित्येनभासमानावा ऋतेनोदकेनोदकार्थमुत्पन्नावा ॥ रश्मीनामुरुभासमानं प्रसिद्धं तथादित्यादुत्पत्तिरपि । उदकार्थंभवनमपि । रश्मीनां धर्मकालेभूमिगतंसारमादायपुनर्वर्षाकालेप्रवर्षंतीतिप्रसिद्धं । आदित्याज्जायतेवृष्टिरिति शास्त्रात् । तथाविधानरः प्रकाश वृष्ट्युदकादेर्नेतारोयूयं सुद्वत्सून्नतेषु प्रदेशेषुमेर्वादिषु तृणव्रीहियवादिरूपमस्मै प्राणिजातायोपकारार्थं अकृणोतन कृतवंतःस्थ।उपसर्गाच्छंदसिधात्वर्थे वति । तथानिवत्सुप्रवणदेशेष्वस्माएवापउदकान्यकृणोतन अकुर्वत।किंस्वभोगार्थं नेत्याहस्वपस्ययाशोभनकर्मेच्छयाशोभनकर्मभिः कृतामिति यथा यजमानाःस्तुवंति तदिच्छयेत्यर्थःकिंच यूयमगोह्यस्याग्राह्यस्यादित्यस्य गृहे मंडले यद्यावत्कालमस्तनसुप्तवंतःस्थ । रात्रौनिर्व्यापारास्तिष्ठथ । षसस्वप्नेअस्माल्लङि. पूर्ववत्तस्य तनवादेशः । अदादित्वाच्छपोलुक् तत्तावंतंकालमद्यहनीदमिदानीं नानुगच्छथ । अनुसृत्यनगच्छथ । यावंतं कालं रात्रौ सूर्ये निगूढा वर्तध्वेतावंतमेवकालमहन्यपि नानुगच्छथेत्यर्थः ॥ यद्वा अगोपनीयस्य तस्यगृहेऽतरिक्षे यद्यावंतं कालनसस्तनवृष्टिमदत्वास्वापमकुरुत । तत्तावंतं कालमद्येदानीं वर्षसमये इदं सस्याभिवर्ध्दनवृष्टिप्रवाहरूप कर्मेनानुगच्छथ अनुसृत्यनप्राप्नुथ । यावंतंकालंविवर्षथ । तावंतमेवकालंप्रवर्षथेत्यर्थः

या मंत्राचा **भावार्थ** असा आहे कीं, आंगिरस कुत्सऋषि यजमान मेघवृष्टि होण्याकरितां ऋभूंची प्रार्थना करितो-हे ऋभुदेवहो, तुह्मी आदित्यरश्मिरूपानें पृथ्वींतील सर्वत्र उदकांला धारण करून प्रतिवर्षीं वर्षाऋतुकांली पर्वतादि उंचप्रदेशावर उदकवृष्टि करून तद्द्वारा तृणधान्यादिक उत्पन्न करीत असता, व तेणेंकरून आह्मा सर्वप्राणिमात्रावर तुमचे मोठे उपकार आहेत तसेंच तुह्मी या उतरत्या भूमिप्रदेशावरही वृष्टि करून उदकांची पुष्कळ समृद्धि करिता झालात. तर आतां तुह्मीं ग्रीष्मर्तूत जावत्काल पर्यंत आदित्यमंडलरूपगृहांत उष्णतेजानें वृष्ट्युदकास धारण करून राहाता झाला. तावत्कालपर्यंत आज या वर्षाऋतूंत धान्यसमृद्धि होईल इतकी वृष्टि करा.

यावरून स्पष्ट आहे कीं, वर्षाऋतूचे प्रवर्तक ऋभुदेव आहेत. याचप्रमाणें आणखी **ऋक् १२ वी संमील्ययद्भुवनापर्यसर्पतक्वस्वित्तात्यापितरांवआसतुः ॥**

अशंपतयः करस्नंव आददेयः प्राब्रवीत्मोतस्माऽअब्रवीतन ॥१२॥

**भाष्यं**---हे ऋभवो रश्मयो यूयं यद्यदा भुवना भूतजातानि संमील्य संमीलनं कृत्वा जलधरपटलैराच्छाद्य पर्यसर्पत परितः सर्पणं कुरुथ । वर्षयेत्यर्थः ॥ तात्यातातोतायमाने वष्टयुदके यद्वातात्यातासु वर्षासु छांदसस्त्यप्रत्ययोदकारस्या त्वंच । अथवापितृविशेषणं । तात्यातत्कालीनौ पितरा जगतः पालकौ सूर्यचंद्रमसौ क्वस्विदासतुः । कुत्र खलु तिष्ठतुः । अहोरात्राविभागेन प्रवर्षयथेत्यर्थः । किंच ईदृशान्वोयुष्मान्यः कोपिवृष्टिप्रतिबंधकारी राक्षसादिः करस्नं बाहुनामैतत् । करस्नौबाहू इत्युक्तत्वादत्रत्वकारांतं युष्मदीयं हस्तमाददेगृण्हाति प्रतिरोधंकरोति तमशपत नाशयथ यश्चप्राब्रवीत्प्रकर्षेण वाचानिरुंधे । तस्मैप्रोप्रैवाब्रवीतन । प्रकर्षेणभर्त्सनादि शब्दं कुरुथ । यद्वायोनूनं स्तौतितं प्रकर्षेण स्तुतेत्यर्थः इति ॥

या श्रुतीचाही **भावार्थ** असाच—हे ऋभुदेवांनो तुम्ही सूर्यरश्मिरूपानें जेव्हां सर्व भुवनाप्रत मेघपटलांनीं आच्छादून चहूंकडून एकसारखी जलवृष्टि करिता, त्या वर्षाऋतुकालीं; जगाचे मातापिता जे सूर्यचंद्र ते कोठें असतात, हें समजत नाहीं. कारण तुम्हीं वर्षाकालीं दिवसरात्र सारखी, मोठी वृष्टि करितां. तसेंच वृष्टीचा प्रतिबंध करणारा जो कोणी राक्षसादि त्याचाही नाश करण्यास तुम्ही समर्थ आहात. वाचेनें निरोध करणाराची निर्भर्त्सना करा आणि जो वृष्टीची प्रशंसा करील त्याची यशोवृद्धि करा. इत्यादि या मंत्रांत असलेल्या ऋभूदेवस्तुतीचें प्रमेय हेंच कीं,वर्षाऋतूचे स्वामी ऋभुदेव आहेत. आणखी प्रमाण (वर्षाऋतूंत केलेलें हवन ऋभूला प्रिय होतें याविषयीं ) यजुर्वेद अष्टक ७

प्रपाठक ५ अनुवाक ७ पन्नाशी ३ विश्वेषांवेदेवानामृभुमतां तृतीयसवनं यद्वैश्वदेवं द्वादशकपालं निर्वपंति ॥ अनु० १३ प. १ अग्नये गायत्राय० वासंतायष्टाकपालइंद्रायत्रैष्टुभाय० ग्रैष्मायैकादशकपालो विश्वेभ्योदेवेभ्योजागतेभ्यः सप्तदशेभ्योवैरूपेभ्योवार्षिकेभ्योद्वादशकपाल इत्यादि ॥

या श्रुतीचा **भावार्थ**---असा कीं, विश्वेदेव आणि ऋभुदेव यांजकारणें सायंकालीन होमाचेवेळीं द्वादशकपालपात्रांतून संस्कृत झालेल्या पुरोडाशानें ( होमद्रव्यानें ) हवन करावें. ( पुढें हीं आणखी ) अग्निदेवतेला गायत्रीछंदोमंत्रांनीं, त्रिवृत्स्तोमानें ( सामविशेषानें ) वसंतऋतूत आठ पात्रांतून संस्कृत झालेला पुरोडाशहवन करावा. इंद्रदेवतेला त्रैष्टुभमंत्रांनीं पंचदशस्तोमांनीं ग्रीष्मऋतूमध्यें अकरापात्रांतून संस्कृत झालेला पुरोडाश, विश्वेदेव आणि ऋभुदेव यांना जगतीछंदोमंत्रांनीं सप्तदशस्तोमांनीं वर्षाऋतूंमध्यें द्वादशकपालपात्रांतून संस्कृत झालेला पुरोडाश हवन करावा. यावरून वाचकांस स्पष्ट समजेल कीं, ऋभुदेवताक आधानास श्रुतीनें वर्षाऋतु सांगितला तो योग्य आहे. अर्थात् द्विजाला जर निरंतर शिल्पकर्मरथकार होणें असेल तर ऋभुदेवताक वर्षाऋतूंतच आधान स्वीकारिलें पाहिजे हा ऋभुदेवतांचा वर्षाऋतू जरी विशिष्ट आ-

धानकाल आहे तरी त्रैवर्णिकांच्याच आधान कालमर्यादेंत आहे. यास प्रमाण पूर्वोक्त (**वर्षारथकारस्य**) हें हिरण्यकेशिसूत्र असून आणखी प्रमाण **बौधायनसूत्रेनारायणी येवृत्तौ—वसंतेपर्वणि ब्राह्मण आदधीत । इदमपिसूत्रं । अर्थतएवंभवति । अनेनवसंते ब्राह्मणगुणकमाधानंविधीयते ॥ ग्रीष्मवर्षाशरत्सुक्षत्रियवैश्योपकृष्टाः ॥ वैश्यस्तक्षकर्मोपजीवीउपकृष्टइत्युच्यते । त्रीण्याधानानिविधीयते । ग्रीष्मेक्षत्रिय गुणकं ।वर्षासुवैश्यगुणकंच शरादिउपकृष्टगुणकंच ॥** या सवृत्ति बौ० सूत्रावरून आणि **वसंतेब्राह्मणोब्रह्मवर्चसकामः ।ग्रीष्मेक्षत्रियःश्रीकामः । वर्षाःप्रजापशुकामवैश्यरथकृतां ॥** या कात्यायनसूत्रावरून वर्षा आधानकाल त्रैवर्णिकांतर्गतच आहे. या प्रमाणें वर्षाऋतूचे त्रैवर्णिकरथकाराधिकारित्व सप्रमाण सांगितलें कोणी ह्मणतील कीं हें ऋभुदेवताक वार्षिक ( वर्षार्तुसंबंधीं ) आधान जरी त्रैवर्णिकाचें आहे तरी रथादि शिल्पसंबंधी असल्यामुळें तदुपासक पंचालरथकार अल्पज्ञवर्गांत गणण्यास योग्य असतील; तर असें ह्मणूनये कारण ऋभुदेवताक आधानाधिकारी रथकारब्राह्मण सुशील विद्वान् परमपूज्य आहेत ह्मणूनच, वेदामध्यें रथकारांना श्रुतीमध्यें कवि, मेधावी, ऋत्विक् अशीं नामेंआहेत प्रमाण—

**श्रुति-यजुर्वेद अ० ३ प्र० १ अनु०९ प० २ इदंतृतीयꣳसवनंकवीनामृतेनयेचमसमैरयंत॥ तेसौधन्वनाःसुवरानशानाःस्विष्टिंनोऽअभिवसीयोनयंतु ॥**

**भाष्यं**—कवीनां ( विदुषांऋत्विजां) संबंधि यदिदंतृतीयंसवनं तदिदं देवाःवसीयः वसुमत्तरं कृत्वानःअस्माकं यास्विष्टिं शोभनोयागःतांस्विष्टिं अभिअभि लक्ष्यनयंतुप्रापयंतु।कीदृशादेवाः तदुच्यंते।चमसं चमसगणं । ऐरयंतः प्रेरितवंतः । तेदेवाः सौधन्वनः सुधन्वनइंद्रस्य संबंधिनःऋभुनामानः सुवरानशानाः स्वर्गप्राप्नुवंतः तादृशादेवानयंतु—इत्यन्वयः ॥

**अर्थ**—विद्वान् ऋत्विजांनीं करावयाच्या या ऋभुसंबंधीं तृतीयसवनाप्रत (तिसऱ्या, सायंकालीन होमाप्रत ) अतिशय संपत्तियुक्त करून स्वर्गीं प्राप्त झालेले,चमसगणाप्रत-पाठवून देणारे, इंद्रसंबंधीं ऋभुनामकदेव आमच्या सुशोभित यज्ञार्थ चमसांचे समुदाय पोंहोचवोत.

यांत रथादिशिल्पकर्ते रथकारब्राम्हण यज्ञपात्रें निर्माण करण्याकरितां तृतीयसवनगत मंत्रांनीं ऋभूंची प्रार्थना करितात. यांत ऋभुदेवताक हवनकर्त्या रथकारांस विद्वान् ऋत्विज ही संज्ञा नित्य अग्निहोत्रित्व असल्याचें सूचवितें. "आणि या श्रुतींत जरी तृतीयसवन होम ऋभूसंबंधीं असें ह्मटलें आहे तथापि तृतीय सवनांतच ऋभुदेवांस हविर्भाग असतो. बाकींच्या सवनांत नाहीं असें समजूं नये. तिन्हीही सवनांत ऋभूना सोमपान आहे. प्रमाण—

**श्रुति—ऋग्वेद अ० २ । ६ । ५ इदमुदकं पिबतेत्यब्रवीतनेदंवाघापिबतामुंजनेजनं ॥ सौधन्वनायदितत्थेवहर्यथतृतीयेघ्वासवनेमादयध्वै ॥**

**भाष्यं**—अत्रेदमुक्तं भवति प्राप्तदेवत्वा ऋभवः आत्मानंप्रति प्रथमेसवनेसोमः पीयतां द्वितीयसवनेवातृतीयेवा पीयतामित्यवदानिति। तत् तदपिनेवहर्यथनैवकामयध्वें तर्हि तृतीयसवनेघमादयध्वें सोमपानेन आनंदिताभवत ॥

यावरून तृतीयसवनाख्य सायंकालीन होमसंबंधींकर्म रथकारांचे गृहीं केल्याचें एखादें प्रत्यक्ष श्रुतिप्रमाण कोठें आहे, असें ह्मणाल तर

**अश्वमेध**—यज्ञप्रकरण श्रुति अष्टक ३ प्रपा० ८ अनु० १२ **ईश्वरोवाअश्वःप्रमुक्तःपरांपरावतंगंतोः । इहधृतिःस्वाहेहविधृतिःस्वाहेहरंतिःस्वाहेहरमतिःस्वाहेतिचतुर्षुपत्सुजुहोति ।**

**भाष्यं**—यदुक्तंसूत्रकारेण " रथकारकुलेवसति भवतीहधृतिः स्वाहेति सायमश्वस्य चतुर्षुपत्सुचतस्रोधृतीर्जुहोति तदिदंविधत्ते ईश्वरोवाअश्वः प्रमुक्त० ॥ स्वेच्छासंचाराय प्रमुक्तोऽश्वः परांपरावतं अत्यंतदूरंगंतोः ईश्वरोगंतुं समर्थः अतो रात्रौ रक्षकेषुराजपुत्रेषु यत्र क्वापिगमिष्यतीतिभीत्यासायंकालेतमश्वं रथकारगृहेस्थापयित्वा तदीयेषुचतुर्षुपदेषुचतुर्भिर्मंत्रैर्जुहुयत् ।

**अर्थ**—अश्वमेध यज्ञाच्या आरंभापासून समाप्तिहोईपर्यंत यज्ञकर्त्या यज्ञियाभिमंत्रित अश्वाचें राजपुत्रांनीं रक्षण करीत असतांही कदाचित् तो अश्व कोठें जाईल या भीतीनें त्या अश्वास रथकाराचे गृहांत स्थापन करून सायंकालीं त्याच्या चहूंपादांच्या निक्षेप स्थानीं, ॐ **इहधृतिःस्वाहा** । इत्यादि चारमंत्रांनीं सांगोपांग होम करावा, तेणेंकरून तो अश्व जरी कोठें गेला तरी सायंकालीं रथकाराचेंच घरीं येतो. या श्रुती वरून स्पष्ट आहे कीं जर विश्वकर्मसंततीय रथकाराचे घरीं वैदिक होमकरण्यास सांगितलें आहे तर ( **होतव्यंदीक्षितस्यगृहाऽ ३ इ** ) **अरण प्रपा० ५ अनु० २** या श्रुती वरून, हवन करणें झाल्यास दीक्षिताचे ( अग्निहोत्रीब्राह्मणाचे ) घरीं करावें अर्थात् विश्वकर्मसंततीयरथकार अपरपर्यायनामपंचालस्वर्णकार नित्य अग्निहोत्रीब्राह्मण आहेत आणि ते आंगिरस असल्यामुळें त्यांचेकुलांत बार्हस्पत्येष्टि, वाजपेयेष्टि झालेलीआहे. एवंच ऋभुदेवता आणि वर्षाऋतुआधानकाल ब्राह्मणजातीयरथकारांचाच आहे हें निःशंक जाणावें.

**शंका**—( वर्षा० ऋभु० ) आधानाधिकारी रथकारासजर त्रैवर्णिक संज्ञा आहे तर विश्वकर्मसंततीयब्राह्मण रथकारच कां समजावेत तिन्हीवर्णांत रथकारआहेत असें कां समजूं नये?

**उत्तर**—जरी या ब्राह्मणजातीय रथकारास सूत्रव्याख्याकारांनीं त्रैवर्णिक असी सामानाधिकरण्य संज्ञादिली आहे, तथापि पूर्वोक्त अन्वयावरून त्रैवर्णिक या पदानें ब्राह्मणचसमजला जात आहे. आणखी, जेथें समर्थसमुदायाचे सामान्य नाम सांगितलें असून त्यापैकीं अमुकवर्ग असा विशेष सांगितला नसतो, तेथें त्यावर्गापैकीं आदि किंवा मुख्य पदार्थ जाणावा; उदाहरणें—( **यत्रदिङ्नियमोनास्तितत्रप्राचीसमाहृता ॥ आचारार्क** ) ह्मणजे जेथें दिशेचा विशेष सांगितला नाहीं, तेथें पूर्वदिशा घ्यावी.

( **आश्वलायनपरिशिष्टेपि–अनादेशे आज्यं** ) ह्मणजे जेथें हवनास होमद्रव्य अमुक, असें सांगितलें नाहीं तेथें होमद्रव्यामध्यें मुख्य जें घृत तेंच घेतात. तसेंच जेथें ' त्रैवर्णिक, अशा वैदिकधर्मी वर्णाचा अविशेष असेल **तेथें** त्या त्रैवर्णिकांत वर्णमुख्य जो ब्राह्मण तोच समजावा, यास प्रत्यंतर प्रमाण- " **ब्रह्मक्षत्रियविट्शूद्रा वर्णास्त्वाद्यास्त्रयोद्विजाः ॥" मनुस्मृ०॥** यांत ब्राह्मण क्षत्रिय आणि वैश्य या प्रथमच्या तीनवर्णासही द्विज अशीसंज्ञा आहे; तथापि " **द्विजांत्संतोषयेत्सुधीः** " इत्यादि शतशःग्रंथोक्तीवरून आणि रूढीनें ही द्विजपदाने ब्राह्मणच समजला जातो तसेंच त्रैवर्णिकरथकार, या अविशेषपदानें फक्त सर्वप्रसिद्ध विश्वकर्मसंततीय ब्राह्मणरथकारच समजला जातो कारण त्रैवर्णिकरथकार या पदावरून ब्राह्मणादि तिन्हींवर्णांतही रथकार असावेत, अशा अनेकार्थी अनेकशक्ती मानण्यांत गौरव असल्यामुळें ( **विश्वकर्मामहाभागस्तस्यांजज्ञेप्रजापतिः ॥ कर्ताशिल्पसहस्राणां० । पंचालास्ते सदापूज्याःप्रतिमाविश्वकर्मणः ॥ अनवस्तेरथ०** ) या श्रुतीनें रथकारपद विश्वकर्मसंततीय पंचालब्राह्मणार्थी मानण्यांत लाघव आहे. त्यांतही विश्वकर्मज पंचालब्राह्मण शिल्पींचेठायीं अन्वयाची उपपत्ति आणि सधर्मसमुदायत्व असल्यामुळें रथकारब्राह्मणांचेठायीं मुख्यावृत्ति आहे; म्हणून " **गंगायांघोषः**,– या प्रमाणें विश्वकर्मसंततीय रथकारापरपर्यायनाम पंचालब्राह्मणांचेठायीं गौणत्व नाहीं. कोणी ह्मणतील कीं, विश्वकर्मा हा देवांचा रथकार असल्यामुळें त्याचा संबंध मनुष्यजातीयाकडेस कसा लागतो? तर ही शंका घेऊं नये कारण ( **ऋषीणांदेवताःपुत्राः पितरोदेवसूनवः । ऋषयोदेवपुत्राश्चइतिशास्त्रविनिश्चयः ॥ २० ॥ वायुपु०उत्तरभागे अ० १** ) **अर्थ**—ऋषींचे पुत्र देव झाले आहेत आणि देवांचे पुत्र पितर आहेत. तसेंच देवांचे पुत्र ऋषि आणि ऋषींचे पुत्र अथवा ऋषि हे मनुष्य प्रजा आहे म्हणून ( **ब्रह्मादेवता, बृहस्पतिर्देवता, यजु० अ० ४ । ३ । ३** ) यानें ब्रह्मा आणि बृहस्पति हे देव किंवा देवपुरोहित असून त्यांच्या वंशांतीलच आंगिरस, भार्गव, बार्हस्पत्य गोत्रोद्भव जसे मनुष्याचे उपाध्याय आहेत तसेंच विश्वकर्मा, ऋभु हे देवांचे शिल्पीअसून त्यांचेच वंशातील सानगादिगोत्रोद्भव पंचालरथकार मनुष्याचे शिल्पी आहेत. जरी विश्वकर्मा हें पद व्यक्तिवाचक आहे तरी विश्वकर्मा हा अनंत शक्तीला धारण करणारा प्रजापति परमेश्वर असल्यामुळें त्याचेसंततीचेठायीं रथकार ब्राह्मण शब्दाची नित्य शक्ति आहे. हें भट्टप्राभाकरादि मीमांसकांसही संमत होय कारण मीमांसक ईश्वरत्व व्यक्तीचेठायीं आणि जातीचेठायीं ( सधर्मसमुदायाचेठायीं ) शक्ति मानतात. एवंच आप्तवाक्य शक्ति निरूपणांत ( वर्षास्वित्यादिप्रमाणवाक्यांनीं वाक्यशेष. ' **रथकारोनामब्राह्मणः** ' इत्यादि व्याख्योक्तींनीं निवृत्तिशक्ति. आणि पंचाल या लोकप्रसिद्ध शब्दाच्या सानिध्यानें सिद्धपदसान्निध्य अशी शक्तिग्रहाची सात कारणें सांगितली. आतां व्यवहारावरून होणारा शक्तिग्रह सांगतो, हा पाठीमागें ठेवण्याचें कारण या जातीसंबंधीं व्यवहार सांप्रत दोनप्रकारचा मानला पाहिजे एक प्राचीनयथास्थितव्यवहार आणि हल्लीचे संकीर्णमिश्रव्यवहार. ह्मणून सांप्रतच्या सार्ववर्णि-

क अनियत व्यवहारावरून कोणत्याही जातीचा शक्तिग्रह भरंवशाचा नाहीं. तथापि पुढील व्यवस्थेवरून रथकाराख्यविश्वकर्मसंततीचेठायीं ब्राह्मणव्यवहारशक्तिग्रह आहे.—पंचालस्वर्णकारामध्यें दीक्षित, महामुनि, धर्माधिकारी, वेदपाठक, स्थपति, अर्कशाली, क्षीरसागर इत्यादि अनेक उपनावें ब्राम्हणजातिव्यवहारबोधक असून त्या पंचालशिल्पी मध्यें अग्निहोत्री, भट्ट, आचार्य, वैदिक, शास्त्री ज्योतिषी वगैरे सर्वत्र असून षट्कर्म षोडशसंस्कार जर आजपर्यंत वेदोक्तमंत्रांनीं प्राचीनपासून प्रवृत्त आहेत तर पंचालस्वर्णकारादिशब्द ब्राह्मण जातिशक्तिसापेक्ष आहे. आतां जरी त्यांना शिल्पसंबंधीं नाईक, पोतदार, सोनार हीं नावें, शिल्पकर्मब्रम्हवृत्ति असल्यामुळें ब्राम्हणधर्मविहित असूनही अर्वाचीनकालीं शिल्पकर्माची सर्वजातींत प्रवृत्ति झाल्यामुळें जरी ब्राम्हणत्वास दूरान्वयबोधक भासतात तथापि जसे कुळकर्णी, देशमुख, कारकून, इत्यादि नित्य नांवें अब्राम्हणवृत्तिबोधक असूनही त्यांच्या वेदोक्तकर्माचरणावरून ब्राम्हणच समजले जातात तसेंच नाईक, पोतदार पंचाल सोनार यांच्या वेदोक्तकर्माचरणावरून त्यांचेठायीं ब्राह्मणजातिबोधक व्यवहार आहे.

**प्रश्न**—ब्राम्हण म्हणविणारे जरी यज्ञादिब्राम्हणधर्म सोडून अन्यधर्मानें उपजीवन करितात. तथापिलोक त्यांना ब्राम्हणच म्हणतात. तसें नाईक पोतदार ही नांवें धंद्यावरून पडलीं तरी पडूं द्या; परंतु लोकांत ब्राम्हण कां म्हणत नाहींत ?

**उत्तर**—जसे वैदिक अग्निहोत्री इत्यादि नांवावरून ब्राम्हणच समजले जातात तसें प्राचीनकालीं स्वर्णरथादि शिल्पकर्म ब्राम्हणांचीच वृत्ति असल्यामुळें रथकार पंचाल या नामांनीं लोक ब्राम्हणच समजत होते, म्हणून निराळें आणखी ब्राम्हण असें उपपद लावण्याची जरूर नव्हती. आतां या कलियुगांत स्वर्णादिशिल्पकर्माचि प्रवृत्ति शूद्रादि सर्वजातींत झाल्यामुळें जरी पूर्वीच्या पंचाल, रथकारादि शब्दावर मृगजळाप्रमाणें शूद्रत्वाचा लोकांस फक्त भास मात्र होत आहे, परंतु त्या पंचाल सोनारनामाच्या रूढीनें ते ब्राम्हण नव्हेत असें होत नाहीं. जसें पांडव हे कुरुकुलोत्पन्न असल्यामुळें किंवा गीताही भारतांतील असल्यामुळें पांडवांस कौरव आणि गीतेस भारत म्हणणें वास्तविक असूनही जरी लोकांत त्यांना पांडव आणि गीता असें स्वतंत्रपणें म्हणण्याची प्रसिद्ध रूढ आहे; तथापि पांडव हे कुरुकुलांतील नव्हेत किंवा गीता भारतांतील नव्हे असें कधींही होणार नाहीं. तसें पंचालस्वर्णरथकार हे ईश्वरमुखोत्पन्न ब्राम्हण असल्यामुळें, त्यास रथकार स्वर्णकार लोकांत म्हणण्याची रूढ पडली आहे. तरी ते ब्राम्हण नव्हेत असें कधींही होणार नाहीं.

**प्रश्न**—ब्राम्हणरथकारापरपर्यायनाम पंचालसोनार ( विश्वकर्मसंततीस सांप्रत पंचालस्वर्णकार ) म्हणण्याचें कारण काय ?

**उत्तर**—याचे कारण पूर्वार्धपृष्ठ ४३ पंक्ति २४–२५ प्रमाणें रथादिशिल्पकर्माचा या कलियुगीं लोप झाल्यामुळें उदरनिर्वाहार्थ स्वधर्मानुरूप स्वर्णादिधातूचीं भूषणादिशिल्पकर्में स्वीकारिते झाले. तेव्हां जें काम करावें तसें नाम प्राप्त होतें म्हणून विश्वकर्म रथकारास हल्लीं पंचालस्वर्णकार म्हणण्याची रूढ आहे. सुवर्णालंकारादिशिल्पकर्म, र-

थादिशिल्पोपलक्षण, सर्व मंगलदायक पवित्र ( पूर्वार्धपृष्ठ २८–३६ पर्यंत पहा. ) असल्यामुळें पंचालस्वर्णकारनाम ब्राम्हणत्वाला विरुद्ध नाहीं. जसें तपःश्रुतसमाधियोगादि ब्रह्मसंबंधीं उद्योगावरून ज्यास पूर्वी ऋषि, मुनि, योगी अशीं नावें होतीं त्या महर्षींच्याच कुलांतील हल्लींचे ब्राह्मण पूर्वोक्त ब्रह्मवृत्तीनें चरितार्थ चालेना, ह्मणून उदरानिर्वाहार्थ व्यवहार करूं लागल्यामुळें ऋष्यादि प्राचीननामाचा लोप होऊन त्याबद्दल जोशी, कुळकर्णी पंत, भट अशी पर्यायनामें पडली आहेत, तसेंच पूर्वी, चयनकुंड, यज्ञपात्रें देवमूर्ति रथादि ब्रह्मसंबंधीं उद्योगावरून ज्यांस पूर्वी रथकार, एतश, कवि, मेधावीं, सौर अशीं नावें होतीं त्या सानगादि ब्रह्मर्षींच्या कुलांतील हल्लींचे ब्राह्मण पूर्वोक्त ब्रह्मवृत्तीनें चरितार्थ चालेना, ह्मणून उदरनिर्वाहार्थ व्यवहार करूं लागल्यामुळें रथकारादि प्राचीनसंज्ञेचा लोप होऊन त्याबद्दल पंचालसोनार, सोनारभट, नाईक, पोतदार अशीं पर्यायनामें पडलीं आहेत तथापि जसें हल्लीं जोशी, कुळकर्णी या पर्यायनामांनीं लोक ब्राम्हण समजतात. तसेंच पंचाल सोनार, पोतदार वगैरे पर्यायनामानीं रथकारब्राम्हण समजावें; कारण रथकार हें स्वर्णकारादि पंचविधशिल्पकर्ते असून विश्वकर्म संतति आहे या विषयीं प्रमाणही आहे. **दारुकारः स्वर्णकारः शिलाकारस्तथैवच ॥ अयस्कारस्ताम्रकारः पंचैतेरथकारकाः ॥ विश्वकर्मसुताश्चेतेरथकारास्तुपंचच ॥ वैदिकेनैवमार्गेणतद्वंश्यानांविशेषतः ॥ वर्षेगर्भाष्टमेतेषांह्युपनीतिक्रियास्मृतेतिस्कंदपु० नागरखंडे** ॥ यावरून विश्वकर्मयाच्या पांचपुत्रांस रथकार संज्ञा असून स्वर्णादि कर्मकर्तृत्व आहे. आणि हे रथकारसंज्ञक पंचालब्राह्मण विश्वकर्म्याच्या मुखापासून उत्पन्न झाले असल्यामुळें " **ब्राह्मणोऽस्यमुखमासीत्** " या श्रुतीवरून मौखिमासीत् ब्राम्हण म्हणवितात तें सयुक्तिक आहे. कारण या मुखोद्भूत ब्राम्हणाचा मूलपुरुष जो विश्वकर्मा यास ( **वाचस्पतिंविश्वकर्माण०** ) या पूर्वोक्त श्रुत्यादिप्रमाणांनीं मुखोत्पत्ति आहे याविषयीं उत्तरार्ध पृष्ठ ८०–८३ यावरून अंगिराख्य विश्वकर्मा हा मुखापासूनच उत्पन्न झाला आहे—प्रमाण—**अंगिरामुखतोक्ष्णोत्रिर्मरीचिर्मनसोऽभवत् । धर्मस्तनाद्दक्षिणतोयत्रनारायणः स्वयम् ॥ भाग० स्कं ३ अ० १२** यावरून आंगिरस बृहस्पति विश्वकर्मसंततीस मुखोत्पत्तिता आहे ह्मणूनच आंगिरस बृहस्पति विश्वकर्मा सर्व प्रकारचे ब्राम्हणजातींचा अधिपति आहे, प्रमाण श्रुति—अभिभूतानामधिपतिः ( इत्यारभ्य ) बृहस्पतिर्ब्रह्मणोऽधिपतिः । यजु० अ. ३ । ४ । ५ **भाष्यं—अग्नि वायु सूर्य चंद्र बृहस्पतयः पृथिव्यंतरिक्षद्युनक्षत्र ब्राह्मणजा**

---

१ अलंकारा धृताःसर्वे सौभाग्यायुःप्रदायकाः ॥ पावित्र्य लक्ष्मीभोगानां कारकाःपरिकीर्तिताः ॥ १ ॥ सुवर्णालंकृति धृतिःकल्याण सुहृदप्रदाः ॥ रत्नालंकारविधृतिर्देवानांतुष्टिकारका ॥ मनसो ल्हादिनप्रोक्तासर्व लोक वशंकरी ॥ रत्नादेनामलंकाराः शरीरानंदकारकाः ॥ कांति कल्याण लक्ष्मीदा ऋषिभिःपरि कीर्तिताः ॥ सोन्याची कंठी-सुवर्णमालिकायुष्याकांतिदादाहवातनुत् ॥ ग्रहपीडानाशकरी० ( इतिनिघंटरत्नाकरः ) २ गर्भापासून आठवे वर्षी उपनयन, काषायवस्त्रधारणं, मृगाजिन, कार्पासोपवीतं, मौंजीमेखला, पळसाचादंड, पित्रैवोपनयनं, भवत्पूर्वशब्देन भिक्षा, श्रोत्रसमहस्तद्वयेन नमस्कार, असमानगोत्रजाकन्याविवाह, श्राद्धे हस्तग्नौकरण भोजनं,इत्यादि ब्राह्मणविहितचधर्म पंचालांचा नित्य आहे. ३ मुखमासीत् शब्दोऽस्मिन्नस्तीत्यर्थे औत्सर्गिकोऽण्.

**तीनामधिपतयः॥** यावरून बृहस्पति शब्दवाच्य विश्वकर्मा ब्राह्मणजातींचा अधिपति आहे आणि पूर्वार्ध पृष्ठ ४२-४३ आणि पू० पृष्ठ २१-२३ तील प्रमाणावरून ही विश्वकर्मसंततीय रथकार ब्राम्हणांचेठायीं व्यवहार शक्ति आहे.

एवंच(**रथकारस्याधानेनियतंचनाभावा०**) या कात्यायनसूत्राचा अभिप्राय "त्रैवर्णिकरथकार" असाच असून कर्क० व्याख्याकार '**नाभावादितिवात्स्यः** १ या सूत्राचा ( **अभावात्नत्रैवर्णिकोरथकारः** ) अशी व्याख्या करून वात्स्यऋषींचे निमित्तभूतनामानें विरुद्धार्थप्रतिपादन करितात; परंतु वात्स्यमुनि 'त्रैवर्णिकरथकार नाहीं' असें मूळ ह्मणतच नाहीं, यास सबळकारण सविस्तर व्याख्येंत इतरसंबंधीं वाक्यें असूनही वात्स्याचे वाक्याचा अभाव आहे ह्मणून. कोणी ह्मणतील कीं, सूत्रोद्देशाच्या विरुद्ध, व्याख्याकार व्याख्या कसे करतील, तर असें ह्मणूंनये. तार्किकविषयसंबंधीं निबंधांत असें क्वचित् नजरचुकीनें एकादे ठिकाणीं होऊन जातें; जसें " **यथात्रयाणां० मनु०** अ० १० **श्लोक** २८ या स्मृति वाक्याच्या ( **द्विजाद्युत्पन्नप्रतिलोमप्राशस्त्यार्थमिदं** ) अशा सर्व संमत सत्यउद्देशाच्याविरुद्ध मेधातिथींनें जशी ( **द्विजत्वप्रतिपादकमेतदेषांवचनमुपनयनार्थी**)अशी व्याख्या केली आहे तशीचही भ्रांति समजावी" पुरें करितों आतां,फार नको ज्या कात्यायन सूत्रांत(**शूद्रस्यवेदाक्षरश्रवणेउच्चारणेधारणेचप्रायश्चित्तस्यदर्शनात्श्रवणेत्रपुजतुभ्यांश्रोत्रपूरणं उच्चारणेजिव्हाछेदःधारणेचशरीरभेदइति**) असें ह्मटलें आहे,त्या कात्यायन सूत्रांत ( **माहिष्येणकरण्यांतुरथकारः प्रजायते ॥ नैवोपनयनंतस्यशूद्रधर्माद्बहिष्कृतः ॥** ) यानें शूद्रधर्म बाह्य उपनयनहीन अशा संकीर्णसंकर रथकारास वर्षा० ऋभु० या आधानाचा अधिकार आहे असें कधींही असावयाचें नाहीं, हें स्पष्ट आहे कारण अनधिकारी त्रैवर्णिकबहिर्भूतजातिमालिकेंत अनन्वितविशिष्टविधानांगीकार करण्यांत गौरव आहे असें असूनही जरी, संकीर्णसंकररथकारास ' **ईज्योपनयनवास्तुशास्त्राध्ययनवृत्तिताचेति**, असें असंभूत मोघम क्वचित एकाद्यानें म्हटलें गेलें असेल तर असेना बापुडें ! त्यांत आमचें काय गेलें! ! कारण जसी '**शूद्रावाजसनेयकाः**' इत्यादि असंमत अननुभूत गौणवाक्यें आहेत त्यांतच याची गणना होते. असो श्रुत्यादि सर्व निबंधांच्या अविरोधानेंपूर्वोक्त

**का० सुत्रांचीव्याख्या—वर्षा०ऋभू०स्येतिश्रुत्यासमर्थस्यद्विजातिरथकारस्याधानेअधिकारोभवतिनियतं । चकारात्पक्षांतरंतेनस्मृत्युक्तसंकीर्णजातीयरथकाराभिधस्योद्देशेनतत्पदंपुनःपतित्वा॥अभावात्संकीर्णजातीयस्यसामर्थ्याभावात्॥आधानेआधिकारोनभवतीतिवात्स्यः॥ एवं-रुद्रदत्ताभिधापस्तंबसूत्रवृत्तावपि-वर्षारथकारस्य॥किमाधानकालइतिशेषः॥किमत्ररथकारइतिद्विजातिभोन्यजातियस्यांतरभवस्यग्रहणंनेत्याहयेत्रयाणांवर्णानामेतत्कर्मकुर्युस्तेषामेषकालः॥ त्रिषुवर्णेष्वंतर्भूतानामेवस्ववृत्तिकर्शितायेरथं कुर्वीतितेषामयमाधानकालः ॥ " एवमेवधूर्तस्वामि भाष्य पृष्ठ ४५. ,** पहा आणखी, **बौधायनसुत्रसूबोधिनीवृत्तौच—वसंतेब्राह्मणस्यग्रीष्मेराजन्यस्यहेमंतोवाशरद्वैश्यस्यवर्षारथकारस्यआधानकालइतिशेषः किंद्विजातिभ्योन्यजातीयस्यरथकारस्तुमाहिष्यात्करण्यांयस्यसंभवइतिस्मृतिप्रतिप-**

**अजातिविशेषस्यग्रहणमित्याशंक्याहयेत्रयाणांवर्णानामंतर्गताएतत्कर्म कुर्युस्तेषामेषकालइतिसमर्थानांत्रैवर्णिकानामयंकालः शिशिरः सार्ववर्णिकः वर्णत्रयसाधारणइत्यर्थः ।**

एवंसर्वसिद्धांतवर्षर्तुर्भ्वाधानाधिकारी रथकार पंचाल ब्राह्मण आहेत.

**शंका**—विश्वकर्मसं॰रथकार हल्लीं स्वर्णशिल्प करीत असल्यामुळें त्यांस स्वर्णस्तेयदोष संभाव्य आहे कीं नाहीं?

**उत्तर**—पातकित्व जसें व्यक्तीवर सक्त आहे तसें जातीवर सक्त नाहीं त्यांतही " **सौवर्णराजतंताम्रंलोहंपाषाणदारवं॰** ( प॰ भू॰ ) यानें रथकारास पंचविधशिल्पकर्मअसल्यामुळें स्वर्णकर्माचें अनियतत्व आहे तो ब्राह्मण असल्यामुळें त्याचे ठायीं ( **सर्वसंकरपापिष्ठंहेमकारंनराधिप ॥ मत्स्यपु. अ. २२७ व सर्वकंटकपापिष्ठं॰ मनु. अ. ९** ) यावरून स्वर्णस्तेयाचा असंभव आहे असें असूनही " **वेधाद्वैधाभ्रमंचक्रेकांतासुकनकेषुच** " यानें जरी एकाद्यादेवपूजकादि भिक्षुक ब्राह्मणानें स्वर्णचौर्यकेलें असतां जसी सर्व भिक्षुकांस शिक्षा होतनाहीं, तसेंच क्वचित् एकाद्या पंचाल ब्राह्मणानें स्वर्णचौर्यकेल्यानें त्याचे जातीस दोष नाहीं ( **कलौकर्तारमेवच** ) आणि विश्वकर्मसंततिनिर्दोषत्वाविषयीं—( **यावद्वेदोस्तिलोकेस्मिंस्तावच्चभवतः प्रजा ॥ विनंदंतिवरंशिल्पंत्वदामेवभविष्यति ॥ पद्म. भू.** ) या शिवविष्णूंच्या वरोक्तीनें जोपर्यंत यालोकीं वेद आहे तोपर्यंत ( कलीच्या तीनचरणापर्यंत ) विश्वकर्म संततीय शिल्पी वरं ( चांगलें अर्थात् स्वर्णस्तेयादिदोषरहित निर्मल ) शिल्पकर्म करतील असें प्रमाण आहे. सप्रमाण वस्तूचा जरी क्वचित् एकाद्यास एकादेवेळीं प्रमाणोक्त अनुभव आलानाहीं, तथापि " जसें **पयसाऽप्यतेवपुः ।** यानें सप्रमाण पौष्टिक दूध ज्वरितास जरी विषवत् होतें तरीं दुधाचे सप्रमाण पौष्टिकत्वास बाध येत नाहीं तसेंच पंचाल ब्राह्मणांच्या सप्रमाण निर्दोष शिल्पत्वास अप्रमाण वृथापवादानें बाधयेत नाहीं. आतां दोषदृष्टीनेंच आपण पाहूं गेलों तर " **कस्यदोषोकुलेनास्तिच्या॰** " पहा. (**ब्रम्हहत्यांप्रकुर्वंतिप्रतिसंवत्सरेश्वमी ॥ सर्वकर्मबाहिःस्थाश्चसर्वधर्मबहिष्कृताः ॥ चांडालब्राम्हणाश्चैवनगृण्हीयाच्चतज्जलं ॥ सुवर्णस्तेयनिरताग्रामेषुनगरेषुच ॥ इतिस्कंदपुराणेसनत्कुमारसं॰ सह्याद्रिखंडे अ॰ ८२ मंजुलेश्वरमा॰** ) यावरून प्रतिवर्षी ब्रह्महत्या आणि स्वर्णस्तेय करणाऱ्या एका ब्राह्मण जाति विशेषास ( कऱ्हाडयास ) आणि त्यांच्याशीं अन्नोदकादि व्यवहारकरणारास तत्संसर्गित्वानें पातित्य आहे कीं नाहीं? असें कित्येक दोष या व्यावहारिक ब्राह्मणह्मणविणारांत आहेत ह्मणूनच विश्वकर्मसंततीय पंचालरथकार ब्राह्मणजाति, कोणत्याही ब्राह्मणादि सर्व जातीचें पाणीं सुद्धां घेत नाहींत. असो,कोणाचाही दोषोच्चार करूंनये परंतु प्रसंग आल्या

---

१ नवदेयावनीं भाषां प्राणैःकंठगतैरपि ॥ योऽसत्प्रतिग्रहग्राही नित्यंयश्चप्रति ग्रही ॥ ग्रह सूचक दूतौच पितृकार्येषुवर्जयेत् ॥ पराशर॰ अ. ४ ॥ प्रति ग्रहेण ह्यस्याशु ब्राह्मं तेजःप्रशाम्यति ॥ यावतः संस्पृशेदंगैर्ब्राह्मणान् शूद्रयाजकः ॥ तावतांन भवेद्दातुःफलंदानस्यपौर्तिकं ॥ वेदविच्चापिविप्रोऽस्यलोभात्कृत्वा प्रति ग्रहं ॥ विनाशंव्रजतिक्षिप्रमामपात्रमिवांभसि ॥ मनु. अ. ४ अवाह्यकादेवलकानाक्षत्रा ग्रामयाजकाः ॥ एते ब्राह्मण चांडाला महापथिक पंचमः ॥ भारत राज धर्में अ. ७६ पलांडुभक्षणं॰

स क्षणभर जशास तसें झाल्याशिवाय परिणाम नसतो.

**शंका**—निर्णयसिंधुधर्मसिंधु अर्वाचीन धर्मशास्त्र ग्रंथांत विश्वकर्म संततीय पंचाल ब्राह्मणाचें वर्णन कां नाहीं?

**उत्तर**—स्मृत्यादि धर्मशास्त्रांत अनेक विशेष भेदांचे उल्लेख गौरवदोषामुळें करीत नाहींत तथापि(पृ. १२२ पं. २७-२९) प्रमाणें विश्वकर्मसं० पंचाल ब्राम्हणांचा,ऋग्वेदशाखीयधर्मांत समावेश आहे केवळपुराण कथितशापग्रस्त कऱ्हाडे चित्पावनादि ब्राम्हणांचाही समावेश धर्मसिंधूक्त आपस्तंबादि शाखेंत करितां तर श्रुतिसूत्रप्रोक्त विश्वकर्ममुखोद्भूत रथकारब्राम्हणांचा समावेश ऋकशाखेंत आनंदानें आहे तसेंच विश्वकर्म मुखोद्भूत सानगादिब्रम्हर्षिमरीच्यादिवैधसाप्रमाणें अयोनिज आहेत म्हणून सगोत्रविवाहदोषाची शंकाच नाहीं, कारण जसें ब्रम्हदेवास प्रजापतित्व आहे तसें विश्वकर्म्यांस ही प्रजाप्रतित्व आहे. यास आणखी प्रमाण—**श्रुतिऋ० विश्वकर्मसूक्त-यइमाविश्वा भुवनानिजुव्हदृषिर्होतानिषसीदपितानः। सआशिषाद्रविणमिच्छमानःपरमच्छद वरांआविवेश ॥ १२ ॥ भावार्थ** ( भाष्यावरून ) जो विश्वकर्मा प्रजापति पृथिव्यादि पंचभूतें उत्पन्न करणारा सर्वसाक्षी सर्वज्ञ ऋषि यज्ञकर्ता आमचा पिता असून कालात्मा सृष्टि उत्पन्न कर्ता परमेश्वर विराट् पुरुष आहे. यावरून विश्वकर्मा महर्षि प्रजापति होय.

**प्रश्न**—' **यइमा** ' या सूक्तांतील विश्वकर्मा हें पद सर्वेश्वर परमात्मपर आहे. यांतील विश्वकर्म शब्दानें शिल्पकर्मकर्त्ता देवशिल्पी विश्वकर्माच घ्यावा हें कशावरून?

**उत्तर**—शिल्पकर्त्ता देवशिल्पी प्रजापति विश्वकर्मा हा परमेश्वर रामकृष्णादिवत् **स्वरूपभेद** आहे म्हणून. आणि **यइमा** इत्यादि हें १४ ऋचांचें विश्वकर्मसूक्त देवशिल्पी विश्वकर्म यांचेंच आहे याविषयीं प्रमाण—

**पद्मपुराणेभूखंडे—सूतउवाच—श्रृणुध्वमृषयःसर्वेपूजनंविश्वकर्मणः ॥ वासुदेवमहेशाभ्यांयत्कृतंतन्मयोच्यते ॥ सर्ववेदेषुयत्सूक्तंपठ्यतेविश्वकर्मणः ॥ चतुर्दशात्वृतेनैनंयइमेत्यादिनायजेत् ॥ २ ॥**

**अर्थ**—ऋषी हो, द्वारकेची रचना करण्याविषयीं श्रीकृष्णांनीं,आणि शिवमंदीर निर्माण करण्याविषयीं शंकरांनीं जें विश्वकर्म्याचें पूजन केलें तें मी सांगतों ऐका—प्रासाद गृहारामादि शिल्पकामाची इच्छा असेल तर सर्व वेदांमध्यें ' **यइमाविश्वा०** इत्यादि जें १४ ऋचांचें सूक्त आहे त्यानें शिल्पाधिपति विश्वकर्म याचें यजन करावें. कारण **यइमा** या सूक्ताची विश्वकर्म देवता आहे. **यइमेत्यस्यभौवनोविश्वकर्मा विश्वकर्मात्रिष्टुप् ॥**

**प्रश्न**—विश्वकर्मा या **शब्देकरून** ब्रम्हदेव कां समजूं नये. कारण तोही सृष्टिरचना करणारा आहे.

**उत्तर**—ब्रम्हदेवाचा मंत्र—**ब्रह्मजज्ञानंप्रथमोवामदेवोब्रह्मात्रिष्टुप्** असा वेगळा

---

२ शापंन्चप्राप्यतेतस्यकृत्सिताश्चदारिद्रिणः॥ सेवा सर्वत्र कर्तार इदं निश्चय भाषणं॥ स. अ. ८१ शू. स्त.

आहे. तसेंच जरी विश्वकर्मा आणि ब्रम्हदेव हे उभयतां सृष्टिनिर्माणकर्ते आहेत तरी ब्रम्हदेवासच विश्वकर्म समजूं नये. याविषयीं प्रमाण—

**भारत आदिपर्व अध्याय २११ दृष्ट्वाचाविश्वकर्माणं व्यादिदेश-पितामहः ॥ सृज्यतांप्रार्थनीयैकांप्रमदेतिमहातपाः ॥ १ ॥ त्रिषु-लोकेषुयात्किंचिद्भूतंस्थावरजंगमम् ॥ समानयद्दर्शनीयंतत दत्रस-विश्वाजित् ॥ कोटिशश्चैवरत्नानितस्यागात्रेन्यवेदयत् ॥ तांरत्नसं-घातमयींमसृजदेवरूपिणीम् ॥ १४ ॥ साप्रयत्नेनमहतानिर्मिताविश्वकर्मणा ॥ त्रिषुलोकेषुनारीणारूपेणाप्रतिमाभवत् ॥ १५ ॥ नतस्याःसूक्ष्ममप्यस्तियद्गात्रेरूपसंपदा ॥ नियुक्तायत्रवादृष्टिर्नसज्जतिनिरीक्षताम् ॥ १६ ॥ साविग्रहवतीवश्रीःकामरूपावपुष्मती ॥ जहारसर्व भूतानां चक्षुंषिचमनांसिच ॥ १७ ॥ तिलंतिलंसमानीयरत्नानांयाद्विनिर्मिताम्॥तिलोत्तमेतितत्तस्यानामचक्रेपितामहः॥१८॥**

**अर्थ**—ब्रम्हदेवानें विश्वकर्म यास एक दिव्य रंभा उत्पन्न करण्यास सांगितलें. नंतर तिलोत्तमा नामक रंभा उत्पन्न केली ती अशी,—त्रैलोक्यामध्यें जीं जीं उत्तम रत्नें होतीं तीं तीं कोट्यावधि रत्नें आणून तिच्या गात्रांचे ठायीं स्थापन केलीं. तिल तिल प्रमाण रत्नें आणून विश्वकर्म्यानें निर्माण केली म्हणून तिचें तिलोत्तमा नाम ठेविलें. ती विश्वकर्म्यानें इतकी सुंदर निर्माण केली होती कीं, त्रैलोक्यांतील सर्वस्त्रियामध्यें रूपानें अप्रातिम होती. त्यामुळें सर्व प्राणिमात्रांचें नेत्र आणि मनें हरण करिती झाली. असो, यावरून उघड आहे कीं, ब्रम्हदेव आणि विश्वकर्मा एक नव्हेत. म्हणून **यइमाविश्वा०** हे सूक्त १४ ऋचांचें शिल्पाधिपति प्रजापति विश्वकर्म यांचेंच आहे. यांत विश्वकर्म यांचें परमेश्वरत्व वर्णिलें असून त्यानें पंचभूतात्मक विराटरूप धारण करून त्रैलोक्य चराचर सृष्टि निर्माण केल्याचें वर्णिलें आहे. आतां विश्वकर्मा आणि ब्रम्हदेव जरी एक नाहींत तथापि——

**यजु. अ. ४ म. ६अ.२ विश्वकर्माह्यजनिष्टदेवा आदिद्गंधर्वोअभवद्द्वितीयः॥ तृतीयः पिताजनितौषधीनामपांगर्भंव्यदधातपुरुत्राः ॥**

**भाष्यं**——ब्रम्हांडमध्यगतानामुत्पत्तिरुच्यते । अंडमध्यें प्रथमंविश्वकर्मा ( देवतिर्यगादिविश्वभेदकर्ता ) सत्यलोकवासी चतुर्मुखोदेवः अजनिष्ठ ( उत्पन्नः ) आदित् अनंतरमेवव ) तदपेक्षयाद्वितीयः गंधर्वः अभवत् ततऊर्ध्वं औषधीनांपालकः पिता जनिताय उत्पादकः सोमः पूर्वोक्तद्वयापेक्षया तृतीयः अभवत् ॥ तदेवं अपांगर्भ ब्रम्हांडं परमेश्वरः पुरुत्रा व्यदधात् ( बहुधाव्यक्तं कृतवान् )

**अर्थ**—विश्वतोमुख ( पंचमुख ) चतुर्मुख ब्रह्मदेव रूपानें अवतरता झाला. दुसरा अवतार गंधर्व, तिसरा अवतार ओषधीपति चंद्रमा होता झाला. या प्रमाणें **परमेश्वर पंचमुख विश्वकर्मा ब्रह्मांडाप्रत बहुप्रकारें करून व्यक्त करिता झाला.** या

---

१ ब्रह्मोत्तरखंडामध्यें तर प्रथम ब्रह्मदेव पंचमुखच होता असें म्हटलें आहे. " २ प्रजापतिमनोगंधर्व इति श्रुतेः

श्रुतीवरून विश्वकर्मा हा सर्व देवतारूपानें अवतरला आहे. आतां सृष्टिकर्ता विश्वकर्म्याचें विश्वनिर्माण कर्म हें प्रासादगृहादि शिल्पकर्मरूप आहे. यास प्रमाण—

**श्रुति. यजुर्वेद अ० ४ प्र० ६ अ० २ किंस्विद्वनंकउसवृक्षआसीद्यतोद्यावापृथिवीनिष्टतक्षुः ॥ मनीषिणोमनसापृच्छतेदु तद्यदध्यतिष्ठद्भुवनानिधारयन् ॥**

**भाष्यं**—लोकेहि प्रौढं प्रासादं निर्मिमाणःकर्स्मिश्चित् प्रौढेवने केचिन्महांतं वृक्षंछित्वा तक्षणादिना काष्ठैः प्रासादमुच्चैस्तरसंपादयति । इहतु परमेश्वर प्रेरितंजगत्सृष्टिः यतः यस्मात्वनात् यंवृक्ष मादाय द्यावापृथिवी निष्टतक्षुः ( तक्षणेन द्यावा पृथिव्यौ निष्पादितवान् ' तद्वनंकिंचिन्नामस्यात्? नकिंचित्तादृशंसंभवतीत्यादि ॥

या श्रुतींत स्वर्ग आणि भूमीसहित ब्रह्मांड विश्वकर्मे यानें काष्ठादिशिल्पजन्य प्रासादा प्रमाणें निर्माण केलें आहे. यावरून शिल्पकर्ता विश्वकर्मा हा स्वर्गभूम्यादि अनंत ब्रह्मांडें निर्माणकर्त्ता आदिनारायण होय.याच अभिप्रायाचें हें विश्वकर्मसूक्त आहे. यांतील २—३ ऋचाचें ( **किंस्विदासी०** आणि **विश्वतश्चक्षु०** यांचें ) भाष्य व अर्थ ग्रंथारंभींच लिहिले आहेत. सर्वविश्वकर्मसूक्त सभाष्य सार्थविस्तारभयामुळें न लिहितां या सूक्तस्थ वेदार्थाला अनुसरून असलेलीं स्मृति वाक्यें लिहितो ॥

**विश्वकर्मानमस्तेस्तुविश्वात्माविश्वसंभवः ॥ अपवर्गोसिभूतानांपंचानांपरतः स्थितः ॥ महाभारते शांतिपर्वणिराजधर्मेभीष्मस्तवे ॥**

**अर्थ**——भीष्माचार्यह्मणतात, हे भगवन्, तूं विश्वाचा व्यापक आणि निर्माणकर्त्ता आहेस म्हणून तुलाविश्वकर्मा म्हणतात. तूं विश्वकर्मा सर्व प्राणिमात्रांचेंकैवल्यसुखरूप निवासस्थान असून पृथिव्यादि पंचमहा भूतांहून पलीकडे तूं निर्विकार स्थिर परब्रम्हस्वरूप आहेस. या स्मृतींत भगवान् विष्णु आणि शिल्पकर्ता विश्वकर्मा यांचें अभेदत्व श्रुतीला अनुलक्षून वर्णिलें आहे. शिल्पकर्म ईश्वर शक्तीवांचून कोणीही करण्यास समर्थ नाहीं. याविषयीं आणखी स्मृति.

**पद्मपुराणे भूखंडे-महादेवउवाच—उक्तंकृष्णस्यमाहात्म्यं वक्ष्येथोविश्वकर्मणः ॥ पुरीचयादृशीतेननिर्मितेत्येतदप्युत ॥ कृष्णश्चविश्वकर्माच नभिद्येतपरस्परम् ॥ नहिकृष्णमृतेकश्चिचित्रंरचयितुंक्षमः ॥ यदानभूर्नखंनाग्निर्नवायुर्नापिचोदकम् ॥ तदैवएककृष्णोभून्निर्गुणोनिष्कलोदयः ॥**

**अर्थ**——शंकर म्हणतात हे पार्वति, तुला कृष्णाचें माहात्म्य सांगितलें. आतां विश्वकर्मे याचें माहात्म्य सांगेन ऐक. ज्या विश्वकर्म्यानें कृष्णाकरितां उत्तम द्वारका निर्माण केली तो परमात्मा विश्वकर्मा आणि श्रीकृष्ण भगवान् यांमध्यें भेद नाहीं. ( दोघे एक रूपच आहेत. ) कारण, चित्रविचित्र ( चमत्कारिक ) शिल्पकर्म भगवच्छक्तीवांचून कोणीं करण्यास समर्थ नाहीं. म्हणून विश्वकर्मा आणि त्याची संतति पंचालशिल्पी हे प्रत्यक्ष पंच ब्रम्हस्वरूप भूदेव असल्यामुळें परम पूज्य आहेत. ज्या कालीं पृथ्वी, आकाश, अग्नि, वायु आणि उदक हीं पंचमहा भूते नव्हतीं त्या काली एकच कृष्णाख्य परमात्मा विश्वकर्मा, निर्गुण, निराकार होता.

तेनमायासहायेननिर्मितंभूतपंचकम् ॥ व्योमवायुस्तथाज्योतिरापोभूमिश्चपंचमी ॥ ४ ॥ शब्दैकगुणमाकाशंशब्दस्पर्शयुतोऽनिलः ॥ शब्दस्पर्शंचरूपंचज्योतिषोमीगुणास्त्रयः ॥ ५ ॥ शब्दस्पर्शौरूपरसौचत्वारोपांगुणाःस्मृताः ॥ शब्दस्पर्शौरूपरसौगंधश्चेतिभुवोगुणाः ॥

अर्थ—त्याविश्वकर्म यानें मायेच्या सहायानें आकाश, वायु, अग्नि, उदक आणि पृथिवी हीं पंचमहाभूतें निर्माण केलीं, आकाशाचा शब्द हा एकच गुण, शब्द आणि स्पर्श हे दोन वायूचे गुण, शब्द, स्पर्श. आणि रूप हे तीन अग्नीचे गुण. शब्द, स्पर्श. रूप आणि रस हे चार गुण उदकाचे. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पांच गुण भूमीचे जाणावे.

व्योमतोनिर्ममेश्रोत्रमिंद्रियं शब्दगामितत् ॥ वायोस्त्वगिंद्रियंजातं स्पर्शस्यग्रहणेक्षमं ॥ रूपग्रहक्षमंचाभूज्ज्योतिषश्चक्षुरिंद्रियम्॥८॥ रसग्रहक्षमंतद्वदद्भ्योभूद्रसनेंद्रियम् ॥ ९ ॥ भूमेर्घ्राणेंद्रियमभूत्सर्वगंधग्रहक्षमम् ॥

अर्थ— नंतर त्या विश्वकर्मे यानें आकाशापासून शब्द प्रवेशयोग्य कर्णेंद्रिय(कर्ण) उत्पन्न केले. वायूपासून शब्दविषय जाणणारें त्वगिंद्रिय, तेजस्तत्वापासून रूप जाणणारें ( नेत्रेंद्रिय ( डोळे ), उदकापासून रस जाणणारें जिव्हेंद्रिय ( जीभ ), भूमीपासून वास घेणारें घ्राणेंद्रिय ( नासिक ) निमार्ण केलें.

सर्वेषामपिभूतानांमात्राभ्यः षष्ठमिंद्रियम् ॥ अंतः करणसंज्ञंतत्सर्वसाधारणंह्यभूत् ॥ तस्यवृत्तिप्रभेदास्तुमताः कार्यवशाच्छिवे ॥ मनोबुध्धिरहंकारश्चित्तंचेतिचतुर्विधाः ॥ संशयोमनसो रूपं बुध्धेरूपंतुनिश्चयः॥ दर्पोऽहंकाररूपंस्याच्चित्तरूपंत्विहस्मृतिः ॥

अर्थ—पांचही भूतांच्या सूक्ष्म अंशापासून सर्व सामान्य असें अंतःकरण संज्ञक सहावें इंद्रिय उत्पन्न केलें. त्या अंतःकरणाचे, कार्यपरत्वें मनस्, बुध्धि, अहंकार, आणि चित्त असे चार भेद मानिलें आहेत. मनाचें रूप संशय, बुद्धिचेंरूप निश्चय, अहंकाराचें रूप दर्प, आणि चित्ताचेंरूप स्मरण याप्रमाणें अंतःकरणाचेठायीं जाणावें.

तांस्मृतिंसमाश्रित्यपूर्ववच्चैवगोचराम्॥ मिश्रीचकारभूतानिपंचधापंचभागशः ॥ १३ ॥ स्वेतरेषांचतुर्णांहिभूतानामष्टमांशकैः ॥ चतुर्भिर्धमर्धस्वंभूतेभूतेव्यवस्थितम् ॥ १४ ॥ पंचीकृतानिभूतानि स्थूलान्येतानिपार्वति ॥ बाह्येंद्रियैः प्रगृह्यंतेसूक्ष्मानिमनसैवहि ॥ ॥ १५ ॥ जलेनमिश्रितामृत्स्नाकुलालेनप्रयोजिता ॥ यथाशैलेंद्रदुहिते योग्यास्याद्घटसृष्टये ॥१६॥ एवंपंचीकृताः खाद्याः पिंड ब्रह्मांडसृष्ट्ये ॥ प्रभवंतिमहादेवीप्रयुक्ताविश्वकर्मणा ॥ १७ ॥ विभज्यमूर्तिरूपेणतत्तद्ब्रभांकुरादिकम् ॥ अदृश्येनैवरूपेणविश्वकर्मा सृजत्ययम् ॥ १८ ॥ अमूर्तेनैवरूपेण भूतानिसस्रजेहरिः ॥ अस्यदृश्यानिरूपाणिसर्वेशिल्पवतांवराः ॥ १९ ॥ तानाविश्यत्व-

**सौसर्वंचित्रंसृजातिपार्वति ॥ दिविभुव्यंतरिक्षेवा पातालेवापि स-**
**र्वशः ॥ ३० ॥ गृहंयंत्रंरथोभूषाप्रतिमावसनादिकम् ॥ यत्किंचि**
**दृश्यतेचित्रंतत्सर्वंविश्वकर्मजम् ॥ ३१ ॥**

**अर्थ**——तो विश्वकर्मा त्या चित्ताचे प्रत्यक्षरूप भूतस्मृतीच्या आश्रयानें पृथिव्यादि पंचभूतांचीं पांच प्रकारचीं परस्पर मिश्रणें करितां झाला. तीं अशीं——प्रत्येक भूताचा (तत्वाचा) अर्धभाग (एक द्वितीयांश) व बाकीच्या चार भूतांचा एक एक अष्टमांश याप्रमाणें एकंदर पांच भूतांचें एकेक मिश्रण अशीं पांच मिश्रणें केलीं, यास पंचीकरण म्हणतात. त्यापासून विश्वकर्म यानें चार प्रकारचीं स्थूल शरीरें उत्पन्न केलीं आहेत. (खालचें कोष्टक पहा) हीं पंचीकृत स्थूलतत्वें कर्ण त्वचा, नेत्र, जिव्हां घ्राण इत्यादि बाहेरच्या इंद्रियांनी समजतात. आणि सूक्ष्मतत्वें अंतःकरणादिक मनानें समजतात असें जाणावें. पाण्यानें मिश्रित केलेली मृत्तिका (चिखल) जशी घटादिक तयार करण्यास योग्य होते तशीं हीं पंचीकरण झालेलीं (मिश्र केलेलीं) आकाशादि तत्वें गर्भांतील पिंड व ब्रम्हांड उत्पन्न करण्यास योग्य होतात. याप्रमाणें पंचीकरण करून पंचभूतांचा उपयोग विश्वकर्म्यानें केला. आणि त्या निराकार रूपानें हीं पंचमहाभूतें निर्माण केलीं. या पंचमहाभूतांच्या मिश्रणाचे पंचविषय अनेक विभाग करून वेगवेगळया प्रकारचे गर्भ स्वतः हा विश्वकर्मा अदृश्य रूपानें निर्माण

| पृथ्वी | उदक | तेज | वायु | आकाश | | |
|---|---|---|---|---|---|---|
| .॥. | ०= | ०= | ०= | ०= | एकूण पृथ्वीरूप शरीर १ | हीं शरीरें मनुष्यें, पशु, पक्षी किडे, मुंग्या, झाडें वगैरेचीं जाणावीं. |
| ०= | .॥. | ०= | ०= | ०= | उदकरूप शरीरें १ | हीं शरीरें वरुणलोकीं किंवा पातालीं प्रसिद्ध आहेत. |
| ०= | ०= | .॥. | ०= | ०= | तेजोरूप शरीर १ | हीं शरीरें सूर्यलोकींचीं किंवा इंद्रादि सर्व देवांचीं जाणावीं. |
| ०= | ०= | ०= | .॥. | ०= | वायुरूप शरीर १ | हीं शरीरें वायुलोकीं प्रसिद्ध असून हीं पिशाचादिकांचीं जाणावीं. |
| | | | | १ | या आकाश तत्वाचा शरीररूप भेद होतच नाहीं हें सर्वतत्वांशीं संयोगानें राहतें. पृथक राहत नाहीं. | |

करितो. या पृथ्वींतील सर्व शिल्पि श्रेष्ठ(पंचालब्राह्मण) हे त्या विश्वकर्म्याचीं दृश्य[3] रूपें

१ आकाशाला नित्य, व्यापकत्व, आणि एकत्व आहे. ह्मणून आकाशप्राय मिश्रणाचा शरीररूप भेद होत नाहीं. ह्मणून पंचभूतांपासून स्थूळ देह चारच उत्पन्न केले.

२ ही स्मृति–अद्भ्यः संभूतपृथिव्यैरसाच्चविश्वकर्मणः समवर्तताधि तस्यत्वष्टाविदधद्रूपमेति॥ या श्रुतीच्या अर्थाला अनुसरून आहे.

३ हीस्मृति–तस्यधीराः परिजानंतियोनिंमरीचीनांपदमिच्छंतिवेधसः॥ या श्रुतीला अनुलक्षून आहे.

(विभूति) आहेत. हे पार्वति हा विश्वकर्मा त्या पंचाल शिल्पी श्रेष्ठांच्या देहीं प्रवेश करून सर्व प्रकारचे चित्र विचित्र पदार्थ उत्पन्न करितो. स्वर्गीं, भूलोकी, आकाशीं आणि पाताळीं, गृह, यंत्र, रथ, मूर्ति, अलंकार, वगैरे जे कांहीं विचित्र पदार्थ दिसतात ते सर्व विश्वकर्म्यानें केले आहेत. याप्रमाणें सकल शिल्पाधि विश्वकर्मा हा, सर्वेश्वरआहे. याविषयीं वर्णन केलें तसेंच विश्वकर्मा वेदयज्ञ क्रिया ब्राम्हण यांचा, उत्पन्न कर्ता व तपोराशी सर्वज्ञ असल्यामुळें यास महर्षि, ब्रह्मर्षि, अशीसंज्ञा आहे, याविषयीं श्रुति. यजुर्वेद अष्टक ४ । पन्न ३ अनुवाक २ प० ३ शाकर रैवताभ्यांविश्वकर्म ऋषिः या श्रुतिवरून आणि यजु० अष्ट० ५ । प० २ अ० १० प० ९ याःप्राचीस्ताभिर्वसिष्ठ आर्ध्नोद्याःदक्षिणाताभिर्भरद्वाजोयाःप्रतीचीस्ताभिर्विश्वामित्रो याउदीचीस्ताभिर्जमदग्नि र्याऊर्ध्वास्ताभिर्विश्वकर्मा " या श्रुतीवरून विश्वकर्मा महान् ऋषि आहे. तसेंच आणखी विश्वकर्मा परशिव महान् ऋषि आहे याविषयीं श्रुति.तैत्तिरीयैतरेयश्वेताश्वतरोपनिषदत्रये—योदेवानां प्रथमंपुरस्ताद्विश्वाधिपोरुद्रोमहर्षिः ॥ हिरण्यगर्भपश्यतजायमानं सनोदेवःशुभयास्मृत्या संयुनक्तु ॥ ज्ञात्वाशिवंसर्वभूतेषुगूढंविश्वस्यैकं परिवेष्टितारं ॥ ज्ञात्वादेवंमुच्यते सर्वपाशैरेषवेदोविश्वकर्मामहात्मा ॥ या श्रुतीवरून विश्वकर्मा हा जगदीश्वर, महान् ऋषि, सदाशिव मूर्ति आहे. विश्वकर्म स्वरूपाचें विशेषवर्णन—

पद्मपुराणे भूखंडे स्कं० वि० ॥ शिवउवाच ॥ चिन्तयेद्विश्वकर्माणंशिवेवटतरोरधः ॥ दिव्यसिंहासनासीनंमुनिवृंदनिषेवितम् ॥ २१ ॥ उपास्यमानममरैः स्तूयमानंमहर्षिभिः ॥ पंचवक्त्रंदशभुजं ब्रह्मचारिव्रतेस्थितम् ॥ २२ ॥ लक्ष्मीसरस्वती भ्यांच संक्षालितपदद्वयम् ॥ वक्षस्थलेचबिभ्राणंब्रह्मविद्यामुमातनुम् ॥ २३ ॥ हारकेयूरकटककुंडलाद्यैःसुशोभितम् ॥ भस्मांगरागंदेवेशंवरदंसुस्मिताननम् ॥ २४ ॥ कुद्दालंकरणीवास्यमामियंत्रंकमंडलुम् ॥ विभ्राणंदक्षिणैर्हस्तैरवरोह क्रमात्प्रभुं ॥ २५ ॥ मेरुंटंकंस्वनंभूषांवन्हिंचदधतंकरैः ॥ अवरोहक्रमेणैव वामैर्वामविलोचने ॥ २६ ॥ एवंध्यायेन्महादेवंविश्वकर्माणमव्ययम् ॥

अर्थ—शंकर म्हणतात हे पार्वति, वटवृक्षाखालीं विश्वकर्ममूर्तीचें ध्यान करावें, तें असें—दिव्यसिंहासनीं बसलेला ज्याच्या सभोवती मन्वादि पांच सानगादि पांच असे दहा मुनीश्वर ध्यानस्थ बसले आहेत. एके बाजूकडे सर्व देव सेवा करितात, दुसरे बाजूस सर्व कश्यपादि सप्त महर्षि स्तवन करीत आहेत. ज्यास पांच मुखें, दहा हस्त आहेत, ब्रम्हचारी दीक्षा धारक. लक्ष्मी आणि सरस्वती या दोघींनीं धुतले आहेत चरण ज्याचे, ज्याच्या हृदयाचेठायीं मूर्तिमंत ब्रम्हविद्या आहे. गळ्यामध्यें नानाप्रकारच्या दिव्य रत्नांचे व पुष्पांचे हार, दंडामध्यें बाहुभूषणें ( कीर्तिमुखें ), हातांत कडीं. कानांत दिव्य तेजस्वी कुंडलें इत्यादि सर्वालंकारांनीं सुशोभित आहे मूर्ति ज्याची, ज्याच्या सर्वांगीं भस्माची उटी, वरद आणि मंद हंसत आहेत मुखें ज्याचीं, चढत्या क्रमानें उजवेकडील पांच हातांत कुदळ, खोरें तासणी, घटकापात्र, सुवर्णकमंडलु, हीं पांच आयुधें धारण करणारा, आणि डावेकडील पांच हातांत

पर्वत, टांकी, सांडस, अलंकार, अग्निकुंड, हीं पांच अशीं दहा आयुधें धारण करणारा, ( कित्येक ग्रंथांतरीं विश्वकर्मा यास ढाल, खड्ग, त्रिशूल, चक्र, कपाल इत्यादि आयुधेंही असल्याचें वर्णिलें आहे. ) हे पार्वती, याप्रमाणें अविनाशमूर्ति विश्वकर्म याचें ध्यान करावें.

**शंका**—विश्वकर्मा हा परशिव विश्वेश्वर आहे, हें पक्कें समजलें. परंतु पूर्वोक्त " **मरीचीनांपद०**"याश्रुतीवरून वास्तुप्रमुखयज्ञादि कर्माचेंठायी ब्राम्हणास ही विश्व कर्मसंततीय शिल्पी पूज्य आहेत, असें वर्णिलें आहे. तस्मात् ब्राम्हणापेक्षां श्रेष्ठ जाति-मुळींच नाहीं बरें. वि० शिल्पी, ब्राम्हण जर म्हणावे तर " **येकर्मारानविहाय ब्राह्मणानेवपू०** " या पूर्वोक्त भाष्यावरून जरी शिल्पीस अग्रपूज्यत्व आहे तथापि,ब्राह्मण वेगळे आणि शिल्पी वेगळे, असा बोध होतो. तेव्हां पंचालीशिल्पीच्या ब्राम्हण्याचें विशेषत्व कोणत्या प्रकारें आहे?

**उत्तर**—विश्वकर्म संतती यांस जरी शिल्पी ह्मटलें आहे, तथापि मुख्यत्वें जातिवाचक ब्राम्हण शब्द त्यांसच लागू आहे. कारण त्यांची मुखापासून उत्पत्ति आहे. विश्वकर्म याचे पंचमुखास पंचब्रम्ह म्हटले आहे. म्हणजे तीं पंचमुखें प्रणव (ओंकार) स्वरूप आहेत. यासप्रमाण—**पद्मपुराण कपिलगीताध्याय ३ ॥ ओमित्येकं परंब्रह्म सर्वतत्वानुग्राहकम् ॥ आब्रह्मस्तंबपर्यंतं सर्वानुग्रहकारकम् ॥ ३० ॥ प्रथमंतारकाकारंद्वितीयंदंडमुच्यते ॥ तृतीयंकुंडलाकारंचतुर्थमर्धचंद्रकम् ॥ पंचमंबिंदुसंयुक्तंप्रणवंब्रह्मपंचकम्॥ ३२ ॥**
या वचनावरून ओंकार हा परब्रम्हरूप आहे. हें परब्रम्ह जग निर्माण करण्याकरितां स्वतः आपण पंचब्रम्हरूप होते झाले. तीं पंचरूपें—पहिलें तारकाकारब्रम्ह. (३), दुसरें दंडकाकारब्रम्ह(—), तिसरें कुंडलाकारब्रम्ह. (०), चवथें अर्धचंद्राकार (◡), पाचवें बिंदुरूप (.) हीं पंचब्रम्हें मिळून एकाक्षर प्रणव ( ॐकार )

स्पष्ट उदाहरण—
या पंचाकृतीचें वर्णन शिल्पशास्त्रामध्यें सविस्तर आहे.

बिंदु
अर्धचंद्र
तारक ॐ कुंडल.
दंड

या प्रणवात्मक पंचब्रम्हापासून, पंचमुखें, पंचवेद, पंचदिशा, ५ देव, ५भूतें,- ५ स्थानें, पंचमात्रा, ५ वाचा, ५ शून्यें, ५अवस्था, ५ देह, ५ गुण, ५ पद्में, - ५क्रिया, ५कोन इत्यादि अनेक प्रकारचीं पंचकें निर्माण झालीं आहेत. असो-

विश्वकर्मयाचीं ५ मुखें प्रणवात्मक ह्मणजे पंचब्रह्म स्वरूपें आहेत. यास प्रमाण- **पद्मपुराण कपिलगीता अध्याय ३ रा. श्लोक २४-२५ ॥ तारकंसद्योजाताय-वामदेवायदंडकम् ॥ कुंडलंयंतत्पुरुषमीशानंचार्धचंद्रकम् ॥ अघोरेभ्योबिंदुमिति प्रणवः पंचवक्रकः ॥**

अर्थ—तारकात्मक सद्योजात मुखब्रह्म, दंडकात्मक वामदेवमुखब्रह्म, कुंडलात्मक तत्पुरुष मुखब्रह्म, बिंदुरूप अघोर मुखब्रह्म, अर्धचंद्रात्मक ईशान मुखब्रम्ह, याप्रमाणें विश्वकर्म याच्या प्रणवात्मक पंचमुखांस पंचब्रम्ह म्हणतात. यास वेदोक्त प्रमाण वीरशैवचंद्रिकायां पंचब्रह्ममंत्र-अरण प्रश्न १०।अ० १७-२१ पंचऋक् १ ऋक् । १ सद्योजातंप्रपद्यामि०--भवोद्भवायनमः ॥ सद्योजातमुखब्रह्म-पूर्व दिक्. २ ऋक् । वामदेवायनमोज्ये०—मनोन्मनायनमः॥ वामदेवमुखब्रह्म। दक्षिणादिक्. ३ ऋक् । अघोरेभ्योथघोरे०—अस्तुरुद्ररूपेभ्यःअघोरमुखब्रह्म । पश्चिमादिक् ४ ऋक् । तत्पुरुषायविद्महे०—तन्नोरुद्रःप्रचोदयात् । तत्पुरुषमुखब्रह्म । उत्तरादिक् ५ ऋक् । ईशानःसर्वविद्या०—मेअस्तुसदाशिवों ॥ ईशानमुखब्रह्म । उर्ध्वदिक् या श्रुतीवरून पंचमुखें हीं पंचब्रह्में आहेत. यास आणखी प्रमाण.—वसिष्ठपुराण कांड तीन अध्याय ६ पृथु वसिष्ठ संवादे ॥ विश्वकर्मापरब्रह्म जगदाधारसूत्रकः ॥ तन्मुखानितु वै पंच पंचब्रह्मेत्युदाहृतम् ॥ १ ॥

यावरून जगताचा आधार जो विश्वकर्मा तो परब्रह्म होय. आणि त्याचीं पांच मुखें हीं पंचब्रह्में जाणावी. आतां ब्राम्हण शब्दाचा विचार केला असतां उघड दिसतें कीं,ब्रम्ह शब्दापासून ब्राम्हण शब्द झाला आहे. त्या ब्रम्हशब्दाचा वेदप्रणीत मुख्यार्थब्रम्ह म्हणजे ईश्वराचें मुख,अर्थात मुखापासून झालेले जे ते ब्राम्हण होत. या मुख अर्थाच्या संबंधानें झालेला ब्राम्हण शब्द जातिवाचक आहे. हा जातिवाचक ब्राम्हण शब्द विश्वब्रम्हवंशस्थ शिल्पींसच लागू होतो. जाति म्हणजे वर्ण ब्राम्हण, क्षत्रिय. वैश्य, शूद्र, असे चार आहेत. या चार वर्णांच्या उत्पत्तींचीं स्थानें. ईश्वराचें मुख, बाहु, मांड्या, पाय अशीं अनुक्रमानें चार जाणावीत. यास प्रमाण श्रुति—

ऋग्वेद् अ. ८ । अ. २ । व. १८ ॥ ब्राह्मणोस्यमुखमासीत्० इत्यादि आहे.

असो, ब्राम्हण वर्ण ईश्वराचें मुखापासून झाला असा या श्रुतीचा अर्थ आहे.

शंका—ब्राम्हणो० या ऋचेंत मुख शब्द प्रथमांत असतां ' मुखापासून ' असा अर्थ करण्यास प्रमाण ?

उत्तर—त्याच श्रुतीचें प्रमाण-भाष्य—अस्य प्रजापते र्ब्राम्हणो ब्राम्हणत्व जातिविशिष्टःपुरुषो मुखमासीत् मुखादुत्पन्न इत्यर्थः ॥

अर्थ—या प्रजापति आदिब्रम्ह विश्वकर्म्याच्या मुखापासून ब्राम्हणत्व जातिविशिष्ट पुरुष ( सर्व ब्राम्हण जातीपैकीं एक विशेष भेदाचा समुदायरूप पुरुष ) उत्पन्न झाला. आणखी प्रमाण-भागवत द्वितीयस्कंध अध्याय ५ पुरुषसूक्तार्थ. ब्रह्मउवाच ॥ पुरुषस्यमुखात्ब्रह्म क्षत्रमेतस्यबाहुतः॥ ऊर्वोर्वैश्योऽभवच्चाथपद्भ्यां शूद्रोभ्यजायत ॥

यांत सर्वेश्वर विश्वकर्म याच्या नाभीपासून झालेला ब्रम्हदेव नारदाप्रत सांगता झा-

---

१ विशेषाख्यं ब्राह्मणमिति श्रुति पुरुषसूक्तेत्युक्तं ॥ ब्राम्हणोस्य मुखमासीत् ॥ इति श्रुतौ एकयोनि प्रसूतस्य पुंसामेकस्यैव ॥ वज्रसूची उपनिषद्.

२ ब्राह्मणानां कुलं द्वेधापूर्वंविरचितं सुरैः ॥ आर्षेयं पौरुषेयंच कर्म जन्मविशेषतः ॥ आर्षेयंतु वसिष्ठादित्यमुष्मिन्मुनिसत्तम ॥ यद्विश्वकर्मणश्चास्य पुरुषस्य मुखोद्भवं ॥ पौरुषेयमितिख्यातं पंचगोत्रं महत्कुलं ॥ स्कांदेनागरखंडे पंचमाध्याये.

ला- विश्वकर्म याच्या मुखापासून ब्राम्हण, बाहूपासून क्षत्रिय, मांड्यांपासून वैश्य,पायां पासून शूद्र, असे चारवर्ण होते झाले.

**शंका**—पूर्वोक्त ब्राम्हणो० या श्रुतीमध्यें ब्राम्हणाच्या उत्पत्तीस एकच मुख आहे, असा बोध होतो; मग पांचमुखें कशीं ? तसेंच आणखी विश्वकर्मा विश्वतोमुख ( अनंत मुखी ) आहे. पांचचकां ?

**उत्तर**—विश्वकर्म यास एकमुख म्हणून जें वर्णिलें आहे त्यापासून समाहार द्वंद्वानें पांच मुखांचा अथवा अनंत मुखांचाच बोध होतो. तसेंच'ब्राम्हणोस्य०'याश्रुतीनेंएक ब्राम्हणच उत्पन्न झाला, असें समजूं नये, तर ब्राम्हणवर्ण उत्पन्न झाला असें जाणावें. याविषयीं सायणाचार्याचें भाष्य पहा म्हणजे समजेल. आतां विश्वकर्म यास जरी विश्वतः मुखें आहेत तथापि विश्वतः म्हणजे सर्व बाजूस अर्थात् चहूंकडून म्हणजे पूर्व, दक्षिण,पश्चिम,उत्तर या चहूं दिशास ज्यास मुखें आहेत. तो विश्वतोमुख( विश्वकर्मा ) होय. यास्तव विश्वकर्म्यास जरी अनंत मुखें आहेत तथापि त्यांचा पूर्व, दक्षिण, पश्चिम उत्तर, उर्ध्व या पंचदिशाभिमुखाचें ठायींच समावेश होतो; म्हणून पांचदिशा हींच विश्वकर्म याचीं अनंतमुखात्मक मुख्यप्रधान, सद्योजातादि पांचमुखें जाणावींत. यांतील अभिप्राय असा कीं, अधिष्ठानरूप एकमुखाचें ठायींच पंचदिशापरत्वें पांच मुखें आहेत आणि त्या पांचमुखाचें अंतर्गत अनंत मुखें जाणावींत. या पंचमुखांच्या पंचादिशा—**वसिष्ठपुराणकांड ३ अध्याय ६ पृथुवसिष्ठ संवादोक्ति ॥ तत्प्रधान मुखंपूर्वंसद्योजातंविचक्षणम् ॥ याम्यंद्वितीयवदनंवामदेवंसनातनम् ॥ ततःप्रतीचीवदनमघोरमितिकथ्यते ॥ ११ ॥ तदुदीचीमुखंनामतत्पुरुषमितीरितम्॥ ओंकारंपंचमंचोर्ध्वमीशानवदनंस्मृतम् ॥ १२ ॥** अर्थ—सद्योजातमुखप्राचीदिशा, वामदेवमुखदक्षिणदिशा, अघोरमुख पश्चिमदिशा,तत्पुरुषमुख उदीचीदिशा, ईशान्यमुखऊर्ध्वदिशा, याप्रमाणे पंचमुख ब्रह्माच्या पंचदिशा आहेत. या पंचदिङ्मुखापासून पंचब्रम्हर्षि उत्पन्न झाले. यास प्रमाण—

श्रुति—यजु० अ० ४ । पन्न ३ । अनुवाक ३ । पन्ना. १-२ ॥ **विश्वकर्मऋषिः-प्रजापतिगृहीतयात्वयावाचंगृण्हामिप्रजाभ्यःप्राचीदिशांवसंतऋतूनामाग्निर्देवताब्रह्मद्रविणंत्रिवृत्स्तोमः सउपंचदशवर्तनिस्त्यविवयः कृतमयानांपुरोवातोवातःसानगऋषिः ॥ १ ॥ दक्षिणादिशांग्रीष्मऋतूनामिंद्रोदेवताक्षत्रंद्रविणंपंचदशस्तोमः-सउसप्तदशवर्तनिर्दित्यवाड्वयस्त्रेतायानांदक्षिणाद्वातोवातःसनातनऋषिः ॥ २ ॥ प्रतीचीदिशांवर्षाऋतूनांविश्वेदेवादेवताविट् २ द्रविण॑ सप्तदशस्तोमःसउवेकाविं॑शवर्तानिस्त्रिवत्सोषयोद्वापरोयानांपश्चाद्वातोवातोहभूनऋषिः ॥ ३ ॥ उदीचीदिशा॑शरदृतूनांमित्रावरुणौदेवतापुष्टंद्रविणमेकविं॑शस्तोमःसउत्रिणववर्तनिस्तुर्यवाड्वय आस्कंदोयानामुत्तराद्वातोवातःप्रत्नऋषिः ॥ ४ ॥उर्ध्वदिशा॑हेमंताशि-**

शिरादृतूनांबृहस्पतिर्देवतावर्चोद्रविणंत्रिणवस्तोमःसउत्रयस्त्रिꣳशवर्तनिःपष्ठवाड्वयोभिभूरयानांविष्वग्वातोवातःसुपर्णऋषिः ॥ पितरःपितामहाःपरेवरेतेनःपांतुतेनोवंत्वस्मिन्ब्रम्हन्नस्मिन् क्षत्रेस्यामाशिष्यस्यांपुरोधायामस्मिन्कर्मन्नस्यांदेवहूत्यां ॥ २ ॥ विट्पष्ठवाड्वयोष्टाविंशतिश्च ॥ ३ ॥

**भाष्यं**—मध्यमदेशेउपधेयानामिष्टकानांमंत्रमाह—इयमुपरि० ॥ अथप्राचीदिशामिति० ॥ हेइष्टके, दिशांमध्ये या प्राची सात्वमसि । ऋतूनांमध्ये यो वसंतः तद्रूपासि देवतानांमध्येयोऽग्निः। तद्रूपासि । स्वकीयत्वेन संपादनीयानां द्रविणानांमध्ये विशिष्ट ब्राम्हण्यरूपं यद्धनं तद्रूपात्वमसि । स्तोमानांमध्ये त्रिवृन्नामको यः स्तोमः तद्रूपात्वमसि सउ । सोऽपित्रिवृत्स्तोमः । पंचदशवर्तनिः । पंचदशस्तोमस्यप्रवर्तकः । बहिष्पवमानस्तोत्रेत्रिवृत्सोमप्रवृत्तौ सत्यांततऊर्ध्वभाविषु आज्यस्तोत्रेषुपंचदशस्तोमाः प्रवर्तंते तत्प्रवर्तनशक्तिरूपात्वमसि । वयसांमध्ये सार्धसंवत्सररूपं यद्वयः । तद्रूपात्वमसि । त्र्यविः शब्दः सार्धसंवत्सरमुपलक्षयति । तथाहि । अविजातौ । प्रायेणगर्भधारणमारभ्य षष्टेमास्येव शिशुर्जायते । त्रिसंख्याका अविजन्मकाला यस्यवयसः । तद्वयः । त्र्यविशब्देनोच्यते । अयानांमध्ये यत्कृतयुगं तद्रूपात्वमसि । वायूनांमध्ये पुरोवाताख्यो योवायुः तद्रूपात्वमसि ॥ ऋषीणांमध्येयः सानगाख्यऋषिः । तद्रूपात्वमसि ॥ ( याप्रमाणें पुढेंही भाष्य आहे. विस्तारभयामुळें दिग्दर्शन मात्र केलें.

**भावार्थ**—प्रासाद, चयनयज्ञाचें पक्ष्याकृति यज्ञकुंड अथवा सर्व प्रकारच्या यज्ञभूमि पाणी लागेपर्यंत भूमी खणून त्या तळापासून समंत्र विधीनें विटांनीं बांधून काढाव्या लागतात. या विधानास इष्टकोपधान म्हणतात. पूर्वोक्त श्रुतीत चयनयज्ञाचें पक्ष्याकृति यज्ञकुंडाचें इष्टकोपधानसमंत्रक सविधि आहे. जसें प्रसादादिक व शिखराचे वगैरे इष्टकोपधान कुशल शिल्पिब्राह्मणावांचून होत नाहीं. तसेंच चयनादियज्ञांचीं कुंडें व भूमी ही कुशल शिल्पि ब्राह्मणावांचून करितां येत नाहीं. म्हणून पूर्वी वसिष्ठादि महर्षींही प्रासादादि सर्व शिल्पांत मोठे कुशल होते. पहा, **अयंपुरोभव**० या श्रुतीनें वसिष्ठ, भरद्वाज, विश्वामित्र आणि जमदग्नि हे महर्षि अनुक्रमें पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर या चहूं बाजूचे चयनयज्ञाचे प्राणभृत् संज्ञक इष्टकोपधानकर्ते आहेत.परंतु चयन प्रासादादि सर्व शिल्पाधीश्वर महामेधावी विश्वकर्मा प्रजापति आहे, ह्मणून ( **विश्वकर्मा त्वासादयत्वंतरिक्षस्यपृष्ठे. यजु. ४।३।६** ) या श्रुतीनें उर्ध्व दिशेचेठायीं ( अग्निस्थापनाच्यामध्यदेशीं ) इष्टकोपधानरचना करणारा विश्वकर्मा आहे. एवढेंचनव्हे. तर मूळ इष्टका ( वीट ) निर्माण करणें, हेंकर्तव्यकर्म ( **विश्वकर्मा ते ऋषिः॥ भाष्यम् ॥ हे इष्टके विश्वकर्मा एवतव ऋषिः । यजु. अ. ४।३।४।३** ) या श्रुतीनें

१ स्तोमलक्षणं सामवेद भाष्ये—सूक्तत्रय पठितानां नवानामृचांगानं त्रिभिःपर्यायैःकर्तव्यम् । तत्र प्रथमपर्याये त्रिषुसूक्तेषु आद्यास्तिस्त्रऋचः । द्वितीये पर्याये मध्यमाः । तृतीये पर्याये चोत्तमाः । तिसृभ्यइति तृतीयार्थेपंचमी । हिंकरोतिगायतीत्यर्थः । सोयंयथोक्तप्रकारोपेता गीतिस्त्रिवृत् स्तोमस्यविष्टुति ( स्तुतिप्रकारविशेषः )

विश्वकर्म्यांचेंच आहे इतरांचें नाहीं ( अर्थात् विश्वकर्मसंतती यांचेच आहे असें समजावें ) आणखी प्रमाण—अग्निपुराण अध्याय ४१ मध्यें इष्टकास्थापनमंत्र— अव्यंगेचाक्षतेपूर्णेमुनेरंगिरसः सुते ॥ इष्टकेत्वंप्रयच्छेष्टंप्रतिष्ठांकारयाम्यहम् ॥ यांत इष्टकाअंगिराऋषीची कन्या आहे असें म्हटलें आहे. अर्थात् अथर्वण अंगिरस बृहस्पति विश्वकर्माच तिचा कर्ता होय. इष्टकेचें प्रमाण—इष्टकाश्चसुपकाः स्युर्द्वादशांगुलसंमिताः ॥ सुविस्तारत्रिभागेनवैपुल्येनसमन्विताः॥ २ ॥ करप्रमाणाःश्रेष्ठास्याच्छिलाप्यथशिलामये ॥ श्रीसूक्तेनचतथाशिलाः संस्थाप्यइष्टकाः॥ शक्तयो विमलाद्यास्तुइष्टकानांतुदेवताः॥ अर्थ—प्रासादार्थ किंवा कुंडार्थ पक्क्या विटा १२ अंगुलें रुंद, १ हात लांब, ८ अंगुलें जाड अशा चतुष्कोण विटा किंवा शिला विश्वकर्मसंततीय पंचालब्राम्हणांनीं अथर्वण वेदोक्त श्रीसूक्त पठण करीत होत्साते कुंडाच्या किंवा प्रासादांच्या इष्टकांची किंवा शिळांची रचना करावी. पंचालशिल्पी हस्तनिर्मित इष्टकांचे ठायीं विमलादि अष्ट देवता वास करितात.' असो, प्राचीदिशां० या श्रुतीचा अभिप्राय—चयनयज्ञकुंडाच्या (अपानभृत्) संज्ञक पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर, आणि ऊर्ध्व—(अग्निस्थापनाचामध्यदेश) या पंच दिशांच्या यज्ञभूमि अनुक्रमें सानग, सनातन अहभून प्रत्न आणिसुपर्ण ऋषि या पांच गोत्रज विश्वकर्म संततीय ब्राह्मणांनीं किंवा सर्वब्राह्मणांनीं इष्टकांनीं बांधून काढाव्या त्याचा क्रम —दशदशोपदधाति०, यजु०—५।२।१०। याश्रुतीनें पूर्वोक्त श्रुतींतील ( प्राचीदिशां १। वसंतर्तूनां २। अग्निर्देवता ३। ब्रह्मद्रविणं ४। त्रिवृत्स्तोमः ५। सउपंचदशवर्तनिः ६। त्र्यविर्वयः ७। कृतमयानां ८। पुरोवातोवातः ९। सानगऋषिः १०। या १०।१० मंत्रांनीं १०।१० विटांचा प्रत्येक थर सहित--बसवून आणि ( हिरण्येष्टकाउपदधाति० यजु० अ० ५। ७। ६। २–३ ) या श्रुतीवरून आणि ( हिरण्यशकलंनिधाय ) या बौधायन सूत्रोक्त चयनप्रयोगोक्त वाक्यावरून त्या प्रत्येक १० दशेष्टकथरास एक एक सुवर्णेष्टका किंवा इष्टकाकृति सुवर्णाचा चौरस तुकडा बसवून सानग गोत्री विश्वकर्मसंततीय शिल्पींनीं पूर्व बाजूच्या यज्ञभूमीची फरसबंदी कुंडाचे मेखलेसहित करावी. याचप्रमाणें बाकीच्या दक्षिणादिशां०। प्रतीची—दिशां०। उदीचीदिशां०। उर्ध्वादिशां०। या श्रुतींतील ही १०। १० मंत्रांनीं सनातन, अहभून, प्रत्न आणि सुपर्ण ऋषि या गोत्रज पंचालब्राम्हणांनीं अनुक्रमें बाकींच्या, दक्षिण, पश्चिम, उत्तर, आणि ऊर्ध्व ( मध्यदेश ) या दिशेंच्या यज्ञभूमि कुंडासहित विटांनीं बांधून काढाव्या. या पक्ष्याकृति चयनयज्ञकुंडाचासमंत्रक सविधि इष्टकोपधान प्रयोग कारिकेसहित बौधायन सूत्रांमध्यें सविस्तर आहे वाचकांनीं पहावा. येथें विस्तारभयामुळें लिहीत नाहीं. असो, चयनयज्ञकुंडप्रयोगांत पूर्वादिपंचदिशेचे अपानभृत्संज्ञक इष्टकोपधानमंत्राचे सानगादि पांच ब्रम्हर्षि असण्याचें कारण हे ऋषि आदिप्रजापतीच्या ( ईश्वराच्या ) पंचमुखांपासून उत्पन्न झाले आहेत ते असे--सद्योजातनामक पूर्वमुखापासून सानगऋषि, वामदेवाख्य दक्षिणमुखापासून सनातनऋषि, अघोरनामक पश्चिममुखापासून अहभूनऋषि, तत्पुरुषाख्य उत्तरमुखापासून प्रत्नऋषि, ईशानाख्य उर्ध्वमुखापासून सुपर्णऋषि, याप्रमाणें पंचब्राम्हण

उत्पन्न झाले. याचप्रमाणें आणखी प्रमाण---**वसिष्ठपुराण कां० ३ अ० ६ शौनकप्रश्न-शौनक उवाच ॥ तन्मुखेषुयथाजाताःसानगाद्यामहर्षयः ॥ तत्प्रशंसकथंलोकेवर्तमानेचरंतिते ॥ १२ ॥ वसिष्ठउवाच ॥ सुपर्णःसानगश्चैवसनातनइतिस्मृतः ॥ गुरुश्रेष्ठोहभूनश्चप्रत्नो धात्रीसुरक्षकः ॥ १३ ॥ विश्वकर्ममुखोद्भूता ब्राह्मणाःपंचकीर्तिताः ॥ सद्योजातमुखेजातःसानगोविश्वकर्मणः ॥ वामदेवमुखेजातोब्रह्मर्षिस्तुसनातनः ॥ अघोरमुखसंजातोऽहभूनोवैश्वकर्मणः ॥ तत्पुरुषेमुखेजातःप्रत्नोसौवैश्वकर्मणः ॥ तस्येशानमुखेजातःसुपर्णोवैश्वकर्मणः ॥ १६ ॥** यात वसिष्ठ ऋषि पृथुराजास आणि शौनक ऋषीस विश्वकर्म कुलवर्णन कथा सांगतांत कीं. सानगादि पांच ब्राह्मण विश्वकर्मयाच्या पांच मुखापासून उत्पन्न झाले. सद्योजातमुखापासून सानग इत्यादि पूर्वोक्तीप्रमाणेंजाणावें. या सानगादिकांच्या पांच देवता आहेत, त्या मनुमयादि जाणाव्या. यास प्रमाण-

**तैत्तिरीय श्रुति पंचब्रह्मोपनिषद्वाक्य–सोमाःयस्माद्विश्वꣳसमस्तंक्रियते॥समांविश्वकर्मापातु॥विश्वस्त्रष्टाविश्वभर्ताविश्वशांतिकः॥जीवाताभुवनानांसिद्धानांकिन्नराणां यःपुराणश्चजीमूतवर्षकः ॥ त्राताऽनुमाता पुरुषःपरः। विराड्विश्वकर्मास्वराड्विश्वकर्मासंराड्विश्वकर्मा । ब्रह्मविष्णुरुद्रशतमखादयोदेवाजायंते ॥ विश्वेदेवावसवःपितरोगंधर्वाइमेसर्वेलोकाश्चेतिविश्वकर्मणः । व्योमान्मारुतः । मारुताद्वैश्वानरः । वैश्वानराज्जलम् ॥ जलाद्भूमिः । भूम्याओषधयः । औषधीभ्योबीजानि। बीजेभ्योखिलसस्यानि । सस्योद्भवंधान्यम् । धान्येभ्योऽन्नंभवति । अन्नादेवरसः । तद्रसेनजंतूनाꣳसर्वेषाꣳरेतः शुक्लशोणितरूपमेवाह । तस्मात्पिंडाः समुत्पन्नाः । समुत्पन्नानिस्थावरजंगमरूपाणि । जातान्मनेकानिपिंडब्रह्मांडानि । इतिविश्वकर्मणाभूतानि । विश्वकर्मणाद्धृतधानि । तेनैवाहप्रतिष्ठितानि । पंचमुखेभ्यः पंचशीर्षोमनुः प्रथमः । मयोद्वितीयः । त्वष्टातृतीयः । शिल्पीचतुर्थः । विश्वज्ञः पंचमइतिसएवार्कोविधीयते । सानगः सनातनोऽहभूनः प्रत्नःसुपर्णश्चेत्येतेचसर्वे गोत्रपुरुषाः । प्राकृतेष्वाद्य । ईश्वरोविश्वकर्ताआहुः । कश्यपोत्रिस्ताभ्याꣳ सूर्यचंद्रादयोजायंते गवाद्याः कुंभिसूत्राः स्थलजाः । जलजाः कीटकाः चतुर्विधाः प्रकृतयः । प्रजातावेदविद्याः । सांख्यादयोपिकर्मज्ञानबोधकाः । निगमागमाश्च । सर्वंविश्वंनिर्मितं । सविश्वकर्मापरब्रह्मेत्युपनिषद् । यएतदुपनिषत्पठेत्प्रातरादिसमये । ससर्वपापैःप्रमुच्यते। तद्वैवंविश्वकर्मकारणम्॥ पंचब्रह्माधिगच्छति॥**

या उपनिषदामध्यें विश्वकर्मा सर्वांचा कर्ता आहे, अशी स्तुति केली आहे. आणि संपूर्ण पिंड ब्रह्मांडांस उत्पन्न कर्ता जो विश्वकर्मा त्याच्या सद्योजातादि पांच मुखांपासून अनुक्रमें पंचमुखीमनु पहिला, चतुर्मुखमय दुसरा, त्रिमुखत्वष्टा तिसरा, द्विमुखशिल्पी चवथा, एकमुखदैवज्ञ पाचवा, असे पांच सृष्टिकर्ते पंचतत्त्वरूप पंच अधिदेवता उत्पन्न झाल्या. त्या पांच दैवतोपासक पांच ब्राम्हण ( गोत्रपुरुष )—सानग ( मनु ) सनातन ( मय ) अहभून ( त्वष्टा ) प्रत्न ( शिल्पी ) सुपर्ण ( विश्वज्ञ ) याप्रमाणें पंचब्रह्मास निर्माणकर्ता सर्वाधिपति विश्वकर्मा आहे, हाच तात्पर्यार्थ. हें उपनिषद् त्रि-

काळ जो पठण करील तो सर्व पापापासून मुक्त होऊन पंचब्रह्म सायुज्य पावेल मनुमयादिक पांच देवतांनीं काय काय सृष्टि केली याविषयीं:—

**पद्मपुराणे भूखंडे—यत्किंचिद्बीजसंभूतं भूतजातंचतुर्विधम् ॥ २६ ॥ तस्यसर्वस्यसंस्थानं मनुर्घटयतिस्वयम् ॥ मानवोभूतसंघोयंशास्त्रदृष्ट्याचतुर्विधा ॥ २७ ॥ मानवत्वंनरेषूक्तं श्रेष्ठत्वामनुसंततौ ॥ ( इतिमनुकृत्यं ) यत्किंचिदिंद्रजालादिमूढदृष्टयैवववर्तते ॥२८॥ तत्वतः सर्वथानास्तिसामायामयनिर्मिता ॥ नसत्यत्वंमानववन्नमृषामयशिल्पवत् ॥ २९ ॥ क्षणेक्षणेच यच्चित्रंनानारूपाकृतिक्रियम् ॥ ( इतिमय० ) खचरंसर्वगंयच्चविशेदपिशिलोदरम्॥ ३० ॥क्षणात्स्थूलं क्षणात्सूक्ष्मं क्षणाल्लघुगुरुक्षणात्॥तत्वष्टानिर्मितंविद्यादिव्यंब्रम्हसभादिकम्(इतित्वष्टा) ॥३१॥ उत्कीर्यदारुदृषदंमूर्तियुद्धरतेतुयः॥सतक्षाक्ष्मातलेयेनकृतंपातालसप्तकम्॥ (इतितक्षा) ३२ ॥ शिल्पिनस्त्रिविधंशिल्पंमृत्स्ना धातूपधातुजम् ॥ मृन्मयंद्विविधंतत्रलेप्यं लेख्यंच भामिनि ॥ ३३ ॥ अकुप्यंकुप्यजंचैव धातुजंद्विविधंमतम् ॥ अकुप्यंस्वर्णरौप्यादिताम्र लोहादिकंपरम् ॥ ३४ ॥ उपधातु भवमपिकुप्याकुप्यभिधंद्वयम् ॥ कुप्यंकाचादिजंशिल्पमकुप्यंपारदादिकम् ॥ ३५ ॥ तार्णवंतांतवंचापिपटवस्त्रादिकंतुयेत् ॥ उपशिल्पंतु तज्ज्ञेयंशिल्पि वर्यैःप्रवर्तितम् ॥ ३६ ॥ एवंनानाविधंशिल्पंद्वारकायांप्रकाशितम् ॥ मनुप्रभृतिभिर्भद्रेपंचभिर्विश्वकर्मजैः ॥ ३७ ॥ पद्मपुराणे भूखंडे ॥** यांत मनु, मय, त्वष्टा. शिल्पी आणि तक्षा या पांच विश्वकर्मपुत्रांनीं अनुक्रमें मानवसृष्टि, इंद्रजाल, नानाविधरूपसृष्टि, काष्टपाषाणमूर्ति निर्माण शिल्प आणि मृत्तिका, धातु,आणि उपधातु अशी त्रिविधशिल्प सृष्टि, येणें प्रमाणें पंचविधसृष्टि करिते झाले. **शिवपुराणे श्रीमूळस्तंभ शिवानिबंधे ईश्वरपार्वतीसंवादे** अध्याय ४ ॥ **पूर्वीचेंच होतेंजंत्र ॥ तैसेंचिउभविलें विचित्र ॥ हे पांचही पंचाल पवित्र ॥ उभारिते जाहले ॥ ४ ॥ तवशक्तिह्मणेशूळपाणी ॥ तुह्मींसांगितलींब्रह्मयाचीकरणी ॥ तरीपंचाल हे कोणकोठोनी ॥ जाहलेदेवा ॥ ५ ॥ मगदेवह्मणेवो भवानी ॥ हे जन्मले आदिब्रह्मयाचे मुखापासूनी ॥ या ब्रह्मांडाची करावयाकरणी ॥ ब्रह्मवदनीं जन्मले ॥ ६ ॥ ते पांचही महाचालक ॥ पांचामुखापासाव झाले वर्चिक ॥ तेरचितेजाहले सुरेख ॥ ब्रह्मांडहें ॥ ७ ॥ जे गायत्री पासावबीज ॥ तेमहापंचभूतसहज ॥ सप्तधातुचारखाणीसरोज ॥ देवदैत्यरचिले ॥ ८ ॥ मगब्रह्माघेऊनमहिमा ॥ पांचजणलाविलेकामा ॥ मेरुस्थापूनिव्योमा ॥ चारीकोणसाधिले ॥ ९ ॥ तेह्मणसीकोणकोण ॥ तरीऐकवोसांगेन ॥ तेपंचाळविचक्षण ॥ परियेसीदेवी ॥ १० ॥ प्रथममनुविख्याति ॥ दुजाविश्वज्ञसोनारानिश्चिती ॥ शिल्पित्वष्टाकुशलमती ॥ मयपाथरवटपांचवा ॥ ११ ॥ मू० अ० १३ ॥ आणखी अध्याय ३ रा—हींपांचहीतत्वेंविशेखें ॥ परमेश्वराचींपांचमुखें ॥ तेपांचहीपांचाळदेखें ॥ यापासूनजन्म ॥ ६४ ॥**

**अथअपस्तंबश्रुत्यनुगत विश्वब्रम्होपनिषद् गोत्रादि ॥ यत्रपूर्वे० सानगगोमृगरभसेतित्र्यार्षेयप्रवरान्वितः । पूर्वदिशा । वसंतऋ-**

तूनां । अग्निस्तत्वं । रुद्रोदेवता । मनुब्रह्मद्रविणं । त्रिवृत्स्तोमः । आश्वलायनसूत्रं । ऋक्‌शाखाः । सद्योजातमुखप्रवरं । त्रिकोणकुंडं । पालाशदंडः । कृतमयानांसानगऋषिः ॥ १ ॥ अङ्गयःसंभूतः० सनातन शकररैवतेतित्र्यार्षेयप्रवरान्वितः ॥ दक्षिणादिशांग्रीष्मऋतूनां । उदकतत्वं । विष्णुर्देवता ॥ मयब्रम्हद्रविणंपंचदशस्तोमः ॥ अपस्तंबसूत्रं । यजुःशाखाः । वामदेवमुखप्रवरम् । चतुष्कोणकुंडं ॥ वटवृक्षदंडः । त्रेतायानां दक्षिणाद्वातोवातःसनातनऋषिः२ विश्वकर्म० अहभूनशिवनामपावनइतित्र्यार्षेयप्रवरान्वितः । पश्चिमदिशांवर्षाऋतूनां । पृथ्वीतत्वं । ब्रम्हादेवता । त्वष्ट्रब्रम्हद्राविणं । सप्तदशस्तोमः । दाक्षायणसूत्रं । सामशाखाः। अघोरमुखप्रवरं।षट्कोणकुंडं।कोविदारवृक्षदंडः । द्वापरोयानांपश्चाद्वातोवातोहभूनऋषिः । ३ । तत्पुरुषस्य० प्रत्नससात्विकस्वामिनिष्कत्र्यार्षेयप्रवरान्वितः ।उदीचीदिशांशरदृतूनां । वायुस्तत्वं । इंद्रोदेवता । शिल्पब्रम्हद्रविणं । एकविंशत्स्तोमः। बौधायनसूत्रं। अथर्वणशाखाः । तत्पुरुषमुखप्रवरं । अष्टकोणकुंडं । श्रीफलवृक्षदंडः । स्कंदोयानां । उत्तराद्वातोवातःप्रत्नऋषिः ॥ आदित्य० सुपर्णसवागीशधृतजीवेति। त्र्यार्षेयप्रवरान्वितः। ऊर्ध्वादिशां । हेमंतशिशिरावृतूनां । आकाशस्तत्वं । अर्कोदेवता । विश्वज्ञब्रम्हद्रविणं । त्रिवण स्तोमः । कात्यायनसूत्रं । प्रणवशाखाः। ईशानप्रवरं । वर्तुलंकुंडं।जंतुफलवृक्षदंडः । अभिभूरयानां । विष्वग्वातोवातःसुपर्णऋषिः । पितरःपितामहाः । परेवरेतेनःपांतु । तेनोवंतु । अस्मिन्ब्रह्मन्नस्मिक्षत्रेस्यामाशिष्यस्यांपुरोधायामस्मिन्कर्मन्नस्यांदेवहूत्यांविश्वब्रह्मभ्यो नम इति ओं शांतिःशांतिःशांतिः ॥

यामध्यें विश्वब्रम्हवंशस्थांचें गोत्र,प्रवर, शाखा,वेद वगैरे प्रकार वर्णिला आहे.

शंका—वेद चार असून पांच वेद म्हणण्यास काय प्रमाण ?

उत्तर--कपिलगीताध्याय २ । ऋग्वेदोथयजुर्वेदःसामवेदोत्यथर्वणः ॥ सूक्ष्मवेदोहिच्याध्यक्षः पंचवेदाः प्रकीर्तिताः ॥ १० ॥ या वाक्यावरून पांचवा सूक्ष्म ( प्रणव ) वेद जाणावा. या पांच वेदांचे अध्यक्ष पूर्वोक्त पांच ब्रम्हर्षि आहेत. आतां या पांच विश्वब्रम्हऋषींचीं वृत्तिकर्मे आहेत तीं—ब्रह्मांडपुराणेद्वितीय पटले विश्वब्रह्मकुलोपाख्याने अ. १ नमोस्तुतेसानगविश्वकर्मणे । नमोस्क्तेतपूर्वमुखोद्भवाय ॥ नमोस्तुषड्भूतविनिर्मिताय । नमोस्तुचिद्रूपनमोनमस्ते ॥ १ ॥ साधनंनास्तिसर्वत्रलोकानांसर्वसाधकः ॥ करोतिलोहकर्माणिलोकान्रक्षतिसानगः ॥ २ ॥ ददौशस्त्राणिदेवानांदुष्टनिग्रहकारणात् ॥ सचसर्वजगत्कर्तासद्योजातमुखोद्भवः ॥ ३ ॥ शूलंददातिभर्गायचक्रंदत्तंच्चविष्णवे ॥ पाशस्तुब्रम्हणदत्तोनिर्मूत्यात्मगसानगः ॥ ४ ॥

या वाक्यावरून सद्योजात नामक पूर्व मुखापासून झालेला सानग ऋषि लोहकर्मा चा अधिपति आहे. तो शिवविष्णवादि देवांस दैत्यवधास्तव अनेक शस्त्रें देता झाला. म्हणून हा जगत्कर्ता आहे. त्या जगत्कर्त्या सानगऋषीस वारंवार नमस्कार असो. ॥ श्लोक॥ **क्षुतृष्णादिनिवृत्तात्माजायतेदक्षिणामुखात्। सनातनोदारुकर्मकुशलोनिर्ममेपुरा ॥ १ ॥ हलादीनांतुकर्तव्यंमंदिराणांविशेषतः॥ स्यंदनादीनियानानि विकरोतिसनातनः ॥ २ ॥** यांतील भावार्थ-क्षुधा तृषाविरहित शांतरूप सनातन ऋषि विश्वकर्म याच्या दक्षिणमुखापासून उत्पन्न झाला. आणि हा सनातन ऋषि हल, मंदिर, रथ, विमान इत्यादि सर्व काष्ठसंबंधीं शिल्पकर्मांचा उत्पन्नकर्ता आहे. ॥ श्लोक ॥ **संस्तुतोनारदाद्यैस्त्वहभूनऋषिसत्तमः ॥ अशेषमुनिभिःपूज्यस्त्वघोरवदनोद्भवः ॥ २ ॥ योगार्हपत्यधर्मस्य विनिर्माताजगद्विभुः ॥ त्वष्टास्वर्णादिभिर्लोहैःपात्राणिविकरोतिसः॥३॥** यातील **भावार्थ**—नारदादिक समस्तऋषींस वंद्य असा पश्चिममुखापासून झालेला जो अहभून ऋषि तो यज्ञयागादि कर्म धर्म निर्माण करणार; आणि सुवर्ण रौप्य ताम्रादि धातूपासून यज्ञपात्रादि नानाप्रकारच्या पात्रसंबंधीं शिल्प क्रियेचा अधिपति आहे; म्हणून त्यास त्वष्टाही नांव आहे. प्रत्न० ॥ श्लोक ॥ **प्रत्नोविश्वस्यकर्तासौजगद्रक्षापरायण॥ब्रह्मण्योदङ्मुखाज्जात प्रवरा प्रत्नसंतते ॥७॥ प्रत्नःप्रहर्षणःशिल्पीवास्तुकोविश्वभद्रकः॥शक्करस्तुशिलाकर्मकर्तृणांगोत्रनायकाः॥८॥**

**यातील भावार्थ**—विश्वकर्मयाच्या उत्तर मुखापासून झालेला प्रत्नऋषि, जगताचें रक्षण करणारा आहे; त्या प्रत्नाचे प्रहर्षण, शिल्पी, वास्तुक, विश्वभद्र, शक्कर, प्रत्न असे पांच प्रवर ऋषि आहेत. हा प्रत्नगण पाषाणासंबंधीं (मूर्तीवगैरे) शिल्पकर्माचा अधिपति आहे. सुपर्ण ऋषि ॥ **महोन्नतोमहापुरुषःपीनवक्षाःससुंदरः ॥ अनादिनिधनः स्वर्णःसुपर्णस्तस्यनामहि॥२॥ स्वर्णंददातिलोकानांब्रह्मण्योर्ध्वमुखोद्भवः॥ किरीटकुंडलादीनांभूषणानांप्रयोजकः ॥३॥**

यांतील **भावार्थ**—महान्‌उग्रतेजस्वी वक्षस्थल रुंद, स्वरूपानें सुंदर, ज्याच्या महिमेस आदि अंत नाहीं, ज्याच्या अंगाचा वर्ण तप्तकांचना सारखा असा सुपर्णऋषि विश्वकर्म याच्या ऊर्ध्वमुखापासून उत्पन्न झाला आणि तो किरीट कुंडलादि सर्व सुवर्ण रत्नसंबंधीं अलंकारादि शिल्पक्रियेचा अधिपति आहे. याविश्वकर्मसंततीय पंचऋषि वंशात गोत्र प्रवर मिळून२५०ऋषींची संख्या आहे. याविषयीं वर्णन ब्रह्मांडपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण, आदित्यपुराण आणि वसिष्ठपुराण इत्यादि पुराणांत साविस्तरकेले आहे विस्तार भयामुळें व भावार्थ एकच असल्यामुळें येथें अन्य ग्रंथांतील वगैरे विशेष संमते घेतलीं नाहींत. आतां या सानगादि पंचऋषि गोत्रसांप्रदायीं ब्रह्मपंचालांचीं जरी लोह, काष्ठादि पंचविध वृत्ति कर्मे आहेत, तथापि कालमानानें व शक्तिमानानें विशेषे करून महाराष्ट्र देशांत आणि वगैरे चहूंदेशांतील ही सानगसनातनादि पंचब्रह्म सांप्रदायी ब्रह्मपांचाल कुलस्थ लोक बहुतकरून सुवर्णरत्नादि संबंधीं शिल्पकर्मेच करीत असतात आणि याच सुवर्ण रत्नवृत्तीनें अगर लोहादि सर्व शिल्पकर्मे करणारें जरी अन्यजातीचें स्वर्णकारादिक आहेत तथापि त्यांच्याशीं ब्रह्मपांचालाचा अन्नोदकादि वगैरे अगदीं व्यवहार नाहीं

असो या विश्वकर्म मुखोद्भूत सानगादि पंचऋषि संततीस या जगामध्यें विश्वब्रह्मवंशस्थ, विश्वकर्मसंतति, ब्रह्मपांचाल, सौरब्राह्मण, पंचालब्राह्मण, विश्वज्ञ, विश्वकर्म मुखोद्भूत स्वर्णकार, देवरथकार, ब्रह्मरथकार, मुखमासीत् ब्राह्मण, पंचब्रह्मकुल इत्यादि संज्ञा आहेत अधिकार—

**यजु० अ० ३ प० ३ अ० ८** अश्वमेधयज्ञप्रकरण **सिद्धांत ॥ पन्नाशी २-२ पं· चवैश्वकर्मणमंत्र यज्ञपतिमृषयएनसा । आहुः । प्रजानिर्भक्ता अनुतप्यमानामधव्यैास्तोकावपतौरराध ॥ सन्नस्ताभ्यांस्रजतुविश्वकर्माघोराऋषयोनमोअस्त्वेभ्यः ॥ चक्षुषएषांमनसश्चसुधौब्रृहस्पतयेमहिषधुमन्नमः ॥ नमोविश्वकर्मणेसउपात्वस्माननन्यान्त्सोमपान्मन्यमानः ॥ प्राणस्यविद्वान्त्समरेनधीरएतश्चकृवान्महिबद्धएषां ॥ तंविश्वकर्मन् । २ । प्रमुंचास्वस्तयेयेभक्षयंतोनवसून्यानृहुः ॥ यानग्नयोन्वतष्यंतधिष्णियाइयंतेषामवयादुरिष्टयैस्विष्टिंनस्तांकृणोतुविश्वकर्मा ॥ नमःपितृभ्यो अभियेनोअख्यन्यज्ञकृतोयज्ञकामाःसुदेवा । अकामावोदक्षिणांननीनिममानस्तस्मादेनसःपापयिष्ट ॥ यावंतोवैसदस्यास्तेसर्वेदक्षिण्यास्तेभ्योयोदक्षिभ्योणांन । ३ । नयेदैभ्योवृश्च्येतयद्वैश्वकर्मणानिजुहोति० ॥**

या श्रुतीचा विद्यारण्य भाष्य सिद्धांतावरून अर्थ पाहिला असतां स्पष्ट समजेल कीं पंचवैश्वकर्मण संज्ञक विश्वकर्म संतति गोत्रज मनु, मय, त्वष्टा, शिल्पी, दैवज्ञ हे विश्वब्रह्मकुलोत्पन्न शिल्पि ब्राह्मण यज्ञदक्षिणोपयोगीं, सुवर्णादिधातु शिल्पाचे अधिपति असल्यामुळें यज्ञयागादि षट्कर्मांचे व षोडशकर्मांचे अधिकारी मुख्यत्वें करून आहेत. कारण **ब्राह्मणोस्यमुखमासीत्०** या श्रुतीवरून व दुसऱ्याही कित्येक ग्रंथांवरून ब्राह्मणवर्ण ईश्वराचे मुखापासून झाला,हें प्रसिद्धआहे. ह्मणून पूर्वोक्त सद्योजातादि पंचमुखें त्यांसच पंचब्रम्ह हें नांव आहे.असे पूर्वी वर्णिलेच आहे अर्थात् "**तस्यापत्यं४।१।८२। तत्र भवः ४।३।५३। प्रभवति ४।३।८३** या सूत्रांवरून अण् प्रत्ययहोऊन [पंच] ब्रह्मणांअपत्यानि=ब्रह्मसुभवावा=ब्रम्हभ्यः प्रभवंतिवा=पंचब्राम्हणाः ( सानगादयःपंच ) विश्वकर्मपंचमुख=( पंचब्रह्म ) त्यापासून झालेले जे ते पांच ब्राम्हण होत. अर्थात् सानगादि विश्वकर्म संततीय विश्वब्रम्ह ( ब्रम्हपंचाल ) यांचेठायींच मुख्यत्वें रूढिवाचक ब्राम्हण शब्दाची शक्ति आहे. आणि मुख्यशब्दही मुखाच्याच संबंधानें असल्यामुळें ब्राम्हणासच आहे. पहा, **भागवत तृतीयस्कंध अध्याय ६— मुखतोवर्ततब्रह्म पुरुषस्यकुरुद्वह ॥ यस्तुमुखत्वाद्वर्णानांमुख्योभूद्ब्राह्मणोगुरुः॥ भावार्थ**—ईश्वराचे मुखापासून जो ब्राम्हण वर्ण झाला तो मुखापासून झालेला असल्यामळें सर्व वर्णांचे ठायीं ब्राम्हण जाति मुख्यत्वानें गुरुरूप असती झाली. म्हणून विश्वकर्म कुलांचे ठायींच मुख्य ब्राम्हणत्व.

**शंका**— कायते विश्वकर्म संततीच जर मुख्य ब्राम्हण आहेत. मग या पृथ्वीमध्यें चहूंकडेस सर्वत्र ज्याना ब्राम्हण म्हणतात तें उगीचच काय ? व ते कोण.

**उत्तर**—ज्यांना लौकिकांमध्यें ब्राम्हण म्हणतात ते सप्तऋषि संततीय व त्यांचे पासून झालेल्या नाना योनिसमुत्पन्न ऋषींच्या वंशांतील आहेत. आणि त्यांना ब्राम्हणशब्द आहे. परंतु तो औपगव, सैंधव, वैष्णव, इत्यादिक शब्दांसारखा यौगिक आहे. कारण, वैश्यवर्णोत्पत्तीचें स्थान म्हणजे जानुमंडल, तत्प्रदेशासमतांतर्गत नाभी पासून ब्रम्हदेव उत्पन्न झाला त्याब्रम्हदेवा पासून ही सप्तऋषि संतति झाल्यामुळें ब्रह्मदेवाच्या ब्रह्मा नांवास ततः प्रभवतीत्यर्थे अण् प्रत्यय होउन साधिलेला ब्राह्मणशब्द सप्तऋषिसंततीचेठायीं यौगिकच आहे—**कश्यपोत्रिर्भरद्वाजोविश्वामित्रोथगौतमः॥— वासिष्ठोजमदग्निश्चेति०**हे सप्तऋषि व एतत्संबंधी आणखी ब्रह्मदेवाच्या मनापासूनझालेले मानसपुत्र दहाऋषि—**भागवतस्कंध ३ अ० १—मैत्रेयउवाच—मरीचिरत्र्यंगिरसोपुलस्त्यःपुलहः क्रतुः॥ भृगुर्वसिष्ठोदक्षश्चदशमस्तत्रनारदः ॥ २२ ॥** ह्मणजे मरीचि, अत्रि, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु, भृगु, वसिष्ठ, दक्ष हे दहा ब्रह्मदेवाच्या शरीराच्या निरनिराळ्या स्थानापासून मानसपुत्र उत्पन्न झाले. यांपैकीं क्रतुऋषीपासून आणखी संतति—**श्रीमत्भागवते पंचमस्कंधे** प्रथमाध्याये—**क्रतोरपिक्रियाभार्यावालखिल्यानसूयत ॥ ऋषीन्षष्टिसहस्राणिज्वलतोब्रम्हतेजसः ॥ २९ ॥**

**अर्थ**—क्रतुनामक ऋषीपासून त्याच्या क्रियानामक स्त्रीच्याठायीं वालखिल्यसंज्ञक साठहजार ऋषी उत्पन्न झाले, आणि ते तपोबलानें ब्रह्मतेजस्वी होते झाले. याचप्रमाणें पशुपक्ष्यादि नानातिर्यक योनींत जन्मपावलेलें " ऋषींचे कुल आणि नदीचे मूळ काढूं नये " अशी ह्मण आहे. हे ऋषि अठ्ठयाऐंशी हजार आहेत. यांना ब्राह्मणत्व मूळ नव्हते. परंतु तपोबलानें ऋषि सर्वपूज्य होते झाले. अर्थात् ब्राह्मणत्व प्राप्त आहे. या प्रमाणें भारतांत शल्यपर्वांत कित्येक अन्य योनिज ऋषीस तपानें ब्राह्मण ह्मणूं लागले, पहा भारत—**तथाचकौशिकस्ताततपोनित्योजितेंद्रियः॥ तपसावैसुतप्तेनब्राह्मणत्वमवाप्तवान् ॥** यावरून विश्वामित्रानें ( क्षत्रियानें ) तपोबळेंकरून ब्राह्मणत्व कमाविलें. फारतर काय! परंतु या नाना योनिज ऋषींचा मूळपुरूष **ब्राम्हणो भगवान्रुद्रःक्षत्रियःपरमोहरिः । वैश्यःपितामहश्चैव०** यानें वैश्यसंज्ञक जो ब्रह्मदेव त्यानें सुद्धां तपानेंच ब्राह्मणत्व मिळविलें. पहा— **भारत—तथेतिचाब्रवीद्ब्रह्मासर्वलोकपितामहः ॥ सलब्ध्वातपसोग्रेणब्राह्मणत्वंमहायशाः ॥** ह्मणजे मोठें कठिण तप जेव्हां केलें तेव्हां ब्रह्मदेवांस ब्राम्हणत्व मिळालें तपानें ब्राम्हणत्व मिळण्याचें कारण—**आत्मावेदस्तपोब्रह्म ( अमरः )** तपासही ब्रम्हसंज्ञा आहे. परंतु गुरुमंत्रोपदेशावांचून तपोधिकारी होतनाहीं. तेव्हां विश्वकर्म याच्या मूलप्रणव मंत्रोपदेशें करून सप्तऋष्यादिक तप करितेझाले. आणि त्या तपानें ब्रम्ह ( निजरूप ) ज्ञानामध्यें प्रवीण झाले म्हणून **कृतलब्धक्रीतकुशलाः ४।३।३८** या सूत्रानें ब्रम्ह

१ इत्येते ऋषयःप्रोक्ता स्तपसा ऋषितांगताः ॥ ऋषिपुत्र ऋषीकास्तु मैथुनाद्गर्भ संभवात् ॥ ऋषीकाणांसुताये वैभूतादि ऋषिकास्तया ॥ सेय्यन तपसा ऋषितांगताः ॥ मत्स्य पुराणे अ. १२०

( आत्मस्वरूप ) या शब्दास अणू प्रत्यय होऊन झालेला ब्राम्हण शब्द सप्तऋषीं सहित अष्टाशीतिसहस्र नाना योनिजात वैधसाख्य ( ब्रम्हदेवसंतति ) ऋषिकुळाचेठायीं यौगिक असून गौणीं लक्षणेनेंही आहे, मुख्यवाचक नाहीं. म्हणून **जन्मनाजायतेशूद्रःसंस्काराद्द्विजउच्यते ॥ वेदपारायणाद्विप्रोब्रम्हजानातिब्राम्हणः ॥** ही प्रसिद्ध स्मृति नाना० अष्टाशीति सहस्रऋषिवंशस्थ वैधसाख्य ( व्यवहारिक शूद्रयाजी ) ब्राम्हणांसच लागू आहे. मनुमयादि विश्वब्रम्हवंशस्थ शिल्पि ब्राम्हणांस नाहीं. कारण **स्कंदपुराण नागरखंड अध्याय ७–मनुःपूर्वमुखोद्भूतोमयोयाम्यमुखोद्भवः ॥ पश्चिमास्येऽभवत्त्वष्टातक्षाचैवोत्तरास्यतः ॥ ऊर्ध्वायांशिल्पिसंभूतिःपंचगर्भमुनीश्वराः ॥** या वचनावरून हे मुखोद्भूत वैश्वकर्मण ब्राह्मण गर्भींच मुनीश्वर ( ब्राम्हण) होते. म्हणून शिल्पिशास्त्रे-“ **विश्वकर्मकुलेजातागर्भब्राह्मणनिश्चिताः ॥ शूद्रत्वंनास्तितद्वंशेब्राह्मणाविश्वकर्मणः ॥** ”

या स्मृती वरून सानगादि विश्वब्रम्हसंततीस गर्भींच असतां ब्राम्हणत्व निश्चयानें आहे. असो, यांत अभिप्राय हाच कीं, मुख्यवर्णवाचक ब्राम्हणत्व विश्वकर्म संततीस च आहे. आणि शूद्रादि हीन प्रतिग्रह घेण्याचा व परान्नोदकाचा कधींही प्रसंग न येतां आपली उपजीविका सुरक्षितपणानें व्हावी; म्हणून ते औपोसन अग्निहोत्ररूप पवित्र सुवर्णादि शिल्पकर्म वृत्तीनें उपजीवन करितात. तस्मात् त्यांचीं आचरणेंही उत्कृष्ट ब्राम्हण धर्माचीं आहेत. म्हणून श्रुतीस्मृतींनीं त्यानांच मुख्य ब्राम्हण म्हटलें आहे. नाना वैधसाख्य ब्राम्हणास ब्राम्हणशब्द यौगिक असूनही ते पूर्वीं विद्वान् आचारशील कर्मनिष्ठ सत्वाभिमानी वगैरे विशेष होते; परंतु हल्लीं अंत्यजादिकांचे प्रतिग्रह घेण्याच्या व परान्न घेण्याच्या व हरएक कामांत याचना करणें वगैरे बचनागाच्या गोडीप्रमाणें त्यांच्या भपक्याच्या दिसाव वागण्यामुळें, झाडून कुणबी, धुणबी वगैरे अज्ञान लोक त्यानांच एकजातित्वानें ब्राम्हण म्हणून जे पूज्य मानितात, ते पूर्वोक्त **मरीचीनांपदमिच्छंतिवेधसः** या श्रुतीवरून मुखोद्भव ब्राम्हणरूप मुख्य सूर्यमंडल सोडून, भूप्रदेशावर पडलेल्या उन्हाची पूजा करणारे आहेत. अशी श्रुतीच आहे. कारण या वैधसाख्य ब्राह्मणांचे मूळपुरुष हे सप्तर्षि विश्वकर्मरूप सूर्याचीं किरणें ( प्रकाश ) आहेत; यास आणखी प्रमाण—

> **ऋग्वेद अष्टक ८ । अध्याय ३ । वर्ग १७ । मंत्र २ ( विश्वकर्मसूक्त ऋक् ९ ) विश्वकर्माविमनाआद्विहाया धाताविधातापरमोतसंदृक् । तेषामिष्टानिसमिषामदंतियत्रसप्तऋषीन्परएकमाहुः ॥ याजवर निरुक्ति उत्तरषट्क अध्याय ४ ऋक् २५ ॥ विश्वकर्मासर्वस्यकर्तातस्यैषा भवति । विश्वकर्माविभूतमनाव्याप्ता धाताच-**

---

१ औपासन महोरात्रं नवलोहंमहाहुतिः ॥ ( शिल्पिसूत्रे ) नवलोह ( सर्वधातु ) हेमेत्यारभ्य. लोहजातरूपमितिपंचदश हिरण्य नामानि ( निघंटअ० १ ) २ रजक श्चर्मकारश्च नटोबुरुडएवच ॥ कैवर्तमेदभिल्लाश्चसप्तैतेचांत्यजाःस्मृताः ॥

विधाताच परमश्चसंद्रष्टा भूतानां तेषामिष्टानिवाकांतानिवाकांता-
निवागतानिवामतानिवानतान्यवाद्भिःसहस्रंमोदंतेयत्रैतानिसप्तऋ
षीणानिज्योतींषितेभ्यःपरआदित्यस्तान्येतस्मिन्नेकं भवतीत्यधि-
दैवतमथाध्यात्मंविश्वकर्माविभूतमना० —संदर्शयितेंद्रियाणांतेषा-
मिष्टानि० नतान्येषान्नेनसहस्रंमोदंतेयत्रेमानिसप्तऋषीणानींद्रिया-
ण्येभ्यःपरआत्मातान्येतस्मिन्नेकं भवतीत्यात्मगतिमाचष्टे ॥ त-
त्रेतिहासमाचक्षतेविश्वकर्माभौवनःसर्वमेधेसर्वाणिभूतानिजुहुवावां-
चकारस आत्मानमप्यंततोजुहुवांचकारतदभिवान्येषऋग् भवति-
यइमाविश्वा भुवनाजुन्हदितितस्योत्तरा भूयसेनिर्वचनाय ॥

या श्रुतीवरून विश्वकर्मा सर्व त्रिभुवनांचा अधिपति आहे. आणि जशी सूर्याची प्रभा ऊन्ह, तशी विश्वकर्म यांची सप्तऋषिं ही प्रभा आहे, ह्मणजे तो सप्तऋषींस आपल्या प्रभावानें व्यापूनही त्याहून तो श्रेष्ठत्वेंकरून वेगळा आहे. यास अध्यात्मपर दृष्टांत—जसा आत्मा सर्व इंद्रियचक्रांचा सत्ताधारी असूनही तो सर्व इंद्रियांहून वेगळा आहे. तसा विश्वकर्मा सत्ताधारी प्रभु जाणावा. आणि तो सर्वमेध यज्ञयागागाची स्थापना करणारा आहे. केवळ तो यज्ञात्माच जाणावा, त्याच्या अभिवंदनार्थ ही ऋचा आहे. यांतील तात्पर्यार्थ असाकीं, सप्तऋषींस ब्राह्मणत्व ह्मणजे षट्कर्मांचा अधिकार विश्वकर्म यानींच दिलेला आहे. यास आणखी प्रमाण—

**वैवस्वतपुराणे उत्तरार्धे आध्याय ९६ कृष्ण भीमसंवादे ॥ विश्वकर्मा याप्रत सप्तर्षि ह्मणतात—**

अस्माकंदीयतांशीघ्रं भगवन्यज्ञ शीलताम् ॥ ७ ॥ यजनं याजनं-
चैवाध्यायनाध्यापनेतथा ॥दानंप्रतिग्रहश्चेतिषट्कर्माणिमहाविभो
॥ ८ ॥ भाषितंतुमय स्तेषांश्रुत्वातद्रोमहर्षणः ॥ ९ ॥ दास्यामी-
तिवचोदत्वाशक्यंकर्तुंनचानृतम् ॥ इत्युक्त्वासददौतेषांषट्कर्माणि-
महाविभुः ॥ ऋषिभिस्तैर्गृहीतानिषट्कर्माणितदामयात् ॥ संतु-
ष्टामुनयःसर्वे आगच्छंतपुनःपुनः ॥ तेषांतत्समयोदत्वादुष्कृतामृ-
षिकूटिनां ॥ कोपेन महताविष्णुः शशापऋषिसप्तकम् ॥ १२ ॥
विफलंभवतामेतद्ब्राह्मण्यंममशापतः ॥ शापदग्धात्मानायूयमपू-
ज्याभवितुमर्हथ ॥ १३ ॥ इत्युक्त्वाक्रोधताम्राक्षः सलिलंतुविसृ-
ष्टवान् ॥ ततस्तेनैव शापेनमुनयः सप्तपीडिताः ॥ १४ ॥ दुःखि-
तास्तेसमागच्छन्ब्रह्माणामिदमब्रवीत् ॥ ऋषयऊचुः ॥ ब्रह्मन्मय-
स्यशापेनपीडितावयमागताः ॥ १५ ॥तस्मान्नोत्त्वभयं देवदातुम-
र्हसिसुव्रत ॥ श्रीब्रह्मोवाच ॥ किमर्थंभवतांशापोदत्तस्तेनमहात्म-
ना ॥ १६ ॥ श्रुत्वेतिचर्षयः सर्वेब्रह्माणामिदमब्रुवन् ॥ षट्कर्मा-
णिगृहीताह्वियंगत्वादयान्वितः॥१७॥ दास्यामीतिसदत्वातुपुन,
शापमुवोचह ॥ इति श्रुत्वाततोब्रम्हतानृषीन्पुनरब्रवीत् ॥ १८ ॥

दोषस्तुभवतांमध्येतस्माच्छापंसदत्तवान् ॥ अतःशापविमुक्त्यर्थं
गच्छध्वमृषिसत्तमाः॥ विश्वकर्माणमेवात्रगतिंसचविदास्यति॥१९॥
इत्युक्ताऋषयस्तेनब्रह्मणाशापपीडिताः ॥ तदासमेत्यसर्वेचवि-
श्वकर्माणमग्रतः ॥२० ॥ ऋषयऊचुः ॥ शिल्पाचार्यायदेवायनम-
स्तेविश्वकर्मणे ॥ मनवेमयायत्वष्ट्रेचशिल्पिनदैवज्ञतेनमः ॥ २१ ॥
भक्तितोविश्वकर्माणंस्तुतिमद्वाक्यमब्रवीत् ॥ सर्वोत्तमोब्रह्मदेवस्त-
थाचऋषिमानवः ॥ २२ ॥ नमस्कृत्वातुचक्रुस्तेप्रभूतांस्तुतिमाद-
रात् ॥ श्रीब्रह्मोवाच ॥ विश्वकर्मन्महादेवदेवदेवमहाप्रभो॥२३॥
त्वमेवसर्वलोकानामीश्वरःप्रभुरेवच ॥ त्वमेवसाक्षाज्जनकोभूता-
नांदेवसत्तम॥ सृष्टिसंहारकर्ताचलोकानांसर्वकामदः ॥ विश्वक
र्मापरब्रह्मविश्वकर्माहरोहरिः ॥ २५ ॥ विश्वात्माविश्वकर्माचसर्व-
कर्मनिवारकः ॥ त्वंतुरूपाण्यनेकानिरजस्तमयुतानिच ॥ कृत्वा-
सृजसिलोकांस्त्रीन्जगच्चसचराचरम् ॥ २६ ॥ तस्माद्विश्वपतेर-
क्षैतानृषीन् शापपीडितान् ॥ त्वांविनान्यगतिंदेवनपश्यामिजगत्र
ये ॥ २७ ॥ इतिश्रुत्वामहादेवोविश्वकर्माजगत्प्रभुः ॥ मत्प्रसादा
त्तुमुनयःपूज्याभवितुमर्हथ ॥ २८ ॥ इत्युक्ताऋषयस्तेनकृपयावि
श्वकर्मणा ॥ शापाद्विमोचितास्तेतंनमश्चक्रुःपुनःपुनः ॥ २९ ॥वि
श्वकर्मन्नमस्तेस्तुजगद्रक्षापरायण ॥ प्रकृतिंपुंस्वरूपायसर्वप्राकृत-
मूर्तये ॥ ३० ॥ अमंगलविनाशायसर्वमंगलदायिने ॥ सर्वलोक-
विनिर्मात्रेसाक्षिणेजगतांनमः ॥ ३१ ॥ नमोनमोविश्वकर्मन्नमस्ते
स्तुतपोधन ॥ तवप्रसादान्महतःशापेनतुविमोचिताः ॥ ३२ ॥शु-
द्धावयंतु भवतःकृपयादेवसत्तम ॥ अतःशीघ्रहिगच्छामोनिज-
मार्गंजगत्प्रभो ॥ ३३ ॥ इत्युक्ताऋषयस्तस्मैनमस्कृत्वापुनःपुनः
॥ प्रदक्षिणमकुर्वंस्तेब्रह्मणेविश्वकर्मणे ॥ ३४ ॥ मुहुर्मुहुर्नमस्कृत्वा-
स्तुवंतिमुनि सत्तमाः ॥ ययुस्ततउदीचींतुदिशंसमानिषावतां॥ ३५
॥ श्रीकृष्णउवाच ॥ तस्माद्भारतयोविप्रोविश्वकर्माणमेवच ॥ सं-
स्तुतेविश्वकर्तारंसर्वाभीष्टमवाप्नुयात् ॥ ३६ ॥ भक्त्यायुतोनरो-
यस्तुविश्वकर्माणमर्चयेत् ॥ संततिस्तस्यलोकेत्रपूज्या भवतिभार-
त ॥ ३७ ॥ इत्थंश्रुत्वातुकौंतेयः कृष्णेनविनयान्वितः ॥ गदांगृ-
हीत्वासययौयुद्धायसमितिंजयः ॥ ३८ ॥ श्रुणोतियइदंदिव्यंरह-
स्यमृषिभिःकृतम् ॥ सनिष्पापोविशुद्धात्माविश्वकर्मप्रसादतः ॥
॥ ३९ ॥ पुत्रपौत्राभिवृद्धिःस्यात्ससुखीचभवेद्ध्रुवम् ॥ देहांतेवि-
श्वकर्मण्यंसायुज्यपदमाप्नुयात् ॥ ४० ॥ इतिश्रीमहापुराणेवैवस्व-
तेउत्तरार्द्धेकृष्णभीमसंवादेमयकृतसप्तर्षिशापविमोक्षणकथायां वि-
श्वकर्मस्तोत्रंनामषण्णवतितमोध्यायः ॥ ९६ ॥

यांतील **भावार्थ**—श्रीकृष्ण भीमास कथा सांगतात कीं, पूर्वी सप्तऋषींनीं आपल्यास ब्राह्मण्य प्राप्त व्हावें म्हणून विश्वकर्म्याची प्रार्थना केली, हे विश्वकर्मन्, आह्मीं पुष्कळ तपस् केलें. आतां आम्हांस षट्कर्मांचा अधिकार द्यावा. तेव्हां विश्वकर्म यांनीं प्रसन्न होऊन त्यांना षट्कर्मांचा अधिकार दिला. परंतु पुनःपुनः ते ऋषि जेव्हां तेव्हां फारच याचना करूं लागले; त्यामुळें विश्वकर्मयानें ऋषि कपटी असें जाणून त्यांना शाप दिला. तुमचें ब्राह्मण्य व्यर्थ होऊन तुम्ही अपूज्य व्हाल. तेव्हां त्या ऋषींनीं ब्रम्हदेवापाशीं जाऊन सांगितलें, कीं, विश्वकर्म यानीं आम्हांस " अपूज्य व्हाल " म्हणून शाप दिला आहे. तस्मात् हे ब्रम्हन् ह्या शापाचें मोचन करावें. तेव्हां ब्रम्हदेवांनीं सांगितलें कीं, तुमच्यामध्यें दोष आहे म्हणून शाप दिला; तर आतां विश्वकर्म याच्या शापाचें मोचन विश्वकर्माच करील. त्याच्या शापास मोचन करणारा दुसरा कोणीं समर्थ नाहीं. नंतर ते सप्तर्षि ब्रम्हदेवासहित विश्वकर्मयाजवळ जाऊन शापमोचनाविषयीं त्याची पुष्कळ स्तुति करिते झाले. तेव्हां विश्वकर्मा संतुष्ट होऊन त्यास आपल्या शापापासून मुक्त केलें. नंतर ते सप्तर्षि सर्वपूज्य होते झाले. मग ते विश्वकर्म यास अभिवंदन करून स्वछंदानें उत्तर दिशेस जाते झाले. याप्रमाणें कृष्ण म्हणतात, हे भीमा, जो भक्तीनें विश्वकर्म याची स्तुति आणि पूजा करील त्याच्या वांच्छित कामना पूर्ण होऊन तो सर्वमान्य होईल. तसेंच हें सप्तऋषींनीं केलेलें विश्वकर्मस्तोत्र जो पठण किंवा श्रवण करील तो विश्वकर्मकृपेनें पुण्यात्मा होत्साता संतति संपत्यादिकांप्रत पावून इहलोकीं सर्व सुख भोगील हें निश्चयानें जाणावें. आणि अंतीं विश्वकर्म सायुज्य पावेल.

पूर्वोक्त वेदोक्तीवरून व नैरुक्तावरून व दुसऱ्याही कित्येक श्रुत्यादि वचनावरून पराशिव विश्वकर्मा हा यज्ञक्रिया उत्पन्न कर्ता यज्ञदीक्षेचा अधिपति, ज्यानें असंख्य यज्ञ केले म्हणून तो ब्राम्हणाचा राजा आहे. त्यानें सप्तऋषींस षट्कर्मांचा अधिकार वगैरे ब्राम्हणत्व दिलें. तस्मात् विश्वकर्मा हा सप्तऋषींचा गुरु होय. असा श्रुतिसिद्धांतच आहे. म्हणून पूर्वोक्त सर्व प्रकरणावरून सिद्धच आहे कीं, वैधसाख्य ब्राम्हण लोकांस विश्वकर्म मुखोद्भव ( विश्वब्रम्हसंततीय ) शिल्पि ब्राम्हण हरएक वास्तुप्रमुख यज्ञयागादि सर्व कर्मांचेठायीं अवश्य पूज्य आहेत. असें वेदादि सर्वमान्य अनेक ग्रंथावरून स्पष्ट दिसत आहे. म्हणूनच अनादि काळा पासून विश्वब्रम्ह वंशस्थ शिल्पी लोक सप्तऋषि संततीय वैधसाख्य व्यवहारिक ब्राम्हणांस ब्राम्हणत्वाच्या नात्यानें विशेष मानीत नाहींत आणि याच कारणास्तव त्यांनां, विश्वब्रम्ह वंशस्थ लोकांनीं आपल्या हव्यकव्य संबंधीं कार्यांतील उपाध्यायपणाचें हक्क देण्याचा वास्तविकपणें पूर्वीपासून सांप्रदाय नाहीं.

**शंका**—एवढें जर विश्वकर्म संततीय शिल्पि ब्राम्हण मोठें पूज्यस्थान आहे. आणि ते जर वेदमान्य मुखोद्भूत ब्राम्हण आहेत तर ते " आम्हीं ब्राम्हण आहों, आम्हीं ब्राम्हण आहों ' असा पुकार काय म्हणून करतात ? खऱ्यास मरण नाहीं.

**उत्तर**—खऱ्यास मरण नाहीं हें सत्य आहे. परंतु या कलियुगांत सगळें उलटें

झालें आहे म्हणून कालपरत्वें बाह्यदृष्टींनें अज्ञान लोक व असूयाभिमानी लोक खऱ्यासही खोटें मानितात आणि खोट्यास खरें मानितात. कारण पहा—या कलियुगाचे आरंभींच एक संकररथकार म्हणून संकरजाति (शूद्रविशेष) हीन जाति उत्पन्न झाली. तें संकर जातिय लोक विश्वब्रम्ह वंशस्थ शिल्पीचें हाताखालीं गड्यासारखे राहून राहून सर्व लोह, काष्ठ, ताम्र, शिला, स्वर्ण इत्यादि शिल्पकर्म शिकून लोहार, सुतार, तांबट, पाथरवट, सोनार, मालाकार, चित्रकार, वस्त्रकार इत्यादि नांवांनीं संकर जातीय) सोनार वगैरे होते झाले. त्यामध्येंही आणखी अनुलोम, प्रतिलोम होऊन संकर रथकारांसुद्धां उत्तरोत्तर अनेक भेद ह्मणजे व्रात्यवैश्यपुत्र, लोहार, सुतार, तांबट पाथरवट, सोनार, वैश्यसोनार, अहेरसोनार, देवांगनसोनार, अंगसाळी, कानसाळी गुजराथी, शिरमाळी, शीलवंत, लिंगधारणी, दासीपुत्र, पाटकरी, पारसेव सोनार, त्रागट, परदेशी, लाड, खानदेशी, खोदलम, बगलानी, माळवी, पुरवी, पोगर, तागल, मेड, परजे, नांडीगुंड, पलेताली, कुब्बळ, हिंदुस्थानी, मारवाडी, तूर्पनाडी, अविंध इत्यादि शूद्रजातीय अनंतप्रकारचे (सुमारें ७० भेद) शिल्पकार सोनार, सुतार, लव्हार, वगैरे नांवानीं बहुतकरून या महाराष्ट्र देशांत वगैरे चहूंकडे भरले आहेत. त्यामुळें इतकें विलक्षण झालें कीं, शिल्प विद्या ही शूद्रवृत्तीच आहे, असें लोक मानूं लागलें, अर्थात् स्वर्णकारादि शद्बांवर शूद्रत्वाचा मिथ्याभास झाला आहे आणि "सरसकट गुडघ्या इतकें पाणी" या गोष्टीप्रमाणें असूयुलोक व अज्ञान लोक (सोनार हा शद्ब धंद्यावरून आहे, जाति वाचक नाहीं असा विचार न करितां) विश्वब्रह्मवंशस्थ स्वर्णकारादिक सुद्धां सरसकट सर्व सोनारांस शूद्रांत गणूं लागले. इतकेंच नाहीं तर विश्वब्रह्म पांचालांचे स्वधर्मास म्हणजे षट्कर्मे षोडशकर्मादि ब्राम्हण धर्मास हरकत करूं लागले. अर्थात विश्वब्रम्हवंशस्थ स्वर्णकारांनीं 'आम्हीं ब्राम्हण आहों २'अशी चहूंकडे प्रसिद्धी अवश्य केलीच पाहिजे.

**शंका**—पूर्वोक्त प्रकरणावरून विश्वकर्म याचे शिष्यभूत सप्तऋषिसंततीय वैधसाख्य ब्राम्हण विश्वकर्म मुखोद्भव शिल्पिब्राम्हणाशीं पूर्वीं एक विचारें होते असें दिसून येतें. परंतु आतां परस्परांचा अन्नोदकादि व्यवहार काय म्हणून होत नाहीं?

**उत्तर**—या वरील शंकेविषयीं ब्रम्हांड पुराणांत एक कथा आहे. त्यांतील कथेवर टीका, संतमालिकेंत प्रसिद्ध सत्पुरुष विश्वकर्म कुलोत्पन्न सुपर्णर्षिगोत्रिय नरहरि बुवा यांचे वंशांत बाळकृष्ण बुवा नामक मोठे सत्पुरुष होऊन गेले. त्यांनीं विश्वकर्म पुराण नांवाचा एक ग्रंथ ओंवीबद्ध केला आहे. त्यांत दर्शविली आहे.—**विश्वकर्म पुराण अध्याय ३ रा ओंवी ९२ पासून—**

**॥ श्री ॥ कलशापासावजन्मत ॥ कलशोद्भवअगस्तिह्मणत ॥ ज्यासींपर्वतहीनमस्कारीत ॥ अपांपतिप्राशिलाजेणें ॥ ९२ ॥ मार्गेवर्णिलाकलशाराधन**

---

१ सर्व संकर पापिष्टंस्वर्णकार नराधिपः ॥ अन्यायवर्तमानंतं छेदयेल्लवशःक्षुरैः ॥ मत्स्यपु० ॥ आणि मनुस्मृति ॥ हें वाक्य संकर जातीयस्वर्णकरांचेंच आहे. २ शूद्रांशयन० इत्यादि शूद्रकमलाकरोक्त सोनार शूद्र धर्मी जाणावें.

क्रम ॥ जेथेंजन्मलाअगस्तिद्विजोत्तम ॥समुद्राचमनकेलेंहेंवर्म ॥ मंत्रसामर्थ्यत्वष्ट्यां
चें ॥ ९४ ॥ ऐसेंचिपांचांचेंसामर्थ्य ॥ जेकेवळविश्वकर्मेचमूर्तिमंत ॥ सप्तऋ-
षिसंततिशिष्यसमस्त॥ परीमतभेदकाझालातेसांगूं॥९५॥मतभेदझालाकैशावरूनी
॥ पांचांचीसंततिबहुगुणी ॥ सकलकलानिपुणी ॥ निगमागमींसमर्थ॥ ९६ ॥
ऋषिमुलेंत्यांतपद्धती ॥ विश्वेशवेदपढविती ॥ सप्तऋषिसंतती ॥ प्रविणविद्या
र्थीसर्वही ॥ ९७ ॥ त्यातअगस्तिमहाहट्टी ॥ वेदपढेबहुनेटीं ॥ आतांत्वष्टाचार्य
संततीचीगोष्टी ॥ श्रवणकरावीसादरें ॥ ९८ ॥ विश्वकर्माजगद्गुरु॥ ऐसासर्वशा
स्त्रांचानिर्धारू ॥ सकलही सेवितीचरणासादरू॥ परीअगस्तिमनींकपटपैं॥९९॥
विश्वकर्मयाचातनुज ॥ त्वाष्ट्रनामेंतेजःपुंज ॥ तो आपुलिया पुत्राचीमौंज ॥ क
रिताझालासंभ्रमें ॥ १०० ॥ सप्तऋषिसंततीबोलाविली ॥ परीअगस्तीसींपाचा
रणानाहींकेली ॥ परमोत्साहतयेवेळीं ॥ ऋषिमंडळीसींआल्हाद ॥ १ ॥ याव-
रीपुढीलकथा ॥ श्रोतींसादरअसावेंश्रवणार्था॥ ब्रह्मांडपुराणींचीवार्ता॥ वर्णितों
सकलार्थतात्पर्ये ॥ २ ॥ त्वष्टेआपुल्यापुत्राचेंमौंजीबंधन ॥ केलियावरीअगस्ती
चेंआगमन ॥ येऊनिपाहेतोसचिंतमन ॥ ह्मणेअपमानकेलामाझा ॥३॥ विश्वक
र्मयाचापणतूविभ्राज ॥ तयाचीत्वष्टाकरीतसेंमौंज ॥ समारंभमहासतेज ॥
केलाविश्वेशपौत्राचा ॥ ४ ॥ अगस्तीन्त्वष्ट्यातेनमस्कारूनी ॥ ह्मणेमीआपुला
शिष्यअसोनी ॥ नपाचारिलेंकायह्मणोनी ॥ कृपाकरोनीसांगावें ॥ तुमच्या-
मनीदुजाभाव ॥ तुमच्याफळासयेईलसर्व ॥ गुरुशिष्यसंबंधअभिप्राव ॥ आज-
पासूनीनमानूंआह्मीं ॥ ६ ॥ तुमचीपुत्रपौत्रसंतती ॥ विद्यामदेंमातलेती ॥ तरी
माझियाशापाचीप्रतीती ॥ विद्यानिष्फळहोईल॥ ७ ॥ त्वष्टागुरुह्मणेएकश्रवणीं
माझियेविद्येमातलेपणीं ॥ तूंअगस्तीवृक्षहोऊनी ॥ निर्जीवहोसींसर्वांगीं ॥ ८ ॥
प्रेतरूपतुझीकाया ॥ उपेगानयेजायेवाया ॥ मांसरूपीअसोनिया ॥ तोडितील
शस्त्रघातें ॥ ९ ॥ माझियावंशींपाहीं ॥ तूंतेंस्पर्शकरणारनाहीं ॥ मातलेपणेंस्पर्श
तांहीं ॥ निर्वंशपैहोईलतयाचा ॥ १० ॥ तुझियावृक्षाचेंपर्णफूल ॥ तेंमांस-
चिजाणकेवळ ॥ जेसेवितीलचांडाळ ॥ नीचत्वयेईलतयासी ॥ ११ ॥ तात्का
ळझालाअगस्तीवृक्ष ॥ तेंअद्यापीआहेसाक्ष ॥ हादगालाविंतीअपरोक्ष ॥ ऋषि
जनआपुलेद्वारीं ॥ १२ ॥ पुढेंसप्तऋषींचियामुलें ॥ चोरूनींभाक्षिलींफुलें ॥ हें
विश्वकर्मयाजाणवलें ॥ मगदवडिलेंआपणापासोनी ॥ १३ ॥ आजवरीस्नेहेंपु-
त्रापरीपाळिलें ॥ आतांमाझियेआज्ञेतेंभंगिलें ॥ तरीतुमचीयामूळालागेलकाळें॥
कुळाकळंकसर्वथा ॥ १४ ॥ येथूनीसप्तऋषिसंतति ॥ नानानीचयोनींतजन्मपा
वती ॥ ऋषींचेंकूळनदीचेंमूळविचारूंनयेह्मणती ॥ जनबोलतीयाअर्थीं ॥१५॥
ऋषींपासूनत्रिगूळहोती ॥ त्रिजन्मह्मणुनीत्रिगूळह्मणती ॥ अद्यापीकिडेमारिती॥
करितातीस्नानसंध्या ॥ १६ ॥ क्षत्रियवरितीब्राह्मणकन्या ॥ भारतींपाहाशोधू
नियां ॥ मीहिसांगतोंविवंचूनियां ॥ परीनिंदाघडेलपैंमातें ॥ १७ ॥ क्षत्रिया-

१ विश्वकर्म याचें. २ मनु, मय, त्वष्टा इत्यादींचें. ३ विश्वकर्मा.

पासावउत्पात्ति ॥ आपणक्षत्रियासी उत्पादिती ॥ असोहीविश्वकर्मशापाचीख्याती॥कोठवरीवर्णावी॥१८॥ तेथूनिशरीरसंबंधतुटला ॥ अन्नोदकव्यवहारवेगळाझाला ॥ पूर्वसंबंधज्याचेत्याला ॥ स्मरताहेअद्यापी ॥ १९ ॥ परीतपश्चर्येंबळावले ॥ पूर्वपुण्यफळाआले ॥ ह्मणोनीराज्याधिकारीझाले ॥ परीनाहींटळलीकमगती ॥ २० ॥ कांहींतरीआगंतुकगुण ॥ उत्तमपुरुषींआचरण ॥ सप्तऋषिसंततीयब्राह्मण ॥ योनिसंकरसंभूत ॥ २१ ॥ योनिसंकरवर्णसंकर ॥ नीचसेवेंभरतीलउदर ॥ हाशापमहिमाथोर ॥ कांकींगुरुद्रोहीह्मणूनियां ॥ २२ ॥ मगविश्वकर्मेविचारिलें ॥ गोत्रभेदवेगळेकेले ॥ शरीरसंबंधकरूंलागले ॥ आपुलियेशाखेमध्यें ॥ २३ ॥ मगविश्वकर्मामहामुनी ॥ आज्ञापीतसेआपुलियेसंततीलागुनी ॥ स्वशाखीयआचार्यांपासूनी शुभाशुभकर्मेंकरावीं ॥२४॥ जातकर्मादिसकळसंस्कार ॥ करावेआपुलियाचद्विजवरें ॥ अन्यशाखीद्विजापासूनकरितांकर्मनिर्धार ॥ ब्राह्मणत्वनयेतया ॥ २५ ॥ माझियेकुळींजन्मोनीजरी ॥ परशाखीयद्विजहस्तेंकर्मकरी ॥ तोकुळघातकीशूद्रनिर्धारी ॥ अंत्यजयोनींजन्मपावे ॥ २६ ॥ माझियेकुळींजन्मोनी ॥ जोदुष्टसेवीलपरान्नपाणी ॥ तोमहापातकीशतश्वानयोनी ॥ भोगूनिनरकींपचे ॥ २७ ॥ ह्मणोनआपुलास्वधर्मसकळ ॥ सांभाळोनिकरावेंकर्मनिर्मळ ॥ तरीचइहलोकींसुखसोज्वळ ॥ लाधोनीसायुज्यपदपावे ॥ २८ ॥ हेंश्रीविश्वकर्मवाक्य ॥ भंगिल्यानीचत्वयेईलसत्य ॥ प्रत्यक्षबोलिलेत्वष्टाचार्य ॥ पंचआचार्यांलागूनी ॥ २९ ॥ जाणोनिहेंसौरब्राह्मण ॥ आज्ञाभंगकरूंनकाजाण ॥ मीहिसांगतोविनयेंकरून ॥ हिताकारणेंतुमचिया ॥ ॥ ३० ॥ असोपुढेंनांदीश्राद्धकथन ॥ श्रीविश्वकर्माकर्ताआपण ॥ प्रीतिपावोत्रिनयन ॥ नरहरिचरणप्रसादें ॥ ३१ ॥ कृष्णनाथपुत्रशामनाथ ॥ त्याचेपोटींप्रल्हादनाथ ॥ त्यापोटींदामोदरनाथ ॥ त्यापोटींकेशवनारायणजाणिजे ॥३२॥ तद्वंशबाळकृष्णगुरुराम ॥ तत्परसेवेसखाराम ॥ ग्रंथकर्ताआत्माराम ॥ सुखविश्रामसर्वांसीं ॥ ३३ ॥ हेंवेदांतविश्वकर्मपुराण ॥ श्रुतीस्मृतीसंभाषण ॥ मुखोद्भूतब्राह्मण ॥ विश्वकर्मकुलवर्णननामतृतीयोध्यायः ॥ १३४ ॥ ३ ॥

**शंका**—पूर्वोक्त शापानें या कलियुगांत क्षत्रिय वैश्यांप्रमाणें विश्वकर्म संततींत संकर कां झाला नसावा ?

**समाधान**—जसें " नंदांतं क्षत्रिय कुलं. " अशीं क्षत्रियादि धर्मलोपाविषयींवाक्यें आहेत तशीं अमुककालपर्यंतच विश्वकर्मसंततीचें ब्राह्मण्य होते अशीं वाक्यें नाहींत भविष्य— ( **ततस्तस्मिन्युगेसर्वेवर्णाएकी भवंतिवै ॥ तदैवतवसंतत्यां भवितावर्णसंकरःपद्मपुराणे भूखंडे** ) यावरून ब्राह्मणादिसर्व वर्णांचा संकर होईल, तेव्हां यांचाही होणार आहे. आणि ( **युगेयुगेस्थिताःसर्वेकलावाद्यंतयोःस्थिताः॥ ( पुराणांतरंशूद्रकमलाकरे** ) यावरून" विश्वकर्मसंततीचा ब्राह्मणवर्ण असल्यामुळें, ते क्षत्रिय वैश्यांप्रमाणें कलीमध्येंही धर्मभ्रष्टहोणार नाहीं. जसाअंबऋषी विष्णुच्या प्रीतीस्तव शापमुक्त आहे तसा ( **नास्माद्धितकर्तुर्हिभवितांकिंचिदप्रियं ॥ प. भू.** )

यानें विष्णुशिवांच्या प्रीतीस्तव विश्वकर्मवंशही शापमुक्त आहे. कारण विष्णूची आणि शिवाची विश्वकर्म्यास, ( **कलौप्राप्तेपियावन्नवर्णानांसंकरो भवेत्॥ तावत्त्वदीयसंतत्यांवेदमार्गःस्थिरो भवेत् ॥ प. भू.** ) अशी वरोक्ती असल्यामुळें ( **सर्वेकलियुगस्यांतेभविष्यंतिचसंकराः ॥ अग्निपु. अ. १६।५** ) यानें जरी कली प्राप्त झाला तरी कलीच्या ४ थ्या चरणांमध्यें होणारा सार्व वर्णिक संकर होईपर्यंत विश्वकर्मसंततींत वेदमार्ग ( ब्राह्मणधर्म ) राहील आणि (श्रुतिःस्मृतिःसदाचारःस्वस्यचप्रियमात्मनः॥एतच्चतुर्विधंज्ञेयंसाक्षाद्धर्मस्यलक्षणम्) या मनूक्त धर्मज्ञापक चार प्रमाणांवरून पाहातां त्याप्रमाणें महाराष्ट्र,आंध्र,कर्नाटक,द्रविड तैलंग. इत्यादि देशांत विश्वब्रम्ह,वाजर आचार्य,ब्रम्हपंचाल इत्यादि नावांनीं प्रसिद्ध असलेल्या विश्वकर्मसंततीमध्यें,आचार व्यवहार मोठे निर्मळ असून वेदोक्त षोडश संस्कार वगैरे ब्रम्हकर्माचा उपभोग अनादि परंपरा प्राप्त अद्याप पर्यंत चालू असल्यामुळें पंचाल हे ब्राम्हण आहेतहे सिद्ध आहे.॥ ॥ ॐ ॥ आणखी संग्रह २ रा. पहा.

## संग्रह १ ला समाप्त.

---

श्री

# संग्रह २ रा.

( धर्मज्ञापक प्रमाणांचा )

हा दुसरा संग्रह लिहिण्याचा उद्देश.

१ या हिंदुस्थानांत सुवर्णाभरणादि शिल्पकर्मोपजीवी सोनार दोन जातींचे आहेत एक पंचालसोनार आणि दुसरें अहेरलाड सोनार.

२ पंचालसोनार हे ब्राह्मणधर्मानें सर्वकालीं सर्वदेशांत वागतात. आणि पंचाल सोनार यास, अपरपर्यायनामें, नाराशंस शिल्पी, त्वष्टृब्रह्मसंतति, विश्वकर्मसंतति अशी आहेत.

३ अहेरलाड सोनार हे शूद्रधर्मानें सर्वकालीं सर्वदेशांत वागतात आणि या ब्राह्मणेतर आहेर वगैरे सोनारास पर्यायनामें अहेरलाड हेमकार अशी आहेत.

४ पंचालसोनार हे योन्यपकृष्ट नाहींत कर्मापकृष्ट आहेत परंतु त्यांच्या परंपरा चालू असलेल्या श्रौतस्मार्त कर्माची हानि नाहीं.

५ पंचालसोनार यास जरी सोनार असे व्यवहारावरून उपपद आहे तरी त्यांचा इतर कोणत्याही सोनारांशी अन्नोदक व्यवहार नाहीं.

६ पंचालसोनार हा यज्ञियशिल्पदेवसंबंधीं शिल्पकर्म करणारा ब्राम्हणवर्णांतील एक विशेष पोटभेद आहे व त्यांस उपाध्यायपणा करण्याचा अधिकार आहे.

वर लिहिलेल्या ६ विषयांस श्रुतिस्मृत्यादि सर्वमान्य ग्रंथांचीं प्रमाणें दिलीं आहेत. या संग्रहांत एकाद्या विषयावर निबंध किंवा ग्रंथरचना केल्यासारखें केलें नाहीं. म्हणून पहिल्या संग्रहाहून या संग्रहाचा प्रकार अगदींच निराळा असून फारच महत्वाचा आहे. ज्या अभिप्रायांचीं जशी प्रमाणें आहेत तशींच वेगळीं वेगळीं यथार्थ लिहिलीं आहेत.

## मंगलाचरणम्.

भक्तानां शमनेकदंतमभयं त्वामेकदंतं गुरुं ।
सिंदूरादि शुभांग सिंधुर मुखं भालेंदु कुंदांबरं ॥
विघ्नाद्याध्यपहं महागणपतिं श्री सिद्धिबुद्धीश्वरं ।
वंदे मंदमतिः पुरंदरमुखै र्वेद्यांघ्रिमात्मोक्तिकैः ॥ १ ॥
या धात्री त्रिजगत्सती श्रुतिपदाधिष्ठात्रि वागीश्वरी ।
वाक्सौरस्य सरस्वती कुरु सरस्वत्याशु मे वैखरी ॥
वाणी या स्वरवर्ण विक्रमकरा जिव्हाग्रहंसाक्षरा ।
श्रौत स्मार्तकथासुधासुवरदा त्वं शारदा पाहि माम् ॥ २ ॥

नाभिर्यस्य जनिर्नमो भगवतःपुत्राय ते ब्रह्मणे ।
वेदायद्वदनान्नमो भगवते श्रीशाय ते विष्णवे ॥
सोमार्काग्निदृशे नमो भगवते सोमाय ते शंभवे ।
स्रष्ट्रेऽदो भुवनं नमो भगवते त्वष्ट्रे परब्रह्मणे ॥ ३ ॥
श्रीमद्रेवणसिद्धसद्गुरुमुखान् देवान् कुलस्वामिनो ।
विश्वानिंद्रमुखान्मखान्नवखगान् साध्यान्मुनींद्रानृभून् ॥
साधून् सिद्धगणान् नरान् नरवरान् नागान्नगान्वानगाः ।
भूतानि प्रणतोस्म्यहं स्वशिरसा सर्वात्मदृक् संततम् ॥ ४ ॥
शृंगेरीप्रमुखादिपीठमठगाध्यक्षान् यतीन् शंकरान् ।
मध्वाचार्यमुखान्जगद्गुरुवरान् स्मार्तान्भजे वैष्णवान् ॥
येषामायुष ऋद्धयेऽस्तुहिनृणां हस्तास्थितिर्मस्तके ।
चिद्बोधाय कृपा सुधादृगुदकं तापापहं चांघ्रिणाम् ॥ ५ ॥
श्री काशी करवीर हाटक विराट् क्षेत्र प्रतिष्ठान सन् ।
मीमांसानिगमागमज्ञ विदुषां विद्या तपःसंपदाम् ॥
पादा आत्मतमोपहारिरजसो गात्रेषु मुद्रीकृता ।
भाग्यं सत्पद धूलि धूसरतनोर्मेस्यादनंतोपमं ॥ ६ ॥
नाना भेद मताक्तशंकिमनसां तावत्ज्जनानां कलौ ।
शंकां तानि सुमान्यजाश्रितजनेर्धर्माविंतुः प्रीतये ॥
त्वष्टृब्रह्मज शिल्पिधर्म विदिताशेषोपयोगीनिच ।
संश्रित्य श्रुतिधर्मशास्त्रवचनान्यर्चामि सत्संसदम् ॥ ७ ॥

*अर्थ*—भक्तांना अनेक प्रकारचीं सुखें देणारा, ज्याला कोणापासूनही भय नाहीं, ज्यास चंद्राप्रमाणें तेजस्वी एक दंत आहे, सिंदूरादि आरक्तवर्ण मंगलद्रव्यांनीं सुशोभित आहे अंग ज्याचें, गजाचें आहे मुख ज्यास, ज्याचे ललाटीं चंद्र असून ज्यानें कुंद पुष्पवत् शुभ्रवस्त्र धारण केलें आहे इंद्रादिक देवांनीं वंदिलेले आहेत चरणकमल ज्याचें असा, जो सर्वविघ्नें, पातकें आणि शत्रु यांची पीडा परिहार करणारा, सर्वसंपत्ति सिद्धि आणि बुद्धि यांचा ईश्वर श्रीमहागणपति त्यास मी अज्ञान सेवक कायावाचामने करून साष्टांग नमस्कार करितो. १.

ज्या मातोश्रीचें चरित्र त्रैलोक्यांत वर्णिलें जात आहे, जी संपूर्ण वेदवाक्यांचीं स्वामिनी, जी वाणीची देवता श्रीमहासरस्वती ती माझ्या वैखरी वाणीला सुरस व रसभरित अशी लवकर करो. आणि जी शद्बरचनेविषयीं बल देणारी, जिची अक्षरें जिव्हाग्राचें ठिकाणीं हंसाप्रमाणें आहेत अशी वाणी, वेदसंबंधीं व धर्मशास्त्र प्रतिपादक स्मृतिग्रंथ तत्संबंधीं कथारूप अमृताविषयीं वर देणारी जी शारदा ती माझे रक्षण करो २.

नाभिकमलापासून ज्याची उत्पत्ति आहे असा जो भगवंताचा पुत्र ब्रम्हदेव त्याला मी नमस्कार करितों, ज्याचें मुखापासून वेद उत्पन्न झाले असा जो भगवान लक्ष्मी पति विष्णु त्याला नमस्कार करितों, ज्याचे नेत्र चंद्र, सूर्य व अग्नि आहेत असा जो

भगवान् महादेव शंकर त्याला नमस्कार करितों, आणि ज्यानें हें संपूर्ण जगत् उत्पन्न केलें असा परब्रम्ह भगवान् श्रीविश्वकर्मा त्याला नमस्कार करितों. ३

श्रीमद्रेवणसिद्ध आदिकरून सद्गुरु, कुलस्वामी देव, अष्टवसु, इंद्रादिदेव, यज्ञ, नवग्रह साध्यदेव, मुनिश्रेष्ठ ऋभु, अंगिरा, सुधन्वा, विश्वरूप, इत्यादि, साधु, सिद्धपुरुष, योगी, सार्वभौमसरकार, सर्वराजे, जहागीरदार, सरकारीखात्याचे सर्व अधिकारी व कामगार, सर्वज्ञाति, श्रीमंत, शेतकरी, व्यापारी, कारागीर इत्यादि सर्व मनुष्यें, नाग सर्प वगैरे पशुपक्ष्यादि सर्व प्राणिमात्र आणि पर्वत वृक्षनद्यादिसर्वचराचराचें ठिकाणीं सर्व व्यापक ईश्वर आहे अशा दृष्टीनें निरंतर साष्टांग नमस्कार करितों. ४ शृंगेरी, द्वारका, संकेश्वर इत्यादि पीठावर असलेले मठाधिपति शंकराचार्य यति, त्याप्रमाणेंच रामानुजाचार्य, रामानंदाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य, चैतन्याचार्य, सहजानंदाचार्य- इत्यादि जगद्गुरु मुख्य, आणि स्मार्ताचार्य व वैष्णवाचार्य यांना मी वंदन करितों. यांचा वरदहस्त आयुष्यवृद्धि होण्याकरितां मनुष्यांच्या मस्तकावर असो. आणि तत्वज्ञान प्राप्त होण्याकरितां अमृताप्रमाणें यांची कृपादृष्टि असो. व यांचें चरणोदक आध्यात्मिक आधिदैविक व आधिभौतिक या त्रिविधतापाचा नाश करो. ५

श्री काशी, करवीर, ( कोल्हापूर ) हाटकेश्वर, विराट् ( वाई ) पैठण इत्यादि क्षेत्रांत असलेले मीमांसा, वेद, शास्त्र जाणणारे आणि ज्यांची विद्या व तपश्चर्या हीच संपत्ति आहे अशा विद्वज्जनांच्या चरणाचे रजःकण शरीराचे ठिकाणीं धारण केलें असतां अज्ञानांचा नाश होतो. त्या विद्वज्जनांच्या चरणांच्या धुळीनें धूसर झालेल्या माझ्या देहाचें भाग्याला उपमा देण्यास अंत नाहीं असे होवो. ६

या कली युगांतील अनेक भेदांचे व अनेक मतांचे शंका घेणारे सर्व लोक जे, त्यांच्या संपूर्ण शंका हीच पुष्पें घेऊन, ज्याच्यापासून धर्माची उत्पत्ति आहे आणि धर्माचे रक्षण करणारा जो ईश्वर तो संतुष्ट होण्याकरितां विश्वकर्मवंशांत उत्पन्न झालेल्या शिल्पी ( ब्रह्मपंचाल ) चा सर्वोपयोगी सांगितलेला धर्म, वेद आणि धर्मशास्त्रग्रंथ- यांच्या वचनाच्या आधारांनीं सज्जनांच्यासभेची मी पूजा करतो. ७

# उपोद्घात.

पंचाल ब्राह्मण अपरपर्यायनाम पंचाल देवरथस्वर्णकार अर्कशालि ब्राह्मणांचे धर्माविषयींश्रुत्यादि चार प्रकारचीं प्रमाणें: —

**श्लोक--श्रुतिःस्मृतिःसदाचारःस्वस्यच प्रियमात्मनः ॥**
**एतच्चतुर्विधं ज्ञेयं साक्षाद्धर्मस्य लक्षणम् ॥ १ ॥ मनुस्मृति ॥**

अर्थ—अमुक जातीचा अमुक धर्म आहे ह्मणजे चारी वर्णांपैकीं कोणत्याही जातीच्या धर्माचें खरें ज्ञान होण्यासाठीं श्रुति, स्मृति, सदाचार आणि आत्मप्रिय या चार प्रमाणांची एकवाक्यता असली पाहिजे. ह्मणजे श्रुतीनें सांगितलेला एकाद्या जातीचा धर्म स्मृतींमध्यें ( शास्त्रग्रंथामध्यें ) सांगितला असला पाहिजे, आणि वेदाला अनुलक्षून असलेल्या शास्त्रग्रंथांत सांगितलेला धर्म शिष्टाचारांत ( जातींतील शिष्टजनांच्या चालू वहिवाटीला ) असला पाहिजे. आणि स्वज्ञातींतील अज्ञ सुज्ञ मनुष्यांची प्रत्ये-

की आपली इच्छा सामान्यतः शास्त्र विरुद्ध नसली पाहिजे. याप्रमाणें धर्माचीं चार लक्षणें जाणावीं.

पंचाल सोनार हे ब्राम्हण असून व ते सामान्यतःब्राम्हण धर्मानें वागत असून पंचाल सोनारादिकांनीं " आह्मी पंचाल ब्राम्हण आहों " असें सांगितलें ह्मणजे कांहीं गैरमाहितीचे अव्युत्पन्न लोक संशयांत पडतात याचीं कारणें आहेत तीं खालीं लिहिल्याप्रमाणें.

**कारण १ लें**—सुवर्णादि शिल्पकर्माच्या धंद्यानें उदरनिर्वाह करणारे सोनार वगैरे नांवाचे शिल्पिलोक सर्वजातींमध्यें असल्यामुळें समुच्चयत्वानें सोनार अशी एकच जाति लोकांस भासणें.

**कारण २ रें**—ब्राह्मण जातीचे सानगादि ब्रह्मर्षि गोत्रज पंचाल शिल्पींचा धर्म ज्या वैदिक भाष्यसूत्रादि ग्रंथांत सांगितला आहे ते प्राचीन महा निबंध ग्रंथ संस्कृत दुर्मिळ व दुर्बोध व मोठमोठाले असून प्रायः अद्यापि छापून प्रसिद्ध झाले नसल्यामुळें ते नित्य पहाणारे विद्वान् हजारांमध्यें एक देखील हल्लीं नाहीं. आणि ज्या ग्रंथांत शूद्र जातींचेच सोनार लोकांचा धर्म सांगितला आहे ते शूद्रकमलाकरादि लहान लहान ग्रंथ मराठींत भाषांतरासहित छापून सर्वत्र प्रसिद्ध झाल्यामुळें सर्व लोकांच्या पहाण्यांत व ऐकण्यांत येत असतात.

**कारण ३ रें**—जीं पवित्र देवशिल्पकर्में करण्यासाठीं ब्राह्मणजातीय पंचालाशिल्पींचीच जरूर लागते, जीं पवित्र शिल्पें शूद्रजातीय शिल्पींचे हातून घेण्याची वेदशास्त्र ग्रंथाची स्पष्ट मनाई आहे, त्या यज्ञकुंड, यज्ञपात्र, देवरथ, देवमूर्ति इत्यादि सुवर्णादि देवशिल्पांचा अगदींच लोप झाल्यामुळें पंचाल ब्राह्मण शिल्पीही शूद्रधर्मी सोनारासारखें दागदागिने वगैरे सोनारकाम करूं लागल्यामुळें लोकांत पंचाल ब्राम्हणांसही सोनार म्हणण्याची रूढ पडली आहे. परंतु कसले सोनार तुम्ही? तर आम्ही पंचाल सोनार असें कोणीं विचारलें तर सांगतात. परंतु येवढ्यानें यथार्थ ज्ञान होत नाहीं.

**कारण ४ थें**—पंचाल सोनार हे स्वज्ञातीवांचून इतर धर्मभ्रष्ट शूद्रसोनार वगैरे इतर कोणत्याही जातींनीं शिवलेलें अन्न व पाणी न घेतां जरी ते परंपरा ब्रम्हकर्म करीत असतात तरी ते पोटाच्या उपाधीनें विद्याहीन झाले आहेत. त्यामुळें त्यांना तुह्मी ब्राह्मण कोणते, तुमचा धर्म कसा आहे, त्यास प्रमाण काय आहे असें कोणीं विचारिलें तर सुयुक्तरीतिनें सांगण्याचें ज्ञान नाहीं. आणि हल्लीं सत्य असत्य मिश्र भासत असल्यामुळें सहज ओळखतां येत नाहीं. अशा चार कारणावरून पंचाल सोनार हे ब्राह्मण आहेत असें लवकर ओळखतां येत नाहीं. ह्मणून त्यांच्या धर्माचें यथार्थ ज्ञान करविणारीं प्रमाणें प्रसिद्ध करण्याची अवश्यकता आहे.

**प्रश्न**—कोणीं म्हणतील कीं, पंचाल सोनार ब्राम्हण आहेत अशा विषयींचीं प्रमाणें प्रसिद्ध करण्याचा हेतू कोणता?

**उत्तर**—आम्ही कांहीं इतर ब्राम्हण जातींत शिरण्याच्या हेतूनें अगर इतर ब्राम्ह-

णांच्या वृत्तीचा अभिलाष करण्याच्या हेतूनें पंचाल ब्राम्हणांचे धर्म संबंधीं श्रुत्यादि महा निबंध बिलकुल छापीत नाहीं. जरी पंचाल हे ब्राम्हण आहेत तथापि पंचालसोनारांच्याच ब्राम्हण्यासंबंधीं श्रुतिस्मृति शिष्टाचारादिकांचे सर्वमान्य ग्रंथाधार वगैरे प्रसिद्ध करण्याचें कारण इतकेंच. हल्लीं सोनार अनेक धर्मांचे व अनेक जातींचे आहेत. आणि ते हल्लीं सुवर्णादि शिल्पकर्मही प्रायःशूद्रजातीचेच लोक करीत असल्यामुळें व धंद्यावरून पंचाल ब्राम्हणांस सोनार हे उपनाम होऊन बसल्यामुळें सरसकट समुच्चयानें सोनार तेथून एकंदर सर्वशिल्पी शूद्र जातीचेच असतील असा बहुतेक लोकांस मिथ्या भास होऊन ब्राम्हण जातीय पंचालसोनारांसही शूद्र समजतील. तें तसें समजू नये म्हणून पंचालसोनारांच्या ब्राम्हण्यासंबंधीं वेदादि ग्रंथाधार अवश्य प्रसिद्ध केले पाहिजेत.

प्रश्न—पंचाल सोनाराच्या ब्राम्हण्यासंबंधीं प्रमाणें प्रसिद्ध न केली तर काय बिघडेल. शूद्र इतर सोनाराप्रमाणें समजतील एवढेचना? समजेनात बापडे, त्यांचा (पंचाल सोनारांचा ) काय त्यांत तोटा होतो?

उत्तर—धर्माच्या बाबतींत गैरसमज असला तर आपआपल्यांतच ( आपल्या हिंदुधर्मातच ) कलह पिकतात, कलह वाढला ह्मणजे अभिमानानें एकमेकांच्या धर्ममार्गास हरकतही करतात. पहा, कोणीएक पंचालसोनार वेदोक्त कर्म ( संध्यावैश्वदेव वगैरे नित्यनैमित्तिककर्म ) करित असतांना पाहिल्याबरोबर कोणीएक गैरमाहिती ब्राह्मण ह्या पंचालसोनारास ह्मणाला, अरे तुम्हीं सोनार असून आमचे ब्राम्हणाचे वेद मंत्र म्हणतां, काय हा अधर्म! फार वाईट करतां! इत्यादि निंद्य भाषणें करूं लागला,त्याची निंद्य भाषणें ऐकून त्या पंचालसोनाराचें मनांस फार दुःख झालें. तो म्हणाला, भटजीबुवा मी आपल्या परंपरा प्राप्त धर्माप्रमाणें ब्रम्हकर्म करीत आहे. आमचे जातीस जरी धंद्यावरून सोनार म्हणतात तरी आम्ही पंचाल सोनार जात्या ब्राम्हण आहोंत. आम्हांस ब्रम्हकर्म करण्याचा अधिकार आहे. हे पंचालसोनाराचें बोलणें ऐकून भटजीबुवा म्हणतात. अहो हल्लीं कोणीं शास्ता नाहीं,राज्य आहे इंग्रजी हवें त्यांनीं हवें तें म्हणावें. असो यांतील तात्पर्य हेंच कीं पंचाल सोनार विद्वान् नसल्यामुळें आणि व्यावहारिक ब्राम्हणांस पंचाल सोनार हे ब्राम्हण आहेत असे सप्रमाण माहीत नसल्यामुळें त्या दोघांत विनाकारण कांहीं ठिकाणीं वाकडेपणा असल्याचें दृष्टीस पडतें. आणि तो फक्त धर्माच्या बाबतींतलाच वाकडेपणा, जरी परस्परांच्या मनांतले मनांत असल्याचे दिसून येत असे, तरी ते दोन मनुष्य ( ब्राम्हण आणि पंचाल सोनार ) प्रसंग विशेषीं एकमेकांच्या निंदा व अपमान करीत. या दोन गृहस्थावरून स्पष्ट समजेल कीं, जसे रामलक्ष्मणाच्या भेटीकारितां भरतशत्रुघ्न आलें असतां विनाकारण लक्ष्मणास ( हे कैकयीनें माझ्या रामाला मारण्या करितां पाठविले असतील ) असा मिथ्याभास होऊन भेटीस आलेल्या बंधूशींही लक्ष्मणानें युद्ध केलें!!! काय हा चमत्कार!!! तसेंच त्या ब्राम्हणानें त्या पंचाल ब्राम्हण जातीय मनुष्यास शूद्र सोनार समजून त्याचा अपमान व निंदा करूं लागला. मग जसें लक्ष्म

णानें सोडलेल्या बाणाचेंच फळ निवारण्यासाठीं शत्रुघ्नासही युद्ध करणें भाग पडलें, तसें त्या ब्राम्हण जातीय पंचाल सोनारासहीं फक्त ब्राम्हणाच्या अपशब्द स्वरूपी बाणाचेंच फळ निवारण्यासाठीं घटकाभर वाईट भाषणें करणें भाग पडलें. असो या विनाकारण तंट्यांत परस्परांचे तोटे होण्याचा संभव आहे. म्हणून ही वेदशास्त्रांचीं पंचाल सोनाराचे ब्राम्हणत्वाचीं वेदादि ग्रंथ प्रमाणें फक्त उभयतांचें मनांतील संशय फिटून परस्परांची स्नेह वृद्धि व्हावी. म्हणजे पंचाल सोनार ब्रम्हकर्म करीत असतात हे त्यांचा स्वधर्म सप्रमाण असल्यामुळें योग्य आहे असें ज्या कांहीं क्वचित् ब्राम्हणास पंचाल धर्माची मुळींच माहिती नाहीं त्या ब्राम्हणाची संशयानिवृत्ति व्हावी फक्त याच हेतूनें हीं ग्रंथादि प्रमाणें प्रसिद्ध केलीं पाहिजेत.आणि सर्वत्र प्रसिद्ध न केलीं तर जसें अंधारांत पडलेल्या दोरीला "हा सर्प असेल" असा मिथ्याभ्रम होऊन एकादा अविचारी मनुष्य जसा त्या दोरीवर सोटे मारितो तसें हे पंचाल धर्माची माहिती नसलेले ब्राम्हणादि लोक विचार न करितां या गरीब पंचाल ब्राम्हणास हे शूद्र सोनारच असतील असें समजून विनाकारण अपशब्द स्वरूपीं दंड प्रहारांनीं दातांनीं जीभ चावल्या सारखी आपल्यासही दुखापत करून घेतील, व दुसऱ्यासही देतील, आणि विना कारण आपआपसांत वाकडेपणा होईल, ह्मणून फक्त सर्वांनीं एक विचारें असावें याच हेतूनें मी ग्रंथादि प्रमाणें प्रसिद्ध करीत आहे. येऱ्हवीं सर्वांनीं अन्न व्यवहार एक ठिकाणीं करावा किंवा लोकांच्या जातींत शिरावें किंवा दुसऱ्या जातीपेक्षां आम्हांस उंच म्हणावें किंवा दुसऱ्या जातीची नुकसानी करावी अशा हेतूनें बिलकूल ग्रंथप्रमाणें प्रसिद्ध करीत नाहीं हे मी शपथ पूर्वक लिहीत आहे.

सोनार हे नांव, सोन्यारुप्याचे दागदागिने वगैरे कलाकौशल्याचीं कामें करणारा या जगांत जो एक मनुष्यांचा समुदाय आहे त्यास ह्मणतात; म्हणून सोनार या शद्बाचा समावेश "शिल्पी" या शद्बांत होतो. आतां शिल्पी या शद्बाचा अर्थ केला तर ( सुवर्णादि शिल्पकामें जे करतात ते शिल्पी ) इतकाच होतो. परंतु शिल्पी या शद्बावरून सुवर्णकारादि सर्व शिल्पी लोकांची जाति अमुक असावी असें मुळींच समजून येत नाहीं. सर्व हिंदूंत मुख्य जाति ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र अशा चार आहेत. पैकीं सोनार वगैरे अनेक प्रकारच्या शिल्पी लोकांचीं नांवें जर अमर कोशाचे शूद्रवर्गांत आहेत, तर सर्व भेदांचे शिल्पी लोकांची गणना शूद्र जातींत असावी, असा आलीकडे कांहीं लोकांस भास होऊं लागला आहे. इतकेंच नव्हे तर जसें 'शक्ति लागलेल्या लक्ष्मणास सजीव करण्यासाठीं श्रीरामाच्या आज्ञेनें द्रोणाचल पर्वत घेऊन आकाश मार्गानें येणारा मारुती "हा राक्षस असेल" असा नंदिग्रामीं भरतास भास होऊन त्यानें मारुतीस विनाकारण बाणानें खालीं पाडिलें त्यामुळें मारुतीचा घटकाभर खोळंबा झाला' तसें एक ठिकाणीं ब्राह्मण जातीय पंचाल सोनाराचें वेदोक्त कर्म होत होतें तें पाहून आमच्या एका आर्य बंधूस पंचाल सोनार शूद्र असतील असा भास होऊन फार राग आला. इतकेंच नाहीं तर त्यानें पंचाल सोनाराचें स्वधर्म कर्मास विनाकारण हरकतही केली होती, असें माझे ऐकिवांत आल्यावरू-

न मला असें वाटलें कीं, पंचाल हे जरी ब्राह्मण आहेत आणि ते परंपरा ब्रह्मकर्म करीत आले आहेत, तथापि हल्लीं पंचाल ब्राह्मण एक दागदागिने वगैरे सोनार कामाचाच धंदा करीत असल्यामुळें व हल्लीं सत्य असत्यमिश्र भासत असल्यामुळें न जाणो, आणखी एकादा गैरमाहिती मनुष्य "पंचाल ब्राम्हण सोनारास' शूद्र सोनार समजेल. कारण हल्ली ज्याची वृत्ति त्यांनीं करावी असा नियम नसल्यामुळें,लोकांस सत्य असत्य मिश्र भासू लागलें आहे. वेद शास्त्र वचन प्रमाणांनीं ओळख करून देण्याचें सामर्थ्य सर्वांस नसतें. कारण वैदिक ग्रंथ पढणारे ( भाष्यसूत्रमीमांसादिद्वारावेदार्थ जाणणारें ) विद्वान् क्वचित् विरलागत आहेत,प्रायः नाहींत. ब्राह्मणाचे ठायीं शूद्राचा भास वगैरे असे जातिधर्म संबंधीं परस्पर विरुद्धाभास होऊं लागला ह्मणजे आपसा आपसांत कलह वाढून उभय पक्षींही दुष्ट परिणाम होईल. कारण लोकास स्वधर्माचे अगत्य आपल्या प्राणापेक्षां अधिक आहे म्हणूनच मनुस्मृतींमध्यें म्हटलें आहे कीं, **श्लोक--प्रायश्चित्तं चिकित्साचज्योतिषं धर्म निर्णयम्॥ विनाशास्त्रेण योब्रूयात्तमाहुर्ब्रह्मघातकम्॥**

**अर्थ**---प्रायश्चित्त, औषध, ज्योतिष, आणि कोणाच्याही धर्माचा निर्णय करणें या कामांत, धर्मशास्त्र ग्रंथ प्रमाणाखेरीज जो बोलतो त्यास ब्रम्हहत्येचें पातक आहे. म्हणून मी या ग्रंथांत ( विश्वकर्मसंतति रथकार अपर पर्यायनाम पंचाल सोनार ) हे ब्राम्हण आहेत, याविषयीं वेदादि सर्वमान्य ग्रंथांचीं जितकीं वचनें मी स्वतः आपल्या दृष्टीनें पाहिलीं तितकींच या ग्रंथांत शंका समाधान पूर्वक सर्वत्र ( सर्वदेशांतील ) आणि सर्वकालांतील ( मागें होऊन गेलेल्या, हल्लीं असलेल्या आणि पुढें होणाऱ्या ) सर्व विद्वज्जन ब्रम्हवृंदांच्या चरण कमलीं मस्तक ठेऊन आपल्या सर्व पुण्यभूमिवासी जनाप्रत समर्पण करितो. येणें करून सर्वांचे धर्म जाणणारे सर्वत्र विद्वज्जन संतोष पावोत. आणि धर्माची माहिती नसलेले शंकित जनास धर्माची सप्रमाण माहिती होऊन त्यांची संशय निवृत्ति होऊन समाधान होवो. अशी माझी **अंतश्चरतिभूतेषु** या श्रुती वरून सर्वचराचरांच्या अंतर्यामि वास्तव्य करणाऱ्या आणि **सर्वं खल्विदं ब्रह्मेति** या श्रुतीवरून, हेंच आहे महत् स्वरूप ज्याचें, त्या जगदीश्वरांस करद्वय जोडून निरंतर प्रार्थना आहे.

अहो श्रोते ब्रम्हवृंदहो, अहो वाचकब्रम्हवृंदहो,आपण विचार दृष्टीनें आणि ज्ञान दृष्टीनें पाहाणारे आहांत. कारण मनुष्यजन्म ज्ञानाचें पात्र आहे.आपण श्री नारायणाचें अधिष्ठान आहांत. आपणास दोन्ही हातजोडून तुमच्या चरणारविंदीं मस्तक ठेवून माझी सेवकाची विज्ञापना आहे.

कित्येक गैरमाहितीचे लोक असे म्हणतात कीं--'सगळ्या हिंदुस्थानांतले सोनार संकर जातीचे आणि ब्राह्मणेतर वर्णाचेच असतात. ' परंतु ब्राह्मण वर्णांत सोनारच नसतात असे नाहीं. या हिंदुस्थानांत हल्लीं सुवर्णकारांच्या अनेक जाती आहेत तथापि त्या अनेकप्रकारच्या सुवर्णकारांत मुख्य जाती दोन ; एक ब्राम्हण जातीय स्वर्णकार, आणि दुसरे ब्राह्मणेतर जातीयस्वर्णकार, ब्राह्मणजातीय सुवर्णकारांस पंचालस्वर्णकार ह्मणतात. शिल्प हे दैव आणि मानुष असें दोन प्रकारचें आहे, दैवशिल्प ही त्रैवर्णिक वृ-

त्ति आहे, यज्ञकुंड, यज्ञवेदी, यज्ञमंडप, यज्ञपात्रें आणि वाजपेययज्ञांतील सुवर्णमयरथ, प्रासाद, देवमूर्ति, देवांचे सुवर्णालंकार हीं देवशिल्पें पूज्य व पवित्र असल्यामुळें हीं करण्यासाठीं ब्राम्हण जातीय स्वर्णकार असतात, ब्राम्हणजातीय नाराशंससंज्ञक देवशिल्पी आहेत, नाराशंस देवशिल्पींचेच पर्यायनाम पंचालस्वर्णकार आहे—याविषयीं प्रमाण—

**ऐतरेयब्राह्मण श्रुति पंचिका ६ खंड २७ अध्याय ५ आनंदाश्रमेसभाष्य हस्तलिखित पुस्तके पृष्ठ ४३—४५—शिल्पानिशंसंति देवशिल्पान्येतेषांवैशिल्पानामनुकृतीहशिल्पमधिगम्यते हस्ती कंसो वासो हिरण्यमश्वतरी रथःशिल्पं शिल्पंहास्मिन्नधिगम्यते य एवंवेद यदेवशिल्पानी ३ ॥**

भाष्यं—शिल्पानिशंसंतीति । शिल्पत्वं लौकिक निदर्शनेन प्रशंसति । देवशिल्पान्येतेषांवैशिल्पानामनुकृतीह शिल्पमधिगम्यते हस्ती कंसो वासो हिरण्यमश्वतरी रथःशिल्पमिति । शिल्पशब्दश्च आश्चर्यकरं कर्मब्रूते। तच्चशिल्पं द्विविधं देवशिल्पं मानुषशिल्पं चेति । नाभानेदिष्ठादीनि शिल्पानिसंति तानिदेवानां प्रीतिहेतुत्वाद्देवशिल्पानीत्युच्यंते । एतेषामेवदेवशिल्पानामनुकृति सदृशरूपं इहमनुष्यलोके शिल्पमधिगम्यते प्रतीयते । हस्तीत्यादिना तदेवोदाह्रियते । लोके शिल्पिनः कर्मकराः मृद्दार्वादिभिः हस्तिसदृशमाकारं निर्मिमतो तथान्यैः शिल्पिभिः कंसोदर्पणादि निर्मीयते । अपरैरन्यैः सुवर्णमयं कटकमुकुटादि निर्मिमीते। अपरैश्चाश्वतरीरथोनिर्मिमीते। गर्दभ्यामश्वादुत्पन्नाश्वतरजातिः तद्युक्तो रथोश्वतरीरथः । तदेतत्सर्वमस्माभिरभिगम्यमानं मानुषशिल्पमेतदृष्ट्वा नाभानेदिष्ठादि शिल्पमाश्चर्यकरमिति निश्चेतव्यं। वेदनं प्रशंसति। शिल्पंहास्मिन्नधिगम्यतेयएवंवेदेति। अस्मिन्वेदितरि शिल्पं कौशलं नानाविधं प्राप्यते सानुनासिक प्लुतेन शिल्पानां पूज्यत्वं दर्शयति । यदेवशिल्पानां ३ इति । यस्मान्नाभानेदिष्ठादीनि शिल्पशब्दवाच्यानि तस्मात्सुवर्णाभरणादिवत्पूज्यानीत्यर्थः ॥

अर्थ—शिल्पकर्म हें इहलोकींच्या उदाहरणावरून वर्णन करीत आहे. शिल्प ह्मणजे सर्वांच्या मनाला आश्चर्यकारक ( आनंद उत्पन्न करणारें ) कर्म जाणावें. हें शिल्प दोन प्रकारचें आहे. एक देवशिल्प दुसरें मानुषशिल्प. नाभानेदिष्ठादि ( नाभानेदिष्ठ, वालखिल्य, सुकीर्ति, वृषाकपि, एवयामरुत्, त्वष्टा, विश्वकर्मा, ऋभु इत्यादि ) ब्रह्मर्षींनींच करावयाचीं जीं नाराशंस संज्ञक शिल्पें असतात ह्मणजे जीं शिल्पें वेदमंत्र विधीनें तयार करावीं लागतात. तीं यज्ञपात्रादि पांच प्रकारचीं शिल्पें देवांस फार प्रीति उत्पन्न करणारीं असल्यामुळें त्या पांच प्रकारच्या शिल्पांस देवशिल्पें म्हणतात या देवशिल्पाहून इतर शिल्पास मानुषशिल्प म्हणतात. देवशिल्पांचीं अनुकरणें या भू-

१ वृद्धहारीत संहितायां ४ ध्याये—चर्मवैणववस्त्राणां हिंसाकर्मचनेजनं ॥ माणिक्यंवपनाग्निंच मद्यमांसक्रियातथा ॥ सारथ्यं वाहकानांच रथानां भूभृतामपि ॥ एवमादि निषिद्धंयत्प्रातिलोम्यं तदुच्यते ॥ यत्सौम्य शिल्पंलोकेऽस्मिन् सौम्यं तदनुलोमकम् ॥ मृद्दारु शैल लोहानां शिल्पं सौम्यमिहोच्यते ॥ जीं शिल्पकर्मे वैदिक ग्रंथाचें अध्ययन करण्याचें बिलकूल कारण पडत नाहीं; जीं शिल्पकर्मे करण्यास ब्राह्मणेतर जातीय शिल्पींचीच जरूर लागते अशी निषिद्ध शिल्पें—जसे, चर्म, वैणव, कार्पासवस्त्र, मद्यमांसादिक्रिया, राजरथांचे सारथ्य इत्यादि.

लोकीं आहेत तीं येणें प्रमाणें–या मृत्युलोकांचे ठायीं जे शिल्पी उखासंभरण, इष्टकाचयनादि ( यज्ञकुंडें यज्ञवेदि ) देवमूर्ति, मृत्तिकापाषाणशिल्पें जें करितात, ते ब्राम्हण जातीय शिलाकार शिल्पी १आणि जे चमस, स्रुवप्रभृति यज्ञपात्रादि यज्ञियकाष्ठशिल्पें करितात ते ब्राह्मणजातीय दारुकारशिल्पी २. व जे चरुस्थाली आज्यपात्रादि धातुमय यज्ञपात्रे व दर्पण व्यजनादि देवोपकरणपात्रें करितात ते, ब्राह्मणजातीय ताम्रकाराशिल्पी ३. व जे कटकमुकुट कुंडलादि सर्व सुवर्णालंकार, भरजरीचेवस्त्र इत्यादि सुवर्ण शिल्पें जे करितात ते ब्राह्मणजातीय सुवर्णकाराशिल्पी ४ व जे देवांचे सुवर्णमय रथ व वज्रादि आयुधे करितात ते ब्राह्मण जातीय लोहकाराशिल्पी ५ जाणावें, याप्रमाणें शिला, काष्ठ, ताम्र, सुवर्ण, लोह असें पांच प्रकारचे शिल्प कर्म करणारें जे शिल्पी त्यांस देवशिल्पी नाराशंस स्वर्णरथकार ब्राह्मण अशा प्राचीन संज्ञा आहेत. त्या नाराशंस देवशिल्पीसच त्वष्टब्रह्मकुलोत्पन्न, विश्वब्रह्म, आचार्य, वाजर, पंचालसोनार, दैवज्ञ इत्यादि अपरपर्यायनामें आहेत, जसें या पंचालशिल्पींचें स्वर्णालंकार, देवमूर्तिरथादि शिल्पकर्म आमच्या मनाला इतकें परमपूज्य व आश्चर्य कारक आहे तर या मनुष्य जातीय पंचालशिल्पीच्या पूर्वजांचें ( नाराशंस देवशिल्पींचे ) शिल्प तर फारच पूज्य व आश्चर्यकारक असेल हें निश्चये करून जाणावें. तस्मात् या नाराशंस देव शिल्पींची स्वर्णरथादि ( शिल्पकर्म देवतांची ) जो यज्ञादिद्वारा उपासना करितो त्यास यज्ञादि संबंधीं देवशिल्प कौशल्यविद्या प्राप्त होते. असो तात्पर्य हेंच कीं जर नाभानेदिष्ठादिकांच्या चमसादि कर्मकौशलास शिल्प ह्मणतात, तर तें पंचाल शिल्पींच्या सुवर्णालंकार देवप्रतिमादि शिल्पासारखें पूज्य आहे असें जाणावें.

सुवर्णालंकारादि पवित्रशिल्पें यज्ञकर्त्या यजमानांच्या शरीरास पवित्र करितात या विषयींची पुढील श्रुति–

**प्रकारांतरेण शिल्पानि प्रशंसति । आत्मसंस्कृतिर्वावशिल्पानि छंदोमयंवा एतैर्यजमान आत्मानं संस्कुरुते । इति ॥**

**सायणीय भाष्ये—वक्ष्यमाणानि नाभानेदिष्ठादि शिल्पान्यात्मसंस्कृतिः जीवात्मनः संस्कारणानि तस्मादेतैर्यजमानो जीवात्मनं छंदोमयं वेदमयोयथा भवति तथासंस्कुरुते ॥**

अर्थ—दुसऱ्या प्रकारानें शिल्पांची प्रशंसा करितात–पुढें सांगावयाचे नाभानेदिष्ठशिल्पाहिकरून ( सुवर्णालंकारादि पवित्रशिल्पकर्माहींकरून ) यजमान आपल्या जीवात्म्यास पवित्र करितो ह्मणजे सुवर्णालंकारादि शिल्पजन्यवस्तु अंगावर धारण केल्या असतां शरीरसंस्कारास पावतें ह्मणजे पवित्र होतें.

नाभानेदिष्टादिशिल्पींच्या आणि देवशिल्पी जो त्वष्टा विश्वकर्मा याच्या शिल्पाच्या मंत्राचें लिंग ( देवता किंवा विनियोग ) एकच आहे यास प्रमाण–

**श्रुति । ऐतरेयब्राह्मणपंचिका ६–रेतोवै नाभानेदिष्टाख्यः सूक्तविशेषोयजमानोत्पादकरेतः स्थानीयः । तत्तेन सूक्तेन होता**

रेतःसिंचति । तस्मिन् सूक्तेदेवताविशेषवाचिनः पदस्यप्रतीत्यभा वाद्यदनिरुक्तत्वमस्तितत्प्रशंसति। तमनिरुक्तं शंसत्यनिरुक्तं वै रेतो गुहायोन्यांसिच्यतइति । तंनाभानेदिष्ठं सूक्तविशेषमनिरुक्तमस्पष्टदेवताकं शंसेत् । लोके ततो निरुक्तमस्पष्टमेवगुहागोप्ये अंतस्थाने योन्यां सिच्यते । नाभानेदिष्ठाख्येन सिक्तरेतसायजमानस्य संबंध मंत्रलिंगंदर्शनेनदृढयति । सरेतोमिश्रोभवति क्ष्मयारेतः संजग्मानोनिषिंचदितिरेतः समृध्याएवेति । सयजमानो नाभानेदिष्टेनरेतसामिश्रितोभवति ।तस्मिन्नर्थेक्ष्मयेत्यादिकस्तत्सूक्तगतः कश्चिदृक्पादः प्रमाणं प्रजापतिर्यदास्वां दुहितरं दिवमुषसंवाधिष्कन् । अध्यस्कंदत् । तदानीमेवक्ष्मयाभूम्यास्वदुहित्रा संजग्मानः संगंप्राप्तोस्मिंलोकेरोहितं भूतोमृश्योभूतोरेतोनिषिंचत् । रेतो निषिक्तवानिति । अतः सूक्तेरेतः सेकलिंगमस्ति । तस्मादिदंसूक्तेरेतः । समृध्यर्थमेवसंपद्यते ॥

या श्रुतिप्रमाणावरून नाराशंसमंत्राचे रेतःसेक लिंग आहे तसेंच देवशिल्पी जो त्वष्टा त्या त्वष्ट्याच्याही मंत्राचे रेतः सेक लिंग आहे यास प्रमाण श्रुति " **त्वष्टावैरेतसः सिक्तस्यरूपाणि विकरोति** ,, ही श्रुति यजुर्वेद अष्टक ६ पन्न ६ अनुवाक १० पन्नाशी ३ री मध्यें आहे.

**प्रश्न**—अनेक जातीचे शिल्पी आहेत त्यांत तुह्मी ब्राम्हणजातीय शिल्पीस विशेष संज्ञा काय आहे ?

**उत्तर**—ब्राम्हणजातीय शिल्पीस नाराशंस शिल्पी म्हणतात.

**शंका**—ब्राम्हणजातीय शिल्पीस नाराशंसशिल्पी म्हणतात यास प्रमाण काय ?

**उत्तर**—महाराज, आपणास सर्वज्ञान आहे परंतु मज लेकराकडून उगीच परवचा घेता, असो आपण विचारतां तर मी सांगतों, ब्राम्हणजातीयशिल्पीस नाराशंसशिल्पी म्हणतात यास प्रमाण.

श्रौतग्रंथे बौधायनसूत्रे महाप्रवराध्याये—नाराशंसान् व्याख्यास्यामः ॥ वसिष्ठशुनकात्रिभृगुकण्ववाध्य्रश्ववाधूलराजन्यवैश्य-इति नाराशंसात्तनूनपाद्यागश्च ॥

**अर्थ**—भगवान् बौधायन नामक श्रौतसूत्रकार म्हणतात आह्मी ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य याचीं गोत्रे आणि प्रवर सांगितलें आतां नाराशंससंज्ञक त्रैवर्णिक ( ब्राम्हण, क्षत्रिय,वैश्य यातीन जातीचे) शिल्पींचीं गोत्रें सांगतो—ब्राम्हणजातीय नाराशंसशिल्पींची गोत्रे—वसिष्ठ[1], शुनक, अत्रि, भृगु, कण्व, वाध्य्रश्व, वाधूल या आर्षेयगणातील अनेक असतात. आणि क्षत्रियजातीयशिल्पी व वैश्यजातीयशिल्पी यांची गोत्रें पूर्वोक्त क्षत्रियवैश्याप्रमाणेंच जाणावीत. नाराशंस ही संज्ञा त्रैवर्णिक ब्राम्हण, क्षत्रिय,वैश्य या तीन जातीचे शिल्पीस असून देवमूर्त्यादि, देवसुवर्णालंकारादि,देवरथादि, यज्ञपात्रादि,

---

१ वसिष्ठा द्या ब्रह्मर्षयः ॥ इति त्रिकांड शेषे रत्न कोशे द्रष्टव्यं.

कुंडवेद्यादि पांचप्रकारचीच देवशिल्पें म्हणजे पवित्रशिल्पें करण्याचा अधिकार ज्यास आहे त्यासच नाराशंस शिल्पी म्हटले आहे.

**शंका**—वरील बौधायनसूत्रप्रमाणावरून नाराशंस म्हणून एक निराळाभेद ब्राम्हणादि तीन्हीवर्णांतीलच असून आणि तीन्हीवर्णांहून एक पृथक् जाति नाराशंस संज्ञेनें चवथा विभाग केला आहे मग यास शूद्रजाति कां समजूं नये? कारण चवथ्या जातीस शूद्रवर्ण म्हणतात.

**उत्तर**—जरी चवथ्या जातीस शूद्रवर्ण म्हणतात तथापि नाराशंस हा शूद्रवर्ण नव्हे कारण गोत्रप्रवरदर्पणांत आणि बौधायनमहाप्रवराध्यायांत नाराशंस ही चवथी जाति केली आहे तथापि शूद्र नव्हे कारणें सप्रमाण आहेत तीं-

१ लें **कारण**—गोत्रप्रवरे शूद्रास मुळींच नसतात. यास प्रमाण.

**हिरण्यकेशीसूत्रे वैजयंतीव्याख्यायां—शूद्रस्य गोत्राभावान्मंत्रानुपदेशाश्च । इति ।**

२ रें **कारण**—ज्या महाप्रवराध्यायादि गोत्रप्रवरनिर्णयग्रंथांत नाराशंसांच्या गोत्रनिर्णयाचे जे वाक्य आहे त्यांत ब्रह्मर्षि, क्षत्रिय आणि वैश्य या तीन वर्णांपैकींच गोत्रपुरुषांचा उल्लेख आहे **वसिष्ठशुनकात्रिभृगुकण्ववाध्यश्ववाधूलराज्यन्य वैश्य इति महाप्रवराध्याये** ) आश्वलायन श्रौतसूत्रामध्यें तर नाराशंस संज्ञक भेदामध्यें वैश्य मुळींच घेतला नाहीं प्रमाण—

**आश्वलायन श्रौतसूत्रे१।५।सूत्रे १६ नारायणीये वृत्तौ—वसिष्टशुनकात्रिवध्यश्वराजन्येभ्यः ॥**

या आश्वलायनसूत्रामध्यें नाराशंस ही संज्ञा फक्त ब्राम्हणजातीय आणि क्षत्रियजातीय यज्ञदेव संबंधीं शिल्पकर्म करणाऱ्या शिल्पीसच आहे वैश्यादिजातीयशिल्पीस नाहीं

३ रें **कारण**—नाराशंसाचा तनूनपात् ( आग्नेयेष्टि ) नामक यज्ञ करण्याचा अधिकार आहे , शूद्रास यज्ञाधिकार नाहीं.

४ थें **कारण**—नाराशंसशिल्पीस त्रैवर्णिक शिल्पी म्हणावे अशी पुष्कळ प्रमाणें आहेत तसें त्यास शूद्रत्व असल्याविषयींचें कोठेंच वचन नाहीं.

इत्यादि कारणावरून नाराशंसशिल्पीस शूद्र समजूं नये.

**शंका**—नाराशंस हे शूद्र नव्हेत परंतु हे तिन्ही वर्णानंतर सांगितले असल्यामुळें वैश्यापेक्षां कनिष्ठप्रतीचे आहेत असे कां समजूं नये.

**उत्तर**—नाराशंस हे ब्राम्हणादि तिन्ही वर्णांचा विशिष्ट भाग असल्यामुळें नाराशंसांतही तीन भेद होतात तथापि तिन्ही वर्णानंतर सांगितलें ह्मणजे ते त्या तिन्ही वर्णांपेक्षा केवळ कनिष्ठ प्रतीचे होतात असे समजूं नये. तर एक विशेष पोटभेदच समजला पाहिजे. यास एक दृष्टांत पहा.—महाभारत हा इतिहासाचा ग्रंथ आहे यांत भगवद्गीता हा ग्रंथ वेदांतशास्त्रसंबंधीं असल्यामुळें त्या भगवद्गीतेस पुराणादि ऐतिहासिक ग्रंथात न गणता वेदांत शास्त्रीय ग्रंथाच्या मालिकेंत गणले आहे. तसेंच पद्म-

पुराणांतील कपिलगीतेसही पौराणिकग्रंथांत न गणता सांख्यशास्त्राच्या ग्रंथांत गणिले आहे ह्मणून भगवद्गीता आणि कपिलगीता इत्यादि ग्रंथ पौराणिक असूनही त्यांचा विषयांतर असल्यामुळें जरी त्यांचा एक निराळा वर्ग केला आहे तरी ते भगवद्गीतादि परिशिष्ट ग्रंथ जसे भारतादि पौराणिक ग्रंथापेक्षां कनिष्ठप्रतीचे ह्मणता येत नाहींत तसेंच ब्राह्मणादि तिन्हीवर्णांपैकीं जे लोक देवमूर्ति सुवर्णरथ यज्ञपात्रालंकारादि वैदिक शिल्प करितात त्या त्रैवर्णिक देवशिल्पीचा जरी तिन्हीवर्णांनंतर चवथा वर्ग केला आहे तरी त्यास तिन्ही वर्णांपेक्षां कनिष्ठ किंवा वरिष्ठही समजूं नये कारण, नाराशंसशिल्पी हे तिन्ही वर्णांपेक्षां कनिष्ठ किंवा वरिष्ठ मानावेत असें कोठेंही वचन नाहीं म्हणून नाराशंस एक त्रैवर्णिक विशिष्ट जाति असेंच समजावें.

**शंका**—या नाराशंससंज्ञक त्रैवर्णिक विशेष जातीस त्रैवर्णिक शिल्पीच समजावेत यास प्रमाण काय?

**उत्तर**—नाराशंस हे त्रैवर्णिक शिल्पीच समजावेत यास प्रमाण—श्रुति.

**ऐतरेय ब्राह्मणपंचिका ६ खं० २७ अ० ५ शिल्पानि शंसंतिदेव शिल्पान्येतेषां वैशिल्पानामनुकृतीह शिल्पमधिगम्यते हस्तीकंसो वासोहिरण्यमश्वतररिथः शिल्पमिति ॥**

या श्रुतीवरून नाभानेदिष्ठादिक जे देवशिल्पी पूर्वीं सांगितलें त्यासच नाराशंसशिल्पी हे पर्यायनाम आहे.

**शंका**—शिल्पानि शंसंति० या श्रुतीमध्यें नाभानेदिष्ठादिकास देवशिल्पी ह्मटले आहे. या श्रुतींत नाराशंसाचे नांव नाहीं मग ही श्रुति नाराशंससंबंधीं आहे यास आधार काय.

**उत्तर**—नाभानेदिष्ठसंज्ञक देवशिल्पीसच नाराशंस असे पर्यायनाम आहे यास प्रमाण याच श्रुतीचा पुढील भाग—श्रुति—

**तंनाराशंसंशंसतिप्रजावैनरोवाक्शंसः प्रजास्वेवतद्वाचंदधाति तस्मादिमाः प्रजावदत्यो जायंत इति ॥**

सायणाचार्यांचे भाष्य—तं नाभानेदिष्ठाख्यं सूक्तविशेषं नाराशंसाख्यसूक्तसहितं होता शंसेत् । नराः अंगिरसः महर्षयः मनुष्यजातावुत्पन्नत्वात् ते शंस्यते यस्मिन् येयज्ञेनेतिसूक्तविशेषेसोऽयं नाराशंसः । तेनसहितमिदमित्थारौद्रमित्येतन्नाभानेदिष्ठं सूक्तं शंसेत् । तत्रमनुष्यरूपाः प्रजाः एव नरा शद्बेनाभिधीयंते शंसशद्बेन वागुच्यते तथासति नराशद्बेन प्रजास्वेव वाचमवस्थापयति तस्मात्कारणात् इमाः प्रजावदत्योवाग्व्यवहारं कुर्वंत्यउत्पद्यंते । अत्रेदं चिंतनीयं । किमिदं नाराशंससूक्तं नाभानेदिष्ठसूक्तस्य पुरस्तात्पठनीयं । उतोपरिष्टात् । अथवामध्यइति तस्मान्नाभानेदिष्ठसूक्तस्य मध्यएव नाराशंससूक्तं शंसेत् ॥

**अर्थ**—या ब्राह्मणश्रुतींत नाभानेदिष्ठसूक्त हे नाराशंससूक्तासहित असते याविषयीं वर्णन आहे तें असें—( नाराशंस ) या शद्बाचा अर्थ असा—नराः असे अंगिरसकु-

१ नरैः शंसनीयःस्वयमपि मनुष्यरूपो देव विशेषो नराशंसः इति तैत्तिरीय ब्राह्मणे कां. २।७।६

कोत्पन्नमहर्षीला पर्याय नांव आहे ते असण्याचें कारण आंगिरसऋषि हे मनुष्यजातीमध्यें उत्पन्न झालेले असल्यामुळें अंगिरसकुलोत्पन्नऋषीस नर असे नांव आहे ज्या सूक्तामध्यें नरांची ( अंगिरसकुलोत्पन्नऋषीची ) प्रशंसा ह्मणजे स्तुति केलेली असते त्या ( येयज्ञेनदक्षिणया० ) या सूक्तास नाराशंससूक्त ह्मणतात त्या नाराशंससूक्तासहित ( इदमित्थारौद्रं. ) या मंत्रापर्यंत नाभानेदिष्ठसूक्त पठण करावे. त्यांत नाराशंस यामधील नराशब्दानें मनुष्यजातीच्या प्रजेचा स्पष्ट बोध होतो आणि शंसशब्दाने वाचेचा अर्थाचा बोध होतो असे असल्यामुळें या नराशंस शब्दावरून स्पष्ट आहे की ईश्वरानें मनुष्यजातीय प्रजेच्या ठायींच वाचा ठेविली आहे ह्मणूनच ह्या मानवी प्रजा वाचेचा व्यवहार करणाऱ्या उत्पन्न होत असतात. असो हे नाराशंससूक्त नाभानेदिष्ठसूक्तामध्यें आहे तें असे नाभानेदिष्ठसूक्ताच्या २७ ऋचेपैकीं २५ ऋचानंतर पठण केलेलें आहे नंतर नाभानेदिष्ठाच्या अवशिष्ट दोनऋचा आहेत ह्मणून नाभानेदिष्ठसूक्तांतच जर नाराशंससूक्ताचा अंतर्भाव आहे तर नाभानेदिष्ठासच नाराशंस नाव आहे. कारण ( येयज्ञेन० ) या नाराशंससूक्तांत नाभानेदिष्ठानेच नरांची ( ह्मणजे अंगिरसांची ) प्रार्थना केली आहे.

नाभानेदिष्ठानें अंगिरसांची प्रार्थना केली आहे यास प्रमाण—

**श्रुति नाराशंससूक्त ऋग्वेद अ० ८ अ० २ व. १ ऋचा १ ली**
**येयज्ञेन दक्षिणयासमक्ता इंद्रस्यसख्यममृतत्वमानश ॥ तेभ्यो-**
**भद्रमंगिरसोवोअस्तुप्रतिगृभ्णीतमानवंभुमेधसः ॥**

याजवर सायणाचार्यांचे भाष्य—नाभानेदिष्ठः स्वपित्रामनुनाभ्यनुज्ञातः सत्रमासीनानंगिरसोऽभ्येत्यमांप्रतिगृण्हीतयुष्मभ्यं यज्ञंप्रज्ञापयामि इति यदुक्तवान्—तदुच्यते ॥

**अर्थ**—या नाराशंस सूक्तांत मनूच्या आज्ञेनें नाभानेदिष्ठ, यज्ञ करण्यास आरंभ केलेल्या अंगिरोगणास " यज्ञांत माझा स्वीकार करा मी तुह्मास यज्ञकर्म यथाविधि करून दाखवीन" इत्यादि जे सांगता झाला तें या सूक्तांत सांगितलें आहे. या ऋचेचा भावार्थ--हे अंगिरसहो तुह्मी बुद्धिवंत आहांत जे आपल्या यज्ञांतील कर्म कौशल्याच्या योगानें इंद्राचे मित्र आणि अमर देव होते झाले.

या ब्राह्मणजातीय नाराशंसदेवशिल्पीस पूर्वी ज्या कालीं वाजपेययज्ञविधींतील सौवर्णरथशिल्प करावे लागत असे त्या काळीं यास रथकारब्राम्हण असे पूर्वपर्याय नाम आहे आणि पंचालस्वर्णकार हे अपरपर्याय नाम आहे.

ब्राम्हणजातीय शिल्पीस आणि ब्राम्हणेतर जातीय शिल्पीस जरी रथकार अशीएक उक्ति आहे तथापि ब्राह्मणजातीयशिल्पी अमुक आणि ब्राह्मणेतरजातीय शिल्पी अमुक हे भेद त्या शिल्पिवाचक रथकारस्वर्णकार शब्दांतील स्वर भेदावरून स्पष्ट समजतात यास प्रमाण—

१ आंगिरस हे पूर्वी मनुष्य जातीय होते यज्ञांतील कर्मकौशल्याच्या योगानें देवत्वाला पावले ह्मणजे देव झाले.

अष्टाध्यायी पाणिनिसूत्रपाठे ॥ सूत्रे ॥ शिल्पिनिचाकृञः । ६ । २ । ७६ । संज्ञायांच । ६ । २ । ७७ ॥ सिद्धांतकौमुद्यांवृत्तौ— शिल्पिवाचिनिसमासे अण्णंतेपरे पूर्वमाद्युदात्तं सचेदण्कृञः परो नभवति । तंतुवायः । शिल्पिनिकिं । कांडलावः । अकृञः किं । कुंभकारः ॥ संज्ञायांच—अण्णंतेपरे । तंतुवायोनामकृमिः । अकृञः इत्येव । रथकारोनामब्राह्मणः ॥ सि० ३८११ ॥ संग्रह १ ला पृष्ठ १०९—११०.

वाजपेयचयनादियज्ञसंबंधी देवसंबंधीं सौवर्णरथादि वैदिकशिल्पकर्मकुशल ( रथंकरोतीतिरथकारः) इतिव्युत्पत्या रथकारसंज्ञक ब्राह्मणजातिविशिष्ट रथकार हा शब्द अंतोदान्त असतो.

ब्राह्मणेतर रथकार ( रथकारस्तुमाहिष्यात्करण्यां यस्यसंभवः ) असा केवळ काष्ठमयग्राम्यशकटादिशिल्पकरणारा संकीर्णजाति रथकारशब्द आद्युदात्त असतो.

प्रमाण २ रे—कुर्वादिभ्योण्यः । पाणिनिसूत्रं ४ । १ । १५१ । ब्राह्मण जातिबोधक आर्षेयगोत्रापत्याधिकारे गणसूत्रं—कुरु । गर्ग । मंगूष । अजमार । रथकार । वावदूक । कवि । मति । कापिंजल । इत्यादिषु ब्राह्मणजात्यर्थकोण्यप्रत्ययः ॥ कौरव्याः ब्राह्मणाः । गार्ग्याः । मांगुष्याः । आजमार्याः । राथकार्याः वावदूक्याः । काव्याः । मात्याः । कापिंजल्याः । ब्राह्मणा। इति सर्वत्र ॥ अन्यत्र क्षत्रियेषु अण्प्रत्ययः ॥ सं० १ पृ० १०९—११०.

देव ब्राह्मण आणि क्षत्रिय यांचे रथ वाजपेययज्ञविधीनें निर्माण करितात याविषयीचीं प्रमाणें बृहस्पतीनें वाजपेयविधीनेच आरंभी रथ निर्माण केला यास प्रमाण—

श्रुति—तैत्तिरीय ब्राम्हण अ० १ प्र० ३ अनु० २—देवावैयथा दर्शयज्ञानाहरंत । योऽग्निष्टोमं । यउक्थं । योऽतिरात्रं । ते सहैवसर्व्वे वाजपेयमपश्यन् । ते । अन्योन्यस्मैनातिष्ठन्त । अहमनेनयजाइति । ते ऽब्रवन् । आजिमस्यधावामेति । तस्मिन्नाजिमधावन् । तं बृहस्पतिरुदजयत् ॥ सं० १ ला. पृष्ट ७२.

वाजपेय यज्ञात रथविषयक मंत्र आहेत प्रमाण.

श्रुति—तैत्तिरीयब्राह्मणे—सप्तदशः प्रजापतिः । प्रजापतेराप्त्यै। अर्वासिसप्तिरसिवाज्यसीत्याह । अग्निर्वा अर्वा । वायुः सप्तिः । आदित्यो वाजी । एताभिरेवास्मै देवताभिर्देवरथं युनक्ति । प्रष्टिवाहिनं युनक्ति । प्राष्टिवाहीवैदेवरथः । देवरथमेवास्मैयुनाक्ति ॥ सं० १ पृ० ७६

संग्रह श्लोकाः—देवहोमोत्र कर्मादाविंद्रस्य रथमाहरेत् ॥ वाजस्य-

वेदिमध्येतमध्यावर्तयतेरथम् ॥ अप्स्वश्वान् प्लावयेद्वाग्तु युनक्ति तुरगं रथे ॥ अपांतदश्वपृष्ठानि मार्ष्टिविष्णो रथं व्रजेत् ॥ अंकौ-रथे स्पृशेत्पक्षावष्टौमंत्रा इहोदिताः ॥ सं० १ पृ० ७६

हे देवब्राह्मण आणि क्षत्रिय यांचे रथ वाजपेययज्ञविधिनिर्मित असून ते सुवर्णाचेच असतात सुवर्णादि धातूखेरीज देवरथ करीत नाहींत म्हणून ब्राह्मणजातीय रथकारास पर्यायनाम पंचालस्वर्णकार आहे याविषयींची प्रमाणें.

मत्स्यपुराणे अध्याय १३२–चक्रुश्चंद्रंच सूर्यंच चक्रेकांचनराजते ॥ कृतंद्विजिव्हनयनं त्रिवेणुं शातकुंभिकं ॥ मणियुक्तेंद्र नीलैश्च-च्छतंहृष्टमुखैः सुरैः ॥ संग्रह १ पृ० ८८

शिवपुराणे अध्याय २३–सर्वदेवमयं दिव्यं रथं परमशोभनं ॥ रचयामासविश्वार्थे विश्वकर्मास्वयंतथा ॥ २५ ॥ अथरुद्रस्यदेवस्य निर्मितोविश्वकर्मणा ॥ सर्वलोकमयोदिव्योरथोयत्नेनसादरं ॥२६॥ सर्वभूतमयश्चैव सौवर्णं सर्व संमतं ॥ रथांगं दक्षिणं सूर्यं वामांगं सोमएवच ॥ २७ ॥

कल्कीपुराणे तृतीयांशे अध्याय ४ –रथौनानामणिव्रातघटितौ-कामगौपुरः ॥ समायातोज्वलद्दिव्यशस्त्रास्त्रैः परिवारितौ ॥ ३९ ॥ ददृशुस्तेसदोमध्ये विश्वकर्म विनिर्मितौ ॥ सं० १ पृ० ८४.

सर्व शिल्पामध्यें सुवर्णशिल्पाचेच प्राधान्य आहे याविषयीं प्रमाण.

स्कांदेकाशीखंडे अध्याय८६–त्वं सुवर्णादिधातूनां० शिल्पंवेत्सि वरान्ममेतिउत्तरेणान्वयः ॥ एवं विश्वकर्माणंप्रति शिववरोक्तिः ॥

सुवर्णाचे व रत्नाचे अलंकार शिल्पही रथकर्ता विश्वकर्माच करिता झाला याविषयीं प्रमाणें.

मार्कंडेयपुराणे देवीमाहात्म्ये—चूडामणिं तथादिव्यं कुंडले कटकानिच ॥ अर्धचंद्रं तथाशुभ्रं केयूरान्सर्वबाहुषु ॥ नूपुरौविमलौ-तद्वद्ग्रैवेयकमनुत्तमं ॥ अंगुलीयकरत्नानिसमस्तास्वंगुलीषुच ॥ विश्वकर्माददौतस्यै० ॥ सं० १ पृ० २६

भारते वनपर्वे२२९अध्याये–यथैवसुसमिद्धस्य पावकस्यात्ममंडलं ॥ विश्वकर्मकृताचास्यादिव्यामाला हिरण्मयी ॥

मणिमंगलसूत्रादि सुवर्णालंकारधारणफल दीर्घायुः प्राप्त होते याविषयीं प्रमाण.

तैत्तिरीयसंहिता कां० ४ प्र० १ अ० १० दृशानोरुक्मउर्व्याव्यद्यौदुमर्षमायुः श्रियेरुचानः ॥

१श्रीमारुतीस विश्वकर्म्यानें सुवर्णाचें यज्ञोपवीत व कौपीन दिलें यांस प्रमाण-इत्युक्तःपुरुषेणाथ विश्वकर्मा महामतिः ॥ संस्मार मनसा सर्वं तत्तदैवतदेवहि ॥ निर्मितं कांचनं सर्वं कौपीनं ब्रह्मसूत्रकं ॥ आदायकटि रूपेण सौवर्णे कर्ण कुंडले ॥ निर्गमात्तस्य पुत्रस्य पितरौ मोदमीयतुः ॥ हनुमन्नामकरणं कृत्वातस्यमहात्मनः ॥

भाष्ये—दृशानः ( दर्शनीयरूपः ) रुक्मः ( सुवर्णनिर्मितः फलकाकार आभरण विशेषः ) उर्व्या ( महत्यादीप्त्या ) व्यद्यौत् ( विद्योततेस्म ) किंकुर्वन्दुर्मर्षं (अतिरस्कार्यम् ) आयुः ( जीवनं ) श्रिये ( श्रयितुं ) रुचानः ( वांछन् )

पाषाणादि सर्वप्रकारच्या मूर्तीपेक्षा सुवर्णमूर्तीचे अधिक फल आहे याविषयीं प्रमाण—

अग्निपुराणे ३८ अध्याये—इष्टकोत्थाच्छैलजेस्याद्धेमादेरधिकं फलं ॥ सप्तजन्मकृतं पापं प्रारंभा देवनश्यति ॥

यज्ञपात्रे ही सुवर्णाची करावीत याविषयीं प्रमाण-

तांड्यमहाब्राह्मणे श्रुति—सौवर्णीं स्रुचं सामगाय ददाति॥

यज्ञकुंड यज्ञवेदीशिल्प सुवर्णशिल्पाधिकारांतच आहे याविषयीं प्रमाण

श्रुति—हिरण्यैष्टका उपदधाति । इत्यादि व्याख्यातं ॥ श्रीमद्भागवतेदशमस्कंधे उत्तरार्धे—रुक्मवेदियज्ञाः ॥

सुवर्णाची यज्ञपात्रे करणे हाच मुख्य पक्ष आहे यांस आणखी प्रमाण-

श्रीमद्भागवते ९ स्कंधे २ अध्याये—मरुतस्ययथा यज्ञो नतथान्यस्यकश्चन ॥ सर्वंहिरण्मयंत्वासीद्यत्किंचिच्चास्यशोभनं ॥ २७ ॥ श्रीधरीटीकायां-अस्य यत्किंचित्पात्रादिकमस्ति तत्तु सर्वं हिरण्मयं शोभनमासीत् ॥

पंचाल स्वर्णरथकार शिल्पींनीं केवळ सुवर्णरथ शिल्पच करावे असे समजूं नये, सर्व प्रकारची पवित्र यज्ञियदेवाशिल्पें करावी याविषयीं प्रमाणें.

रुद्रयामलेवास्तुतंत्रे—मृदाकाष्टेन लोहेनपाषाणैःपारदेनवा॥ रचयंति विचित्राणिरूपाणिविविधानिये॥दिव्यान्भौमानांतरिक्षान्भावात्संदर्शयंतिये॥पंचालास्तेसदापूज्याःप्रतिमाविश्वकर्मणः॥अचेतनंचेतनकार्यकारिकुर्वंति-यंत्रप्रतिमादिकंये॥ स्वयंवहंवैशिशुमारचक्रंरथान्विमानानिच खेचराणि ॥ पंचांगुलांस्तानिहवर्णलोपात्पंचालसंज्ञा श्चतुरास्य हस्तान् ॥ पंचप्रभेदान्भुवनस्यभर्तुःपूजापदानीतिविदुःपुराणाः ॥ गृहादिनिर्माण विधौततस्तानाद्यंत मध्येषुविनायकांश्च ॥ संपूजयेदन्नधनादिभिश्च सौवर्णरूपैश्च तदायुधैश्च॥ संग्रह १ पृष्ठ १०

पंचाल सुवर्णकारास शिल्पी ह्मटले आहे प्रमाण.

निरुक्ते पूर्वषट्के ७ अध्याये-हिरण्यनामान्युत्तराणि पंचदशहिरण्यं कस्मात् ह्रियतं आयम्यमानमितिभाष्ये-आयम्यमानंह्रियते-एवशिल्पिभिःकटक रुचक स्वास्तिकादि भावेनविस्तीर्यमाणं॥ पंचालस्वर्णकारस्यैवशिल्पिवाचित्वं ॥

---

[1]मृद्दारुमयं शिल्पं प्रशंसनं-तैत्तिरीय ब्राह्मण भाष्ये आद्य १ कांड ४ प्रपा० १ अनुवाके तत्र देवार्यानि दारुमयाणि पात्राणि यानिसंति यानिचान्यद्रव्य संग्रहार्थानि मृण्मयानि तदुभयं प्रशंसति ।

सुवर्ण शिल्पकर्त्यास शिल्पी हें नाम सुवर्णाच्या व रथशिल्पाच्या प्राधान्यत्वानें आहे जसें(यत्रदिङ् नियमोनास्ति तत्रप्राचीरुदाहृतेति । आचारार्के ॥ अनादेशे आज्यं ॥ इति आश्व०गृह्यपरिशिष्टे ॥)तसे शिल्पी रथकार या नामांनी देवशिल्प कर्ता जो ब्राह्मणजातीय असेल तो सुवर्ण शिल्पकर्ताच समजावा.

सुवर्णादि देवप्रतिमा ब्राम्हण जातीय पंचाल स्वर्णकार हस्तनिर्मितच पाहिजेत शूद्रकमलाकरोक्त संकर जातीय शूद्रजातीय सुवर्णकारांनीं घडलेल्या पुजूं नये यांस प्रमाण.

**शिल्पावतंसे ५ तरंगे १२ पृष्ठे--देवोभक्तःपराधीनःसर्वेषामभयं ददौ ॥ सौम्यं मनोहरं रूपं धृत्वाकामानपूरयत् ॥ कृत्रिमार्चातु हेमादिधातुभिरत्नदारुभिः ॥ सिकतापिष्ट पाषाण हरिद्रागोमयादिभिः ॥ विलोमहीनजातिभ्यो व्रात्येभ्यःप्रतिलोमतः ॥ पतितेभ्यो देवतानां विग्रहं नैव कारयेत् ॥ ६२ ॥ नपूजयेच्चमोहाद्वै पूजांकुर्यान्नराधमः ॥ सततं दुःख माप्नोति नरकं चसमश्नुते ॥ ६३ ॥ राष्ट्र भंगो भवेद्राज्ञा मयशःपापसंचयः ॥ प्रजानष्टो ह्यनावृष्टिर्दुर्भिक्षंमरणं भयम् ॥ ६४ ॥ एवमादिसमुत्पन्ना उत्पाता दुःखदा सदा ॥ ज्ञात्वामारभ्यकुर्वीत ह्यकुर्वाणो विनश्यति ॥ ६५ ॥ षष्ट तरंगे-माताशिल्पी पिता शास्त्रमरूपं रूपमानयत् ॥ शिल्पी संतुष्यति यदा बिंब संतुष्ट मुच्यते ॥**

अर्थ--देवभक्तांच्या अधीन आहेत. सर्वांस अभय देतो. सौम्यरूपें धारण करून भक्तांची मनकामना पूर्ण करितो. देवमूर्ति कृत्रिमा आणि अकृत्रिमा अशा दोन प्रकारच्या आहेत. बाणशालिग्रामादि ह्या अकृतिमा मूर्ति होत. आणि सुवर्ण, रुपें, तांबे, पितळ इत्यादि धातुमूर्ति, माणिक्य प्रवालादि रत्नमूर्ति, चंदनादिकाष्ट, वाळू, पिष्टे, पाषाण, हळदगोमयादि पवित्र द्रव्यांच्या मूर्ति कृत्रिमा होत. सुवर्णधात्वादि द्रव्यांच्यामूर्ति ब्राह्मणजातीय पंचालसुवर्णकार शिल्पींच्या हातांनीं घडलेल्याच पूज्य आहेत. विलोम प्रतिलोमादि संकरजातीय पतित, व्रात्य अशा शिल्पी पासून देवांच्या प्रतिमा करवूं नयेत. शूद्रादि शिल्पींनीं केलेल्या मूर्तींची जो पूजा करितो त्या हीन मनुष्यास नेहेमीं दुःखें प्राप्त होऊन अंती नरकप्राप्ति होते. शूद्रादि हस्तनिर्मित मूर्तींची पूजा जर राजा करील तर त्या राजाच्या राज्यांत राष्ट्रनाश, अपयश, पापसंचय, प्रजेचानाश, अवर्षण, दुष्काळ, मरण, भयें इत्यादि अनर्थ प्राप्त होऊन राजास अनेक दुःखदायक उत्पात होतील. ह्मणून पंचालशिल्पी हे त्या मूर्तींची मातुश्री आहे आणि शिल्पशास्त्र हे पिता आहे; करितां पंचालशिल्पीकडूनच मूर्ति करवून त्यांस दक्षिणा भोजनादि देऊन संतुष्ट करावे तेव्हां त्या देवमूर्ति संतुष्ट होतात.

देवमूर्तींची प्राणप्रतिष्ठा पंचालशिल्पि ब्राह्मणाच्या हातूनच करावी यांस प्रमाण--

**शिल्पावतंसग्रंथे ६ तरंगे-प्रातरुत्थाय हृदये ध्यात्वामामंबिकापतिम् ॥ बहिर्गत्वाशुचौदेशे नद्यादौचविशेषतः ॥ ४ ॥ स्नानंविधायविधिवच्छौचाचमनपूर्वकम् ॥ परिधायच वासांसि शुद्धा-**

नि प्रयतःशुचिः ॥ अलंकृतो भस्मनाच स्त्रक्चंदनमृदादिभिः ॥ नित्यकर्मसमाप्याथ दक्षपाद पुरःसरं ॥ ६ ॥ प्रविशेद्वाग्यतःशिल्पी देवागारमनुत्तमम् ॥ आसनेत्युपवेश्याथ कंबलादि परिस्तृते ॥ ७ ॥ भूशुद्धि भूतशुद्ध्यादि मातृकान्यासपूर्वकम् ॥ मंत्रन्यासंततःकृत्वा यथोक्तविधिनाततः ॥ ८ ॥

अर्थ—शुचिर्भूतपणें पंचालशिल्पीनें देवांच्या सुवर्णादिप्रतिमा तयार केल्यावर पंचाल शिल्पीचे वागेश्वरींत गिन्हाइकानें मधुच्छिष्ट नामक होम करावा. त्या पंचालशिल्पी कडूनच देवालयांत अगर देव्हाऱ्यांत मूर्तींची स्थापना करावी ती अशी---पंचालशिल्पीनें प्रातःस्नान करून संध्यादि नित्यकर्म करून भस्मगंधाक्षत मालादिकांनीं मूर्त्यादि करवित्यायजमानानें अलंकृत व पूजित होत्साता त्यानें सोवळ्यानें मूर्त्यादिक रवित्या मालकाचे देवघरांत अगोदर उजवा पाय पुढें ठेवून प्रवेश करावा. नंतर त्या प्रतिमाकर्त्या पंचालशिल्पीनें कंबलादि आसनावर बसून यजमान ब्राम्हण असेल तर वेदमंत्रानीं आणि शूद्र असेल तर पुराणोक्त मंत्रांनीं भूशुद्धि, भूतशुद्धि, मातृकान्यास पूर्वक मंत्रन्यासादि प्राणप्रतिष्टा करून त्या देवतेचे यंत्र ठेवून त्या यंत्रावर नूतन मूर्तीची स्थापना करून षोडशोपचार पूजा करावी.

पहिल्याप्रतिष्ठांगपूजेचे याज्ञिकमूर्तिकर्त्या पंचालशिल्पीस द्यावे यांस प्रमाण.

प्रासादाधिकारे ८ अध्याये विश्वकर्मनारदसंवादे प्रतिष्ठाविधौ- देवस्याभरणं पूजावस्त्रालंकारभूषणैः ॥ तत्सर्वं शिल्पिने देयमिति श्लोक ६४ ॥ सं० १ पृ० १३—१४

देवालयांत प्रतिष्टेकरिता प्रथम प्रवेश करण्याचा अधिकार पंचाल ब्राह्मणाचा आहे यांस प्रमाण

पद्म संहितायां क्रियापादे प्रतिष्ठाविधौ—प्रासादं प्रविशेच्छिल्पी रथकार द्विजोत्तमः ॥ इति ॥

रथमूर्ति प्रतिष्ठादिकर्मास सांगितलेले शिल्पि विश्वकर्मसंततीय पंचालशिल्पीच पाहिजेत यास प्रमाण.

स्कंदपुराणे-शिल्पिनां देव कर्तृत्वं वंश्यानांविश्वकर्मणः ॥ शिल्पिगर्भाणि लिंगानि लिंगगर्भश्च शिल्पिनः ॥ सं० १ पृ० ९०

पंचालब्राह्मणांनीं केलेल्या मूर्तींचीच स्थापना करावी यास प्रमाण.

ब्रह्म पुराणे ४५।४६ अध्याये पुरुषोत्तम क्षेत्र वर्णने विश्वकर्मकृत मूर्ति स्थापनं—श्रुत्वैतद्वचनं तस्य विश्वकर्मा सुकर्मकृत् ॥ तत्क्षणात्कारयामास प्रतिमाःशुभ लक्षणाः ॥ अध्याय ५० श्लोक ४८

अर्थ---याप्रमाणें देव शिल्पकर्ता विश्वकर्मा यांने एकाक्षणांत उत्तम लक्षणांनीं युक्त अशा तीनमूर्ति निर्माण करून पुरुषोत्तम क्षेत्रांत स्थापना केली आहे.

---

१ सुकर्मा विश्वकर्मणि इति विश्वकोशे.

ब्रह्मदेव विष्णु वगैरे सर्व देवांनीं सर्व दुःखें हरण व्हावीं ह्मणून लिंगें प्राप्त होण्याकरितां विश्वकर्म्याची प्रार्थना केली असतां सर्व देवांस विश्वकर्म्यांनीं लिंगें दिलीं आहेत. यांस प्रमाण---

शिवपुराणे अध्याये २५-इत्युक्त्वाथ तदा देवाःप्रणिपत्य हरिं स्वयं ॥ लिंगानि प्रार्थयामासुः सर्वकामाप्तये नृणां ॥ हरिरपितथा ब्रह्मा विश्वकर्माणमब्रवीत् ॥ लिंगानिच त्वया देव कल्पयित्वा शुभानिच ॥ ३५ ॥ देयानि सर्वदेवेभ्यो वचनान्मम सत्तम ॥ लिंगानि कल्पयित्वैवं चाधिकारानुरूपतः ॥ ३६ ॥ विश्वकर्मा ददौ तेभ्यो नियोगाद्ब्रह्मणःप्रभो॥ तदेव कथयामद्य श्रूयतामृषिसत्तम ॥ ३७ ॥ पद्मरागमयं शक्रो हैमं विश्रवसः सुतः॥ पीतं मणिमयं धर्मो वरुणःश्यामलं शिवं ॥ ३८ ॥ इंद्रनीलमयं विष्णुर्ब्रह्मा हेममयं तथा ॥ विश्वेदेवा तथारौप्यं वसवश्च तथैवच ॥ ३९ ॥ आरकूटमयं वायुरश्विनौ पार्थिवं तथा ॥ लक्ष्मीश्च स्फटिकं देवि आदित्यांस्ताम्रनिर्मितं ॥ ४० ॥ मौक्तिकं सोमराजो वै वज्रलिंगं विभावसुः ॥ मृण्मयं चैव विप्रेंद्रा विप्रपत्न्य स्तथैवच ॥ ४१ ॥ दैत्यांश्च गोमयं लिंगं राक्षसांश्च महाबलाः ॥ लोहमयं तथा लिंगं पिशाचाः पूजयंतिहि ॥४२॥ शिवा देवी सदा पूज्या नवनीतविनिर्मितं ॥ दारुजं निर्ऋतिर्भक्त्या योगी भस्ममयं तथा॥ ४३ ॥ छायापिष्टमयं चैव ब्रह्माणी रत्नसंभवं॥ दधिमयं तथा यक्षाः पूजयंति निरंतरं ॥४४॥ एवंविधानि लिंगानि दत्तानि विश्वकर्मणा ॥ ते पूजयंति सर्वे वै देवा ऋषिगणास्तथा ॥ ४५ ॥ ब्रह्मा चैव तथा विष्णुरन्ये देवाश्च ये पुनः॥ पूजयंति सदादेवं नित्यसिद्धिसमीहया ॥ ४६ ॥ तथा दत्वाच लिंगानि देवानां हितकाम्यया ॥ पूजाविधिं समाचख्यौ ब्रह्मणेऽनंतशक्तये ॥ ४७ ॥ तत्च्छ्रुत्वा वचनं तस्य ब्रह्मा देवगणैः सह ॥ आजगाम स्वकं धाम हर्षनिर्भरमानसः ॥ ४८ ॥ विष्णुश्चांतर्हितस्तत्र त्द्युपविश्य यथाविधिः ॥

भावार्थ---सर्व देवांनीं सर्व इच्छा पूर्ण होण्याकरितां लिंगें मिळावीं ह्मणून विष्णूची प्रार्थना केली असतां विष्णूनें व ब्रह्मदेवानें विश्वकर्म्यास सांगितलें. हें विश्वकर्मेन् सर्व देवांस अधिकारानुरूप लिंगें द्यावींत. नंतर विश्वकर्म्यांनीं देवांस लिंगें दिलीं तीं- माणिकाचें लिंग इंद्रास, सुवर्णाचें कुबेरास, पीतवर्ण मण्याचें यमास, कृष्णवर्ण मण्याचें वरुणास, इंद्रनील मण्याचें विष्णूस, सुवर्णमय ब्रह्मदेवास, रुप्याचें विश्वेदेव व अष्टवसूंस, पितळेचें वायूस, पार्थिव अश्विनी कुमारांस, स्फटिकाचें लक्ष्मीस, तांब्याचें सूर्यांस, मोत्याचें चंद्रास, हिऱ्याचें अग्नीस, मृण्मय ब्राह्मणास व ब्राह्मण स्त्रियांस, गोम-

याचें दैत्यांस व राक्षसांस, लोहाचें पिशाचास, लोण्याचें देवीस, लाकडाचें निॠतीस, भस्माचें योग्यांस, पिठाचें छायादेवीस, रत्नाचें सरस्वतीस, द्रव्याचें यक्षांस, याप्रमाणें सर्व देवांस विश्वकर्म्यांनीं लिंगें देऊन त्यांचा पूजा करण्याचा विधिही सांगितला. नंतर ब्रह्माविष्णू सहित सर्व देव आपआपले ठिकाणीं निघून गेले.

देवमूर्तींची प्रतिष्ठा करतेवेळीं प्रतिष्ठांगभूत रथोत्साह करण्यासाठीं शिल्पिब्राह्मण हस्त निर्मितच रथ पाहिजे यांस प्रमाण—

**मत्स्यपुराण** अ० २६५ प्रतिष्ठाविधौ—उत्थापयेत्ततो देवमुत्तिष्ठ ब्रह्मणस्पते॥ आमूरजेतिच तथा रथे तिष्ठेतिचापरः॥ रथेब्रह्मरथे वापिधृतां शिल्पिगणेनतु ॥ आरोप्यच ततोविद्वानाकृष्णेन प्रवेशयेत् ॥ सं० १ पृ० ८९

तसेंच ब्राह्मणास अग्निहोत्रादि यज्ञकर्माचे ठायीं हीं शिल्पिब्राह्मण हस्तनिर्मित धातुमय रथ अवश्य पाहिजे यांस प्रमाण--

**श्रुति**—तैत्तिरीय ब्राह्मण अ० १ प्र० १ अनु० ६ रथचक्रं प्रवर्तयति । मनुष्य रथेनैव देवरथं प्रत्यवरोहति ॥ सं० १ पृ० ११४

**भाष्यं**---गार्हपत्यादाहवनीयं प्रत्यग्नेः प्रणयनकाले रथचक्रस्य प्रवर्तनं । अनेन मनुष्य रथप्रवर्तनेन नीयमानाग्न्यर्थं देवरथ एव प्रवर्तितो भवति ॥ सं० १ पृ० ११४

यज्ञपात्रेंही ब्राह्मण जातीय शिल्पी पंचालरथकार हस्तनिर्मितच पाहिजेत, शूद्रहस्त निर्मितपात्रे वर्ज्य आहेत याविषयीं प्रमाणें--

**श्रुति यजुर्वेद** अ० १ प्र० ६ अ० ८ प० २-यज्ञायुधानिसंभरंति यज्ञोवै यज्ञायुधानि यज्ञमेव तत्संभरंति ॥ स्फ्यश्च कपालानिचाग्निहोत्रहवणींच शूर्पंच कृष्णाजिनंच शम्या चोलूखलंच मुसलंच दृषच्चोपला चैतानि वैदशयज्ञायुधानिय एवं वेद मुखतोऽस्य यज्ञःकल्पते ॥ सं० १ पृ० २३

**भाष्यं**--वक्ष्यमाणानि स्फ्यकपालादीनि यज्ञस्यसाधनत्वादायुधानीत्युच्यंते तान्यध्वर्युः संपादयेत् ॥ साध्यसाधनयोरभेदोपचाराद्यज्ञस्यैव तदायुधत्वं तत्तेनायुधसंपादनेन यज्ञमेव संपादयति ॥ सं० १ पृ० २३

आणखी प्रमाण---**हिरण्यकेशीसूत्रे आधानस्य ३ प्रश्ने ७ पटले वैजयंती व्याख्यांच** ॥ अग्निहोत्रपात्राणि प्रयुनक्ति ॥ खादिरंस्रुवमग्निहोत्रहवणीं वैकंकतीमचक्रवर्तीमशूद्रकृतामूर्ध्वकपालामग्निहोत्रस्थालीं ॥

**वैजयंती व्याख्या**--दर्शपूर्णमास स्रुचव्यतिरिक्तत्वख्यापनयाग्निहोत्रपात्राणीत्युक्तं स्रुवाग्निहोत्रहवण्यौ व्याख्यातौकुलालचक्रमेण नविद्यतेआवर्तो भ्रमणं यस्याः सेतिशूद्रव्यतिरिक्तेनत्रैवर्णिकेनैवकृतामित्यर्थः ॥ सं० १ पृ० ११४

ब्राह्मणजातीयरथकाराकडून यज्ञपात्रें करावींत व त्यांबद्दल दक्षिणाही सर्व धातुमय द्यावी यांस प्रमाण.

आपस्तंबसूत्रस्य कपर्दीस्वामिभाष्ये राजसूययज्ञप्रकरणे--त्रयोदश-तक्षरथकारयोरिति। रथकारोरथस्यकर्तासाधारणयोर्गृहे सर्वायसानिदक्षिणेति सर्वाण्यायसानि सर्वायसानि लोहमयानि ताम्रादिभिर्लोहैः सर्वाणि कृतानिपात्राणि

गृहनिर्माणशिल्पसंबंधीं वास्तुकर्मविधि पंचालब्राह्मण शिल्पींनींच करावे. यांस प्रमाण--

वाजसनेयशाखीय वास्तुप्रयोगे-- ततः उपरिस्तंभान् स्थापयेत् ॥ प्रथममाग्नेयां तत्र मंत्राः॥ इमामुच्छ्रयामीति चतुर्णां विश्वकर्मा ऋषिः ॥ क्रमेणात्रिष्टुप्पंक्ति जगत्यनुष्टुप्छंदांसि ॥ चतुर्णांशालादेवता स्तंभोच्छ्रयणेविनियोगः॥प्रतिस्तंभचतुर्मंत्रान् पठेत्॥तत्रादावाग्नेये ॐ इमामुच्छ्रयामिभुवनस्यः नाभिंवसोर्धारांप्रतरणींवसूनां ॥ इहैवध्रुवांनिमिनोमिशालांक्षेमेतिष्ठतुघृतमुच्छ्रयमाणा॥१॥ इत्यादि--

वास्तुपुरुषपूजन विश्वकर्म्यांस सांगितलें. यांस प्रमाण--

स्कंदपुराणे नागरखंडे तृतीयेपारिच्छेदे वास्तुपदोत्पत्तिकथने १३१ अध्याये---विष्णुं प्रति ब्रह्मोक्तिः--ब्रह्मोवाच ॥ अनेनतववाक्यस्य प्रोक्तं वाक्यं हरे परं ॥ वासवेतदितियस्माच्चतस्माद्वास्तुभविष्यति ॥ ३० ॥ एवमुक्त्वाहृषीकेशं प्राहूयविश्वकर्मणे ॥ विधानं कथयामास पूजार्थंविस्तारन्वितम् ॥ ३१ ॥ एतस्मिन्नंतरे प्राहयाज्ञवल्क्यसुतः सुधीः ॥ विश्वकर्माणमाहूयप्रथमंद्विजसत्तमाः ॥ ॥ ३२ ॥ हाटकेश्वरजेक्षेत्रेममाश्रमपदंकुरु ॥ अनेनैवविधानेन प्रोक्तेनतुमहात्मने ॥ ३३ ॥ ततोहंसकलं बध्वाद्यद्विनेष्यामिभूतले ॥ बालाववोधनार्थाय तस्मादागच्छसत्वरं ॥ ३४ ॥ ततः संप्रेषयामास तं ब्रह्मापितदंतिकं॥ विश्वकर्माणमाहूय स्वसुतस्यहितेस्थितः ॥ ३५ ॥ विश्वकर्मापितत्कृत्य ( वास्तुपदं जातं ) तस्मिन्क्षेत्रेद्विजोत्तमाः ॥ अस्मिन्दृष्टेनरः पापात्स्पृष्टेमुच्येतकर्मणः ॥३६॥ तथा नप्राप्नुयाद्दोषं गृहजातंकथाचन ॥ शिल्पोत्थंकुपदोत्थंचकुवास्तुजमथापिच ॥ ३७ ॥ वैशाखस्यतृतीयायांशुक्लायां रोहिणीषुच ॥ तत्पदंनिहितं तत्रवास्तोस्तेनमहात्मना ॥ ३८ ॥ तस्मिन्क्षेत्रे महापूजांतेनैवविधिना नरः॥ तस्ययः कुरुतेसम्यक्सभूपत्वमवाप्नुयात् ॥ ३९ ॥ ग्रंथ वक्रतुंडबुवाकवीश्वर ॥

विश्वकर्मपूजने वास्तुपुरुष पूजाविधि यांस प्रमाण.

स्कंदपुराणे नागरखंडे १३०अ०१७२पृष्ठे२८--४४श्लोके द्रष्टव्यं॥ वास्तुपद्धतिप्रयोगे---विश्वकर्माख्यनामानं देवतागणपूजितं ॥ आगच्छभगवन्ब्रह्म क्षेत्रेऽस्मिन्सन्निधोभव ॥

ब्राम्हणजातीय स्वर्णकारांस पंचाल आणि दैवज्ञ पर्यायनामें आहेत. याचें सप्रमाण दुसरें कारण असें आहे कीं,

(शिल्पंद्विविधं दैवं मानुषं चेति ऋग्वेदीयऐतरेयब्राह्मणे षष्ठपंचिकाभाष्ये व्याख्यातं )। देवसंबंधिशिल्पं दैवशिल्पं )

देवसंबंधीं ह्मणजे देवमूर्ति,देवरथ, यज्ञकुंड, यज्ञपात्रादिसंबंधीं जें शिल्प तें दैवशिल्प ह्मणावें ( दैवं शिल्पं जानातीतिदैवज्ञः ) देवमूर्त्यादि कर्ता ब्राह्मणजातीयशिल्पी.

देवप्रतिमा करण्याचे मुख्य पदार्थ पांच आहेत—प्रमाण.

वृद्धगौतमस्मृतिः—मृदाचमणिरत्नैश्च ताम्रेणरजतेनच॥ कृत्वाप्रतिकृतिं कुर्यादर्चनाकांचनेनवा॥पुण्यं दशगुणं दद्यादेतेषामुत्तमोत्तमम् ॥

मृत्तिका, रत्नें, ताम्र, रौप्य आणि सुवर्ण हे पांच पदार्थ देवमूर्त्यादि दैवशिल्पांचीं उपादान कारणें असून यांत सुवर्णमूर्ति शिल्पाचें अधिक पुण्य असल्यामुळें सुवर्णाचें मुख्यत्व आहे म्हणून जसें सांगवेदवित् वैदिक ह्मणविणारास दशग्रंथाचें किंवा षडंगांचें अध्ययन असतें तसेंच पंचालस्वर्णकार दैवज्ञ ह्मणविणारास सुवर्ण, रौप्य, ताम्र, रत्न, मृत्तिका या पांच पदार्थांच्याही प्रतिमादि दैवशिल्पकर्म करितां येत असतें ह्मणून ब्राह्मणजातीय स्वर्णकारांस पंचाल आणि दैवज्ञ अशीं पर्यायनामें आहेत.

देवमूर्ति देवरथ यज्ञपात्र यज्ञकुंडादि,दैवशिल्प वैदिक आणि शास्त्रीय ग्रंथांचें अध्ययन केल्याशिवाय देवमूर्त्यादि शिल्पकर्म करितां येत नाहीं.तसेच शिल्पाचे ग्रंथ वैदिक आहेत.

बौधायनशुल्बसूत्र ॥ ऋतव्येष्टकोपधानब्राह्मण ॥ ऋग्वेदांतील ऋभुदेवताकसूक्त ॥ यजुर्वेदअष्टक ४ ॥ हिरण्यकेशीश्रौतसूत्र ॥ कात्यायन श्रौतसूत्र ॥ तैत्तिरीयब्राह्मण प्रथमकांड प्रपाठक ४ ॥ वाजपेययज्ञकांडांतर्गतरथविषयकमंत्र ॥ पाद्मसंहिता ॥ महोपनिषद ॥ बृहत्संहिता ॥ आथर्वणमंत्रसंहिता ॥ वास्तुविद्या इत्यादि

इत्यादि वैदिकग्रंथ शिल्पकर्मसंबंधीं आहेत. ह्मणून पूर्वोक्त देवप्रतिमादि शिल्पकर्म,

---

१ या शिवाय आणखी शिल्प शास्त्राचे ग्रंथ आहेत ते—१ शिल्पसंहिता २ पद्मसंहिता ३ हेमाद्रिप्रतिष्ठा ४ श्री विश्वकर्मापुराण ५ अपराजितग्रंथ ६ विश्वकर्मा प्रकाश ७ वास्तुशास्त्र ८ वास्तुप्रदीप ९ वास्तुमंजरी १० वास्तुमंडन ११ वास्तुचक्र, १२ वास्तुनिर्माण १३ वास्तुलक्षण १४ वास्तुविचार १५ वास्तुशिरोमणि १६ वास्तुसंग्रह १७ वास्तुसमुच्चय १८ वास्तुसार १९ राजवल्लभ २० आयतत्व २१ सूत्रधार २२ विश्वकर्मीय २३ ज्ञानरत्नकोश २४ शिल्पशास्त्र २५ शिल्पकलादीपिका २६ शिल्पसर्वसंग्रह २७ शिल्पलेख २८ शिल्पार्थसार २९ शिल्पग्रंथ ३० प्रासादमंडन ३१ प्रासाददीपिका ३२ प्रासादकीर्तन ३३ प्रासादलक्षण ३४ प्रासादालंकारलक्षण ३५ प्रासादकल्प ३६ क्षीरार्णव ३७ समरांगण ३८ वास्तुविद्या ३९ परिमाणमंजरी ४० काष्ठशाला ४१ भुवनदीपक ४२ केसरीराज ४३ राजगृहनिर्माण ४४ रूपमंडन ४५ रूपावतार ४६ प्रतिष्ठासारसंग्रह ४७ उद्दिष्टानयन ४८ लग्नशुद्धी ४९ युक्तिकल्पतरु ५० विश्वकर्माविद्याप्रकाश ५१ निर्दोषवास्तु ५२ प्रासादकेसरी ५३ शम्भुवनीय ५४ श्रीक्षीरार्णव ५५ केसरीवास्तु ५६ वापिचक्र ५७ विहारकारिका ५८ ग्रहपीठमाला ५९ निर्दोषमुक्तवास्तु ६० तत्वमाला ६१ शिल्पज्ञान ६२ जलयानज्ञान ६३ मानवसूत्र ६४ शिल्पसाहित्य. ६५ सिद्धांतशिरोमणि ६६ सूर्यसिद्धांत ६७ गद्यचिंतामणि ६८ उदकार्गल. इत्यादि शिल्पशास्त्र संबंधी सुमारे बारासहस्र ग्रंथ होते. त्यांचा समावेश कलियुगांत चारसहस्र ग्रंथांतच झाला. पुढें पुढें एक सहस्रग्रंथ अस्तित्वांत राहिले त्यां पैकीं वर लिहिलेले ग्रंथ हल्लीं कोठेकोठे असून याशिवाय आणखी ही आहेत असे ह्मणतात. केसरी ता. २१।११।१९०५

वेदशास्त्राचें अध्ययनांत गणलें आहे यांस प्रमाण—

**श्रीमहाभारते अनुशासनपर्वणि दानधर्मे भीष्मयुधिष्ठिर संवादे- योगोज्ञानं तथा सांख्यं विद्याःशिल्पादिकर्मच ॥ वेदाःशास्त्राणिविज्ञानं एतत्सर्वं जनार्दनात् ॥**

यांतील भावार्थ-योग आणि सांख्य या दोन प्रकारच्या ग्रंथास ज्ञान ह्मणतात आणि मंत्रादि सर्व विद्या, शिल्पशास्त्राचे ग्रंथ, व वेदशास्त्राचे ग्रंथ यांस विज्ञान ह्मणतात. हे ज्ञानविज्ञानरूपी सर्व वेदशास्त्रें नारायणापासून उत्पन्न झालें आहे. यावरून देवशिल्पकर्मग्रंथ वेदाध्ययनांत गणले आहेत.

दुसरें प्रमाण--**अमरकोशे १ कांडे-मोक्षेधीर्ज्ञानमन्यत्र विज्ञानं शिल्पशास्त्रयोः॥**

यावरून विज्ञान ह्मणजे दैवशिल्पकर्म हें ब्राह्मणाचें स्वाभाविक कर्म आहे यास प्रमाण.

**श्रीमद्भगवद्गीतायां १८ अध्याये-शमोदम स्तपःशौचं क्षांतिरार्जवमेवच ॥ ज्ञानंविज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥**

या दैवशिल्पकर्मास सुशिल्पकर्म ह्मणतात व ब्राह्मणांनीं उपनयन होतांच वेदशास्त्राध्ययनाबरोबर शिल्पशास्त्रीय ग्रंथांचेंही अध्ययन करावें लागतें यास प्रमाण.

**सह्याद्रिखंडे-चूडोपनयनादीनि कर्माण्यस्यचकारह ॥ कृत्वाचाध्यापयामास वेदान् सांगपदक्रमान् ॥ यजुर्वेदं धनुर्वेदं गांधर्वं शास्त्रमुत्तमम् ॥ सुशिल्पानिच कर्माणि निर्मलं ज्ञानमेवच ॥ शास्त्रलोकप्रमाणानि तथा व्याकरणानिच॥ तथा चैव पुराणानि तथाशास्त्राणि सर्वशः ॥ पंचज्ञानानि जातानि ज्योतिर्गणविचेष्टितम् ॥ मातृकंच महातेजं योगाभ्यासमनुत्तमं ॥ पंचभिर्दैवसैःसर्वं तेनाधीतमशेषतः ॥**

दैव शिल्पकर्म व अग्निहोत्रादि यज्ञकर्म ब्राह्मणांनींच करावें यास प्रमाण.

**शंखस्मृति—अग्निहोत्रं तपःसत्यं वेदानांचैव धारणं ॥ आतिथ्यं वैश्वदेवंच इष्टमित्यभिधीयते ॥ वापीकूपतडागादि देवतायतनानिच ॥ अन्नप्रदानमारामःपूर्त मित्यभिधीयते ॥इष्टापूर्तौतु कर्तव्यौ ब्राह्मणेनाविशेषतः॥ इष्टेन लभतेस्वर्गं मोक्षं पूर्तेन विंदति॥ वृद्ध०—एवमिष्टंच पूर्तंच यद्विजैःक्रियतेनृप ॥ तत्सर्वंसम्यगात्दत्य चादित्येस्थापयाम्यहं ॥**

यांतील भावार्थ--अग्निहोत्रादि यज्ञकर्मास इष्ट म्हणतात व देवालयादि दैवशिल्पकर्मास पूर्त म्हणतात. हीं इष्टापूर्त कर्में ब्राम्हणांनींच करावीं. इष्टकर्में करून स्वर्गप्राप्ति आणि पूर्तकर्मानें मोक्षप्राप्ति होते.

सुवर्णादि दैवशिल्पकर्माचा उद्देश अग्निहोत्राकरितां, यज्ञपात्रादि करण्याकरितांच आहे याविषयीं प्रमाण.

**बृद्धगौतमसंहितायां—रसाः स्नेहास्तथागंधारत्नानिमणयस्तथा**

---

१ श्रीमद्भागवते दशमस्कंधे ५० अ०-दृश्यते यत्र हित्वाष्टं विज्ञानं शिल्प नैपुणम् ॥

॥ कांचनाद्यानिलोहानि चाग्निहोत्रकृतेऽभवन् ॥ आथर्वणानि कर्माणि अग्निहोत्रकृतेऽभवन् ॥ यज्ञपात्रपवित्रार्थं द्रव्यसंभरणाय च ॥ सर्वयज्ञविकल्पाय पुरातुल्यंप्रकल्पितं ॥ सुवर्णादिकं यज्ञपात्रार्थमेव ॥ वेद्यर्थंपृथिवीसृष्टा॥ गावोयज्ञार्थमुत्पन्नादाक्षिणार्थंतथैवच ॥ सुवर्णरजतंचैवपात्रिकं भार्यमेवच ॥

याप्रमाणें वाजपेययज्ञांतील सुवर्णमयरथ आणि अग्निहोत्री त्रैवर्णिकाच्या होमशाळेंतील आहवनीयादिकुंडस्थ अग्नीचें प्रणयमानयन करण्याकरितां सुवर्णादिधातुमय देवरथ तसेच प्रासादस्थ देवमूर्ति प्रतिष्ठोत्साहास लागणारे देवरथ हेही सुवर्णरथशिल्प ब्राम्हणजातीय पंचालस्वर्णकारांनींच करावे. तसेंच चक्र, त्रिशूल, बाण, धनुष्य इत्यादि शस्त्रें म्हणजे ज्या शस्त्रांत अथवर्णमंत्रांनीं देवतांची स्थापना करावी लागते तीं शस्त्रें ब्राम्हणजातीय शिल्पींनीं करावीं; परंतु या कलियुगांत क्षत्रिय धर्म भ्रष्ट झाल्यापासून रथांत बसून युद्ध करण्याचें आणि मंत्रविधीनें शस्त्रास्त्र सोडण्याचें सामर्थ्य क्षत्रियांत राहिलें नाहीं,म्हणून या अर्वाचीन कालांत रथ आणि शस्त्रास्त्रें या शिल्पाचा लोप झाला आहे. पूर्वी जे रथ आणि शस्त्रास्त्रें करीत होते ते हल्लीं प्रायः सुवर्णशिल्पच करितात; कारण बाणकरी वगैरे शस्त्रकर्म कर्तृत्वबोधक उपनावाचे शिल्पी हल्लीं पंचालस्वर्णकारांमध्येंच आहेत.

या रथकारब्राह्मणांस पंचालस्वर्णकारनाम प्राप्त होण्याचें कारण व तें कधींपासून झालें म्हणाल तर जोंपर्यंत क्षत्रियराजे रथांत बसून युद्ध करीत असत आणि जोंपर्यंत ब्राम्हणांनीं आधानें सोडलीं नव्हतीं तोंपर्यंत पूर्वोक्त देवसंबंधीं यज्ञकर्मसंबंधीं शिल्पिब्राम्हणास रथकार ब्राम्हण म्हणत असत. जेव्हांपासून क्षत्रियांनीं रथांत बसून युद्ध करण्याचें सोडलें व त्यांचें धनुष्यबाणादि मंत्रविधीनें शस्त्रास्त्र प्रहरणाचें सामर्थ्य नष्ट झालें. व क्षत्रियराजे महानंदि राजापासून धर्मभ्रष्ट शूद्रप्रायझाल्यामुळें व राजे यवनजातीय झाल्यामुळें ब्राम्हण निराश्रित होत्साते त्यांनीं आधानें सोडून देऊन मोडी लिहिण्याच्या धंद्यानें उपजीविका करूं लागले, व कित्येक ब्राम्हण जोशीपणाच्या धंद्यानें उपजीविका करूं लागले.

" लेखनवृत्ति आणि ज्योतिषीवृत्ति ह्या ब्राह्मणांच्या मुख्य स्वाभाविक वृत्ति नव्हत.आपत्कालिक ह्या वृत्तिकरणनामक संकरजाति आणि क्षत्रियजातीच्या आहेत. प्रमाण.

अमरकोशेक्षत्रियवर्गे—सांवत्सरो ज्योतिषिकोदैवज्ञगणकावपि ॥
शूद्रवर्गे—शूद्राविशोस्तुकरणः ॥ म० टी० सतु लेखनवृत्तिः ॥"

त्या कालापासून रथकारांची सुवर्णादि रथवेदि कुंड करण्याची वृत्ति लोपल्यापासून सुवर्णाचे रथ वेदी यज्ञपात्रें इत्यादि यज्ञियशिल्पाबद्दल सुवर्णाच्या मूर्ति देवप्रतिमा अलंकार इत्यादि शिल्पे करूं लागल्यामुळें आणि ( मृदाचमणिरत्नैश्च ताम्रेणरजते-

१ महानंदि सुत श्चापि शूद्रायांकलिकांशजः ॥ उत्पत्स्यते महापद्मःसर्व क्षत्रांतकोनृपः ॥ १७ ॥ ततःप्रभृति राजानो भविष्याः शूद्रयोनयः॥ एकराट् समहा पद्मो एक छत्रो भविष्यति ॥ सर्व क्षत्र मथोत्साद्यभावितार्थेनचोदितः ॥ मत्स्य पुराण अध्याय २७२

२ नाधीयंते तथा वेदा यजंते वै द्विजातयः॥ उत्सीदंतितथाचैव वैश्यैःसार्धंतु क्षत्रियाः ॥ ३९ ॥ मत्स्य पुराण अध्याय १४३

नच ॥ कृत्वाप्रतिकृतिंकुर्यादर्चनाकांचनेनवा ॥ पुण्यं दशगुणं दद्यादेतेषामुत्त-मोत्तमम् ) मृत्, रत्न, ताम्र, रौप्य, सुवर्ण या पांचांमध्यें सुवर्णाच्या प्रतिमादि शिल्पाचें अधिकफल असल्यामुळें रथकारास पंचाल सुवर्णकार हें पर्यायनाम आहे ह्मणून रथकार ब्राह्मण अपरपर्यायनाम पंचालस्वर्णकार असें ह्मटलें आहे.

शंका—जसें रथकारास ब्राह्मण ह्मटलें आहे तसें स्वर्णकारास ब्राम्हणत्व असल्या विषयीं प्रत्यक्ष वचन प्रमाण पाहिजे, स्वर्णकारास शूद्रत्व असल्याविषयीं शूद्रकमलाकरांत जसें वचन आहे.

उत्तर—ब्राम्हणजातीय स्वर्णकार आहेत यांस प्रमाण.

याज्ञवल्क्यस्मृति स्नातकधर्मप्रकरणे—अवीरास्त्रीस्वर्णकार स्त्रीजि-तग्रामयाजिनां ॥ शस्त्रविक्रयकर्मारतंतुवायश्ववृत्तिनाम् ॥

या श्लोकांतील स्वर्णकार ब्राह्मण जातीय कां समजावा ह्मणाल तर ( सर्वेचैतेकद-र्यादयोद्विजाएवेत्यादि विज्ञानेश्वरीटीका) हे द्विज स्व स्वकर्मांतर्गत दोषांनीं युक्त होण्याचा संभव असल्यामुळें स्नातक ब्राह्मणानें अभोज्यान्न आहेत. अभोज्यान्न झाला ह्मणजे त्यांचें द्विजत्व गेलें असें होत नाहीं. कारण ग्रामयाजी, आयुधजीवि, राजपुरोहित हेही अभोज्यान्न असल्यामुळें त्यांचेंही द्विजत्व गेलें असें ह्मणण्याचा दोष येईल आणि भोज्यान्न जे दासगोपाल आणि स्त्रिया यांस वेदाधिकार आहे असें ह्मणण्याचा दोष येणार ह्मणून सांप्रतकालीं अभोज्यान्न असलेल्या ग्रामयाजी, राजपुरोहित, आयुधजीवी,कनोजे,गुजराथी, गौड वगैरे ब्राह्मणांचें जसें ब्राह्मणत्व वेदाधिकारित्व चालू आहे तसें सांप्रतकालीं पंचालस्वर्णकाराचेंही ब्राह्मणत्व वेदाधिकारित्व चालूच आहे. फारतर काय याज्ञवल्क्यांनीं १६४–१६५ श्लोकापर्यंत सांगितलेल्या सोमविक्रयवृत्तीनें व रजकद्विज ( धोत्रें धुण्याच्या वृत्तीनें उपजीविका करणारा ) चर्मकार द्विज ( मृगचर्म व्यजनें, कृष्णाजिनें, व्याघ्रासनें, आनडुहचर्मवृत्तीनें, उपजीवन करणारे द्विज ) आणि तंतुवायवृत्तीनें ( जानवीं करणें, शिवविष्ण्वादि पवित्रारोपणें, कौतुकसूत्रें, अनंतादिग्रंथियुक्त देवाधिष्ठानसूत्रें, मौंजीमेखला, रज्जूकरण, यज्ञांतील कूर्चे, तृणमयशूर्प, दर्भासनें, कंबलासनें, शालजोड्या विणणें इत्यादि वृत्तीनें उपजीविका करणारे द्विज ) अभोज्यान्न असून त्यांनाही द्विज ह्मणतात. हे द्विज गौड काश्मीर इत्यादि देशांत अद्याप आहेत.

या कैमुत्य न्यायानें यज्ञकुंड, मंडप, वेदि, यज्ञपात्र, देवरथ, मूर्ति, कटकमुकुट भूषणादि, पवित्र वैदिक ग्रंथप्रणीत देवशिल्पवृत्तीनें उपजीवन करणारे पंचालस्वर्णकार यांच्या श्रौतस्मार्त कर्मास बाध नाहीं, कारण सामान्य त्रैवर्णिकास शिल्पोपजीवन जरी प्रतिषिद्ध आहे तथापि चयनरथ देवप्रतिमा, यज्ञपात्र, कटकमुकुटालंकारादि देवशिल्प देवांना प्रिय असल्यामुळें त्या स्वर्णरथादि कर्मकर्त्या श्रीकाशीविश्वेश्वरवरप्रसादलब्ध शिल्पकर्त्या त्रैवर्णिक विशिष्ट शिल्पीस प्रतिषिद्ध नाहीं.जर प्रतिषिद्ध असता तर स्वर्णरथादि शिल्पकर्त्या द्विजास श्रौतस्मार्त कर्मानुष्ठान श्रुतींनीं कधींच सांगितलें नसतें.

सुवर्णाचे पवित्रतेस प्रमाण.

**महाभारते आदिपर्वणि २०९ अध्याये-यत्सुवर्णभगवानग्निरीशः प्रजापतिः ॥ पवित्राणांपवित्रंहि कनकं द्विजसत्तम॥ अग्नीषोमात्मकंचैव जातरूपमुदाहृतम् ॥सं० १ पृ० ३४**

कोणीं ह्मणतील कीं, सुवर्णदेवमूर्त्यादि जर निर्दोष आहे तर मग याज्ञवल्क्यांनीं त्या द्विजातीय स्वर्णकाराची गणना ग्रामयाजी सारख्या प्रत्यवायी ब्राह्मणांत कां केली ह्मणाल तर, विज्ञानेश्वरांनीं मिताक्षरी टीकेंत प्रत्यवाय दर्शविला आहे. तो असा-- ( **सुवर्णस्य विकारांतरकृत्** ) म्हणजे सुवर्णशिल्पाचे अवयव सांधण्यासाठीं सोन्याचा डाक सोन्यास कनिष्ठ धातूचा विकार केल्याशिवाय होत नाहीं. यास स्वर्णस्तेयाचा दोष नाहीं. जसें सगळेच वैदिक ब्राम्हण ग्रामयाजी नसतात तसे सगळेच रथकार दैवशिल्पी ब्राम्हण एक डाकलागीच सुवर्णकर्म करणारे नसतात म्हणून पातकित्व जसें व्यक्तीवर सक्त आहे तसें जातीवर सक्त नाहीं. यास एका निबंधकाराची उक्ति प्रमाण.—**कर्मण्येवापकृष्टत्वं ॥ जातावपकृष्टत्वंनार्यसंमतं ॥ इत्युक्तेः ॥**

स्वर्णस्तेयी पातकी स्वर्णकार संकर जातीचा असतो यास प्रमाण--

**मत्स्यपुराणे २२७ अध्याये—सर्वसंकर पापिष्ठं हेमकारं नराधिप ॥ इति ॥ मनुस्मृतावपि--सर्वकंटकपापिष्ठं हेमकारं नराधिप॥ इतिच ॥**

या कलियुगांत ब्राम्हणादि त्रिवर्णांनींही अग्निहोत्रें यज्ञादिकर्में सोडल्यामुळें आणि क्षत्रियांनीं रथांत बसून युद्धादि करणें सोडल्यामुळें आणिः प्रायः सर्व लोक कनकालंकार प्रियकामिनींचे लोभी झाल्यामुळें प्रायः पांचही गोत्रांचे पंचाल ब्राम्हणाची उपजीविका बहुतकरून एका सुवर्णालंकार शिल्पानेंच हलीं होत आहे. चयनरथादि यज्ञिय शिल्पाचें कारणच पडत नाहीं. म्हणून जसे पूर्वी तपश्चर्या अग्निहोत्रादि वृत्तीनें उपजीविका करणाऱ्या ब्राम्हणास अपरपर्यायनाम जोशी कुलकर्णी असें अर्वाचीन वृत्तिवरून पडलें आहे तसेंच पूर्वी केवळ चयनवाजपेयादि यज्ञिय शिल्पवृत्तीनें उपजीविका करणाऱ्या पंचाल शिल्पि ब्राम्हणांस अपरपर्यायनाम पंचाल स्वर्णकार पोतदार असें अर्वाचीन वृत्तीवरून पडलें आहे. जसें ग्रामजोशी कुलकर्णी यांच्या परंपराप्राप्त उपनयनादि ब्रम्हकर्माचरणावरून त्यांना शूद्रजातीय कुडमुड्या जोशी व लेखनवृत्ति करण जाति यांच्या जातींत न गणतां ब्राम्हणच समजतात तसेंच पंचाल स्वर्णकार यांच्या परंपराप्राप्त उपनयनादि ब्रम्हकर्माचरणावरून ते पंचाल ब्राम्हणच समजावे.

**शंका**—या याज्ञवल्क्य स्मृत्युक्त स्वर्णकारास जर द्विज असें म्हटलें आहे तर द्विज असें त्रिवर्णांसही म्हणतात. मग हा स्वर्णकार ब्राम्हणच कां ? क्षत्रिय किंवा वैश्य कां नसावा?

**उत्तर**—केवळ ब्राम्हण जातीचाच बोधक अशा ग्रामयाजी द्विजाच्या साहचर्यानें युक्त आहे. या ब्राम्हण जाति बोधक द्विजाच्यापूर्वी जितके तितके ब्राम्हणत्व बोधक द्विज आहेत तसेंच द्विजशब्द त्रैवर्णिक सामान्य आहे म्हणून सामान्यांतलि विशेष जेथें सांगितला नसेल तेथें सामान्याचा मुख्य विशेष ब्राम्हणच समजावयाचा जसे--**अना-**

देशे आज्यं ॥ इति) आश्वला० परिशिष्टे ॥ यत्रदिङ्नियमोनास्तितत्रप्राचीरुदाहृता इतिवत् ॥

आणि ब्राम्हण जातीच्या धर्मानें परंपरा वागणारी व आमची जाति ब्राम्हण आहे असें म्हणणारी (पंचाल सोनार) म्हणून एक जातिही प्रसिद्ध आहे. पंचाल स्वर्णकार जातीच्या पंचाल या उपपदावरूनही ते स्वर्णकार ब्राम्हण आहेत असें समजावें कारण-

पंचाल हा शद्ब ब्राम्हणवाची आहे, यास प्रमाण.

**श्रौतग्रंथे गणपाठे--नडादिभ्यःफक् ( ११०१ सि० )** हें गणसूत्र आर्षेय गोत्रापत्याधिकारांतील असल्यामुळें यांतील सर्व शद्ब ब्राह्मणगोत्रवाची आहेत. यांत पंचाल चमसिन् हे शद्ब शिल्पिब्राह्मणवाची आहेत,यास प्रमाण. (**गणरत्नमहोदधौ पंचालः ब्राह्मणगोत्रवाची.** ) आणखी प्रमाण—ब्राह्मणगोत्रवाची पंचालशद्बाचें विशेषण स्वर्णकार शद्बाशीं आहे याविषयीं प्रमाण.

**शैवागमे ७ अध्याये—शिल्पिब्राह्मणनामानः पंचालाः परिकीर्तिताः ॥ एतेषां पंचगोत्राणि पंचच प्रवराःस्मृताः॥**
**रुद्रयामलेवास्तुतंत्रे---शिवेमनुर्मयस्त्वष्टा तक्षाशिल्पीचपंचमः ॥ विश्वकर्मसुतानेतान् विद्धिशिल्पप्रवर्तकान् ॥ एतेषां पुत्रपौत्रायें तएते शिल्पिनोभुवि ॥ पंचालानामविज्ञेया पंचभेदाहितमताः ॥**
**कौसलागमे ३ अध्याये---तस्मादाथर्वणाः प्रोक्ताः सर्वे शिल्पिन एवच ॥ पंचालानांचसर्वेषां शाखास्याच्छौनकायनी ॥**

वरील प्रमाणें—पंचालशिल्पी हे त्वष्टृब्रह्मसंतति ब्राम्हणजातीय शिल्पी आहेत या विषयींचीं आहेत. म्हणूनच ज्या ग्रंथांत ब्राम्हणेतरजातीचे भेद सांगितले आहेत अशा जातिविवेक व शूद्रकमलाकर ग्रंथांत पंचाल शद्बाचा उल्लेख नाहीं.

**पंचालस्वर्णकारांचा आचार**—पंचालस्वर्णकारांत उपनयनादि संस्कार होतात. ब्रम्हगायत्री उपदेश आहे, अभक्ष्यभक्षण अपेयपान करीत नाहींत, नित्यनैमित्तिक काम्यकर्मे वेदमंत्रांनीं करितात, भिन्नगोत्रांनीं विवाह करितात, स्त्रियांचा पुनर्विवाह करीत नाहींत, नमस्कार दोन्ही हातानें करतात, परजातींनीं स्पर्शिलेलें अन्नोदक घेत नाहींत. पौरोहित्य करितात. इतर कोणत्याही सोनारांशी या पंचाल सोनारांचा अन्नोदकादि व्यवहार नाहीं.

**क्षेपक**---शूद्रकमलाकरोक्त सोनार कशावरून समजावेत म्हणाल तर ज्या सोनारांत उपनयन होत नाहीं, हिंसा करतात, मद्यमांस सेवन करितात, स्त्रियांचा पुनर्विवाह ( पाट ) लावितात, एक हातानें राम राम करितात, गोत्रें नाहींत, पुराणोक्त कर्मे करितात, या शूद्रधर्मी सोनारास आहेर सोनार लाड सोनार संकरसोनार म्हणतात. सं० १ पृ० १५५ पहा.

जसा शूद्रजातीय कुडमुड्या जोशी आणि ब्राम्हणजातीय गांवजोशी या परस्परांत धर्मसंबंधें कांहींच संबंध नाहीं, तसा ब्राह्मणजातीय पंचाल सोनारांशीं आणि ब्राम्हणेतर आहेरलाडसंकरजातीय सोनारांशीं कांहीं एक संबंध नाहीं.

पाणिःस्थापकसंजाता ममतुल्याश्चशिल्पिनः ॥ संध्यात्रयंप्रकुर्वंति स्नानदानादि-तर्पणं ॥ १८ ॥ वैश्वदेवं बलिदानं षट्कर्माण्यपि शिल्पिनाम् ॥ शिवार्चनरता नित्यं जपहोमादिकर्मसु ॥ १९ ॥ एवं विधाक्रियाख्याता शिल्पिनांचवशंकर ॥ विश्वकर्मपराणांच ब्रह्मविष्णुशिवात्मनां ॥ २० ॥ तत्रसूत्रं समाख्यातं विश्वसूत्रं स्वयंभुवा ॥ प्रासादभुवनादीनिलिंगस्थापनमेवचेत्यादि ॥ सं० १ पृ० ५१

गोत्रप्रवरदर्पणे—भृगुगणे—त्वाष्ट्रयाः ॥

रुद्रयामले वास्तुतंत्रे—शिवउवाच ॥ शिवेमनुर्मयस्त्वष्टा तक्षाशिल्पीच पंचमः ॥ विश्वकर्मसुतानेतान् विद्धिशिल्पप्रवर्तकान्॥ एतेषां पुत्रपौत्रा ये तएतेशिल्पिनोभुवि ॥ पंचालानामविज्ञेया पंचभेदाहितेमताः ॥

कौसलागमे ३ अध्याये—आथर्वणस्योपवेदः शिल्पवेदः प्रकीर्तितः ॥ तस्मादाथर्वणाः प्रोक्ताः सर्वेशिल्पिनएवच ॥ पंचालानांच सर्वेषां शाखास्याच्छौनकायनी ॥ सं० १ पृ० १२२

वराहपुराणेऽपि ॥ पंचालब्राम्हणेतिहासकथनं ॥ तत्र ॥ सुवर्णालंकारवाणिज्योपजीविनः पंचालब्राम्हणाः ॥

बृहज्जोतिषार्णवे ब्राह्मणोत्पत्तिमार्तंडाध्याये—यत्रब्राम्हणसंबंध्यनेकविषयाः । तत्र पंचालब्राह्मणवर्णनमप्यस्ति.

आपस्तंबादिसूत्रेषु—वर्षासुरथकारोऽग्नीनादधीत ॥

बौधायन महाप्रवराध्याये अथ—नाराशंसान्व्याख्यास्यामः ॥

भट्टोजीदीक्षितकृत सिद्धांतकौमुद्यांवृत्तौ—रथकारोनाम ब्राह्मणः ॥

गणरत्न महोदधौ—पंचालः ब्राह्मणगोत्रवाची ॥

शैवागमे—पंचालानांच सर्वेषामाचारोप्यथगीयते ॥ अष्टांगयोगः षट्कर्म पंचयज्ञाइतिश्रुतिः ॥ यजनं याजनं चैव तथाचाध्ययनंस्मृतं ॥ अध्यापनं ततः प्रोक्तं तथादानप्रतिग्रहः ॥ स्नानं संध्यात्रिकालेषु चाग्निहोत्रंतथैवच ॥ षट्कर्माण्येवमेतानि पंचालानांस्मृतानिच ॥ नित्यनैमित्तिकं कर्म द्विजातीनांयथाक्रमम् ॥ पितृयज्ञंभूतयज्ञं देवयज्ञं तथैवच ॥ नृयज्ञं ब्रह्मयज्ञंच पंचयज्ञांश्चरंतिये ॥ एवंत्रिविधमाचारंकर्तारस्तेद्विजातयः ॥

शिल्पशास्त्रे पंचालधर्मे—आदौशौचविधिंकृत्वाद्वितीयं दंतधावनम्॥ स्नानंकृत्यं तृतीयंस्यादजिनंच चतुर्थकम् ॥ पवित्रधारणं चैवपंचमंपातसंस्कृतिः॥ पवमानविधिः शिल्पिसंध्यावंदनषष्ठमम् ॥ सप्तमंतर्पणंकुर्यादष्टमंजपउच्यते ॥ नवमंसर्वाचार्यकृत्यमादित्यहृदयंपठेत्॥ एकादशं तथाविप्रयोग्यः स्वाध्यायवर्धनम् ॥ द्वादशंतुमहाशांति वृक्षराज प्रदक्षिणम् ॥ अष्टत्रिंशत्करन्यासैर्मुद्राकर्मत्रयोदशम् ॥ शालिग्रामार्चनंशिल्पी कुर्याच्चैवचतुर्दश॥ वैश्वदेवं पंचदशं हवनंषोडशंभवेत् ॥ आपशुद्धिः सप्तदशं भोजनाष्टादशंभवेत् ॥ इमानिशिल्पिनांनित्यकर्माण्यष्टादशक्रमात् ॥

स्कंदपुराणे नागरखंडे ५।१३ अध्याये ईश्वरषण्मुखसंवादे—ईश्वरउवाच ॥ मनुर्मयश्चत्वष्टाचशिल्पी विश्वज्ञएवच ॥ पंचैतेदेवऋषयो विश्वकर्ममुखोद्भवाः ॥ सृष्टिप्रवर्तकाह्येते रथकारास्तुपंचच ॥ शतंच विंशतिःपंच वंशजाविश्वकर्मणः ॥ तद्वंशसंभवाः सर्वेपंचपंचास्य संभवाः ॥ जायंतेऽनुयुगंलोके सृष्टिसंत्राणतत्पराः॥ कृतेतुमानसास्टष्टिस्त्रेतायांदृष्टिसाधनं ॥ द्वापरेमंत्रतः सृष्टिःकलौतुकरसाधनं ॥ वैदिकेनैवमार्गेणतद्वंश्यानांविशेषतः ॥ गर्भाधानंनिषेकंतुतुर्येपुंसवनक्रिया॥ मासेष्टमेहिसीमंतो जाते वै जातकर्मच ॥ अह्न्येकादशेनामषष्टेमास्यन्नभोजनं॥ वर्षे तृतीये चौलंस्यादष्टमे चोपनायनं ॥ वेदव्रतचतुष्कंतु गोदानं षोडशेतथा ॥ वत्सरेस्नातकं कर्मवैवाहं पैत्रमेधिकं ॥ इतिषोडशकर्माणि वंश्यानांविश्वकर्मणः ॥ कर्तव्यं तद्विशेषेण आचार्येण समाधिना ॥ पुनर्जननरूपासा उपनीतीक्रियामता ॥ पुण्याहवाचनं पूर्वं वेदघोषपुरःसरं ॥ पूर्वेद्युरेवकर्तव्यं नांदीमुखमतःपरं ॥ अपरेद्युःप्रभातेतु मंगलस्नानमाचरेत् ॥ धारयित्वानवं सूत्रं पुण्याहं वाचयेत्ततः ॥ अग्निमादायविधिवत् सम्यक् शास्त्रोक्तमार्गतः ॥ स्थापयित्वा चरुंपूर्वंहोमं कुर्याद्विधानतः। उपनीय ततः पश्चादाचार्यः सामिधाहुतिः ॥ हावयित्वाथशिष्येण हस्तग्रहणपूर्वकं ॥ ततोमौंजीपरीधानं कृष्णाजिनपुरःसरं ॥ उपदिश्यततः पश्चाद्गायत्रीमपिदेवतां ॥ अग्निकार्यंततः पश्चात्कृत्वाहोमं समाचरेत् ॥ स्विष्टकृद्धोममारभ्य पूर्णाहुतिमतःपरं ॥ दद्यादेवंचविधिवत् त्रिसंध्यंहोममाचरेत् ॥ एवं समाप्य विधिवदुपनीतं विशेषतः ॥ आचार्यस्तुततः पश्चाच्छिष्यमध्यापयेत्तवै ॥ ऋग्वेदंच यजुर्वेदं सामवेदं विशेषतः ॥ अथर्वांगिरसश्चैवलक्षणानि पृथक्पृथक् ॥ अष्टादशपुराणानि तथा षट्दर्शनानिच ॥ ज्योतिः शास्त्रविशेषेण शिल्पशास्त्रं तथैवच ॥ चतुः षष्टिकलाश्चापि धर्मशास्त्रं विशेषतः ॥ इत्यादि ॥ अग्रेपि ॥ गृहस्यैशान दिग्भागे कारयेद्यागमंडपं० ॥ ॥

भविष्ये—गृहपाकात्समुद्धृत्य चरुणा पायसेनवा॥ पिंडदानं प्रकुर्वीत त्वाष्ट्रे श्राद्धे कृते सति ॥

मूलस्तंभपुराणे १७ अध्याये—विश्वकर्माजगन्नाथो विश्वकर्माजगद्गुरुः ॥ विश्वकर्मा जगत्तेजः वैश्वकर्ममिदंजगत् ॥ १६ ॥ एवं श्रीविश्वकर्माणं तन्निबोधतसुश्रुतिं ॥ अन्यशास्त्रावबोधाच्च अन्यदेवसमर्चनात् ॥ १७ ॥ नजानंतोपरंपारं तस्य श्रीविश्वकर्मणः ॥ भ्रांताश्चरंतिचोन्मत्ता अंतेगच्छंतिनारकं ॥ ॥ १८ ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन विश्वकर्माणमर्चयेत् ॥ तथैवतस्यशास्त्राणि सर्वथैव-

१ स्कंदपुराणे नागरखंडे ६ अध्याये दार संग्रह प्रकरणे—ईश्वर उवाच॥शृणु षण्मुख सुज्ञानिन् मन्वादेर्दारसंग्रहम्॥ मुनेरांगिरसः पुत्री प्रसिद्धा कांचनाव्हया॥ विश्वकर्मतनूजस्य मनोःपत्नी बभूव सा ॥ पाराशरमुनेःपुत्री सौम्यादेवी सुलोचना॥।विश्वकर्मतनूजस्य मयस्यापिकुलांगना ॥ कौशिकस्य मुनेःपुत्री जयंतीतिचाविश्रुता॥।विश्वकर्मतनूजस्य भार्या त्वष्टुरभूत्स्वयं॥विश्वकर्मतनूजस्य पत्नी तक्षस्यचाभवत्॥ करुणानाम विख्याता ब्रह्मर्षेस्तनयाभृगोः॥कुमारी जैमिनेःसाध्वी चंद्रिकानाम विश्रुता॥।विश्वकर्मतनूजस्य विश्व... शैवच॥एतेषां मन्वयंसृष्टि पारंपर्यं समुद्भवं॥

समभ्यसेत् ॥ ज्ञानवंतो महात्मानो चांते गच्छांति सद्गतिं ॥ १९ ॥ विश्वकर्मामनुश्चापि त्वष्टा विभ्राजकस्तथा ॥ कृतेयुगेतु कर्तारो ब्रह्मणः संप्रकीर्तिताः ॥ २० ॥ मुनीश्वरोनलश्चैव शिल्पीस्थपति संज्ञकः ॥ त्रेतायुगेच कर्तारश्चत्वारो ब्रह्मणः स्मृताः ॥ २१ ॥ मयोमित्रोरुक्मदश्च देवसेनइतिस्मृताः ॥ द्वापरे विश्वकर्माण एते चत्वारईरिताः ॥ २२ ॥ कलौतुभूबलाचार्यो देशिकाचार्य एवच ॥ मन्युश्चरथकारश्च चत्वारो नायकाःस्मृताः ॥ २३ ॥ शिखाशाखाश्च पुंड्रंचसदाचारः प्रसन्नता ॥ कुलाचारविहीनश्चेद्यदिसः पतितोभवेत् ॥ २४ ॥ स्नानंसंध्याजपोहोमः स्वाध्यायः पितृतर्पणम् ॥ आतिथ्यं वैश्वदेवं चाप्यष्टकर्माणिकारयेदित्यादि ॥

**पुराणांतरे**—कृतेतुव्यंकटाचार्यस्त्रेतायांनरकेसरी ॥ द्वापरेचोलनाचार्यः कालहस्तः कलौयुगे ॥ कालहस्ताचार्यनाम्नाच पुरुषोत्तम गुरुर्भवेत् ॥ व्यंकटाचार्य विख्यातमनुश्रुतमकल्पिताः ॥

**शंका**—पूर्वोक्त प्रकरणावरून भृग्वंगिरस गणांतर्गत विश्वकर्मसंततीय पंचाल शिल्पी हे ब्राह्मणआहेत. तर त्यांनीं सप्तर्षिवंशस्थ ब्राह्मणांचें अन्न घेतलें असतां काय दोष असावा? कारण उभयतांही ब्राह्मणच आहेत.

**उत्तर**—जरी उभयताही ब्राह्मण आहेत तथापि यज्ञिय देवशिल्प, करणारे ब्राह्मणांचा आणि इतर ब्राम्हणांचा पूर्वींच श्रुतीनें आधान काल मंत्रदेवतादि पृथक् करून नाराशंस म्हणून एक निराळा वर्ग केला आहे. यांस प्रमाण
**बौधायन महाप्रवराध्याय** आणि **गोत्रप्रवरदर्पण** म्हणून स्वधर्मलोपजनवेदत्यागाचा दोष प्राप्त होईल.

**शंका**— जसे क्षत्रिय वैश्य किंवा ब्राम्हण जातीमध्येंही पृथक् भेद असून स्वधर्मलोपजनवेदत्यागाचा दोष नाहीं. तसे नाराशंसशिल्पींचा जरी निराळा भेद असला तरी स्वधर्मलोपाचा दोष नसला पाहिजे.

**उत्तर**—असें म्हणाल तर म्हणूनये. कारण कलियुगांत देवरथायुध यज्ञपात्र वेद्यादि देवशिल्पांचा लोप झाल्यामुळें सर्व नाराशंस मनुष्याच्या अलंकारशिल्पावर उपजीविका करूं लागल्यामुळें ब्राह्मण आणि पंचालशिल्पी यांनीं परस्परांत अन्नोदक व्यवहार करूं नये. केला असतां महादोष आहे अशीं प्राचीन ऋषीचीं वचनें आहेत. प्रमाण

**मूळस्तंभ अध्याय १७ विश्वकर्मकुलेजातो यदिभुंक्तोऽन्यवेश्मनि ॥ श्वानयोनिसहस्राणि गत्वा चांडालतां व्रजेत् ॥ २७ ॥**

**अर्थ**—विश्वकर्मसंततीय शिल्पिब्राह्मणास स्वज्ञातीपेक्षां दुसरी ज्ञाति श्रेष्ठ असो अगर कनिष्ठ असो कोणत्याही परजातीय मनुष्याचे अन्नोदक सेवन करूं नये.

---

परमहंसाचार्य पिठ श्रीकाशीतून ( मूळपीठातून ) श्री कालहस्ताचार्य १ त्याचा करकमल संजात श्री रूढाचार्य २ त्या० कर० श्री व्यंकटाचार्य ३ त्या० कर० श्रीकालाचार्य०४ त्या०कर ० श्रीनृसिंहाचार्य५ त्या ० कर ० पूर्वाचार्य ६ त्या ० कर० श्रीकृष्णाचार्य ७ त्या ० कर ० श्रीऋम्वाचार्य८ त्या० कर० श्री नारसिंहाचार्य ० ९ त्या ० दशम संसारेच्छ नरसिंहाचार्य १० त्या ०अजेंद्राचार्य इत्यादि.

जर करील तरत्यास श्वानाच्या सहस्र योनि प्राप्त होऊन चंडालाच्या जन्मास जातो.या प्रमाणावरून ब्राह्मणाचे घरीं सुद्धां विश्वकर्मसंततीय पंचालशिल्पीनें अन्न ग्रहण करूं नये इत्यादि प्रमाणांवरून वेव्हारी ब्राह्मणाशीं पंचाल ब्राह्मणाचा अन्नोदक व्यवहार प्राचीनकालापासून नाहीं. जो कोणी पंचालब्राह्मण व्यवहारी ब्राह्मणाचें अन्न जेवील त्यास स्वधर्मलोप होऊन वेदत्यागाचा महादोष प्राप्त होतो.

**शंका**—व्यवहारी ब्राह्मण पंचाल ब्राह्मणापेक्षां कर्मानें व विद्येनें श्रेष्ठ आहेत व व्यवहारी ब्राह्मणाचें अन्न सर्व जातीचे लोक जेवतात तरी ब्राह्मणानें ब्राम्हणाचें अन्न जेवल्यानें कसा दोष प्राप्त होतो.

**उत्तर**—कलियुगांत पंचालब्राह्मण कर्मानें व विद्येनें जरी कमी झाले तथापि ते ब्राम्हणजातीय असल्यामुळें **ब्राह्मणेतद्विशेषग्रहणं** या भट्टोजी दीक्षितांच्या वृत्तिवचन) वरून आणि(**यच्चकेषांचित् भेदंकुतश्चिद्भेदंकरोति तत्सामान्यविशेषोजातिः ॥** या वात्स्यायन सूत्रावरून ब्राम्हणांत कर्मधर्मांच्या भिन्नतेनें किंवा हीनत्वानें कितीही भेद झाले तरी ते अन्य यातीमध्यें मिळत नसतात म्हणून ते ब्राम्हण जातींतीलच एक भेद समजावे आणि ते भेद स्वतंत्र राहतात. कारण ब्राम्हणांनीं ब्राम्हणाचे घरीं भोजन करणें झाल्यास एक पंक्तीस करावें. ज्या ब्राम्हणांची जाति भ्रष्ट नसून एक पंगत होत असते अशा ब्राम्हणांमध्येंही ब्राम्हणाचे घरीं जो ब्राम्हण जातिभ्रष्टासारखा जर लांब बसून भोजन करितो तर त्यास **परिभाषेंदुशेखर ग्रंथोक्त । अवज्ञातस्य। अनर्चितदत्तस्य** ( अपमानयुक्त अन्नाचे भोजन) घडल्यामुळें परिग्रहाशुचिदुष्टान्नभोजन अतिकृच्छ्र ( एकवीस दिवसांचें उपोशन) प्रायश्चित्त घेतल्याशिवाय पंक्तिपावन होत नाहीं.

ज्या ब्राम्हणांची एक पंगत नसून म्हणजे ब्राम्हणाब्राम्हणांत कांहीं एक सप्रमाण विशेष धर्म धारण केल्यामुळें जातिभेद झाला असून परस्पर जातीचे परंपरा प्राचीनपासून अन्नोदक व्यवहार बंद झाला व तो अन्नोदक व्यवहार बंद करणें सप्रमाण असेल तर एकांत त्या एकाचे घरीं दुसरे जातीचा मनुष्य भोजन करील तर त्यास स्वधर्मलोप केल्यानें महादोषी होत्साता जातिभ्रष्ट करण्यास योग्य होतो.

**शंका**—व्यवहारी ब्राम्हणाचें अन्न जेवल्यानें परिग्रहाशुचिदोष दुष्टान्न भोजन केल्याचें पातक प्राप्त होईल परंतु व्यवहारी ब्राम्हणाचें अन्न जेवल्यानें स्वधर्म त्यागाचें पातक प्राप्त होतें यास प्रमाण काय.

**उत्तर**—स्वज्ञातीवांचून इतर ब्राम्हणादि कोणत्याहि जातीचें अन्नउदक सेवन करूं नये हा विश्वकर्मसंततीय ब्राम्हणांचा मुख्य स्वधर्म आहे यांस प्रमाण मूळस्तंभावरून स्पष्ट आहे कीं विश्वकर्म संततींनीं ब्राम्हणादि इतर जातीचें अन्न सेवन केलें अ-

---

१ भारतवनपर्व अ०२०१ मार्कंडेय समस्या पर्वणि धुंधुमारोपाख्याने—दुर्वेदा वा सुवेदा वा प्राकृता संस्कृतास्तथा॥ब्राह्मणानावमंतव्या भस्मच्छन्ना इवाग्नय:॥८८॥ यथा श्मशाने दीप्तौजा:पावको नैव दुष्यति॥एवं बिद्वानविद्वां वा ब्राह्मणोदैवतं महत॥८९॥

सतां त्यास स्वधर्मत्यागाचें महापातक प्राप्त होतें. स्वधर्माचा त्याग करणारास ब्रह्महत्यासमान महापातक आहे.

स्वधर्म याचें पर्यायनाम वेद आहे याविषयीं **मनुस्मृति** अ० १ **वेदोऽखिलो धर्ममूलं** ।। वेद हा धर्माचें मूल आहे. ।। **श्रुतिप्रामाण्यतोविद्वान् स्वधर्मे विनिवेशयेत्** ।। **श्रुतिस्मृतिपुराणेषु प्रोक्तोधर्मः सनातनः** ।। आणखी प्रमाण **नामलिंगानुशासने प्रथमकांडे ।। श्रुतिः स्त्रीवेद आम्नाय त्रयी धर्मस्तु तद्विधिः ।। त्रयीधर्मः।।त्रय्या व्याख्यायमानत्वात् । तद्विधिः वैदिकोविधिर्यागादिःधर्मइत्युच्यते वेदमूलत्वात्स्मृत्युक्तोऽपि विधिर्धर्मएव।।यदाह ।। गौतमः ।श्रुतिस्मृतिविहितोधर्म इति।।परंच ।। विधानमृग्यजुः साम्नां त्रयी धर्मं विदुर्बुधाः।।**

**अर्थ**—वेदशास्त्रांत सांगितलेल्या विधीस धर्म म्हणतात. म्हणून ज्यानें स्वधर्मत्याग केला त्यानें वेदत्याग केला असें जाणावें हें सप्रमाण आहे.

आतां स्वधर्म त्याग वेदत्याग अपरपर्यायनाम धर्मत्याग करणारास ब्रम्हवधसमान पातक आहे यांस प्रमाण.

**प्रायश्चित्तेंदुशेखर निरंक** पृ० ३० पं० ९ **नास्तिक्याव्द्यसनासक्त्यावा वेदत्यागो** ब्रह्महत्यासमः ।।

**अर्थ**— नास्तिकमतानें, किंवा व्यसनानें वेदत्याग करणें हा दोष ब्रम्हहत्येसमान आहे.

व्यसन या शब्दाचा अर्थ—स्त्री, पुरुष, किंवा कर्ण, त्वचा, नेत्र, जिव्हा, नासिका या पांच इंद्रियांपैकीं कोणत्याही एका इंद्रियानें सेवन करण्याचा पदार्थ इत्यादिकाचे ठायीं जो लोभिष्टपणा तें व्यसन. या अर्थास प्रमाण **शब्दरत्नाकर ग्रंथ पृष्ठ ८३९.**

आतां व्यवहारी ब्राह्मणाचे अन्नोदक विश्वकर्म संततीय ब्राह्मण सेवन करीत नाहींत म्हणून व्यवहारी ब्राह्मणांच्या कर्मानें व विद्येनें असलेल्या महत्त्वास कमी आहे असें कोणीं समजूं नये. जसें **शिवसौरनिर्माल्यनैवेद्यभक्षणेचांद्र** प्रा० **शे० निरंक** पृ० १५ यावरून शिवाचा किंवा सूर्याचा नैवेद्य भाक्षिला असतां चांद्रायण प्रायश्चित्त आहे म्हणून शिवाचें महत्व कमी समजूं नये. तसेंच ( **विश्वकर्म कुलेजातो यदि भुंक्तेन्यवेश्मनि ।। श्वानयोनिसहस्राणि गत्वा चांडालतां व्रजेत्) ग्रामयाज्यादीनां अन्नभक्षणे चांद्रायणं** ।। या वचनावरून व्यवहारी ब्राह्मणाचें अन्न विश्वकर्मसंततीय पंचाल ब्राह्मणांनीं भाक्षिलें असतां जरी पूर्वांग उत्तरांग प्रायश्चित्त आहे तथापि व्यवहारी ब्राह्मणाचे कर्मानें व विद्येनें असलेलें महत्त्व कमी झालें असें समजूं नये.

असो, व्यवहारी ब्राह्मणांचें अन्न जर पंचाल ब्राह्मणांनीं भक्षिलें तर त्यांस स्वधर्मत्यागाचें ब्रह्मवधसमान अनुपातक प्राप्त आहे हा एक पक्ष दुसऱ्या मतानें निंदितान्नादन प्रायश्चित्त प्रकरणांतील परिग्रहाशुचि दुष्टान्न भोजनाचें उपपातक प्राप्त आहे. यावरून दोन पक्षांचें पातक जेथें एकत्र होतें त्या पातकास ( **तत्रजातिभ्रंशकरादि ग-**

**णितातिरिक्तं प्रकीर्णकम्** ) प्रा० शे. पृ. २ यावरून प्रकीर्णक पातक ह्मटलें आहे. प्रकीर्णक पातकास प्रायश्चित्त ( **प्रकीर्णकेषु तादृशेषु तादृशस्यैकाब्दं** ) प्रा० शे० पृ. ९८ यावरून एकाब्द प्रायश्चित्त आहे ह्मणून ( **नवदिनसाध्ये शिखावर्ज्यं**) प्रा. शे. पृ. ८ यावरून आणि ( **राजा वा राजपुत्रोवा श्रोत्रियोवा बहुश्रुतः ॥ केशानां वपनं कृत्वा प्रायश्चित्तं समाचरेत् इति गृह्याग्निसागरे** पृ. ६ ) यावरून हे एकाब्द प्रायश्चित्त पूर्वांग उत्तरांग सहित केल्याशिवाय स्वज्ञातींत पंक्तिपावन करून घेण्यास योग्य नाहीं. शास्त्रोक्त प्रायश्चित्त पातक व त्याची शक्ति द्रव्यदेशकालादिकाला अनुसरून करावे. पूर्वांग उत्तरांग प्रायश्चित्ताचा प्रयोग प्रायश्चित्तेंदुशेखर ग्रंथाचे पृष्ठसांक ४७ पासून ते ५० पृष्ठापर्यंत आहे.

एवंच पूर्वोक्त श्रुतिस्मृत्याद्यनेक सर्वमान्य ग्रंथोक्त प्रमाणांवरून देवरथ वाजपेय चयनयज्ञकुंड यज्ञपात्र देवप्रतिमालंकारादि देवशिल्पकर्म वृत्तीनें उपजीवन करणारे भृग्वंगिरस गणांतर्गत सानगाद्यनेक ब्रह्मर्षिगोत्रोत्पन्न त्वष्टब्रह्मवंशस्थ नाराशंसशिल्पी अपरपर्यायनाम विश्वकर्म संतति पंचालस्वर्णकार ही जाति ब्राह्मण असून या जातीचा धर्म श्रुतीनें सांगितलेला असून स्मृतीमध्यें ( शास्त्रग्रंथामध्यें ) सांगितलेला आहे आणि वेदाला अनुलक्षून असलेल्या शास्त्रग्रंथांत सांगितलेला धर्म अनादि प्राचीनकालापासून भूतभविष्य वर्तमानादि सर्वकालीं महाराष्ट्र कर्नाटक आंध्र तैलंग द्रविड इत्यादि सर्व देशांत प्रसिद्धपणें शिष्टाचारांत ( पंचाल ब्राह्मणांत शिष्टजनांच्या चालू वहिवाटीला ) आहे याविषयीं श्रीमच्छंकराचार्य, प्रतिष्ठित विद्वान्, सर्वमान्य पुरुष यांनीं संमतिपत्रें दिलीं आहेत ( संग्रह ३ रा पहा ) आणि पंचाल ब्राह्मणांतील अज्ञसुज्ञ मनुष्याची प्रत्येकी आपली इच्छा सामान्यतः शास्त्रविरुद्ध नसल्यामुळेंच अनेक प्रकारचे सरकार मार्फत निवाडे झालेआहेत (संग्रह४था पहा ) यावरून पंचाल ब्राह्मणांच्या धर्माविषयीं ( श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्यच प्रियमात्मनः॥ एतच्चतुर्विधं ज्ञेयं साक्षाद्धर्मस्य लक्षणम् ) या मनुस्मृत्युक्त चार प्रमाणांची एकवाक्यता आहे हें उघड असून त्याप्रमाणें त्वष्टब्रह्मवंशस्थ नाराशंस शिल्पी अपरपर्यायनाम विश्वकर्म संतति पंचाल स्वर्णकारांत ब्राह्मण धर्म प्रत्यक्ष दृष्टिगोचर आहे आणि विश्वब्राम्हण, त्वष्टब्रम्हकुलोत्पन्न, अर्कशालिब्राम्हण, पंचालब्राम्हण, आचार्य, वाजर, पंचालस्वर्णकार, दैवज्ञ, या नावांनीं प्रसिद्ध आहेत.

याप्रमाणें वेदशास्त्रादि सर्वमान्य ग्रंथाचीं प्रमाणें मीं जितकीं पाहिलीं तितकीं सर्व आणि चालू असलेल्या वहिवाटीप्रमाणें जें यथार्थ सत्य आहे तें या ग्रंथांत शंकासमाधानपूर्वक लिहून सर्वत्र विद्वज्जन ब्रम्हवृंदांस त्याचे चरणारविंदीं मस्तक ठेवून सर्वत्र ब्रम्हवृंदापुढें हा ग्रंथ समर्पण केला आहे.

वेदशास्त्र प्रमाण पूरित या ग्रंथरूप कंदमूलफलांचा स्वीकार " जसा सतुषपोह्याचा स्वीकार श्रीकृष्णांनीं केला तसा आवडीनें करावा " आतां जरी या माझ्या ग्रंथांत अधिक उणें अक्षर पडलें असेल तरी " सुदामा ब्राम्हणाचे पोहे श्रीकृष्णांनीं फुंकून

फुंकून भक्षिले तसे शाब्दिक दोष टाकून उद्देशरूप पोहे भक्षणाचा स्वीकार करावा." अशी माझी सर्वत्र विद्वज्जन ब्रम्हवृंदांस करद्वय जोडून प्रार्थना आहे.

आतां कदाचित् ब्रम्हवृंदांस या इंग्रजी राज्यांतील सुधारकाच्या उलाढालीवरून मीही कोणी एक ब्राम्हणाची निंदा करणारा वगैरे सुधारक किंवा नास्तिक असेन म्हणाल तर असें समजूं नका. जरी सर्वत्रांस माझी माहिती नाहीं तरी मी प्रतिज्ञेनें सत्य स्मरून लिहितों कीं मी सर्वत्र सर्वदेशीय सर्वशाखीय ब्राम्हणांचें चरणरज मस्तकीं धारण करणारा असा सर्व ब्राम्हणांचा सेवक आहे. इतकेंच नव्हे तर चारीवर्णादि सर्व चराचर माझे प्रिय आप्त आहेत असें भासतें. माझी जगदीश्वर नारायणाचे ठायीं पूर्णपूज्यबुद्धि आहे. माझा वेदोक्त धर्मावर पूर्ण विश्वास आहे. धर्म हा नित्य असल्यामुळें त्या धर्मरक्षणार्थ युगायुगीं अवतार धारण करणारा जो श्री लक्ष्मीनारायण तत्प्रीत्यर्थ हा यथामति ग्रंथ यथार्थ केला आहे. ॥ ॐ तत्सद्ब्रम्हार्पणमस्तु॥ शुभंभवतु ॥

## संग्रह २ रा समाप्त.

श्री.

# संग्रह ३ रा.

( स्वामिकृत, विद्वत्कृत संमतिपत्रांचा )

या तिसऱ्या संग्रहांत विश्वकर्म संतति पंचाल स्वर्णकार हे ब्राह्मण असून वेदशास्त्र विहित ब्राह्मण धर्मानें भूत भविष्य वर्तमानादि सर्व कालीं वागतात या विषयीं, श्री शंकराचार्य, प्रतिष्ठित विद्वान्, सर्वमान्य पुरुष व प्राचीन शिष्टजन यांची संमति पत्रें नांव निशा सहित दिली आहेत.

पत्र १ लें.

**श्रीमत्परमहंसादिवेदोक्तविरुदांकितशृंगेरीसिंहासनाधीश्वरश्रीमच्छंकराचार्यान्वयस्वामीकरकमलसंजाताभिनवश्रीविद्यानृसिंहभारतीस्वामीकृतनारायणस्मरणानि.**

आमचे जातीची चौकशी कैलासवासि शाहूमहाराजांचे वेळेस विश्वकर्मसंततीय पंचाल सोनार यांचे विषयीं सभा होऊन झालेलें निर्णयपत्र आणि स्वामींचें निर्णयपत्र आणवून उभयपत्रें महाराजांनीं वैदिकमंडळीसहित ध्यानास आणून आह्मांस पूर्ववत् प्रमाणें आज्ञा केली—सोनार पंचाल देशस्थ कानडे विश्वकर्म संतती कसबे पुणें वगैरे यासीं ब्रह्मकर्माची अर्हता ( अधिकार ) आहे. याविषयीं श्रुतिस्मृति पुराणें इतिहास सूत्रें मीमांसादिकरून प्रमाणें आहेत तीं:—

श्रुति.

१ विश्वरूपोवैत्वाष्ट्रःपुरोहितोदेवानामासीत् अस्यार्थस्तु विद्यारण्य चरणैः०
२ त्वष्टासोमंपिबस्वाहेति विद्यारण्यचरणैर्व्याख्यातः
३ त्वष्टाहतपुत्रोवींद्र ॰ सोममाहर ०
४ त्वष्टारूपाणामधिपति०
५ त्वष्टेदंविश्वंभुवनंजजान०
६ अनैवस्तेरथमश्वायुतक्षंत्वष्टावज्रंपुरुहूतद्युमंतम्
७ त्वष्टास्यवज्र ॰ स्वयंततक्षेति०
८ ऋभूणांत्वादेवानांव्रतपतेव्रतेनादधामीति.
९ तृतीय ॰ सवनंकवीनामिति०
१० त्वष्टास्मैवज्र ॰ स्वयंतक्षयति०
११ आदित्यानांत्वेतिभृगूणात्वाःअंगिरसांव्रतपतइति०

यांचीं भाष्यें आहेत त्यांत संपूर्ण विस्तार आहे.

---

१ यजुर्वेद अष्टक २ पन्न ५ अनुवाक १ ला. २ यजुर्वेद अष्टक १ पन्न ४ अ० २७ पन्ना १. ३ यजुर्वेद अष्टक २ पन्न ४ अनुवाक १२ पदे २६. ४ यजुर्वेद अष्टक ३ पन्न ४ पन्नाशी १ पन्नाशी १ पदें ३७–४३. ५ शुक्लयजुर्वेदसंहिता अध्याय २८ मंत्र १२. ६ यजुर्वेद अष्टक १ पन्न ६ अनुवाक १२ पन्नाशी ६. ७ तैत्तिरीय ब्राम्हण अष्टक २ प्रश्न ५ अनुवाक ४ दशक १३. ८ तैत्तिरीय ब्राम्हण अष्टक १ प्रश्न १ अनुवाक ४ दशक ९. ९ यजुर्वेद अष्टक ३ पन्न १ अनुवाक ९ पन्नाशी २. १० तैत्तिरीय ब्राम्हण अष्टक १ प्रश्न १ अनुवाक ४ दशक ९. ११ तैत्तिरीय ब्राम्हण अष्टक १ प्रश्न १ अनुवाक ४.

कात्यायन सूत्र परिभाषा अध्यायाचीं भाष्यें. १कर्कभाष्य. २देवयाज्ञिक३ श्रीअनंत. ४ हिरण्यकेशीसूत्र त्याचें भाष्य वैजयंती. ५ बौधायनसूत्र भाष्य. ६ आपस्तंबसूत्र भाष्य. ७ आश्वलायनसूत्र. ८ आश्वलायन अनुक्रमणिका. ९ षड्गुरुभाष्य. १० जैमिनीसूत्रमीमांसा. ११ संस्कारसार. १२ स्मृतिदर्पण. १३ विज्ञानेश्वर. १४ नृसिंहप्रसाद. १५ गोविंदार्णव, १६ शिल्पशास्त्र.

पुराणें.

१ शैवपुराण. २ लिंगानुशासन. ३ विराटपर्व. ४ काशीखंड. ५ रामायण.६ भागवत. ७ वराहपुराण. ८ आदित्यपुराण. ९ भारत आदिपर्व. १० ब्रह्मवैवर्तक. ११ स्कंदपुराण. १२ नागरखंड. १३ विष्णुपुराण.

मीमांसा.

१ भाट्टदीपिका. २ व्याख्यान पार्थसारथिमिश्र. ३ तंत्ररत्न. ४ रुद्रदत्तरामांडरु व्याख्यान.

---

पत्र दुसरें.

* 


श्रीमत्परमहंसादियथोक्तबिरुदांकित श्रीगिरिसिंहासनाधीश्वरश्रीमच्छंकराचार्यअन्वय श्रीविद्यानृसिंहभारति स्वामिकरकमलसंजाताभिनव श्रीविद्यानृसिंहभारतिस्वामिकरकंजोभ्दवश्रीविद्या० सकलगुणालंकरण—

हरिगुरुभक्तिपरायण वेदशास्त्र संपन्न राजमान्य राजश्री—समस्त वैदिकवृंद व जोशी व धर्माधिकारी व राजकीय गृहस्थ व देशमुख व देशपांडे व कुळकर्णी व समस्थ ग्रामस्थ गृहस्थ वास्तव्य परांडा. परम भक्तोत्तम यांप्रति विशेष.—अस्तु तुमचें कल्याण इच्छित क्षेत्र प्रतिष्ठानानिकट असो. तदनंतर तुम्हीं वेदमूर्ति आत्माराम यांपाशीं पृच्छा केली कीं, स्वर्णकार पंचालांनीं कोण्या आधारें कर्म करावें, ऐशी यास त्यानें आम्हांपाशीं या कामास मनुष्यें पाठविलीं. त्यावरून आम्हीं येथें विज्ञानेश्वर जातिविवेकादि ग्रंथ आणून क्षेत्रस्थ ब्राम्हणांच्या विद्यमानेंकरून विचारितां तेव्हां शास्त्र बोललें कीं, विश्वकर्म या पासून या पंच पांचालांची उत्पत्ति आहे, परंतु पाचांचीं कर्में वेगळालीं आहेत. तर स्वर्णकार पंचाल मात्र विश्वकर्म याच्या मुखापासून उत्पत्ति, व लोहकार हृदयापासून उत्पत्ति, व सुतार बाहूंपासून उत्पत्ति, तांबट नाभीपासून उत्पत्ति,

* शिक्क्यामध्यें आणखीही मजकूर आहे. १ परांडा हा गांव सोलापूर जिल्ह्यांत आहे.

व पाथरवट पायांपासून उत्पत्ति असे, आणि धर्म वेगळाले असे. ऐशीयास तुम्हीं पृच्छा केली—पंचाल स्वर्णकारांनीं कोण्या आधारावर कर्म करावें. तरी वेदोक्त कर्माचा अधिकार असे. हें शास्त्र शोधून तुम्हांकडे पत्र मुद्रांकित पाठविलें असे. तरी सुज्ञांप्रति विशेष लिहिणें नलगे. (इत्यलम्) शके १६८२ विक्रतिनामसंवत्सरे. श्रावण वद्य९ बुधवासरे पत्रंप्रेषितं-शुभंभवतु.

---

पत्रतिसरें.




**श्रीमत्परमहंसादि यथोक्त बिरुदांकित श्रीगिरिसिंहासनाधीश्वर श्रीमच्छंकराचार्यान्वय श्रीविद्यानृसिंहभारतीस्वामी करकमलसंजाताभिनवश्रीविद्याशंकरभारतीस्वामीकृतनारायणस्मरणानि.**

शाहुराजाशंभुराज छत्रपति स्वस्ति श्रीनृपशालिवाहन शके १६७३ प्रजापति नामसंवत्सरे चैत्रसित २ तद्दिने राजश्री लक्ष्मणाचार्य व रामचंद्र धर्माधिकारी व बाळोबा सखाराम पोतदार पेठ कोल्हापूर व समस्त सुवर्णाकार पंचाल विश्वकर्म संतति वास्तव्य क्षेत्र करवीर यांसीं आज्ञा केली. ऐसीजे तुह्मी पूर्वमर्यादेप्रमाणें आपले ज्ञातींत शास्त्रसंमतें कर्माचरण करीत असतां, ब्राह्मणांनीं कज्जा करून राजद्वारीं निवेदन केलें. त्यांहीं मनास आणून तुह्मांस मठास जावयास आज्ञा केली. त्यास मठास न येतां कागलास गेलां. तेथील मुख्यांनीं भावगर्भ मनास आणून आमचें वास्तव्य सेदलगेत[1] असतां समस्तांस पाठवून दिलें. त्यावरून विचारणा करितां समस्तांहीं पूर्वोक्त वर्तमान विदित केलें कीं, आम्हीं पूर्वींपासून आपल्या शास्त्र मर्यादेप्रमाणें आचरण करीत असों. यामार्गे सर्तेऋषीस[2] चर्चा झाली होती तत्समयीं महाराज राजश्री छत्रपति यांहीं प्रतिष्ठान क्षेत्रास पत्र पाठविलें. आणि येविषयीं साक्षीस्तव ग्रंथ लिहिलेले जे नृसिंहप्रसाद व स्मृतिदर्पण व गोविंदार्णव, कर्कभाष्य व कात्यायनीसूत्र ऐशा पांच ग्रंथांचे आधार लिहिले. त्याचप्रकारें वर्तत आलों, येविषयीं स्वामींनीं अभयपत्र द्यावें, म्हणोन त्यावरून तुम्हांस आज्ञा केली कीं,—

करवीरास गेल्यानंतर येणें. मग सांगणें तें सांगूं. तदनंतर मठास आल्यावर महाराज राजश्रींनीं मागुती पाठवून दिल्यावर विचारकरितां तुम्ही आपले ज्ञातींत सन्मार्गें यथाशास्त्र वर्तावें, ऐसें ध्यानास आलें. आणि येविषयीं प्रतिष्ठानकरांनीं लिहिलें तेंही प्रमाण जाणून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तर जैसें आजपावेतों शास्त्रसंमतें कर्माचरण करीत

---

१ गांवाचें नांव आहे. २ सातान्यास.

आलां त्याप्रमाणें सुखरूप आचरत जाणें या गोष्टीस कोणीं दूषण ठेवावयास गरज नाहीं . अभय असो. बहुत काय लिहिणें.




---

पत्रतिसरें.




श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्यपदवाक्यप्रमाणपारावारपारीणयमनियमासनप्राणायामप्रत्याहारधारणाध्यानसमाध्यष्टांगयोगानुष्ठाननिष्ठगरिष्ठतपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्नगुरुपरंपराप्राप्तषड्दर्शनास्थापनाचार्यव्याख्यानसिंहासनाधीश्वरसकलवेदार्थप्रकाशकसांख्यत्रयीप्रतिपालकसकलनिगमागमसारहृदयवैदिकमार्गप्रवर्तक सर्वत्रस्वतंत्रादि राजधानीश्रीविद्यानगरमहाराजधानीकर्नाटकसिंहासनप्रतिष्ठापनाचार्यश्रीमद्राजाधिराजगुरुभूमंडलाचार्यतुंगभद्रातीरनिवासऋष्यशृंगपुरचराधीश्वरशृंगेरीश्रीविरूपाक्षश्रीविद्याशंकरदेवदिव्यश्रीपादपद्माराधकशृंगेरीश्रीविरूपाक्षश्रीमदभिनवोद्दंडनृसिंहभारतिस्वामिकरकमलसंजातश्रीमदभिनवविद्यारण्यभारतीस्वामिभिः

अस्मच्छिष्य वर्गांतर्गत समस्त सुवर्णकार मंडळी वास्तव्य मुंबई, यांप्रती आशीर्वाद पूर्वक नारायणस्मरण. सांप्रत तुम्हीं येऊन विनंति केली कीं, आह्मास कोणेकर्माचा अधिकार आहे ? कोणतें कर्म चालवावें ? त्यावरून तुह्मांस आज्ञापत्र दिलें कीं, अग्निपुराणांत, तथा विश्वकर्मोत्पत्ति प्रतिपादित श्रुतिकर्मांचा अधिकार आहे. तुह्मीं सुखें वेदोक्त कर्म करावें. तथा नमस्कार करावा. याप्रमाणें शृंगेरी व विरूपाक्ष, कर्नाटक प्रांतादिकांत चालत आहे त्यांत हरकत नाहीं आतां हें पत्र तुह्मांस योग्य आहे, ह्मणून दिलें असे. तर यास कोणीं एक तुमचें सांगातीं हरकत करील त्यास आपली शपथ असे. शके १७०९ प्लवनामसंवत्सरे ज्येष्ठ वद्य ५ भौमवासरे.

---

पत्र ४ थें.



श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्यपदवाक्यप्रमाणपारावारपारीणयमनियमासनप्राणायाम कर्नाटकसिंहासनप्रतिष्ठापनाचार्य तुंगभद्रातीरजताचलवासीऋष्यशृंगपुराधीश्वरशृंगेरीश्रीविद्याशंकरदेव दिव्यसर्ववेदार्थप्रकाशकसांख्यत्रयीप्रतिपालकश्रीकरकमलसंजात श्रीपादपद्माराधकश्रीशंकराचार्यान्वयश्रीबाळकृष्णभारतीस्वामिभिः ॥

स्वस्तिश्रीमन्नृपविक्रमार्क शालिवाहनशके १७५० सर्वधारीनामसंवत्सरे माहे वैशाख शुद्ध ८ मंगळवार सकल गुणालंकरण हरिगुरु भक्तपरायण पंचाल सोनार पेठ वैरागकर यांसिप्रति—आज्ञा श्रीमुख विशिष्ट स्वारी श्रीमठाहून देशाटनानिमित्य बारशी मुक्कामीं आली. तेंव्हां तुह्मी सर्वत्रांनीं येऊन विनंति केली कीं, आमचा जाति धर्माचा विधी कसा आहे ? त्याजवरून लिहिलें जातें जे,—तुह्मीं आपला मार्ग शास्त्रसंमतें जो पूर्वापार चालत आला आहे त्याप्रमाणें सुखरूप चालणें. याचा विचार पूर्वीं शृंगेरी मठाचे पत्राअन्वयें पाहून धर्म चालविणें पुढें कोणीं नवीन मार्ग सांगतील तो करूं नये. प्राचीन वंशपरंपरा तुमचे समुदायांत जो व्यवहार चालत आला तो चालवावा. तुह्मीं पांच कर्मे करितां ह्मणून तुह्मांस पंचाल अशी संज्ञा आहे, हें शास्त्र प्रसिद्ध आहे. तुमची उत्पत्ति विश्वकर्मापासून आहे. त्यास याची वहिवाट ग्रामस्थ ब्राह्मण व जोशी व धर्माधिकारी जे यांनीं अनुकूल होऊन यांचें कर्ममार्ग ज्याप्रमाणें आहे त्याप्रमाणें चालवावयास कोणी अडथळा करील तर श्रीमठाचा दंडाधिकारी होईल. नानादेशान्वयवर्तीभू०



याप्रमाणें अशीं कित्येक स्वामींचीं पत्रें आहेत. परंतु सर्व पत्रांतील भावार्थ बहुतकरून एकच असल्यामुळें व विस्तारभयामुळें येथें घेतलीं नाहींत. आतां या पूर्वोक्त चार पत्रांतील सारांश इतकाच दिसून येतो कीं, पंचाल स्वर्णकारांनां वेदोक्त कर्माचा अधिकार निश्चयेंकरून आहे परंतु जाति ब्राह्मण आहे याविषयीं संमति पत्रांत स्पष्ट रीतीनें लिहिण्याविषयीं एकाहि शंकराचार्याच्यानें आपली हृदय ग्रंथि मोकळी करवली नाहीं. मग संपादिलेल्या[२] स्वकीय गुरुत्वाचें प्रस्तुत वैभवास लघुत्व येईल या भयास्तव

१ वैराग हा गांव सोलापूर जिल्ह्यांत आहे.

२ त्वष्टृब्रह्मभूनकुलावतंस रुद्राचार्यांच्या कृपेनें शंकराचार्यांस नाना कुलऋषिवंशीय लोकांचें गुरुत्व मिळालें आहे. त्यामुळें विश्वकर्मसंततीय लोक शंकराचार्यांस दक्षिणा देत नाहींत

करवली नसो, अथवा स्वजातीय पेशवे वगैरे असूयु शिष्य लोकांच्या दुर्वासनेचा अपमान होईल या भयास्तव करवली नसो.

असो, त्यांनीं जरी जातीविषयीं परिस्फुटता केली नाहीं तथापि त्यांच्याच या पत्रांवरून पंचाल हे मुख्य ब्राम्हण आहेत, असें उघड दिसून येत आहे, तें असें कीं, पूर्वोक्त स्वामींच्या चार पत्रांत पंचाल ब्राम्हण असल्याचें जरी स्पष्ट लिहिण्यांत आलें नाहीं तरी त्या सर्व पत्रांत ( पंचाल स्वर्णकारास वेदाचा अधिकार आहे. आणि त्यांनीं आपले ज्ञातींत पूर्वींपासून परंपरा चालत आलेल्या मार्गानुरूप सुखरूप चालणें. कोणीं हरकत करूंनये. व त्यांची विश्वकर्माच्या मुखापासून उत्पत्ति आहे ) वगैरे मजकूर स्पष्ट लिहिला आहे. अर्थात् वेदाचा जर अधिकार आहे तर ब्राम्हण क्षत्रिय वैश्य या तिहींतून एक असावेत हें प्रथमच उघड दिसत आहे. आतां ब्राम्हणच कशावरून ? तर तिहीं वर्णांस जरी वेदाचा अधिकार आहे तथापि ब्राम्हण व्यतिरिक्त क्षत्रियें वैश्यांस अध्यापन याजन आणि प्रतिग्रह या तिन्हीं कर्मांचा अधिकार नाहीं. येवढेंच नाहीं तर सर्व श्रुतिस्मृत्यादि ग्रंथांत आणि रूढींत ही ब्राम्हणांच्या आणि क्षत्रियवैश्यांच्या संस्कारवगैरे कर्म धर्मपद्धतींत पुष्कळ भिन्नत्वें आहे. त्यांतून केवळ ब्राम्हणवर्णांच्याच संस्कार वगैरे कर्मधर्म पद्धति येथें कांहीं सांगतों.—षट्कर्मोपभोग, स्वकीय आचार्यद्वारां षोडशसंस्कार करणें, आठवे वर्षीं उपनयन करणें, कापसाचें यज्ञोपवीत, मृगचर्म, काषाय वस्त्र धारण, दर्भाची मेखला बांधणें, केश संमित साग्र पालाशदंड, त्रिपदा गायत्री उपदेश. भवच्छद्वाचा प्रथम उच्चार करून भिक्षा नमस्कार करणें, भिन्नगोत्र प्रवरानें शरीरसंबंध करणें; हस्ताग्नौकरण इत्यादि केवळ ब्रह्मकर्म पद्धति पूर्वींपासून परंपरा सांप्रत काल पर्यंत पंचाल ब्राम्हणांत शास्त्राधारें चालत आली आहे. एतद्विषयीं शंकराचार्यांनीं श्रृंगेरी, विरूपाक्ष, मलबार, कर्नाटक, इत्यादि सर्व देशांत चौकशी करून दिलेल्या वरील सर्व संमति पत्रांतील ( तुम्हांस वेदाचा अधिकार आहे. परंपारा चालत आलेल्या वहिवाटीप्रमाणें सुखरूप चालणें. ) या लेखावरून व ( विश्वकर्माच्या मुखापासून उत्पत्ति आहे. ) या लेखावरून पंचाल स्वर्णकार हेच निश्चयें करून मुख्यत्वें ब्राम्हण आहेत, असें शंकराचार्यांच्याच चहूंही संमति पत्रांवरून वाचकांस साहजिक दिसून येईल.

केवळ स्पष्ट रीतीनें ब्राह्मण ह्मटलें आहे याविषयीं पुढचें संमति पत्र पहा.

---

१ ब्रह्मक्षत्रियविट्शूद्रावर्णास्त्वाद्यास्त्रयोद्विजाः ॥ निषेकादिस्मशानांतातेषांवैमंत्रतःक्रियाः ॥ मिताक्षरा ॥ २ अधीयीरंस्त्रयोवर्णाः स्वकर्मस्थाद्विजातयः ॥ प्रभूयाद्ब्राह्मणस्त्वेषान्नेतराविति निश्चितः॥ मनुस्मृति अध्याय १० श्लोक १ ला. ३ दुसऱ्यांस वेदशिकविणें. ४ दुसऱ्याच्या यज्ञांत आचार्यत्व करणें. ५ दुसऱ्याचें दान घेणें. ६ नतौप्रतिहितान्धर्मान्मनुराह प्रजापतिः॥ म॰ अ॰ १० श्लोक ७८ अस्यार्थः- यस्मान्मनुःप्रजाप्रतिस्तौ क्षत्रियवैश्यौप्रतितानिवृत्यर्थानिकर्माणि कर्तव्यत्वेननोक्तवान् इतिमन्वर्थमुक्तावल्याम् ॥ ७ या विषयीं आश्वलायनसूत्र मनुस्मृति पहा. ८ तिसरें पत्र पहा. ९ पंचाल स्वर्णकार जर ब्राह्मण नसतें तर त्यांच्या स्वतःच्या उपाध्यायांकडून हव्य कव्यादि पूर्वोक्त धर्मकर्में करण्याची वहिवाट शंकराचार्यांनीं बिलकूल मान्य केली नसती. तस्मात् ज्या पेक्षा शंकराचार्य आपल्या पत्रांत ( वहिवाटीप्रमाणें सुखरूप चालणें ) असें स्पष्ट लिहितात त्यापेक्षां पंचाल हेमुख्य ब्राम्हण आहेत हें पूर्वसिद्धच आहे.

पत्र ५ वें.

आदौशिवस्ततोविष्णुस्ततोब्रह्माततःपरः ॥ वसिष्ठाख्यस्ततः श-
क्तिः स्ततः षष्ठःपराशरः॥ततो व्यासः शुकःपश्चात् गौडपादाभिधस्ततः
गोविंदार्यगुरुस्तस्माच्छंकराचार्यसंज्ञिकः ॥ श्रीमत्परमहंसपरिव्रा-
जकाचार्यषण्मतस्थापनचार्यश्रीमच्छंकराचार्यछत्रचामराब्रदविळी
सदासेव्यमान श्रीबाळकृष्ण भारतीस्वामिभिः ॥

स्वस्तिश्री विजयाब्धि शालिवाहन शके १७४५ संधिवर्तमाने नर्मदा दक्षिण देशे कृष्णोत्तर पूर्वपश्चिमे मध्यदेशे महाराष्ट्र मागधसिंधु आंध्रे कर्नाटके देशामध्यें ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्रवर्णांतर्गताष्टादश जातीनामधिकः ब्राम्हणानां वेदांत षट्-शास्त्र प्रासंगिक श्रीमूर्ति ब्राम्हण वृंदमध्यें समस्तदेशानां प्रभु ब्राम्हण क्षत्रिय सुभेदार वो कमावीसदार वो देशमुखवो देशपांडे मुकदम नायब पेशवो फडन्वीस वो वराड पांडे जोशी वो धर्माधिकारी वो सभापति अशेष महाजनास आज्ञा श्रीमुख विशेष श्रृंगेरी मठाहून आज्ञा श्रीमुख, चित्रभानु नाम संवत्सरे कार्तिक शुद्ध सप्तमी ७ दिवशीं पत्र लिहिलें तें आम्हास पौष वद्य ७ सप्तमीस पोंचलें. यावरून आज्ञा केली आहे,-

विश्वकर्म संततीय ब्राम्हण आनाचार करीत नाहींत म्हणून श्रीमुखामध्यें वेदादि षट्कर्म करावें. म्हणून आज्ञा केली आहे कीं, आप आपले वर्णाश्रमाप्रमाणें वैदिक कर्म विश्वकर्म संततीय ब्राम्हण करतील. यांचे घरीं षोडशसंस्कार वेदोक्त मंत्रपूर्वक समस्त ब्राम्हणानीं करावे यांस कोणी प्रतिबंध करूं नये. त्यांहीं अन्याय कर्म केलें तर याहींस शिक्षा करावी. जोशी वो धर्माधिकारी वो सभापति यानीं त्यांचे वेदोक्त कर्मास अटकाव करूं नये. केलातर श्रीमठाची शिक्षा होईल. पुण्याहवाचनादि षोडशकर्मे यांचे श्रीमठाच्या बोलें यथाशक्त्यादक्षिणा घेऊन पुढें कर्म करणें याशीं अटक न करणें. स्वदत्ताद्द्विगुणं पुण्यं परदत्तानुपालनम् ॥ परदत्तापहारेण स्मदत्तानिश्चलंभवेत् ॥ इति श्लोकार्थ प्रमाणें समस्तांनीं मान्य करावें. श्री जन्मेजय शके ३७३८ सुभानु नाम संवत्सरे पौष वद्य १२.

---

आतां प्रस्तुत मानावरून पाहतां रत्न सुवर्णालंकारादि शिल्पविद्येच्या वृत्तीवरून पडलेल्या पंचाल सोनार या शद्बावरून कित्येक दुर्बोधनीय लोकांस शंका घ्यावी अशी उत्कंठा असेल तर पुढील महाक्षेत्र काशीस्थ विद्वज्जनांचीं संमति पत्रे पहा. म्हणजे समाधान होईल.

पत्र ६ वें.

---

१. या श्रीशंकराचार्यांच्या संमति पत्राची जुनीनकल जिल्हा नागपूर पैकीं कसबे भिवापूर येथें रा. रा. बापूजी पंचाल यांचे घरी होतीतिचीच ही नक्कल अस्सल प्रमाणें छापिली आहे.

## श्रीक्षेत्रकाशीस्थविद्वज्जनानाम्
## संमतिपत्रम्.

श्रुतिस्मृतिपुराणज्ञैःकाशीपुरनिवासिभिः ॥ सर्वलोकोपकाराय क्रियतेजातिनिर्णयः ॥ १ ॥

सामान्यतःप्रजाद्विविधाः। विश्वकर्मब्रह्मनिर्मिताः कश्यपब्रह्मनिर्मिताश्च। यद्यपि॥ ब्राह्मणोस्यमुखमासीदित्यादिना विराडंगत्वं प्रतीयतेतथापिआकाशाद्वायुरित्यादिवत्परंपरयातज्जन्यत्वंबोध्यं। आद्याःपंचविधाद्वितीयाश्चतुर्विधाः। तत्रमुखतःसृष्टाब्राह्मणावेदायज्ञाश्चइतरेबाव्हादिसृष्टाः। तैश्चवृत्तिकर्मणिप्रतिप्रार्थ्यमानश्चतुर्मुखःयजनादित्रीणिकर्तव्यानियाजनादित्रीणि॥ प्रजापालन कृषिवाणिज्यसेवादीनिचजीवनोपयोगिकानिददौ॥ तत्राद्यावैश्वकर्माणायजनादित्रयंकर्तव्यत्वेनप्रजापालनादिकंवृत्त्युंपयोगित्वेनस्वीचक्रुः॥ काश्यपेषुमध्येब्राह्मणायजनादित्रयंकर्तव्यत्वेनयाजनादित्रयंजीवनोपयोगित्वेनएवंक्षत्रियवैश्योआद्यत्रयंकर्तव्यत्वेनप्रजापालनादिकंवृत्त्युपयोगित्वेनशूद्रास्तुसेवामुभयार्थत्वेनवव्रुः ततःपरस्परंकलहायमानाःब्रह्मणावृत्त्यंतरंपरिकल्प्यपालनात्याजितावैश्वकर्माणाइतिस्थितिः। अंबष्टादयस्तुअनुलोमप्रतिलोमजा अनंतावेदितव्याः॥ ॥ अयंचार्थः स्कंदाग्नेयादिपुराणेषुमनुयाज्ञवल्क्यादिस्मृतिषुश्रुतावपिप्रसिद्धः॥ तथाहिस्कांदे स्कंदमैत्रेयसंवादे कल्पादौ ब्रम्हक्षत्रियाविट् शूद्रपांचालानांप्रभंजसाम्॥ स्रोतसासर्वजंतूनांसृष्टिंवद जगत्प्रभो इतिमैत्रेयप्रश्ने श्रीस्कंदः। विष्णुकर्णमूलोद्भूत तत्संहृतमधुकैठभमेदोमज्जात्मिकांमेदिनींविध्वाज्ञयाब्राह्मणाः आदौप्रजामानसाश्च। सानगादिऋषींस्तथेत्यादिना विश्वकर्मादिसृष्टिमुक्त्वा। मेदोरूपत्वादस्पृश्यामेदिनीतिनारदादिभिःप्रार्थितात् विश्वकर्मस्त्वमद्यैवब्राम्हणान्मुखतःसृजेत्यादिनाब्राह्मणसृष्टिमुक्त्वा॥ भूमावागत्यतेसर्वेविश्वकर्मप्रसादतः पवित्रींमेदिनींकर्तुंचक्रुस्तेदुष्करंतपः॥ तपःसामर्थ्यतःसर्वेस्वर्णाकारांचमेदिनीं॥पवित्रांकृतवंतोहिब्राह्मणाःसफलक्रियः॥तान्दृष्ट्वाथमुदंप्रापविश्वकर्माजगत्प्रभुः॥ ब्राम्हणासहतेषांसनामधेयंददौतदा॥ यतःस्वर्णकृताभूमिःस्वर्णकाराभविष्यथ॥ पुनर्ददौवरंतेषां राज्यंवेदादिकंतथेत्यादिनातेभ्योवरदानमुक्त्वा॥ ततस्तेब्राह्मणाःसर्वेराजानोभूमिमंडले॥ राज्यंतपःप्रकुर्वाणाब्रह्मयज्ञोभयान्विताः॥ इत्यादिनातेषांयज्ञपालनादिकर्मचोक्त्वा॥ कदाचित् कश्यपोधीमानभूमिंदृष्ट्वासभार्यया॥ पुष्कराख्यमहाक्षेत्रेस्थानंकृ-

त्वाथसाग्निकः ॥ वेदिकरणयोग्यायमृत्खंडंनचदृष्टवान् ॥ इत्यादिनाकश्यपस्यमृदलाभमुक्त्वा ॥ तत्रगत्वानमस्कृत्यब्रह्माणंब्रह्मवादिनमित्यादिनामृल्लाभम् ॥ गंगायमुनयोर्मध्येमृत्स्नावेदिःप्रकल्पितेत्यादिनामेदिन्यामृद्भावमुक्त्वा ॥ ततस्तेवैश्वकर्माणामृण्मयांचमहीमिमाम् ॥ स्वर्णाकारेणरहितांदृष्ट्वाचिंताकुलास्तदेत्यादिनान्योन्यकलहम्वैश्वकर्मणांनिर्गमनंचोक्त्वा ॥ वेदाश्चमुखतस्तस्यब्राह्मणाश्चभवन्पुरा ॥ बाहुतःक्षत्रियाजाताऊर्वोर्वैश्यास्तथैवच ॥ पादाच्छूद्राअजायंतवर्णाएवंक्रमेणहीत्यादिनाकश्यपात्सर्ववर्णसृष्टिमुक्त्वा॥स्वकीयागमनंदृष्ट्वाक्रोधताम्राक्षमानसः॥हाहाकारोमहानासीदृषिदेवादिमंडले ॥ ऋषिदेवादयः ॥ सर्वेब्रह्माविष्णुपुरोगमाः ॥ कश्यपंचपुरस्कृत्यस्तुत्वातंत्रेदवाक्यगैः ॥ विश्वकर्मामनसेत्यादिनावैदिकस्तुतिंचोक्त्वा ॥ ततोब्रह्मणाविश्वकर्मब्राह्मणानां ॥ युष्मत्स्थितिर्भूमंडले स्याद्भवंतोब्राह्मणप्रभाइत्यादिनाभूमंडलनिवासंवृत्त्यर्थंकटकमुकुटादिनिर्माणकौशल्यलाभम् ॥ कृतेचभवतांसर्वब्राह्मण्यंपालयतेसदा । त्रेतायांपंचकर्माणि ॥ द्वापारेतुचतुष्टयम् कलौत्रीण्येवकर्माणिपालयंतेधातुलोभतः॥करणेयदिनिष्ठाचेत् सर्वत्रस्तिनसंशयः ॥ इत्यादिनायजनाद्यधिकारलाभादिकंचबहुधाप्रपंचितवान् ॥ अग्निपुराणेप्ययमेवार्थआख्यायिकांतरेणप्रतिपादितः ॥ तथाहि ॥ अग्निः । कदाचित्शंखदैत्योभूत्सिंधुपुत्रोमहाबलइत्यादिनाशंखदैत्योत्पत्तिं ॥ महान्हिंस्रोमहागर्वीलोकान्जित्वाबलात्स्वयम् ॥ ससर्वांल्लोकपालांश्चब्रह्मादिसहितान्ऋषीन्॥ इत्यादिनातस्यलोकपालादिजयम् ॥ तेभ्योवेदान्सुवर्णंचगृहीत्वाथययौजलमित्यादिनातत्कृतवेदाद्यपहरणं ॥ स्थितवान्स्तत्रदैत्येशस्ततोश्रीकमिदंबभावित्यादितत्कृतजगत्पीडाम् ॥ ततोहंदैत्यराजंतंहत्वेत्यादिनास्वेनतत्संहरम् ॥ सुवर्णब्राह्मणान्पुनः ॥ संस्कृतान्पंचपंचभ्योजिव्हाभ्यःसप्तजिव्हकः॥सृष्ट्वातेभ्योवरंदेयसुवर्णराज्यसंपदम् ॥ दत्वाभिवांछितान्कामानित्यादिनातेभ्योवरदानमुक्त्वा ॥ अथतेब्राम्हणाःपंचवेदवेदांतपारगाइत्यादिनातेषांवेदाध्ययनयज्ञानुष्ठानादिकंमोक्तवान् ॥ एवंसुतसंहितायामपि ॥ हिरण्यगर्भोभगवान्ब्रह्माविश्वजगत्पतिः ॥ आस्थायपरमांमूर्तितस्मिन्पद्मेसमुद्भवौ ॥ तस्मिन्वेदविदांश्रेष्ठाब्रह्मणः परमेष्ठिनः ॥ महादेवाज्ञयापूर्ववासनासहितामुखात् ॥ ब्राह्मणाब्राह्मणस्त्रीभिः सहजातास्तपोधना इत्यादिनातदुत्पत्त्यादिकंप्रपंचितम् एवंमिताक्षरायामपि ॥ ब्रह्मक्षत्रियविट्शूद्रावर्णास्त्वाद्यास्त्रयोद्विजाः ॥ निषेकादिश्मशानांतातेषांवैमंत्रतःक्रियाइत्यादिनाप्रतिपा

दितम् ॥ इत्थंमानवेधर्मशास्त्रेच ॥ मुखबाहूरुपज्जानांपृथक्कर्माण्य कल्पयत् ॥ अध्यापनंचाध्ययनंयजनंयाजनंतथा॥ दानंप्रतिग्रहंचै वब्राह्मणानामकल्पयत् ॥ अधीयीरंस्त्रयोवर्णाःस्वकर्मस्थाद्विजा तयः ॥ प्रब्रूयाद्ब्राह्मणस्त्वेषांनेतरावितिनिश्चितम् ॥ सर्वेषांब्राह्म णोविद्याद्वृत्युपायान्यथाविधि ॥ प्रब्रूयादितरेभ्यश्चस्वयंचैवतथा भवेत् ॥ वैशेष्यात्प्रकृतिश्रैष्ठ्यान्नियमस्यचधारणात् ॥ संस्कार स्यविशेषाच्चवर्णानांब्राह्मणःप्रभुरित्यादिनाप्रकटीकृतम् ॥ सा क्षात्काश्यपिवन्हिवत्क्रजननादात्मास्यतोविप्रवत् ॥ षट्कर्मस्वपि तस्यहेमकृतिनांकर्मत्रयेयोग्यता॥अस्त्येवश्रुतितः स्मृतेरनुभवात्सा क्ष्यादिसत्वादितिश्रीकाशीपुरसूरिसाक्षसहितंपत्रंकृतंप्रत्नवत्॥१॥ पौराणाद्वचनान्महाजनमतच्छ्रीशंकराचार्याज्ञया ॥ प्राक्पत्राद नुभूतितोऽखिलजनख्यातेःश्रुतेःपाठतः ॥ यागाद्याचरणंहिरण्यकृ तिनामस्तिद्विजानामितिश्रीकाशीपुरसूरिसाक्षसंहितंपत्रंकृतंप्रत्नव त् ॥ २ ॥

( उक्तार्थे पंडितानां संमतानि.

१ संमतोयमर्थः गोस्वामिरामजीवनस्य.
१ संमतोऽयमर्थः गुसाई आनंदघन शर्मणः
१ श्रीकाशिनाथशर्मणः संमतोयमर्थः
१ संमतोऽयमर्थोऽनंतभट्टस्य.
१ शेषहरिरामपंतानांसंमतोऽयंपत्रार्थः
१ संमतोऽयमर्थोयज्ञेश्वरशास्त्रिणः
१ संमतोऽयमर्थोनंतशास्त्रिणः
१ संमतोयमर्थोव्यंकटरामशास्त्रिणः
१ संमतोऽयमर्थोरामब्रह्मशास्त्रिणः
१ संमतोऽयमर्थोरांजणकरोपनामक भैरवभट्टस्य.
१ सम्मतोऽयमर्थःजयकृष्णशास्त्रिणः
१ सम्मतो यमर्थःपौराणिक रघुनाथ भट्टस्य.
१ सम्मतोयमर्थः भास्करनरसिंहशास्त्रिणः
१ सम्मतोयमर्थः पौराणिकराजेश्वर भट्टस्य.
१ सम्मतोऽयमर्थः कोंडूश्रोत्रिणः
१ सम्मतोऽयमर्थःव्यंकटशास्त्रिणः
१ सम्मतोऽयमर्थःमुकुंदशास्त्रिणः
१ सम्मतोऽयमर्थ; महादेवपंडितस्य.
१ सम्मतोऽयमर्थःभूमानंदस्वामिनः
१ सम्मतोऽयमर्थःसदाशिवशास्त्रिणः
१ संमतोयमर्थःसदाशिवस्य.

श्रीकोंकणप्रांतमुंबईवास्तव्यादितः । देवाग्निजातिहटकरतः । भारद्वाजगोत्रकृष्णाजीनाम्निप्रौढेऽधिकाशीवसतीहकालितेकलहे देशेपत्रेप्यत्रवचागतेदेशात् ॥ सिद्धार्थिशरादितेनश्रावणशुक्ल द्वितीयायाम् ॥विद्वत्संमति पत्रम्प्राग्वत्साक्ष्यसंयुतंरचितम् ॥ १ ॥ ईशास्यश्रुतिशंभुमूर्तिधरणीसंख्यांकवर्षेशके ॥ श्रीमद्विक्रमभूमि पस्यसकलश्रीकाशिविद्वद्वरैः ॥ यज्ञाद्याचरणंसुवर्णकृतिनामस्ति

द्विजानामितिस्कंदाग्नेयपुराणवाक्यवशतः पलंकृतंमत्नवत् ॥ १ ॥

**अर्थ**—वेदशास्त्र पुराणादि निष्णात जे काशीवासी यांनीं सर्व लोकांच्या उपयोगार्थ हा जातिनिर्णय केला आहे. मुख्यत्वें प्रजा दोन प्रकारच्या आहेत. पहिली विश्वकर्मानें निर्मिलेली आणि दुसरी कश्यपानें निर्मिलेली. आतां ' ब्राह्मणोस्य मुखमासीत् ' या श्रुतीवरून जर विराट् विश्वकर्माचे अवयव समजले जातात. तर " आकाशाद्वायुः " यावाक्यावरून म्हणजे आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि ही त्या विराट् विश्वकर्म्याची परंपरा संततीच समजावी. पहिली विश्वकर्मसंतति पांच प्रकारची. दुसरी कश्यप संतती चार प्रकारची त्यांत मुखापासून ब्राह्मण, वेद आणि यज्ञ उत्पन्न झाले. आणि क्षत्रिय, वैश्य, शूद्र, हे तीन अनुक्रमें बाहु, मांड्या आणि पाय यां पासून उत्पन्न झाले. आणि त्या सर्व वर्णांनीं उपजीविकेच्या वृत्तीविषयीं ब्रह्मदेवाची प्रार्थना केली असतां त्यानें दोघांच्याही संतती पैकीं ब्राह्मणांसच यजनयाजनादि षट्कर्मे आणि क्षत्रियादि वर्णास प्रजापालन कृषि वाणिज्य आणि सेवा अशा वृत्ति त्यांच्या उपजीविके करितां दिल्या. त्यां पैकीं पहिल्या वैश्वकर्मणी प्रजांनीं आपल्या षट्कर्मांपैकी कर्तव्य संबंधीं यजनादि तीन कर्तव्य कर्मे करित होत्साती उपजीविकेची वृत्तिसंबंधीं तीन कर्मे सोडून प्रजापालनादि वृत्तींचा त्यांनीं स्वीकार केला. काश्यपी प्रजेपैकीं ब्राह्मण यजनादि तीन कर्तव्य कर्मे करीत होत्साते उपजीविके करितां तींच दिलेलीं याजनादि तीन कर्मे करूं लागले. याच प्रमाणें क्षत्रिय वैश्यही यजनादि तीन कर्तव्य कर्मे करून उपजीविके करितां प्रजापालनादि वृत्तीं करूं लागले, आणि शूद्रास कर्तव्य आणि उपजीविका य दोहीं ही विषयीं सेवावृत्तीच दिली.

तदनंतर थोड्याच दिवसांनीं वैश्वकर्मणी प्रजा आणि काश्यपी प्रजा या परस्परांत कलह होऊं लागला, म्हणून पुनः ब्रह्मदेवानें अन्य वृत्तीची योजना करून वैश्वकर्मणी संततीनीं घेतलेलीं प्रजापालनादि वृत्ति सोडविली, अशी व्यवस्था केली. पुढें आणखी दोनही संततींत अंबष्टादिक अनुलोम प्रतिलोम वगैरे शेकडों संकर जाति झाल्या आहेत, असें जाणावें. आणि हा पूर्वोक्त भावार्थ स्कंदपुराण अग्निपुराण इत्यादि पुराणांत व मनुस्मृति याज्ञवल्क्य स्मृति इत्यादि शास्त्रांत आणि वेदांमध्येंही प्रसिद्ध आहे तो प्रकार असा—

स्कंदपुराणामध्यें स्कंदमैत्रेय संवादोक्ती वरून वर्णन केलें आहे तें असें कीं, प्रथम मैत्रेय ऋषींनीं ब्रह्म, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, इत्यादि सर्व पांचालांची आणि इतर सर्व जीव जंतूंची उत्पत्ति कशी आहे ? असा प्रश्न केला असतां कार्तिकस्वामी सांगते झाले.—पूर्व कल्पी एकार्णवामध्यें जलशायी नारायणाच्या कर्णमूलापासून झालेल्या मधु आणि कैटभ नांवांच्या दोन दैत्यांचा विष्णूनीं वध केल्यामुळें त्यांच्या केवळ मेदोमांसाची भूमि होती झाली. पुढें विष्णूच्या ( विराट् पुरुषाच्या ) इच्छेनें सानगादि ऋषि उत्पन्न झाले. या प्रमाणें विश्वकर्माची प्रथम सृष्टि झाली म्हणून सांगितले आहे. " नंतर ब्रह्मदेवापासून नारदादिक उत्पन्न झाले. "

१ ही श्रुति अरण प-७।१यांत आहे २ यजन, अध्ययन, दान ३ मधुकैटभौदुरात्मानावतिवीर्यपराक्रमौ ॥ क्रोध०इतिमार्कंडेय पुराणे देविमाहात्येपिच ॥

पूर्वोक्त अस्पर्शनीय मांसमयीं पृथ्वीस पवित्र करण्याकारितां नारदादिकांनीं विश्वकर्मांची प्रार्थना केली कीं, हे विश्वकर्मन् तुम्हीं आजच आपल्या मुखांपासून ब्राह्मण उत्पन्न करा. या प्रमाणें मुखांपासून ब्राह्मण उत्पन्न होऊन ते सर्व भूमीवर आले, आणि विश्वकर्माच्या कृपेंकरून पृथ्वी पवित्र करण्याकरितां मोठें दुर्धर तपाचरण केलें. त्या तपाच्या सामर्थ्येंकरून ती पृथ्वी सुवर्णमयी व पवित्र करते झाले. अर्थात् त्यांची तपःक्रिया सफल झाली. नंतर त्या ब्राह्मणांस पाहून तो जगदीश्वर विश्वकर्मा आनंदाप्रत पावला, आणि ब्रह्मदेवा सहित तो आपल्या मुखोद्भूत ब्राह्मणांस नामाभिधान देता झाला कीं, ज्या पेक्षां सुवर्णमयी पृथ्वी केली त्यापेक्षां तुम्हीं स्वर्णकार या नांवानें प्रसिद्ध व्हाल पुनःवर दिला कीं, तुम्हीं वेदांचे मुख्य अधिकारी असून या पृथ्वीचें राज्यही तुम्हींच करावें. याप्रमाणें त्यानां वरदान दिल्याचें वर्णन केले आहे. त्यानंतर ते विश्वकर्म मुखोद्भूत सर्व ब्राह्मण भूमंडळींचे राज्याधिकारी होत्साते तपोयज्ञादि कर्मेंही करते झाले. याप्रमाणें त्यानां यजनयाजनादि षट्कर्माधिकार, व प्रजापालनादि अधिकार असल्याचें वर्णिलेलें आहे.

पुढें कित्येक दिवसांनीं कश्यपऋषि ती पवित्र सुवर्णमयी भूमि पाहून आश्रम[1] सुरू करण्याच्या हेतूनें आपल्या स्त्रियेसहवर्तमान पुष्कर नामक महाक्षेत्राचेठायीं आश्रम करून राहता झाला. परंतु वेदि करण्याकारितां मृत्तिका कोठें दिसेना, ( या प्रकारें मृत्तिकेची अप्राप्ति वर्णिली आहे. ) तेव्हां सत्य लोकास जाऊन मृत्तिकेच्या प्राप्तीविषयीं ब्रह्मदेवास नमस्कार करून विनंति केली. ( या प्रकारें मृत्तिकेची प्राप्ति वर्णिलेली आहे. ) " मग ब्रह्मदेवानें सांगितल्याप्रमाणें " गंगा आणि यमुना या दोन नद्यांचे मध्यप्रदेशामधील मृत्तिकेची वेदि करून होमादिक करूं लागला. ( या प्रकारें पृथ्वी मृन्मयी झाल्याचें वर्णन केलें आहे. ) त्यानंतर ते विश्वकर्म मुखोद्भूत ब्राम्हण स्वर्णरहित मृन्मयी पृथ्वी झालेली पाहून चिंताक्रांत झाले. ( या प्रमाणें उभयपक्षांमध्यें कलह उत्पन्न झाल्याचें वर्णन केलें आहे. नंतर पुढें कश्यपाच्याही मुख, बाहू, मांड्या, पाय या स्थानांपासून अनुक्रमें ब्राम्हण, क्षत्रिय वैश्य, शूद्र, असे चार वर्ण उत्पन्न झाले. ( इत्यादि प्रकारें कश्यपसृष्टीचे वर्णन केलें आहे. )

मृन्मय पृथ्वी झालेली ऐकून विश्वकर्मा क्रोधायमान होऊन भूतलाचे ठायीं आला. तेव्हां देवऋष्यादि मंडळीमध्यें मोठा हा हा कार झाला. मग ब्रम्हा विष्णु, महेश, आदिकरून समस्त देवऋष्यादि 'कश्यपापुढें उभें करून, विश्वकर्माची वेदोक्तीनें स्तुति केली. ही स्तुति " विश्वकर्मामनसा० " इत्यादि विश्वकर्मसूक्तांत वर्णिली आहे. तदनंतर ब्रह्मादिक देवमुनि विश्वकर्मसंततीय ब्राह्मणांस वर देते झाले कीं तुमचे वास्तव्य

१ मनुःपूर्वमुखोभूतोमयोयाम्यमुखोद्भवः ॥ पश्चिमास्ये भवत्त्वष्टातक्षाचोत्तरतःस्मृतः॥ उर्ध्वायां॥ शील्पिसंभूतिःपंचगर्भमुनीश्वराः॥ इतिस्कांदे नागरखंडे अ०७।२८ ) तसेंच आणखी' सुपर्णःसानगश्चैव सनातन इति. स्मृतः॥ गुरु श्रेष्ठोऽहभूनश्चप्रत्नो धात्रीसुरक्षकः॥ विश्वकर्ममुखोद्भूताब्राह्मणाःपंचकीर्तिताः ॥ इतिवासिष्टपुराणे तृतीयकांडे अध्याय ६ एवं ब्रह्मांडेपि, २ सांप्रत पाहिलें असतां सर्वांस माहित आहेकीं, सुवर्णरत्नादि खाणी पृथ्वीतच असतात. ३ आग्निहोत्र. ४ हेंविश्वकर्मसूक्त, ऋग्वेदअ-८ अ-३ व.१६व-१८ यांत आहे आणि यजु अ. ४ प,५ अ.२ यांसही आहे,

या भूमंडळाचेठायीं अखंड परंपरा असो. व तुम्ही सर्व ब्राम्हणवर्णामध्यें अध्यक्ष आहांत. इत्यादि प्रकारें त्यांना ( विश्वकर्मवंशस्थांनां ) भूमंडळीं वास्तव्य व षट्कर्मोपभोग आणि वृत्तीकरितां कडीं, मुकुट, कुंडलें वगैरे सुवर्ण रत्नादि अलंकार कौशल्य उत्तम निर्माण करोत असें सांगितलें. आणि कृतयुगांत सहा कर्में करवतील, त्रेतायुगांत पांच कर्में करवतील, द्वापारांत चार आणि कलियुगांत द्रव्याच्या वगैरे लोभामुळें त्यांच्यानें तीन कर्में करवतील. परंतु करण्याविषयीं निष्ठा ठेवितील तर त्यांना मुळींच सर्व साहा ही कर्मांचा अधिकार आहेच. यांत अगदीं संशय नाहीं.

इत्यादि प्रकारें विश्वकर्म मुखोद्भूत ब्राम्हणांस षट्कर्मांचा अधिकार विशेषेंकरून सांगितला आहे. आतां अग्निपुराणामध्यें ही हाच भावार्थ आहे. मात्र अन्य कथेनें प्रतिपादन केला आहे तो असा कीं, (अग्निपुराण—पूर्वीं एके काळीं समुद्राचा पुत्र महा बलवान् शंखासुरनामक दैत्य उत्पन्न झाला. याप्रमाणें शंखासुराची उत्पत्ति सांगून पुढें) तो दुष्ट महागर्विष्ठ शंखासुर आपल्या स्वकीय बळानें ब्रम्हादिक देवऋषि वगैरे संपूर्ण लोकपालासहित त्रैलोक्यास जिंकिता झाला. याप्रकारें देवांदिकांस जिंकून त्यांच्यांपासून वेद आणि सुवर्ण हरण करून समुद्रोदकामध्यें गेला. याप्रकारें त्यानें वेदादिक हरण केल्याचें वर्णन आहे. मग तो दैत्य समुद्रामध्यें राहून सर्व जगास पीडा करूं लागला. त्याचा मी वध करितों, म्हणून विष्णूनीं अग्नीचें सहाय्य घेऊन शंखासुराचा वध केला, आणि हेंच कार्य साधण्याकरितां अग्नीनें आपल्या सात जिव्हांपैकीं पांच जिव्हांपासून दिव्य तेजस्वी पूर्व संस्कृत पांच ब्राम्हण उत्पन्न केलेले जे त्यांना वेद आणि सुवर्णादि धातु व राज्यसंपत्ति वगैरे देऊन त्यांचे वांछित मनोरथ पूर्ण केले. यानंतर ते पांच ब्राम्हण वेदवेदांगामध्यें मोठे प्रवीण होते झाले. याप्रकारें त्यानां वेदाध्ययनादि यजन याजनानुष्ठानाद्यधिकार आहे म्हणून वर्णन केलें आहे.

याप्रमाणें सूतसंहितेमध्येंही आहे कीं, हिरण्य आहे गर्भी ज्याच्या तो ब्रम्हा भगवान् समस्त जगतीचा पति विराट्रूप नारायणाच्या परम विस्तीर्ण मूर्तीस अभिलक्षून त्या कमलाचे ठायीं प्रगट होता झाला. आणि त्याच्या मुखांतून महादेवाच्या आज्ञेनें स्वेच्छावर्ती वेदविदांमध्यें श्रेष्ठ महातपोनिष्ठ असे ब्राम्हण स्वस्त्रियांसहवर्तमान उत्पन्न झाले. याप्रकारें त्यांची उत्पत्ति सांगितली आहे.

याचप्रमाणें मिताक्षरेमध्येंही सांगितलें आहे कीं, ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चहूंपैकीं पहिल्या तीन वर्णांसही द्विज अशी संज्ञा असल्यावरून त्या तिघांना गर्भाधानादि अंत्य संस्कारांत वेदमंत्रांनीं कर्म करण्याचा अधिकार आहे, याप्रकारें प्रतिपादन केलें आहे. तसेंच आणखी मनुस्मृतीमध्येंही सांगितलें आहे कीं,

१ षट्कर्मे विश्वब्रम्हवंशस्थामध्ये चालूच आहेत, २ विश्वकर्ममुखोद्भवाचाचअवतार म्हणून पूर्वीचे ज्यांचें संस्कारत्व आहे ३ यावैश्वकर्मणावतारमूलपांच ब्राम्हणानी शंखासुराचा शंख कोरला, मग विष्णूनी त्यांत शिरून त्या शंखासुरास बाहेर काढून त्याचा वध केला नंतर त्या पांचजन ब्राम्हणानी उरलेला रिक्त शंख सुवर्णाने वगैरे भूषित केल्यावरून तो विष्णूनीं हस्ताचे ठायी धारण केला म्हणून विष्णूच्या शंखास पांचजन्य म्हणतात मग त्या अग्निजिव्हाद्वारें अवतीर्ण झालेल्या वैश्वकर्मणपांच ब्राम्हणास विष्णू आणि अग्नि संतुष्ट होऊन वर देते झालेकीं, या दैत्यापासून सोडविलेले वेद आणि सुवर्ण धातुकर्म तुमच्यात परंपरा राहो.

मुख, बाहू, मांड्या आणि पाय या स्थानांपासून झालेल्या ब्राम्हणादि वर्णांचीं कर्में पृथक् पृथक् सांगितलीं आहेत. पैकीं ब्राम्हणांस अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान, प्रतिग्रह, या षट्कर्मांचा अधिकार आहे. तिहीं वर्णांनीं वेदाचें अध्ययन करावें. परंतु दुसऱ्यांस वेद शिकविण्याचा अथवा उपदेश करण्याचा अधिकार ब्राम्हणांसच आहे. क्षत्रिय वैश्यांस नाहीं, हें निश्चित आहे. सर्वांच्या उपजीविकादि वृत्त्युपदेशास कारण ब्राम्हणच आहेत. म्हणून इतर वर्णांहून ब्राम्हणांस मुख्यत्व असून स्वतंत्रता आहे. तात्पर्य कीं विशिष्टत्वेंकरून, स्वभावाच्या श्रेष्ठत्वेंकरून, कर्मधर्मादि नियमांच्या विशेष धारणे करून, संस्कारांच्या अधिकत्वेंकरून इत्यादि सर्वोत्कृष्टत्वेंकरून सर्व वर्णांस ब्राम्हण गुरु आहे. या प्रकारें त्यांची प्रसिद्धि असल्याचें वर्णिलें आहे.

एवंच प्रत्यक्ष विश्वकर्मा आणि अग्नियांच्या मुखांपासून ज्यांचा जन्म झाला आहे, ते ब्राम्हण म्हणजे विश्वब्रम्हवंशस्थ स्वर्णकार यांना षट्कर्मांचा अधिकार आहे. उपजीविकार्थ सुवर्णादि व्यवहारामुळें त्यांच्यानें बहुधा तीन कर्में करवतात. याविषयीं श्रुतिस्मृतींच्या प्रत्यक्ष अनुभवावरून आणि श्रुत्यनुसार त्यांचें प्रत्यक्ष कर्माचरण दिसून आल्यावरून श्रीक्षेत्र काशीपुरस्थ पंडितांच्या साक्षीसहित हें संमतिपत्र पुरातनप्रमाणें केलें आहे.

पुराणोक्त वचनांवरून, शिष्ट लोकांच्या संमतीवरून, श्रीमच्छंकराचार्यांच्या आज्ञेवरून, प्राचीन पत्रें दृष्टोत्पत्तीस आल्यावरून आणि सर्व लोकप्रसिद्धीवरून विश्वब्रम्हवंशस्थ सुवर्णकारांस वेदमंत्र पठणेंकरून यज्ञयागादि कर्माचरण करण्याचा अधिकार आहे. याविषयीं श्रीक्षेत्र काशीपुरस्थ पंडित लोकांच्या साक्षीसहित हें संमतिपत्र पुरातन प्रमाणें केलें आहे.

येथें (वर लिहिलेल्या संमतिपत्रांतील निर्णयार्थ आम्हांस मान्य आहे, असें प्रत्येकीं क्षेत्रकाशींतील स्वामी, शास्त्री, पंडित, वैदिक, पुराणिक, धर्माधिकारी इत्यादि शिष्ट लोकांच्या सह्यांची नांवनिशी आहे ती मागें आलीच आहे. )

कोंकण प्रांतांतील मुंबईमध्यें राहणार देवाग्नि हटकर ( स्वर्णकार ) यांचे कडून काशीमध्यें मुख्यत्वें राहणार प्रसिद्ध भारद्वाज गोत्रीय कृष्णाजी नामक प्रवृद्ध ( प्रतिष्ठित गृहस्थाच्या येथें वैदिक कर्मनिर्णयाबद्दल उभयपक्षांमध्यें पडलेल्या तंट्याच्या मजकुराचें पत्र देशाहून या देशांत आलें असतां त्यांनीं विद्वज्जनांच्या संमतीनें त्यांच्या साक्षीसहित प्राचीन प्रमाणें हें पत्र श्रावण शुक्ल २ विक्रम संवत् १८४५ सिद्धार्थी नामसंवत्सरे ह्मणजे शालिवाहन शके १७१० सालीं श्रीक्षेत्र काशींतील समस्त विद्वज्जनोत्तमांनीं विश्वकर्मवंशीय स्वर्णकारेत्यादि द्विजांस यज्ञादि कर्मांचा अधिकार आहे, अशाविषयीं स्कंदपुराण आणि अग्निपुराण यांतील प्रमाणावरून पुरातन प्रमाणें हें पत्र केलें आहे.

---

या पत्रावरून स्पष्ट समजेल कीं, विश्वकर्मसंततीय स्वर्णकार हे ब्राह्मणोत्तम आहेत. असें असून पंचाल ब्राह्मणांच्या व्यवहारामाणें संकर रथकार जातीआदिकांचा-

ही व्यवहार असल्यामुळें पंचाल ब्राह्मण हे संकररथकार आहेत असें स्थापन करण्याविषयीं स्वमताभिमानी नाना ऋषिवंशीयवगैरे असूयु लोकांस मोठी सवड सांपडल्यासारखें वाटत आहे. परंतु पंचाल ब्राह्मणांच्या प्रत्यक्ष षट्कर्मोपभोगादि निर्मल आचरणावरून व श्रुतिस्मृत्युक्त अनेक वाक्यांवरून आणि तदनुरूप शिष्ट जनांच्या संमतीवरून सुज्ञलोक असें समजतील कीं, विश्वकर्मवंशस्थ स्वर्णकारादिक हे, संकररथकारेत्यादि इतर स्वर्णकारांहून, भिन्न आहेत. त्यांचा इतर स्व कारेत्यादि शीं त्यादि हरएक प्रकारें कांहींच संबंध नाहीं. याविषयीं पुढील पत्र पहा.—

पत्र ७ वें.

अथस्वर्णकाराणांवैदिककर्मार्हत्वेविवेचनीयेतत्रापस्तंबशाखांतर्गतानेक श्रुतिस्मृतिविद्यारण्यचरणभाष्यकात्यायनसूत्रतद्भाष्यहिरण्यकेशीसूत्रतद्भाष्यधूर्तभाष्यबौधायनसूत्रतद्भाष्य आश्वलायनसूत्रानुक्रमणिका षड्गुरु भाष्य जैमिनीसूत्रमीमांसाशास्त्रकर्कभाष्यदेवयाज्ञिक श्रीअनंतवैजयंतीसंस्कारसार स्मृतिदर्पण विज्ञानेश्वर नृसिंहप्रसाद गोविंदार्णवशिल्पिसूत्र शैवपुराण लिंगानुशासन वराहपुराण काशीखंड रामायण महाभारत श्रीमद्भागवत आदित्यपुराण ब्रह्मवैवर्त स्कंदपुराण नागरखंड विष्णुपुराण कालिकापुराण भाट्टदीपिका व्याख्यान पार्थसारथिमिश्र तंत्ररत्नरुद्रदत्तरामांडरूयाज्ञवल्क्यस्मृतीतिहासपुराणादिपर्यालोचनयारथकारग्रंथतात्पर्यनिर्णयः ॥ तथाहि । विश्वरूपोवैत्वाष्ट्रइति श्रुतिः । त्रिशिरःस्मृतिः । त्वष्टुःपुत्रःपुरोहितोदेवानामासीत् । इतितस्यार्थः । अथचत्वष्टुत्वष्टासोमंपिबेतिसोमपानविधायकवाक्यमपि त्वष्टाहतपुत्रइतियज्ञाधिकारविधायकवाक्यंच ॥ त्वष्टुर्देवरथकारकत्वंच अनवस्तेरथमिति श्रुत्यालभ्यते । एतेषांरथकाराणांतद्वंशजत्वंभारतादिषुश्रूयते । तथाचादिपर्वद्विषष्ठितमाध्याये । बृहस्पतेस्तु भगिनीवरस्त्रीब्रह्मवादिनी ॥ योगसक्ता जगत्कृत्स्नमसक्ताविचचारह ॥ तस्याश्चकारमांगल्यंतत्पिताचप्रभावसोः ॥ प्रभावसोस्तु भार्यायांवसूनामष्टमस्यहि ॥ विश्वकर्मामहाभागोजज्ञेशिल्पप्रजापतिः ॥ यः सर्वेषांविमानानिदैवतानांचकारह ॥ मनुष्याश्चोपजीवंति यस्यशिल्पमहत्वतः॥ पूजयंतिचयान्नित्यंविश्वकर्माणमव्ययमिति ॥ अतएवविज्ञानेश्वराद्युक्तानुलोमजादयोभिन्नाइतिस्पष्टम् ॥ अथच रथकारशब्दस्यतुपंकजादिवद्योगरूढः॥ वर्षासुरथकारोऽग्नीनादधीतेत्यादिवाक्यबलाच्चप्रामाण्यात् ॥ एतेषांवेदविहितकर्मानुष्ठानयोग्यताच ॥ अतएवविज्ञानेश्वरेणापिरथकारस्येज्योपनयनसंस्कारक्रियालयप्रतिष्ठारथवास्तुविद्याध्ययनवृत्तिताचोक्ता । तथावराहपुराणेऽपि । जातकर्मादिसंस्काराब्राह्मणानांयथाविधि॥ तथैव-

मनुनाप्रोक्ताः विश्वकर्तुर्विशेषतः।।वि श्वकर्मसुताह्येतेरथकाराःस्वरूपं- चच ।। वैदिकेनैवमार्गेणतद्वंशानांविशेषतः ।। दारुकारःस्वर्णका रःशिलाकारस्तथैवच।।अयस्कारस्ताम्रकारःपंचैतेरथकारकाः।।अ तएवशिल्पिशास्त्रे। आदौशौचविधिंकृत्वा इत्याद्यारभ्यकर्माण्यष्टा दशक्रमादित्यंतेनस्वाध्यायाध्ययनमप्युक्तम्। किंचस्कंदपुराणेना गरखंडेअष्टमाध्यायेविश्वकर्मवंशनिर्णयेवैदिकाधिकारत्वंचस्पष्टमे वोक्तम् ।विश्वकर्मतनूजस्यपत्नीतक्षस्यचाभवत ।। करुणानामवि ख्याताब्रह्मर्षेस्तनयाभृगोः।। विश्वकर्मतनूजस्यभार्याभूतस्यशिल्पि नः।। एतेषांवैदिकं कर्मभविष्यतिनसंशयइति ।। तथाचस्कंदपुरा णे। मनुःपूर्वमुखोद्भूतोमयोयाम्यमुखोद्भवः।।पश्चिमास्ये भवस्त्वष्टात क्षकश्चोत्तरास्यतः।।ऊर्ध्वेशिल्पीसमुद्भूतः पंचगर्भमुनीश्वराइत्यादि ना। उत्पत्तिमुक्त्वा । अग्रेवेदाधिकारश्चोक्तः। चौलोपनयनंचैववे दाध्ययनपूर्वकम् ।। एतेचविश्वकर्मापिब्रह्मकर्मयथाक्रममित्यादि नापितदेवोक्तं ।। स्कांदेस्कंदमैत्रेयसंवादेमेदोरूपत्वादस्पृश्यामेदि नी । नारदेन प्रार्थितः।।विश्वकर्मस्त्वमद्यैवब्राह्मणान्मुखतःसृजेत्या दिनाब्राह्मणसृष्टिमुक्त्वा। भूमावागत्यतेसर्वेविश्वकर्मप्रसादतः।।पवि त्रांमेदिनींकिंतुचक्रुस्तेदुष्करंतपः।।तपःसामर्थ्यतःसर्वेस्वर्णाकारांचमे दिनींपवित्रांकृतवंतोहिब्राह्मणाःसफलक्रियाः।। तान्दृष्ट्वाथमुदंमा प्यविश्वकर्माजगत्प्रभुः।। ब्राह्मणासह तेषांसनामधेयंददौतदा।यतः स्वर्णकृताभूमिः स्वर्णकाराभविष्यथ ।।पुनर्ददौवरंतेषांराज्यंवेदा दिकंतथा । इत्यादिनोक्तं । तत्रैवाग्रिमग्रंथे । युष्मात्स्थितिर्मंडले स्याद्भवतोब्रह्मवल्लभाः।। इत्यादिनाभूमंडलनिवासंवृत्त्यर्थंकटककुं डलादिनिर्माणकौशल्यलाभंचोक्त्वा । कृतेचभवतासर्वंब्राह्मण्यंपा ल्यते । धातुलोभतः करणेयदिनिष्ठाचेत्सर्वत्रास्तिनसंशयः।इत्या दिनाचोक्तं। अग्रेपि। तस्यवेदविदांश्रेष्ठाःब्राह्मणाःपरमेष्ठिनः। महा देवाज्ञयापूर्ववासनासहितामुखात्।।ब्राह्मणाब्राह्मणस्त्रीभिःसहजा तास्तपोधनाः।। इत्यादिनातदुत्पत्त्यादिकमपिप्रपंचितम् ।मिताक्ष रायामपि । निषेकादिश्मशानांतातेषांवैमंत्रतःक्रिया ।। तथाचा ग्निपुराणेभृगुवचनं । निर्गताभ्यस्तुज्वालाभ्योमिथुनंसमपद्यते त्यादिना ।। अग्नेः सकाशादुत्पत्तिमुक्त्वा ।। अग्रे ।। निषेकादि श्मशानांताःपूर्तेष्टाः सकला अपि ।। भक्तिमद्भिःप्रकर्तव्याःश्रुत्यु क्तेनैवमार्गतइति ।।इत्यादिभिर्वचनैर्विश्वकर्मणादेवाशिल्पित्वानि र्ण यस्यावगमात् । रथकाराणांतद्वंशजत्वस्यभारतादिवत्स्कंदपु- राण वचनपर्यालोचनयानिर्णयतयास्वर्णकारस्यरथकारोत्तमत्व स्यापिप्रतिपादितत्वेन । नंदांतंक्षत्रियकुलमित्यादिनाक्षत्रवंश स्येवस्वर्णकारवंशस्योच्छेदादर्शनांध्रकर्नाटकद्रविडदेशादिषुविम-

लाचारव्यवहारैः । वेदोक्तषोडशकर्मोपभोगस्यप्रसिद्धत्वेन-सर्वप्रकारैः स्वर्णकाराणांवैदिककर्माईत्वमस्तीतिसिद्धांतोऽवगम्यते ॥ ॥

कोंकण मुंबई ग्रामस्थ यांनीं येऊन पंडितापाशीं निवेदन केलें त्याजवरून त्यांचा आचार व्यवहार षोडशकर्मांच्या भोगवट्याच्या शोधावरून हे तद्वंशीय असें जाणून यास हें पत्र करून दिलें असे.

याप्रमाणें आंध्रादि सर्वत्र देशांत दुसऱ्याचें उदक न घेतां वेदोक्तरीतीनें सोळा संस्कार आजपर्यंत चालत आहेत, तसेंच कर्नाटक देशांत, त्याप्रमाणेंच द्राविड देशांत चालत आहेत; यास्तव स्वर्णकारांस लिहिल्याप्रमाणें श्रुतिकर्माधिकार आहे.

अथलिखितार्थे विदुषां सम्मतिः

१ अभिमतोयमर्थस्तरुवेंकटाचार्य शास्त्रिणः
१ शेषशास्त्रिणः संमतोयमर्थः
१ उक्तेर्थे गरुडाचार्य शास्त्रिणःसम्मतिः
१ अनंताचार्य शास्त्रिणः सम्मतिः।
१ बेहडेकरोपनामक सदाशिव भट्टस्य सम्मतिः
१ नारायणशास्त्रिणः संमतिः
१ बाळंभट्ट पुराणिकस्यसंमतं रायरीकर.
१ सम्मतोयमर्थो व्यंकटशास्त्रिणः
१ सम्मतोयमर्थोव्यंकटनारायण शास्त्रिणः
१ चिंतामणभट्टदामले सम्मतिः

**अर्थ**— यानंतर स्वर्णकारांस वैदिक कर्म करण्याच्या अधिकाराविषयीं विचारणाकर्तव्य असतां, त्याविषयीं आपस्तंब शाखेंतील अनेक श्रुति व स्मृति व त्यांजवर असलेलें विद्यारण्याचें भाष्य आणि कात्यायनी सूत्र व त्याचें भाष्य, हिरण्यकेशीसूत्र व त्याचें भाष्य, आणि धूर्तभाष्य बौधायन सूत्र व त्याचें भाष्य, आश्वलायनसूत्राची अनुक्रमणिका, पद्गुरुभाष्य, जैमिनीसूत्र व मीमांसाशास्त्र, कर्कभाष्य, देवयाज्ञिक, श्री अनंत, वैजयंती, संस्कारसार, स्मृतिदर्पण, विज्ञानेश्वर, नृसिंहप्रसाद, गोविंदार्णव, शिल्पसूत्र, ( शिल्पशास्त्र ) शैवपुराण, लिंगानुशासन, वराहपुराण, काशीखंड, रामायण, महाभारत, श्रीमद्भागवत, आदित्यपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण, स्कंदपुराण, आणि त्यांतील नागरखंड, विष्णुपुराण, कालिकापुराण, भाट्टदीपिकाव्याख्यान, पार्थसारथिमिश्र, तंत्ररत्न, रुद्रदत्त आणि रामांडरु, व याज्ञवल्क्यस्मृति, व इतिहासपुराणें इत्यादि ग्रंथांच्या एकंदरींत अवलोकनावरून आणि रथकार ग्रंथांच्या तात्पर्यार्थावरून निर्णय झाला आहे तो असा कीं, “ विश्वरूपोवैत्वाष्ट्रः० ” ही श्रुति आणि त्रिशिरस्मृति—“ त्वष्टुः पुत्रः पुरोहितोदेवानामासीत् ” म्हणजे, त्वष्ट्याचा पुत्र हा देवांचा पुरोहित होय. असा या श्रुतीचा अर्थ आहे. आतां त्या त्वष्ट्यास “ त्वष्टासोमंपिब० ” हें श्रुतिवाक्य सो-

मपान विधायक आणि " त्वष्टाहतपुत्रो० " हें श्रुतिवाक्य यज्ञाधिकार विधायक असून आणखी त्या त्वष्टापुरोहितांस देवरथकारकत्व ( शिल्पकर्तृत्व ) " अनवस्तेरथ " ० या श्रुतीवरून प्राप्त होतें. त्या त्वष्ट्याचे वंशांतील हे ब्रह्मरथकार आहेत, असें भारतादिक ग्रंथावरून स्पष्ट समजतें. तो प्रकार भारतांतील आदिपर्वामध्यें ६२ व्या अध्यायांत त्या त्वष्ट्याचा ( विश्वकर्माचा. ) अवतार असा वर्णिला आहे कीं, बृहस्पतीची बहीण वरस्त्री ही ब्रह्मज्ञानामध्यें आणि योगाभ्यासामध्यें प्रवीण होती. तिनें वैराग्य धारण करून सर्व पृथ्वी पर्यटन केलें. नंतर तिच्या पित्यानें प्रभावसु नामक आठवा वसू वर योजून तिचें लग्न केलें. त्या प्रभावसूपासून तिच्या पोटीं महान् ईश्वर शिल्पाधिपति विश्वकर्मा अवतीर्ण झाला. जो सर्व देवांचीं विमानें करणारा, ज्याच्या मुखापासून झालेल्या शिल्पिजनांच्या ( ब्रह्मपांचालाच्या ) वैभवें—करून सर्व मानवांची उपजीविका होत आहे तो अविनाश विश्वकर्मा देवादिकांस पूज्य आहे. ह्मणूनच या विश्वकर्म वंशज ब्रह्मरथकारांहून विज्ञानेश्वरादिकांनीं सांगितलेले अनुलोमादिक संकर रथकार भिन्न ( अगदीं निराळे ) आहेत असें स्पष्ट दिसत आहे, आणि रथकार हा शब्दही पंकज, औपगव इत्यादि शब्दांसारखा योगरूढ आहे. रथकारांनीं वर्षाकालीं अग्नीचें आधान करावें. अशा वचनप्रमाणांवरून त्यांना वेदोक्त कर्में करून अनुष्ठान करण्याचा अधिकार आहे; ह्मणून विज्ञानेश्वरानेंही रथकारांस उपनयनादि सर्व संस्कार क्रिया, आलयप्रतिष्ठा, रथवास्तुविद्या, अशी वृत्ति सांगितली आहे. तसेंच वराह पुराणामध्येंही ह्मटलें आहे कीं, जातकर्मादि सर्व षोडश संस्कार जसे ब्राह्मणांस सांगितले आहेत, तसेंच मनूनें विश्वकर्म संततीस विशेषेंकरून सांगितले आहेत. विश्वकर्माचे पुत्र जे पंच ब्रह्म रथकार त्यांच्याच वंशास वेदोक्त कर्ममार्ग विशेषेंकरून सांगितला आहे. ते पांच कोणतें? तर दारुकार ( मय ) स्वर्णकार ( विश्वज्ञ ) शिलाकार ( शिल्पी ) लोहकार ( मनु ) ताम्रकार ( त्वष्टा ) असे पांच आहेत. याचप्रमाणें शिल्पशास्त्रामध्येंही या विश्वकर्म वंशज ब्रह्म पांचालांस प्रथमतः शौचविधीपासून अध्ययनाध्यापनादिपर्यंत अष्टादश कर्में सांगितलीं आहेत. स्कंदपुराणांतील नागरखंडामध्यें आठवे अध्यायांत विश्वकर्म संतती यांस वेदाचा अधिकार आहे, असें स्पष्ट सांगितलें आहे. तें असें—जैमिनी ऋषीची कन्या चंद्रिका ही विश्वकर्म्याचा पुत्र जो तक्षा त्याची स्त्री होती झाली. आणि करुणा या नांवानें प्रसिद्ध जी भृगु नामक ब्रह्म ऋषीची कन्या ही शिल्पि नामक विश्वकर्म्याच्या पुत्राची भार्या होती झाली. अर्थात् या विश्वकर्म संततीस वैदिककर्म निश्चयेंकरून आहे, यांत संशय नाहीं. तसेंच आणखी त्या स्कंदपुराणा-

---

१ पांचालानांचसर्वेषामाचारइतिगीयत इत्यारभ्य आदौशौचविधिंकृत्वाद्वितीयंदंतधावनं ॥ स्नानंकृत्यंतृतीयं स्यादाजिनंचचतुर्थकम् ॥१॥ पवित्रधारणंचैवपंचांमपात्रसंक्रांतिः ॥ पवमानविधिः शिल्पित्संध्यावंदनषष्ठमं ॥ २ ॥ सप्तमंतर्पणंकुर्यादष्टमंजपउच्यते ॥ नवमंसर्वाचार्यकृत्यमादित्यहृदयंपेठत् ॥ ३ ॥ एकादशंतथाविप्रयोगः स्वाध्यायवर्धनम् ॥ द्वादशंतुमहाशांतिवृक्षराजप्रदक्षिणम् ॥ ४ ॥ अष्टत्रिंशत्करन्यासैर्मुद्राकर्म त्रयोदशम् ॥ शालिग्रामार्चनं शिल्पीकुर्याच्चैवचतुर्दशं ॥५॥ वैश्वदेवंपंचदशंहवनंषोडशंभवेत् ॥ आपःशुद्धिः सप्तदशं भोजनाष्टादशंभवेत ॥६॥ इमानिशिल्पिनांनित्यकर्माण्यष्टादशक्रमात् ॥ इतिशिल्पशास्त्रेपांचालधर्मे ॥

मध्यें विश्वकर्माच्या पूर्वमुखापासून मनु, दक्षिण मुखापासून मय, पश्चिम मुखापासून त्वष्टा, उत्तर मुखापासून तक्षा, ऊर्ध्व मुखापासून शिल्पी, असे हे पांच गर्भींच असतां मुनीश्वर झाले. इत्यादिप्रकारें उत्पत्ति सांगून पुढें आणखी वेदाधिकारही सांगितला आहे कीं, चौलोपनयनादि सर्व संस्कार या विश्वकर्मसंततीस वेदमंत्रपठणेंकरून करण्याचा अधिकार आहे. आणखीही याच स्कंदपुराणांत स्कंदमैत्रेय संवादेंकरून वर्णिलें आहे कीं, पूर्वीं अस्पर्शनीय मांसमयी पृथ्वी असल्यामुळें नारदानें विश्वकर्माची प्रार्थना केली कीं, हे विश्वकर्मन्, तूं आजच मुखापासून ब्राह्मण उत्पन्न कर. याप्रमाणें ब्राह्मणांची उत्पत्ति सांगून पुढें ते सर्व ब्राह्मण भूतलावर येऊन विश्वकर्मकृपेनें पृथ्वी पवित्र करण्याकरितां मोठें कठिण तप करिते झाले. नंतर त्या तपाच्या सामर्थ्येंकरून त्या ब्राह्मणांनीं सर्व पृथ्वीसुवर्णमय व पवित्र केली. याप्रमाणें ज्यांची तपःक्रिया सफल झाली आहे त्या स्वमुखोद्भव ब्राह्मणांप्रत विश्वकर्मानें पाहून ब्रह्मदेवासहवर्तमान तो जगदीश्वर विश्वकर्मा आनंदयुक्त होत्साता त्या ब्राह्मणांस वर देता झाला कीं ज्यापेक्षां तुम्हीं सुवर्णमय पृथ्वी केली, त्यापेक्षां तुम्हीं सुवर्णकार या नावानें प्रसिद्ध व्हाल. राज्य संपत्ति आणि वेद तुम्हांस अखंड असोत, म्हणून पुनःआणखी वर दिला.याप्रमाणें वर्णन असून याच्याच पुढें या ग्रंथामध्यें आणखी लिहिलें आहे कीं, तुमचें वास्तव्य भूमंडळींच असो, व आपण सर्व ब्राह्मणांमध्यें अध्यक्ष आहांत. याप्रमाणें त्या ब्राह्मणांस भूमंडळाचेंठायीं वस्ती व उपजीविके करितां कडीं कुंडलादि अलंकार करण्याच्या कौशल्याची प्राप्ति सांगून आणखी सांगितलें कीं, कृतयुगामध्यें सर्व ब्राह्मण धर्म सांग उत्कृष्ट चालेल. पुढें दिवसानुदिवस सुवर्णादि धातूंच्या लोभेंकरून आचार कमी होत जाईल; परंतु निष्ठा ठेवून सर्व षट्कर्मरूप ब्राह्मण धर्म आचरतील तर सर्व कर्मांचा अधिकार आहे यांत संशय नाहीं. इत्यादि प्रकारें सांगून आणखी पुढेंही लिहिलें आहे कीं, त्या ब्रह्मपदाचें ठायीं राहणाऱ्या परमेष्ठीच्या मुखापासून पर शिवविश्वकर्माच्या आज्ञेनें वेदविदांमध्यें श्रेष्ठ महा तपस्वी ब्राम्हण, स्वकीयं स्त्रियांसहित अवतीर्ण झाले. याप्रकारें त्यांची उत्पत्ति वर्णिली आहे. मिताक्षरेमध्येंही आहे कीं, ब्राम्हणादिकांस जातकर्मादि अंत्येष्टीपर्यंत वेदमंत्रांनीं कर्म करण्याचा अधिकार आहे. तसेंच आणखी अग्निपुराणामध्यें भृगुऋषी सांगताहेत कीं अग्नीच्या जिभाळ्यांपासून एक दंपत्य (स्त्रीपुरुष) उत्पन्न झालें. याप्रमाणें अग्निमुखापासून झालेल्या स्वर्णकारांची उत्पत्ति सांगून त्यांनीं जातकर्मादि श्मशानापर्यंत सर्व संस्कार कर्मं व यज्ञादिकर्मेंही श्रद्धाठेवून वेदोक्त पद्धतीनें करावींत, असें सांगितलें आहे. तस्मात् या पूर्वोक्त सर्व वचनांवरून विश्वकर्म संततीस देवशिल्पित्व आहे, असा निर्णय समजून आल्यावरून त्या विश्वकर्माचे कुलांतील हे स्वर्णकार आहेत, असें भारतांतील आणि स्कंद पुराणांतील वचनावलोकनावरून स्पष्ट निर्णय होत आहे कीं, विश्वकर्म संततीय स्वर्णकारांना रथकारोत्तमत्व ( देवरथकर्तृत्व ) आहे, असें प्रतिपादन होत असून, जसा क्षत्रियांचा वंश नंदराजापर्यंतच राहणार, पुढें राहणार नाहीं. अशा क्षत्रियवंशाप्रमाणें या स्वर्णकार वंशाचा उच्छेद झाल्याविषयीं कोणत्याही देशांत अथवा ग्रंथांत दिसून येत नाहीं. इतकेंच नव्हे, तर आंध्र, कर्नाटक, द्रविड इत्यादि देशांत विश्वब्रह्म, ब्रह्मपांचाल, इत्यादि नांवांनीं प्रसिद्ध

असलेल्या विश्वकर्मसंततीय स्वर्णकारांमध्यें आचार, व्यवहार मोठे निर्मळ असून वेदोक्त मार्गानें षोडशसंस्कारवगैरे ब्रह्मकर्माचा उपभोग अद्यापपर्यंत चालू आहे, म्हणून विश्वकर्म संततीय स्वर्णकारांना सर्व प्रकारांही करून ब्रह्मकर्म करण्याचा अधिकार आहे, असा सिद्धांत होतो.

याच्याखालीं सदरहू निर्णयपत्रास संमती देणारे काशींतील पंडित लोकांची नांवनिशी आहे. ती मागें आली असून अर्थ उघड असल्यामुळें पुनः लिहिली नाहीं.

या सर्व संमतीपत्रांपेक्षांही पूर्वींचें सम्मति पत्र पहा.

---

पत्र. ८ वें.

शास्त्रार्थपत्रंलिख्यते । तद्यथा तलकोंकणादि दक्षिणदेशे सकल शिल्प शास्त्राद्यभिज्ञ सकल वेदपुराण प्रसिद्धेन लब्ध वरेणद्विजोत्तमेन ब्रह्मनिर्मितेन विश्वकर्मणा निर्मिता दैवज्ञसंज्ञकाः सुवर्णकाराः शिल्पिनः संतिबहवः । तेषामुपनयनादि सर्वेसंस्काराः सर्वाणिकर्माणिच जायंत इति प्रसिद्ध मेतत् ।तेषां श्राद्धेचरुपाय सादिना पिंडदानं भवति । तथाच भविष्ये । गृहपाकात्समुध्दृत्यच-रुणापायसेनवा ॥ पिंडदानंप्रकुर्वीतत्वाष्ट्रश्राद्धेकृतेसतीति । अत्र काश्यांकरवोपनामकः श्रीधरभट्टचवलकरोपनामक बाबूजोशीच दक्षिणदेशात्समागतौस्तस्तस्यचरुपायसादिनापिंडदानंभवति ॥ तत्रकाशीस्थपंडितैः सर्वैस्सकल शास्त्रधर्म शास्त्राद्यभिज्ञैरेवंशास्त्रार्थोनिर्णीतोयतः पूर्वोक्तभविष्यवचनाच्चरुपायसादिनापिंडप्रदानं धर्मतोनिर्णीतंमत्रसंदेहो नास्ति। लिखितमिदंधर्माधिकारीश्यामभट्टपंडितेन । भवतीति । विजयदशम्यां संवत् १७८१ शके १६४६ समस्त पंडितानुमतं पत्रं शंकर भट्टात्मज श्यामभट्टेन लिखितम्

अत्रसंमतानि

१ सम्मतोयमर्थःभट्टगोपीनाथस्य.
१ सम्मतोयमर्थः शेषकेशवसंख्यावसु.
१ सम्मतोयमर्थः केशवभट्टकाळे.
१ संमतोयमर्थः पायगुंडोपनामक गणेश भट्टस्य
१ पत्रार्थेसंमतंनगरकरयादवभट्टस्य.
१ पत्रार्थेसंमतंपन्नगगोविंद भट्टस्य.
१ संमतंअंबेकरभाइभट्टस्य.
१ पत्रार्थेसंमतंसुंदरभट्टरामफर.
१ पत्रार्थेसंमतंदुल्लसुंदरभट्टस्य.
१ पत्रार्थे संमतं पद्मनाथभट्टसुतसदा

१ पत्रार्थेसंम्मतंमौनीमहादेवभट्टस्य.
१ पत्रार्थेसंम्मतंदीक्षितोपनामजयराम भट्टस्य.
१ पत्रार्थेसंम्मतौविश्वनाथभट्टटिळकस्य
१ पत्रार्थेसंम्मतौमोडकशंकरभट्टस्य.
१ संमतंसदाशिवभट्टविद्वांस.
१ संमतंभारद्वाजवैजनाथभट्टस्य.
१ संमतंदातारकेशवभट्टस्य.
१ संमतंपौराणिकसदाशिवभट्टस्य.
१ संमतंगोविंदभट्टवझे.
१ पत्रार्थेसंम्मतंभास्करभट्टखरे.

शिव भट्ट उपाध्ये.
१ संमतोयमर्थः गोपीनाथ भट्टस्य 'गाडगीळ'
१ सम्मतोयमर्थःभारद्वाजनीलकंठस्य.
१ संमतो०जोगळेकरमहादेवभट्टस्य.
१ पत्रार्थेसंम्मतंदामोदरदेवस्य.
१ पत्रार्थेसंमतंशिवरामभट्टभावध्ये.

अर्थ—महाक्षेत्र काशीस्थ विद्वज्जनांकडून शास्त्रार्थ पत्र लिहिण्यांत येतें कीं, दक्षिण देशामध्यें सर्व शिल्पविद्याधीश्वर सकल वेदशास्त्र प्रसिद्ध सकल वरदायक द्विजाधीश्वर ब्रम्हनिर्मित अशा विश्वकर्म्यापासून झालेले दैवज्ञ नामक ब्रम्हजातीय स्वर्णकार सुवर्णादि शिल्पविद्यावृत्तीनें या पृथ्वीवर आहेत. त्यांना उपनयन वगैरे सर्व षोडश संस्कारांचा व षट्कर्म करण्याचा अधिकार असल्याचें प्रसिद्धच आहे. तसेंच त्यांच्या श्राद्धामध्यें चरुपायसान्नेंकरून पिंडप्रदान होत असतें.आणि भविष्योत्तर पुराणामध्येंही स्पष्ट आहे कीं, विश्वकर्म संततीय शिल्पीनीं श्राद्धाचे ठायीं गृहपाकांतून अथवा पृथक् पाक करून चर्वन्नानें अथवा पायसान्नानें पिंडप्रदान करावें. असें सांगितलें आहे. असो या निर्णयाविषयीं श्रीधरभट्ट करवे व बाबू जोशी चवलकर, हे दोघे दक्षिण कोंकण देशांतून काशीमध्यें आल्यावरून विश्वकर्मसंततीय दैवज्ञ स्वर्णकारांस पूर्वोक्त भविष्योत्तर पुराणादि सर्वाधारें चरुपायसान्नें करून पिंडप्रदान करण्याचा अधिकार आहे, अशाविषयीं क्षेत्रकाशीवासी सर्व पंडित लोक धर्मशास्त्रादि सर्व शास्त्रवेत्ते यांनीं हा धर्ममर्यादेप्रमाणें शास्त्रनिर्णय केला आहे. अर्थात् वेदोक्त कर्म करण्याचा अधिकार आहे. याविषयीं मुळींच संशय नाहीं. हें लिखित पत्र विजयादशमी ( अश्विन शु० १० ) संवत् १७८१ म्हणजे शालिवाहनशके १६४६ मितीस समस्त पंडितांच्या अनुमताप्रमाणें श्यामभट्ट शंकर भट्ट धर्माधिकारी यांनीं लिहिलें असे.

याहीपेक्षां जुनें, प्रतिष्ठान ( पैठण ) क्षेत्रस्थविद्वज्जनांचें संमतिपत्र पहा.

या पत्राचा इतिहास ऐकिवांत असा आहे कीं, सातारचे शाहुमहाराजांचे वेळीं या ब्रह्मपंचाल स्वर्णकारांचा व्यवहारिक ब्राम्हण लोकांशीं धर्मसंबंधीं तंटा होऊन तो तंटा शाहूमहाराजांकडेस निर्णयाकरितां गेला तेव्हां पंचाल स्वर्णकारांस कोणते कर्माचा अधिकार आहे. हा निर्णय करण्याकरितां महाराजांनीं क्षेत्र पैठण येथील विद्वान् लोकांकडे शिपायाचे हातीं पत्र पाठविलें असावें,असें या पत्रांतील मजकुरावरून समजतें.

पत्र ९ वें.

( अथ गोदावरीतीरविराजमान प्रतिष्ठान क्षेत्रस्थ विद्वज्जनानां सम्मति पत्रम्. )

स्वस्तिश्रीमत्पार्वतीरमणपरिचरणासादितवैभवतर्पितभूसुरपरिगीयमानयशःपरीताशामंडलेषुगांभीर्यौदार्यधैर्यशौर्याखिलगुणगणमंडितेषुश्रीमन्महाराजाधिराजप्रभुचूडामणीषुगोदावरीतीरविराजमानप्रतिष्ठानमहास्थानस्थितनिखिलविद्वद्वैदिकविरचिताःपारंपराधर्माशिषः । अत्रत्यक्षेम शके १६३१ विरोधिसंवत्सरस्थ आषाढकृष्णपंचमीपर्यंतं ज्ञात्वा स्वक्षेमवेदक पत्रलेखने आज्ञाविधेया

अस्माभिर्गोदास्नानाग्निहोत्रादिसमयेमहाराजानं आशिषोयंतां श्रीमद्भिः संताजीसुराजीनामकंस्वकीयभृत्यद्वारा पत्रिकामेषिता सासभास्थ निखिल विद्वद्वैदिकादिभिर्बहुमानपुनःसरमवलोकिता तत्रश्रीमद्भिरिदंलिखितम् ॥ सोनार ब्रह्मकर्म करिताती ह्मणून सोनारांस तलब करून आणून वर्तमान मनास आणितां तिहीं विदित केलें जे । सोनार पंचाळ यातीस ब्रह्मगायत्री उपदेश आहे. व्रतबंधादिकर्में वेदोक्तमंत्रें करून होत आहेत, परंपरेनेंऐसेंच चालत आहे. येविषयीं पैठणाहून निर्णयपत्रही आणून देऊं ह्मणून विदित केलें त्यावरून या गोष्टीचा विचार पाहतां पंचाळ यातीनें ब्रह्मकर्म करावें हें कोठें आढळत नाहीं. ऐसी यास पैठण ह्मणिजे महास्थळ आहे, याकरितां सोनार तेथें पाठविले आहेत. तरी तुह्मीं सोनार पंचाळ यातीस ब्रह्मगायत्री उपदेश ब्रह्मकर्म आचरायास अर्हता आहे कीं काय ? हा शास्त्रार्थ मनास आणून लेखन करणें. जरी ब्रह्मकर्म अर्हता नसेल तरी पंचाळ यातीस कोणतें कर्म ग्राह्य असे. कैसें वर्तावें हा निर्वाह करून लिहिणें. स्वधर्मनिर्णय आहे याकरितां आपलें सत्य समरून जैसें असेल तैसें यथार्थ वादे लिहिणें. कोणीं कोणाची रयात करील त्यासशपथ असे. जाणिजे बहुतकायलिहिणें ॥ एतत्पत्रार्थसभास्थविद्वद्वैदिकैरंतःकरणे समानीय महानिबंधविचारणायामयमर्थः संपन्नः संस्कारसारे नृसिंहप्रसादे तथा स्मृतिदर्पणे गोविंदार्णवेच माहिष्येणकरण्यांतुरथकारःप्रजायते ॥ अस्यपर्यायनामानि तक्षाशिल्पीचवर्धकी ॥ लोहकारःस्वर्णकारोविद्यते-यजनंतथा ॥ उपनीतंविधानेनकुर्यादाधानमप्यसौ ॥ वास्तु शास्त्रमधीयानःप्रासादप्रतिमादिकान् ॥ यज्ञपात्रंद्विजातीनांहैमान्याभरणानिच॥ कृष्युपस्करणंसर्वकर्माण्यस्योदितानिचेति तथाविज्ञानेश्वरे आचाराध्याये जातिविवेचनप्रस्तावे माहिष्येणकरण्यांतुरथकारःप्रजायत इतियाज्ञवल्क्यस्मृतिव्याख्यानावसरेऽभिहितं क्षत्रियेणवैश्यायामुत्पादितोमाहिष्योवैश्येनशूद्रायामुत्पादिताकरणीतस्यांमाहिष्येणोत्पादितोरथकारोनामजात्याभवतितस्यचोपनयनादिकंसर्ववचनात् ॥ तथाहशंखः॥ क्षत्रियवैश्यानुलोमानंतरोत्पन्नोरथकारः॥ तस्येज्याधानोपनयनसंस्कारक्रिया अश्वप्रतिष्ठारथसूत्र-वास्तुविद्याध्ययनवृत्तिताचेत्येवंब्राह्मणक्षात्रियोत्पन्नमूर्धावासिक्त-माहिष्याद्यनुलोमसंकरेजात्यंतरतोपनयनादिप्राप्तिश्चवेदितव्या ॥ तयोर्द्विजत्वादिति ॥ तथारथकारस्याधानेनियतंच । नाभावादितिवात्स्यइतिकात्यायनसूत्रव्याख्यानात्कर्कभाष्ये देवयाज्ञिकेचरथ

कारस्या धानाद्यधिकारःप्रतिपादितः ॥ तथाचनृसिंहप्रसादस्मृति दर्पणगोविंदार्णवविज्ञानेश्वरकर्कदेवयादिकादिनिबंधैकवाक्यतया- रथकारापरपर्याय स्यसुवर्णकारस्योपनयनब्रह्मगायत्रीवास्तुविद्या- ध्ययनदानाधानादिकरणेधिकारइतिविज्ञायते ॥ ननुमाहिष्येणक करण्यांतुरथकारः प्रजायते ॥ नैवोपनयनंतस्यशूद्रधर्मोह्यहिःक्वचि- दितिजातिविवेके रथकारस्योपनयनाद्यनधिकारोपिप्रतीयेतइतिचे त ॥ मैवं ॥ पूर्वोदाहृतविज्ञानेश्वरादिमहानिबंधविरोधेनतस्यनि र्मूलत्वात् ॥ समूलत्वेवाउदितानुदितहोमवाक्यवत्षोडशी ग्रह- णाग्रहणवाक्यवच्चव्यवस्थितविकल्पपरत्वेनोपनयादिनिषेधवाक्य स्यतत्कर्तव्यताबोधकवाक्यस्यचपरस्परमविरोधः संपादनीयः ॥ तथाचयैःस्वर्णकारादिभिः परंपरया उपनयनादि नानुष्ठीयतेतत्परं जातिविवेकस्थंनिषेधवाक्यं ॥ यैस्तुस्वर्णकारादिभिः परंपरयोप- नयनाद्यनुष्ठीयतेतत्परंमहानिबंधस्थमुपनयनादिकर्तव्यताबोधक- मितिसर्वनिबंधानाविरोधः ॥ तस्मात्रथकारपर्यायस्यसुवर्णका रस्योपनयनादिवास्तुविद्याध्ययनदाधानाधिकार इत्यलमति- विस्तरेण अभिज्ञंचूडामणीन्प्रतिपत्रेपंक्तयः समग्राः ॥

१ संमतं महादेव पाठक धर्माधिकारी
१ पत्रार्थेसाक्षी आचार्य वासुदेव.
१ पत्रार्थेसाक्षी गोस्वामी श्रीधर.
१ पत्रार्थे संमतं त्र्यंबकदैवज्ञ.
१ पत्राप्रमाणें साक्षी गुंडाजीमहाजन.
१ पत्राप्रमाणेंसाक्षी भीमाजी महाजन
१ हस्ताक्षरमिदं अनंतदेव धर्माधिका- रिणः
१ संमत रामचंद्र धर्माधिकारी.

१ गोहिराव मानसिंग देशमुख.
१ गोहिविसाजी व विठोजी दामोदर देशपांडे परगणे मजकूर विकलम- गीर माजी बावदेव गुमास्ते.
१ गुमास्ते कृष्णाजी रुक्मांगद.
१ गोही धोंडाजी चौधरी.
१ पत्राप्रमाणें साक्षी रणसोडबगाजी महाजन.
१ गोही दादोजी चौधरी.

अर्थ—स्वस्ति श्रीयुत पार्वतीपति शंकराच्या चरण सेवेंकरून स्थीर अशा प्रभू ऐश्वर्य संपत्तीनें संतुष्ट केलेल्या ब्राह्मणांनीं वर्णनीया अशी चहू दिशांत परिपूर्ण आहे कीर्ति ज्यांची, जे गंभिरपणा, औदार्य, धैर्य, शूरत्व इत्यादि सर्व गुणांच्या समूहानें सुशोभित, त्या श्रीमंत महाराजाधिराज, सर्व भूमंडल नृपश्रेष्ठांचे ठायीं, गोदावरी न- दीच्या तीरानें शोभणान्या प्रतिष्ठान नामक महास्थान क्षेत्रस्थ संपूर्ण विद्वान वैदिकांनीं केलेले आशिर्वाद, ब्रह्मकल्पाहूनही अधिक चिरकाल असोत. येथील क्षेम शालिवाहन शके १६२१ विरोधिनामसंवत्सरे आषाढ वद्य ५ पंचमीपर्यंत जाणून आपणाकडेस क्षेमबोधक पत्र लिहिण्याविषयीं आज्ञा असावी. कारण आम्ही गोदावरी गंगास्नानाचे व अग्निहोत्रादि नित्यकर्म करण्याचे समयीं, महाराजांप्रत आशीर्वाद चिंतीत असतां, श्रीमंतांनीं संताजी सुराजी नामक आपल्या सेवकाच्या हातीं पाठविलेलें पत्र आलें तें

सभेंतील सर्व विद्वज्जन वैदिक मंडळींनीं फार सन्मानपूर्वक अवलोकन केलें. त्यांत श्रीमंतांनीं असें लिहिलें आहे कीं, ( तत्र श्रीमद्भिरिदंलिखितं ) " येथपर्यंत भाषांतर झालें. प्राकृतच मजकूर असल्यामुळें ( बहुत काय लिहिणेंपर्यंत ) पुनः लिहीत नाहीं. पुढें संस्कृत. " एतत्पत्रार्थ०—प्राकृत—या पत्राचा अर्थ सभेंतील विद्वज्जनांनीं ध्यानीं आणून महानिबंधग्रंथांच्या चर्चेच्या आधारावरून हा विषयार्थ संपादन केलेला आहे.— संस्कार सारामध्यें, नृसिंहप्रसाद ग्रंथामध्यें तसेंच स्मृतिदर्पणामध्यें आणि गोविंदार्णवामध्यें अशीं वचनें आहेत कीं, " माहिष्यापासून करणीच्या ठायीं रथकार उत्पन्न झाला त्याचीं पर्याय नामें तक्षा ( सुतार ) शिल्पी, ( पाथरवठ ), वर्धकी ( तांबट ) लोहकार आणि स्वर्णकार, अशीं पांच आहेत. यांनीं यज्ञ करावा. तसेंच उपनयन करून त्या विधीनें अग्निहोत्रही करावें. वृत्तीकरितां वास्तुशास्त्राचें अध्ययन करून देवालयें, देवांच्या मूर्ति, स्रुक् स्रुवादि ब्राह्मणांचीं यज्ञपात्रें, सुवर्णाचे अलंकार, आणि शेतकामासंबंधीं हलादिक आयुधें करावींत " तसेंच आणखी विज्ञानेश्वरामध्यें आचाराध्यायास जातिविवेक प्रस्तावामध्यें ' माहिष्येणकरण्यांतु ' या याज्ञवल्क्य स्मृतिवाक्य व्याख्यानाचे वेळीं असेंच सांगितलें आहे कीं-क्षत्रियानें वैश्यस्त्रीच्या ठायीं उत्पादित तो माहिष्य आणि वैश्यानें शूद्रीच्या ठायीं-उत्पादित जी कन्या ती करणी, माहिष्यापासून करणीच्या ठायीं झालेला रथकार यास उपनयनादि सर्व कर्मांचा अधिकार आहे. कारण असें वचनच आहे. तसेंच शंख, स्मृतींतही आहे कीं, पूर्वोक्त संकर रथकारांस यज्ञ, दान, अश्वप्रतिष्ठा रथसूत्र वास्तुविद्याध्ययनवृत्तिकर्मांचा अधिकार आहे. तसेंच आणखी ' रथकारस्याधाने । नियतंच । नाभावादिति वात्स्यः, ' या कात्यायन सूत्रांवरून व त्याचे कर्क भाष्य व्याख्येंत आणि देवयाज्ञिक ग्रंथांत रथकारास अग्निहोत्रादि अधिकार प्रतिपादन केले आहेत. तस्मात् नृसिंहप्रसादादि सर्व महानिबंधांच्या एकवाक्यतेनें रथकारापरपर्याय नाम सुवर्णकार यास उपनयन, ब्रम्हगायत्री, अग्निहोत्र, वास्तुविद्यादि करण्यास अधिकार आहे. असें निश्चयेंकरून समजतें. यद्यपि "संकररथकारास उपनयन नाहीं. कारण त्यास शूद्रधर्मावरून बहिष्कृत केला आहे." या जातिविवेक ग्रंथस्थ वचनावरून त्यास उपनयनादि अधिकार नाहीं अशी जर कोणी शंका घेतील तर घेऊं नये.कारण पूर्वोदाहृत विज्ञानेश्वरादि सर्व महानिबंधांच्या विरोधानें जातिविवेकस्थ वचनांस निर्मूलत्व आलें आहे अथवा तें समूळ आहे अशी कल्पना केली तर " उदिते जुहोति अनुदिते जुहोति " या श्रुतीनें झालेल्या उदितानुदित होमांच्या उभय पक्षांची जशी शाखापरत्वें व्यवस्था किंवा षोडशी ( यज्ञविशेष ) यज्ञाच्या " नोक्थेगृण्हीयाद्गृण्हीयाद्वा, " या सूत्रानें झालेल्या ग्रहण अग्रहणाच्या उभयपक्षांची जशी सवनपरत्वें व्यवस्था मीमांसकांनीं केली आहे तशी उपनयनादि निषेधवाक्याचा आणि उपनयनादि कर्तव्यतत्व बोधक वाक्याचा परस्पर विरोध न येईल अशी व्यवस्था करावी. ती अशी कीं, जेसुवर्णकारादिक. परंपरेनें उपनयनादिक कर्मानुष्ठान करीत नाहींत तत्संबंधी जातिविवेकांतील निषेधवाक्य जाणावें.आणि जे स्वर्णकारादिक परंपरेनें उपनयनादिक कर्मानुष्ठान करितात तत्संबंधी पूर्वोक्त महानिबंधांतील उपनयनकर्तव्यत्व बोधक

वाक्य जाणावें. या निर्णयानें सर्व निबंध ग्रंथास विरोध येत नाहीं. तस्मात् रथकारापरपर्याय नाम सुवर्णकारांस उपनयनादि कर्मानुष्ठान अग्निहोत्र वास्तुविद्याध्ययन दानादि वेदोक्त कर्मांचा अधिकार आहे. विद्वानांमध्यें जे चूडामणि ( श्रेष्ठ ) त्यांना इतकें सविस्तर लिहिणें पुरें आहे .संमत देणारांचीं नावें वर आलींच आहेत.

या पत्रांतील बहुतकरून सर्व स्मृतिवचनें संकर रथकारांसंबंधी आहेत असें प्रथम दिसून येतें. तथापि यांत " **रथकारास्याधानें । नियतंच ना भावादितिवा-त्स्यः,**' या श्रुतिरूप कात्यायन सूत्रांवरून व त्याचे कर्कभाष्यावरून प्रतिपादन केलेल्या विश्वकर्म संततीय रथकाराच्या ब्रह्मवंशजत्वसंबंधी ब्रह्मगायत्री उपदेशाचा व ब्रह्मकर्माधिकार वाक्याचा समावेश केला आहे. १ शिवपंचाल. २ देवपंचाल ३ ब्रह्मपंचाल. ४ उपपंचाल. ५ संकरपंचाळ ( संकर रथकार ) असे वेदोक्त कर्माधिकारी पांच प्रकारचे रथकार आहेत, पैकी पहिले दोन ' स्वर्गस्था यज्ञपोषकाः ' या स्कंदपुराणोक्तीवरून देवलोकीं आहेत, बाकीचें ब्रह्मपंचालादि ३ पृथ्वीमध्यें सर्व देशांत आहेत.

केवळ ब्रह्मपंचालांच्याच अधिकाराविषयीं व उत्पत्तीविषयीं आणखी पुढचें संमती पत्र पहा.—

हें संमतिपत्र सरकारमार्फत आहे. हें होण्याचें कारण निर्दय अशा कांहीं लिंगाईत वाणी लोकांनीं हैद्राबाद येथील राहणाऱ्या विश्वकर्मसंततीय लोकांचे लग्नांतील वरात नामक एका धर्मसंबंधी कार्यास हरकत केल्यावरून झालें आहे. यांत विश्वकर्मसंततीय ब्रह्म पंचालांचे धर्मसंबंधी वरातवगैरे उत्साहास कोणीं हरकत करूं नये अशी सरकारमार्फत सक्त ताकीद असल्यामुळें या संमतीपत्रास **महजरनामा** असें नांव आहे.

पत्र १० वें

## ( राजमुद्रांकितम् तैलंगदेशस्थविद्वज्जनानांसंमतिपत्रम्. )




*Stamp of one Rupee in*

*Hydrabad.*

" सदरील इंग्लिश लेखामध्यें
" कागद विकणाराची सही
" (सुपरिन्टेन्ड) ह्मणून आहे
" (किंमत १ रुपया "

( फारशी मोहर अक्षरांची छाप आहे )







महजरनामा शके १७९८ धातृनामसंवत्सरे अश्विन शुद्ध १० ते दिवशीं शहर हैद्राबाद येथील राहणार विद्वज्जन पंडित लोक यांनीं केला आहे. ऐसाजे या शहरामधील विश्वकर्मवंशीय ह्मणजे मनु, मय, त्वष्टा, शिल्पी, दैवज्ञ यांचे घरीं विवाह कार्यसंबंधीं पालखी व घोडे यांचेवर आरोहण करून सरकार रस्त्यानें उत्सव घेऊन जातेवेळीं इतरजातीचे लोक आडवे येऊन सदरहू पालखी व घोडे यांवर बसूं नका म्हणून क

लह केला, तऱ्हां त्या लोकांनीं आमचा प्रतिबंध केला, याकरितां सरकारांतून बंदोबस्त करावा म्हणून अदालत सिव्हिल कोर्टांत, जंगम गंगाधर अप्पा व गुरु बसापा वगैरे इसमांवर फिर्याद केली. नंतर श्रुतीमध्यें त्यांचा पूर्वींपासून कुलाचार सांप्रदाय कसा काय आहे ; याविषयीं पंडित लोकांनीं केलेला हा महजरनामा कचेरींत घेऊन यावें म्हणून सांगितलें, त्यावरून त्यांनीं आपल्या पूर्वींपासून चालत आलेल्या कुलाचार सांप्रदायाविषयीं ग्रंथाधार वगैरे म्हणजे श्रुतिस्मृति पुराणांच्या संमतांनीं केलेला सिद्धांत ( महजरनामा ) सरकारांनीं ध्यानास आणून व शोध करून आम्हास हुकूम द्यावा, म्हणून अर्ज केला त्याजवरून या खालीं लिहिलेल्या श्रुतिस्मृति पुराणांमध्यें शोध केला असतां विश्वकर्मसंतति ही जाति सर्व जातींहून श्रेष्ठ आहे म्हणून आम्हीं जंगम वगैरे इसमास ताकीद दिली जाते कीं, सरकारी रस्त्यांतून सदरील ( विश्वकर्म० ) वगैरे लोक लग्नसंबंधीं इत्यादि उत्सव घेऊन गेले असतां तुमच्या शास्त्रास बट्टा लागतो काय? कांहीं लागत नाहीं. हरकत करण्याचें कारण नाहीं.

**श्रुति.**

**(१) विश्वकर्माविमना आद्विहाया धाता विधाता परमोत्त संदृक्‍तेषामिष्टानिसमिदा मदंतुयत्रसप्तऋषीन्परएकमाहुः । योनःपिताजनितायोविधातायोसतो अभ्यसज्जजान ॥**

**(२) प्रजापतिर्विश्वकर्मामनोगंधर्व०**

**(३) विश्वकर्मणःसमवर्तताधि । तस्यत्वष्टाविदधद्रूपमेति ।**

**(४) विश्वरूपोवैत्वाष्ट्रःपुरोहितोदेवानामासीत् ।**

**(५) यजुर्वेद अष्टक ४ थें. पन्न३रा. अनुवाक ३रा.**

**प्राचीदिशांवसंतऋतूनामग्निर्देवताब्रह्मद्रविण त्रिवृत्स्तोमःस उपंचदशवर्तनिस्त्र्यविर्वयःकृतमयानांपुरोवातोवातःसानगऋषिः ॥ १ ॥**

**दक्षिणादिशाग्रीष्मर्तूनामिंद्रोदेवताक्षत्रंद्रविणंपंचदशःस्तोमः सउसप्तदशवर्तनिर्दित्यवाड्वयस्त्रेतायानांदक्षिणाद्वातोवातःसनातनऋषिः ॥ २ ॥**

**प्रतीचीदिशांवर्षाऋतूनाविश्वेदेवादेवताविट्द्रविणंसप्तदशस्तोमःसउवेकविंशवर्तनिस्त्रिवत्सोवयोद्वापरोयानांपश्चाद्वातोवातोहभूनऋषिः ॥ ३ ॥**

**उदीचीदिशांशरदृतूनांमित्रावरुणौदेवतापुष्टंद्रविणमेकविंशस्तोमःसउत्रिणववर्तनिस्तुर्यवाड्वयआस्कंदोयानामुत्तराद्वातोवातःप्रत्नऋषिः ॥ ४ ॥**

**उर्ध्वादिशांहेमंतशिशिरावृतूनांबृहस्पतिर्देवतावर्चोद्रविणंत्रिणवस्तोमःसउत्रयस्त्रिंशवर्तनिःपष्ठवाद्वयोभिभूरयानांविश्वग्वातोवातःसुपर्णऋषिः ॥ ५ ॥**

---

( १ ) या श्रुतीचा भावार्थ—विश्वकर्मा हा महान् ऋषि, देव, आदिकरून सर्व त्रैलोक्याचा जनिता (पिता ) आणि पोषणकर्ता आहे. ( २ ) या श्रुतीचा भावार्थ—विश्वकर्मा हा प्रजापति आहे. ( ३ ) या श्रुतीचा भावार्थ—विश्वकर्मा हा श्रेष्ठत्वेंकरून नानाप्रकारची रूपें ( शरीरें, जीव ) उत्पन्न करितो. (४) या श्रुतीचा भावार्थ—विश्वकर्मा देवांचा पुरोहित असल्यामुळें त्याच्या पुत्रपौत्रादि संततीसही देवपुरोहितत्व आहे. ( ५ ) या श्रुतीचा भावार्थ—(विद्यारण्यभाष्यावरून )—विश्वकर्मयाच्या सद्योजातादि नामक पूर्वादि पंचदिशांच्या पांच मुखापासून अनुक्रमें सानग, सनातन, अहभून, प्रत्न, सुपर्ण असे पांच ब्रह्मर्षिउत्पन्न झाले. या ब्रह्मर्षीच्या परंपरा संततीसच विश्वकर्मसंतती किंवा विश्वब्रह्मवंश या संज्ञे

(६) श्रीभागवतेस्कं-२अ-१। इंद्रादयोबाहवआहुरुस्राःकर्णौदिशःस्तोत्रममुष्यशद्बः नासत्यदस्रौपरमस्यनासेघ्राणोस्यगंधोमुखमग्निरिद्धः ॥ २९ ॥ द्यौरक्षिणीचक्षुरभूत्पतंगः पक्ष्माणिविष्णोरहनीउभेच ॥ तद्भ्रूविजृंभःपरमेष्ठिधिष्ण्यमापोस्यतालूरसएवजिव्हा ॥ ३० ॥

(७) महाभारतेद्रोणपर्वणि १०८ अध्याये ॥ तत्रक्रोधाभिताम्राक्षोनिर्दहन्निवपावकः ॥ संदधेत्वाष्ट्रमस्त्रंसस्वयंत्वष्टेवमारुतिः ॥३९॥ ततःशरसहस्राणिप्रादुरासन्त्समंततः॥तैः शरैस्तवसैन्यस्यविद्रवःसुमहानभूत्॥ ४० ॥

(८) स्कंदपुराणेनागरखंडे अध्याय ७ पंचब्रह्मपुनर्जन्मपंचवक्त्रस्यगर्भजं ॥ पंचसादाख्यतत्वंचद्वितीयास्क्तमुनीश्वराः ॥ २६ ॥ तृतीयोजन्मभेदश्चसकलैः कारणैःशृणु॥ मनुःपूर्वमुखोद्भूतोमयोयाम्यमुखोद्भवः ॥ २७ ॥ पश्चिमास्येभवत्त्वष्टातक्षाचोत्तरतःस्मृतः॥ऊर्ध्वायांशिल्पिसंभूतिःपंचगर्भमुनीश्वराः।२८।

*True copy* — *Hydrabad Court* — एथेंफारशीलिपींतसही आहे.

ब्रह्मांडपुराणेद्वितीयपटले विश्वकर्मकुलोपाख्याने अ.१

(९) शीर्षस्योर्ध्वदिशोभागेतिष्ठतेकालचोदितः॥महोन्नतोमहापुरुषःपीनवक्षःससुंदरः॥अनादिनिधनःस्वर्णःसुपर्णस्तस्यनामहि ॥ स्वर्णंददातिलोकानांब्रह्मण्योर्ध्वमुखोद्भवः ॥ २ ॥ श्येनायपत्वनेविश्वंविष्टंभःकर्मणांपतिः॥किरीटकुंडलादीनांभूषणानांप्रयोजकः ॥ ३ ॥ (इतिसुपर्णऋषिः)

(१०)प्रत्नोविश्वस्यकर्तासौजगद्रक्षापरायणः॥ब्रह्मण्योद्ध्र्वमुखेजातःप्रवराप्रत्नसंततिः ॥ १ ॥ प्रत्नःप्रहर्षणःशिल्पीवास्तुकोविश्वभद्रकः॥ शक्ररस्तुशिलाकर्मकर्तॄणांगोत्रनायकाः ॥ २ ॥(इतिप्रत्नः)

---

नें मनुमयादि नावें आहेत. (६) या भागवतोक्तीचा भावार्थ—विश्वकर्म याचे स्थूलदेहाचें वर्णन आहे, तें असें—विश्वकर्म याचे बाहु इंद्रादिकदेव, दिशा, कर्ण, व त्याचा विषय शद्ब, अश्विनी कुमारघ्राण त्याचा विषय गंध, अग्नि हें मुख. आकाश-नेत्र, सूर्य-नेत्र गोलक, दिवस रात्र-पापण्या, ब्रह्मनेत्र विकास, अपस्तत्व-तालु, रसविषय-जिव्हा, इत्यादि वर्णिले आहे. (७) या भारतोक्तीचा भावार्थ—भीमानें युद्धांत राक्षसांवर त्वाष्ट्र (त्वष्टयाचें) अस्त्र सोडिलें त्यापासून हजारों बाण निघून राक्षसांचा पराभव झाला. यांतील तात्पर्य कीं, सर्व शस्त्र विद्येचाहि अधिपति विश्वकर्माच आहे. (८) या स्कं० नागर खंडोक्तीचा भावार्थ—ओंकारात्मक तारकादि पंच ब्रह्मस्वरूप विश्वकर्म याचीं सद्योजातादि पांच मुखें हा पहिला अवतार. या पांच मुखापासून सानगादि पांच ब्रह्मर्षि झाले, हा पंच ब्रह्माचा दुसरा अवतार. पुनः त्याच पूर्वादि. पांच दिङ्मुखापासून मनुमयादिक पांच गर्भांतच असतां ब्राह्मण होते झाले. हा तिसरा अवतार जाणावा. ह्मणूनच त्यांच्या परंपरा संततीस गर्भींच असतां ब्राह्मणत्व आहे. ह्मणजे संस्काराच्या पूर्वीही आहे असें समजावें. याचें कारण मुखोत्पत्ति. (९) पासून (१३) या ब्रह्मपुराणोक्तीमध्यें 'प्राचीदिशां' इत्यादि श्रुतींत वर्णिलेल्या सानगादि ब्रह्मऋषींचें विशेष वर्णन केलें आ

(११)योगार्हपत्यधर्माणिविनिर्माताजगद्विभुः॥त्वष्टास्वर्णादिलोहैस्तुपात्राणिविकरोतिसः ॥ ३ ॥ तद्गोत्रजाःप्रवर्ततेवेदमार्गानुसारितेः॥ पुराणेषुचविख्यातः संभूतःपाश्चिमेमुखे ॥ २ ॥

(१२)सनातनोदारुकर्माकुशलोनिर्ममेपुरा ॥ हलादीनांतुकर्तव्यंमंदिराणांविशेषतः॥ १ ॥ स्यंदनादीनियानानिविकरोतिसनातनः॥देवैर्नमस्कृतः स्तोप्यन्कर्तृत्वंजगृहेविभुः ॥ २ ॥ ग्रीष्मर्तुर्दक्षिणेभागेक्षत्रमिंद्रोस्यदेवता ॥ द्रव्यंपंचदशस्तोमोसौसप्तदशवर्तनिः॥ ३ ॥ दित्यवाट्चवयस्त्रेतायानांब्रह्मासनातनः ॥ ४ ॥ वामदेवमुखेजातोविश्वलोकान्सरक्षति ॥

(१३)साधनंनास्तिसर्वत्रलोकानांसर्वसाधकः ॥ करोतिलोहकर्माणिलोकान्रक्षतिसानगः ॥ १ ॥ शूलंददातिभर्गस्यचक्रंदत्तंश्रियःपतेः ॥ ददौशस्त्राणिदेवानांदुष्टनिग्रहकारणात् ॥ २ ॥ तेनसर्वजगत्कर्तासद्योजातमुखोद्भवः॥

(१४)रुद्रयामले- शिवेमनुर्मयस्त्वष्टातक्षाशिल्पीच पंचमः ॥ विश्वकर्मसुतानेतान्विद्धिशिल्पप्रवर्तकान् ॥

(१५)एतानिश्रुतिस्मृतिवाक्यानिचरुद्रयामलब्रह्मांडपुराणस्कंदपुराणांतर्गतनागरखंडादिषुबहूनिसंति । केषांदिदृक्षाचेद्दर्शयिष्यामः

( अत्रार्थेविदुषांसंमतयः )

१ चक्रवर्तिनृसिंहाचार्यस्यसंमतिः
१ अस्मिन्नर्थेशेषशास्त्रिणःसंमतिः
१ अस्मिन्नर्थेमाडाशिवरामशास्त्रिणःसंमतिः
१ झंकयाशास्त्रीजोशीमंगेप्याटी.
१ हरीबुचैय्यासंमतिः(साकीनमहंमदावजारू.)
१ अस्मिन्नर्थेव्यंकटनृसिंहशास्त्रिणःसंमतिः
१ रामकृष्णजोशी ( साकिन् पटिंचरु )
१ केतुमाल्लवासूर्यशास्त्रिणःसंमतिः
१ वंगिपुरनृसिंहाचार्यलुसंमतिः
१ चलैय्यासाकिन्रायनुबजारअस्मिन्नर्थेसंमतिः
१ अस्मिन्नर्थेमल्लेशासिद्धांतिनःसंमतिः
१ देवलपल्लीशेषशास्त्रिणःअस्तिन्नर्थेसंमतिः

---

हे. त्याचा अर्थ प्रथम संग्रहांत सांगितला आहे. याशिवाय—यजुर्वेदअष्टक३ पत्र ३ अनु. ८ पन्नाशी २ 'श्येनायपत्वने' या श्रुतींत सुपर्ण ऋषींचें विशेष वर्णन असल्याचें यांत दर्शविलें आहे. (१४) यारुद्रयामलोक्तींत"पद्मपुराणभूखंडोक्तींतही"यांत शंकरपार्वतीप्रत सांगतात कीं, हे पार्वती, मनु, मय, त्वष्टा, शिल्पी, दैवज्ञ, हे विश्वकर्मा याचे पांच पुत्र शिल्पविद्येचे अध्यक्ष आहेत असें जाण. (१५) यांत महजरनामा करणारे पंडितलोक ह्मणतात कीं, याप्रमाणें हीं श्रुतिस्मृति पुराणादि वाक्यें असून आणखीही पूर्वोक्त ग्रंथांत पुष्कळ वर्णन आहे. कोणीं विचारल्यास आम्हीं दाखवूं असें लिहून त्यांनीं स्वदस्तूरच्या सह्या । केल्या आहेत.




*True Copy.*

( ) (सही) हैदराबादरेसिडेन्ट.

*Resident*

*Hydrabad Residency 8th March 1878*

( हैद्राबादकोर्ट. )

( तारीख ८ मार्च सन १८७८ ई० )

याप्रमाणें आणखी ब्रम्हपंचालांच्या अधिकाराविषयीं संमतिपत्र पहा—

पत्र ११ वे.

**श्री राजमाहेंद्रपुरीनिलयविप्रविद्वज्जनसहायकृतोयं श्रीविश्वकर्मान्वयसंजातसुचरितास्वजात्यर्चिता कोसूरिपापय्यदीक्षितादीनांविशाखापट्टणादिवासकोत्पुर्तिसर्वाचार्यमतच्छेदनपूर्वकप्रश्नसमूहः**

### उतपरिष्कारश्च

राजमाहेंद्रपूर येथील विद्वज्जन आणि विश्वब्रह्मकुलोत्पन्न वे० शा० सं०पापय्यदीक्षित वगैरे मंडळींचा पंचालांच्या अधिकाराविषयीं प्रश्नोत्तररूपी वादविवाद होऊन समस्त विद्वज्जनांनीं सशास्त्रनिर्णयकरून संमतिपत्र दिले त्यांतील सारांश.

विश्वकर्मा हा सृष्टिकर्ता आहे आणि त्याच्या मुखापासून पंच ब्रम्ह मनु, मय, त्वष्टा, शिल्पी, विश्वज्ञ असें पांच ब्राह्मण उत्पन्न झाले आहेत याना सानग, सनातन, अहभून, प्रत्न, सुपर्ण अशी पांच गोत्रे आहेत. विश्वकर्मा सृष्टिकर्ता असून देवांचा पुरोहित आहे. याविषयीं प्रमाणें श्रुति **प्रजापतिर्विश्वकर्मा० ॥ विश्वकर्मणःसमवर्तताधि०॥ तस्यत्वष्टाविदधद्रूपमेति॥ विश्वरूपोवैत्वाष्ट्रःपुरोहितोदेवानामासीत्॥ स्मृति—मनुर्मयस्तथात्वष्टाशिल्पीविश्वज्ञएवच ॥ पंचैतेदेवऋषयोविश्वकर्ममुखोद्भवाः ॥ श्रुति—प्राचीदिशांव० ॥ विद्यारण्यभाष्ये अहभूनऋषिः ॥ कस्यचिद्दषेर्नामसतुमहाप्रभावः ॥ त्वष्टृणांयज्ञादि प्रवर्तकः ॥ ब्रह्मांडपुराणे—ब्राह्मणानांकुलं द्वेधापूर्वं विरचितंसुरैः ॥ आर्षेयंपौरुषेयंचकर्मजन्मविशेषतः ॥ आर्षेयंतुवसिष्ठादि ह्यमुष्मिन्मुनिसत्तम ॥ यद्विश्वकर्मणश्चास्य पुरुषस्य मुखोद्भवं ॥ पौरुषेयमितिख्यातं पंचगोत्रं महत्कुलं ॥**

यावरील प्रमाणांवरून विश्वकर्मसंततीय लोक ब्राह्मण आहेत यांत संशय नाहीं व त्याना पौरुषेय ब्राम्हण अशी संज्ञा आहे हे ब्राह्मण असल्यामुळें याना गायत्री मंत्रोपदेश व षट्कर्माधिकार आहे. क्षत्रिय वैश्याना यजनादि तीन कर्मांचा अधिकार आहे परंतु याजनादि तीन कर्मांचा अधिकार नाहीं. विश्वकर्मसंततीय ब्रा-

ह्मणास वेदाचे प्रमाण असल्यामुळें ( श्रुतिस्मृति विरोधे श्रुतिरेव प्रमाणं ) या न्यायानें मीमांसावाक्याचा निषेध होऊन विश्वकर्म कुलोत्पन्न पंचाल हे ब्राम्हण असून त्याना षट्कर्माचा अधिकार आहे असें सिद्ध आहे.

अत्रीलखितार्थे विद्वज्जनानां संमतयः

१ घनपाठी रामावधानलुगारु.
१ यडवल्ली कृष्णय्यगारु.
१ ददि सोमयाजलुगारु.
१ चीमल कोंडा ब्रह्मण्यशास्त्रिलुगारु.
१ नूरते वीरन्नगारु.
१ कन्नम रड्डी.
१ नामन कोंडलरामडु नायडगारु.
१ विश्वनाथ राममूर्तिगारु.
१ मेहूरि सोमयाजलुगारु.
१ कयव्वु पल्लावधानलुगारु.
१ सरिपल्लि सांबशिवरामलुगारु.
१ चलमकुत्ति कृष्णय्यगारु.
१ पाकल रामराव नायडुगारु.
१ यडवाल्लि भैरवावधानलुगारु.
१ सूरि व्यंकटकृष्णशास्त्रिलुगारु
१ विठ्ठल व्यंकटावधानलुगारु.
१ घनपाठी कामशास्त्रिलुगारु.
१ सागि रामशास्त्रिलुगारु.
१ पार्थसारथि नायडगारु.
१ येल्लूरु नूरावधानलुगारु.
१ केतमुकल श्रीराम लुगारु.
१ हरि लक्ष्मणलुगारु.
१ दुर्भा कांडवगारु.
१ तेलकीचर्ल पेटय्यगारु.
१ चलमकोटी व्यंकटकृष्णय्यगारु.

हे संमतिपत्र शके १८०० बहुधान्यनामसंवत्सरे वैशाख शुद्ध ११ आदितवार ता० १२ मे १७७८ ई० रोजीं राजमाहेंद्रपुर येथील विद्वज्जनांनीं सभा करून दिलें आहे.

आणखी विश्वकर्मसंततीय पंचाल ब्राम्हणास रथकार हे नाम असल्यामुळें कित्येक लोकांस शंका घ्यावी अशी उत्कंठा असेल तर तैलंग देशांतील महत् विद्वज्जन ब्राम्हणांची मोठी सभा होऊन त्या सभेंत ( विश्वकर्मसंततीय पंचाल रथकार आणि संकीर्णसंकर रथकार हे भिन्न असून यांचा कांहींच संबंध नाहीं. ) असानिर्णय करून संमति दिली आहे त्यांतील अभिप्राय पहा ह्मणजे समाधान होईल.

**भारतवर्षीय विजयनगर संस्थानाधीश श्रीमन्महाराजानां प्रमुखत्वेन कृतायां सभायां तैलंगदेशीयैरनेकनगरग्रामनिवासिभिरुपपदधारिभिःपंडितैरधिकारिभिश्च विरचितं रथकाराधिकरणस्य तात्पर्यम् ॥**

विश्वकर्मसंततीय पंचाल ब्रह्मरथकार हे ब्राह्मणोत्तम असून, पंचालरथकारांच्या व्यवहाराप्रमाणें संकररथकारजातीयादिकांचाही व्यवहार असल्यामुळें पंचाल रथकार हे संकररथकार आहेत असें स्थापन करण्याविषयीं स्वमताभिमानी असूयु अविद्वान् लोक प्रयत्न करीत असत,ह्मणून विश्वकर्मसंततीय पंचाल रथकार चिदंबर मठाधिपति वे०शा० सं०कनुर्पति बसवाचार्य वे० वीराचार्य वगैरे मंडळींनीं शालिवाहन शके १६७८ धातृनामसंवत्सरे चैत्र शुद्ध २ गुरुवारी मु० विजयानगर येथें श्रीमन्महाराज विजय

**रामराजा** यांच्या अध्यक्षतेखाली, कृष्णागोदावरीच्या मध्यप्रांतात राहाणारे जाहागीरदार, इनामदार, अधिकारी, आणि वैदिक, शास्त्री, पंडित, मीमांसक, नैय्यायिक, वैय्याकरण, इत्यादि महत् विद्वज्जन ब्राह्मणांची मोठी सभा करून त्या सभेत श्रुति, सूत्र, स्मृति, भाष्ये, वेदांगे, मीमांसा, न्याय, व्याकरण, पुराण इत्यादि ग्रंथांच्या आधारांनीं शंका समाधानपूर्वक निर्णय करून विश्वकर्म संतति पंचाल स्वर्णकार हे संकररथकारेत्यादि इतर स्वर्णकाराहून भिन्न असून त्यांचा इतर स्वर्णकारेत्यादिकांशीं जात्यादि कांहींच संबंध नसून हे आचार्यसंज्ञक विश्वकर्मसंतति पंचाल स्वर्णकार षट्कर्माधिकारी असून केवलांगिरसवंशमालिकेंतील विशेष भेदाचे रथकार ब्राम्हण आहेत असा सिद्धांत सर्व विद्वानांनीं करून आपली नांवनिशीं सहित संमति दिली आहे.

**त्या सभेंतील प्रत्येक विद्वानांच्या व्याख्यानांचा अभिप्राय व संमति.**

१ रथकारांस उपनयन, वेदाध्ययन व अग्निहोत्राचा अधिकार आहे. हा अभिप्राय, **दक्षिणामूर्तिशास्त्री** जहागीरदार राहणार **मुंगजोंड**, यांच्या व्याख्यानाचा आहे

२ आधानविधि वर्षाऋतूंत रथकारालांच सांगितलाच आहे. हा अभिप्राय, **भवानीशंकर** शास्त्री इनामदार रा० **मुंगजोंड** यांच्या व्याख्यानाचा आहे.

३ सौधन्वनांचे ठिकाणीं रथकार शद्बाची रूढी असून आधानाचा अधिकार आहे. हा अ० **मारेमंड अच्युताचार्य** इनामदार रा० **कदलीपूर** यां० व्या० आहे.

४ रथकारांस विश्वकर्म वंशजत्व देवपुरोहित्व असल्यामुळें वर्षाऋतु अधानकाल त्यांचाच आहे. हा अ० **व्यंकटाचार्य** रा० **कंबंमेट्ट** यां० व्या. आहे.

५ शिल्पविद्या रथकारांचींच आहे हा अ. **अनंताचार्य** रा. **बुक्कपट्टण**. यां. व्या आहे.

६ विश्वकर्मवंशजांचें शिल्पकर्म स्वाभाविक आहे. हा अ० **भवानीशंकरशास्त्री** इनामदार रा. **मुंगजोंड** यां० व्या० आहे.

७ रथकार शद्बरूढीनें विश्वकर्मवंशज सौधन्वनासच आहे. हा अ० **मारेमंड अच्युताचार्य** जहागीरदार रा० **कळ्ळेपल्ले** यां० व्या० आहे.

८ पंचालरथकार हे संकररथकाराहून निराळेच आहेत. हा अ० **बुक्कपट्टण अनंताचार्य** रा० **अयनंपूडि**. यां० व्या० आहे.

९ विश्वकर्मवंशजांचीं पंचविध शिल्पकर्में आहेत. हा अ० **कृष्णदीक्षित** यां. व्या. आहे.

१० निषादस्थपति व अवकिरत ब्रह्मचारी हे रथकारास लागू नाहींत, रथकारास वेदाधिकार आहे हा अ०, **व्यंकटकृष्ण दीक्षित** रा० **बोब्बिलि** यां० व्या० आहे.

११ निषादस्थपतिन्याय रथकारास लागू नाहीं, रथकारांस आधानाचा अधिकार आहे. हा अ० **बुक्कपट्टण अनंताचार्य** इनामदार रा० **अयनंपूडि**. यां० व्या०आहे.

१२ पाणिनीसूत्रांतील शंका रथकारास लागू नाहीं, रथकारांनीं तिन्ही अग्नीचे आधान करावें. हा, अ० **अनुमर्ति नृसिंहशास्त्री** रा० **क्रापग्राम** यां० व्या० आहे.

---

हीं सर्व व्याख्यानें मिळून रथकाराधिकरण या नांवाचा ग्रंथ मद्रासकडे छापला आहे.

१३ सौधन्वनांच्या हीनत्वाची शंका निवृत्त करून, वर्षाऋतूंतच रथकारांनीं आधान करावें. हा, अ० **दक्षिणामूर्तिशास्त्री** जहागीरदार रा० मुंगजोंड. यां.व्या० आहे

१४ कलियुगांतही विश्वकर्मवंशज रथकारांस वेदाधिकार आहे. हा, अ० **वीरवल्ली श्रीनिवासाचार्य.** यां० व्या० आहे.

१५ कलियुगांतही विश्वकर्मसंततीय **रथकारांचे** अस्तित्व आहे. हा, अ० **दक्षिणामूर्तिशास्त्री** राहणार **विजयानगर.** यां० व्या० आहे.

१६ विश्वकर्मवंशजरथकारास गोत्रप्रवर ऋषी पुष्कळ आहेत.हा, अभिप्राय **भवानीशंकरशास्त्री** रहाणार **विजयानगर** यां व्या० आहे.

१७ विश्वकर्मा आंगिरस कुलोत्पन्न असून रथकार आहे. हा अभिप्राय. **व्यंकट कृष्ण दीक्षित.** यां० व्या० आहे.

१८ अमरकोशांतील शंकानिवृत्त करून रथकार उत्तम वर्णांतील आहेत हा अ० **भट्टल व्यंकटाचार्य.** राहणार **कंभम्पेट्ट.** यां० व्या० आहे.

१९ आदित्य पुराणांतील शंका निवृत्त करून रथकार विश्वकर्म वंशज आहेत.हा, अ० **वीरवल्ली राघवाचार्य** राहणार **बंदरूपट्टण.** यां. व्या० आहे.

२० शिवपुराणांतील शंका निवृत्त करून रथकारास यज्ञाधिकार आहे असें सिद्ध केले. हा, अ० **भवानीशंकरशास्त्री** राहणार **विजयानगर** यां० व्या० आहे.

२१ नमक भाष्यांतील शंकानिवृत्तकरून रथकारांस उपनयनाधिकार आहे हा अ० **भवानीशंकरशास्त्री** राहणार **विजयानगर.** यां० व्या० आहे.

२२ मीमांसा ग्रंथांतील शंका निवृत्त करून रथकारांनीं वर्षाऋतूंतच आधान करावें हा, अ० **भवानीशंकरशास्त्री** जहागीरदार **मुंगजोंड** यां० व्या० आहे.

२३ ( माहिष्येणकरण्यांतु० ) हे वाक्य संकीर्ण संकर रथकारांचे आहे, विश्वकर्मसंततीय रथकार निराळे आहेत. हा, अ० **अनकापल्लि श्रीनिवासाचार्य** यां० व्या० आहे.

२४ अष्टादश जातींखेरीज विश्वकर्मसंततीय रथकार आहेत. हा, अभिप्राय. **मारेमंड अच्युताचार्य** यां० व्या० आहे.

२५ पद्मपुराणांतील शंका निवृत्त करून रथकार उत्तम ब्राह्मण जाति आहे हा, अ० **वोरुगंटी सिंगरशास्त्री** रा० **तिवपुकुंडरी** यां० व्या० आहे.

२६ मध्यमजातिवचनाची शंका निवृत्त करून रथकार श्रेष्ठ ब्राह्मणवर्ण आहे. हा, अ० **मारेमंड अच्युताचार्य** रा० **कल्लेपल्लि.** यां० व्या० आहे.

२७ सिद्धांत कौमुदीतील शंका निवृत्त करून रथकार ब्राह्मण आहेत. हा, अ० **कंदाड रामचंद्राचार्य** रा० **चुल्लकल्लूरिपाडु.** यां० व्या० आहे.

२८ विज्ञानेश्वरस्मृतीतील शंका निवृत्त करून रथकार हे ब्राह्मण असून त्यास आधानाधिकार आहे. हा, अ० **मारेमंड व्यंकटाचार्य.** यां० व्या० आहे.

२९ वर्षाकाळींच रथकारानें अग्नीचें आधान करावें. हा, अ० **सुपर्ल व्यंकट कृष्ण आचार्य** इनामदार रा० **कल्लेपल्लि.** यां० व्या० आहे.

३० परमेश्वर सृष्टिकर्ता आहे त्यापासून सर्व वर्ण उत्पन्न झाले. हा, अ० **दक्षिणामूर्तिशास्त्री** इनामदार रा० **मुंगजोंड** यां. व्या. आहे.

३१ वेदवाक्य व लौकिकवाक्य यांत फार अंतर आहे. हा, अभिप्राय **भवानी शंकरशास्त्री, विजयानगर** यां. व्या. आहे.

३२ विश्वकर्मा, ऋभु, सुधन्वा, विश्वरूप हे शिल्पकर्ते असून विश्वरूप देवांचा पुरोहित होता, व मनु, मय, त्वष्टा, शिल्पी, विश्वज्ञ हे विश्वकर्म्यापासून झाले. हा अभिप्राय, **वीरवल्लि राघवशास्त्री**. यां. व्या. आहे.

३३ रथकार विश्वकर्म कुलोत्पन्न आहेत. हा, अ० **मारेमंड अच्युताचार्य यां.** व्या० आहे.

३४ रथकार हे ब्राह्मण आहेत. हा, अ० **वीरवल्लि श्रीनिवासाचार्य अनकापल्लि** यां० व्या० आहे.

३५ रथकार हे उत्तम कुलीन ब्राह्मण आहेत हा अभिप्राय, **मारेमंड व्यंकटाचार्य** इनामदार **कदलीपूर** यां. व्या. आहे.

३६ रथकारांचा ब्राह्मणामध्येंच अंतर्भाव आहे हा. अ० **बुलुसुबुचन्नशास्त्री रा. पेनुमंचलि** यां० व्या० आहे.

३७ रथकारांना आठवे वर्षी उपनयन करण्याचा अधिकार आहे हा, अभिप्राय **अनकापल्लि श्रीनिवासाचार्य**. यां. व्या० आहे.

३८ रथकार देवांचे पुरोहित आहेत. हा, अ० **वीरवल्लि श्रीनिवासाचार्य अनकापल्लि** यां० व्या० आहे.

३९ विश्वकर्म वंशज रथकार ब्राह्मण आहेत. हा, अ० **व्यंपडि कोंडावधानी** यां० व्या० आहे.

४० रथकारांनीं आठवे वर्षी उपनयन करणें हें सप्रमाण आहे. हा, अ० **भवानी शंकर शास्त्री** यां० व्या आहे.

४१ विश्वकर्मा चयनवाजपेयादि यज्ञियशिल्पकर्म कर्ता आहे **म्हणून** पंचाल हे, यज्ञकुंड यज्ञवेदी यज्ञमंडप, देवरथ, देवमूर्ति अलंकारादि दैवशिल्पकरणारे ब्राह्मण आहेत. हा, अ० **स्वामिशास्त्री** रा० **राजमाहेंद्रपुर यां**. व्या. आहे.

४२ विश्वकर्म संततीय रथकारास षट्कर्माचा अधिकार असून व त्यांना षोडश संस्कार वेदोक्त करण्याचा अधिकार आहे हा. अ० **भवानीशंकरशास्त्री** जहागीरदार **मुंगजोंड** या. व्या. आहे.

४३ विश्वकर्मा प्रजापति असून, विश्वकर्म्याचा पुत्र विश्वरूप देवांचा पुरोहित होता हा, अ० **लिंगगुंट रामकवि** यां. व्या. आहे.

४४ सानग, सनातन. अहभून, प्रत्न, सुपर्ण, विश्वरूप, अंगिरा, अत्रि इत्यादि विश्वकर्मसंततीय रथकारांची गोत्रें आहेत. हा अ० **व्यंकट कृष्ण दीक्षित** इनामदार **रा. अनकापल्लि यां**. व्या. आहे.

५

४५ वैश्वकर्म शद्वाची व्याख्या. हा. अ० वीरवल्लि श्रीनिवासाचार्य अनकापल्लि यां०व्या०आ०
४६ विश्वकर्मा श्रेष्ठ ब्रह्मर्षि कुलांत उत्पन्न झाला आहे. हा. अ०पट्टाभिरामशास्त्री रा०ताडमल्लग्राम.यां०व्या० आहे.
४७ रथकारांनीं वर्षाऋतूंत आधान करण्याचें कारण हा. अ०कारंबेटिअर्कचेनु यां०व्या.आ
४८ विश्वकर्मा हा ब्रह्मर्षि असून देवांचा पुरोहित होता व त्याची संतति पंचाल रथकार, यांना वैदिक कर्मांचा व आचार्यत्व पुरोहितत्वाचा अधिकार पूर्ण असून, ते श्रेष्ठ ब्राम्हण आहेत. हा अभिप्राय. वीरवल्ली राघवशास्त्री वेंदुरपहुण. यांचे व्याख्यानाचा आहे.

याप्रमाणें प्रत्येक अभिप्रायावर वरील विद्वानांनीं सभेंत शंकासमाधानपूर्वक मोठें सविस्तर व्याख्यान करून सिद्धांतकेला आहे. ही सर्व व्याख्यानें या ठिकाणीं दिलीं तर ग्रंथाचा विस्तार फार होईल म्हणून त्यांतील व्याख्यानांचे सर्व अभिप्राय संक्षेपानें आम्ही दिले आहेत. यावरून विश्वकर्मसंतति पंचाल रथकार हे उत्तम कुलीन ब्राह्मण आहेत. हे स्पष्ट लक्ष्यांत येईल.

आतां हल्लीं ही विश्वकर्मसंततींत ब्राम्हण धर्म प्रत्यक्ष दृष्टिगोचर असल्यामुळें विश्वकर्मसंततीय ब्राम्हण रथकारांचीं आधानेंचालू आहेत याविषयीं सभा करून विद्वज्जनांनीं संमतिपत्र दिले आहे तें पहा—

## वृंदावनस्थविद्वज्जनानां संमतिपत्रस्याशयः

शके १७९६ माघ शुद्ध १० दिवशीं विश्वब्रह्मकुलोत्पन्न वे० शा०सं०पापय्य शास्त्रीदीक्षित[1] यानीं आपल्या सर्व पंचाल ब्रह्मवृंदांस बोलावून मु०वृंदावन इ०मद्रास येथें आधानकर्म (अग्निहोत्र) करण्याची तयारी केली त्यावेळीं तेथील वेदशास्त्र पंडित व श्रौतस्मार्त कर्मांत निष्णात असलेले सुब्बण्णाश्रौतपाठी, नागेश्वरघनपाठी, रायलप्रोलारु, यज्ञिनूशास्त्री, वगैरे मोठेमोठे विद्वान् येऊन त्यांनीं वे० पापय्य दीक्षित यानां म्हटलें तुम्हांस आधान कर्म करण्याचा अधिकार नाहीं व तुह्मी करण्यास सिद्ध झाला आहां तर आह्मी या प्रांतांतील विद्वान् पंडितांची सभा करतो त्या सभेंत आपणास अधिकार आहे असें आपण वेदशास्त्र प्रमाणांनीं सिद्ध करून दिल्यास आम्हीं कबूल करूं या त्यांच्या प्रश्नास वे०पापय्यदीक्षितानी अनुमति दिल्यावर तेथील अग्निहोत्रीव्यंकटाचल यांचें घरीं समस्त विद्वज्जन ब्रम्हवृंदांची मोठी सभा होऊन त्या सभेंत वे०शा० सं० पापय्यशास्त्रीदीक्षित यांनीं विद्वज्जनांच्या प्रत्येक प्रश्नास वेदशास्त्रग्रंथाधारें[2] उत्तर देऊन निर्णय केला आणि पंचाल ब्राम्हणास भूतभविष्यवर्तमान कालीं आधानादि कर्म करण्याचा अधिकार असून परंपरा वहिवाट आहे असें सिद्ध केल्यावर समस्त महत् विद्वज्जन ब्रम्हवृंदांनीं तुम्हीं ब्राम्हण असून तुमच्यांत पूर्वापार वैदिक ब्राम्हण धर्म चालत आला आहे त्याप्रमाणें चालवावें व हें आधानकर्म करावें

१ हे पापय्यशास्त्री दीक्षित हल्लीं मद्रास येथें राहतात. २ या प्रश्नोत्तररूप निर्णयाचे पुस्तक (विश्वकर्मान्वय भूषण) या नावाचे म्हैसूराकडे छापले आहे.

अशी सभा करून संमति दिल्यावर शके १७९७ चैत्रशु० १० शुक्रवार रोहिणीनक्षत्र तेदिवशीं पापय्यशास्त्री दीक्षित यांनीं आधानकर्म (अग्निहोत्र) चालू केलें.

या विषयीं विद्वज्जनांची संमति.

**१ महाराज श्रीकोरंगी सब् म्याजिस्ट्रेट सुवर्ण सुब्रह्मण्य सभाध्यक्ष.**

रा. चितगुट पाल्यग्रहार

**१ चर्व रामचंद्र सोमयाजी.**

**१ ताडपल्ले नागेश्वर सोमयाजी.**

**१ केतवर पु० सोमयाजी.**

**१ काजा सोमयाजी.**

रा. कल्लेपल्ले अग्रहार

**१ मदूरु चंद्रशेखर चयनयाजी.**

रा. अवीसगड्ड

**१ तंगिराल व्यंकटाचल श्रौती.**

रा. चाटपर्ति अग्रहार.

**१ गुंडु सुब्रम्हण्य साग्निचित्सोमयाजी**

**१ मुशुरल शिवराम सोमयाजी.**

रा. कंतेरु

**१ चरुकुपल्ले जोगावधानी.**

रा. सोमवर

**१ मल्लरि ब्रह्मावधानी.**

रा. मैलवर.

**१ जोन्नाभट्टल यज्ञन्न दीक्षित.**

रा. नुजेटि.

**१ दिट्टकवि जोगीदीक्षित.**

रा. चिरुयड.

**१ पमिडिमर्रि व्यंकटावधानी.**

रा. दंगेरु ( गोदावरीतीर. )

**१ उपयल्लरि भीमन्नशास्त्री.**

रा. कोत्तपाल्यग्रहार.

**१ चीमलकोंड ब्रह्मय्यशास्त्री.**

रा. मल्लेश्वर.

**१ मंडवाल्लि वराहशास्त्री.**

रा. मंडपाक.

**१ देवरकोंड वीरेश्वरशास्त्री.**

रा. वृंदावन.

**१ पिसपाटी व्यंकटप्प सोमयाजी.**

**१ दोनेपुडि ब्रह्मावधानी.**

रा. काकरपर्ति.

**१ सामवेदी बापय्यावधानी.**

**१ आकुंडि अद्वैतपर ब्रह्मशास्त्री.**

रा. ताडीपरु.

**१ वाजपेय याजुलु अप्पावधानी.**

रा. बाहुबलेंद्र गौंडि

**१ सूरिसुब्रह्मण्य सोमयाजी.**

रा. अकोरिपल्ले.

**१ बोम्मकाडि जोगी सोमयाजी.**

या श्रौतस्मार्त कर्मनिष्णात वेदशास्त्रवेत्यापंडितांनीं आधान करण्याविषयीं संमति दिली आहे अर्थात् पंचाल ब्राह्मणांत हल्लीं आधानें चालू आहेत. याविषयीं मुळींच संशय नाहीं.

विश्वकर्म संततीय पंचाल सोनाराचे हांतूनच देवमूर्तींची स्थापना व प्राणप्रतिष्ठा प्राचीनपासून करण्याची वहिवाट आहे या विषयीं संमति.

**संस्थान मिरज** येथें सरकारवाड्यांत दत्ताचें देऊळ बांधिलें. आंत मूर्ति स्थापन करण्यासाठीं मोटे विद्वान **वे० शा० सं० गोपीनाथ शास्त्री सांगलीकर, बाळकंभट्ट संकेश्वर, अप्पाभट्टसंकेश्वर, महादेव दीक्षित.** वाड्यांत आणविलें त्या वेळीं गोपीनाथशास्त्रींनीं सांगिलें कीं, अगोदर पंचाल सोनारांनीं स्थापना केली पाहिजे असें सांगितल्यावरून **श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन** मिरजकर ( हल्लीं आहेत जे

गंगाधरराव यांचे आजे ) यांनी **रामचंद्र मेहेतें** पंचाल सोनार यांना बोलाविलें आणि त्याचे हांतून प्राणप्रतिष्ठा केली. शके १७७५ सालीं दत्ताची स्थापना झाली.

याप्रमाणें पंचाल स्वर्णकार हे ब्राह्मण असून प्राचीनपासून ब्राह्मण धर्मानें वागतात याविषयीं आणखी संमतिपत्रें आहेत तीं.

**शृंगेरी जगद्गुरु मठांतील श्रीरामशास्त्री** यांचे **संमतिपत्र** शके १८२३ मार्गशीर्ष शुद्ध ६ मंगळवार ता. १७ डिसेंबर १९०१

**मेलकोटा** येथील **विद्वान् कुप्पणयंगारु** यांचें **संमतिपत्र** शके १८२३ मार्गशीर्ष शुद्ध ६ मं. वा. ता. १७–१२–१९०१.

**नांजनगड, म्हैसूर** येथील **राघवेंद्र स्वामी** यांचें **संमतिपत्र** शके १८२३ मार्गशीर्ष शुद्ध ६ मं. वा. ता. १७–१२–१९०१.

**मद्रास** येथील **शतावधानी घनपाठी लक्ष्मणाचार्य** यांचें **संमतिपत्र** शके १८२३ मार्गशीर्ष शुद्ध ११ शनिवार ता. २१–१२–१९०१.

अशी कित्येक संमतिपत्रें आहेत परंतु सर्व पत्रांतील भावार्थ बहुतकरून एकच असल्यामुळें विस्तारभयास्तव येथें घेतली नाहींत.

पूर्वोक्त श्रीशंकराचार्य, प्रतिष्ठित विद्वान्, सर्वमान्य पुरुष यांच्या सशास्त्र निर्णय संमतिपत्रांवरून विश्वकर्म संततीय हे कुलीन ब्राह्मण आहेत आणि पंचाल ब्राह्मणांत गर्भाधानादि वेदोक्त समंत्रक षोडश संस्कार, यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान प्रतिग्रहहीषट्कर्मे, वगैरे ब्राह्मण धर्म अनादि प्राचीन पासून परंपरा चालू वहिवाटीला आहे, हे उघड आहे.

## संग्रह २ रा समाप्त.

---

श्री

# संग्रह ४ था.

## ( सरकारमार्फत झालेल्या निवाड्यांचा. )

येथपर्यंत या ग्रंथाचे तीन संग्रह जे यथामति वर्णन केले ते ज्ञाते, सुशील, गुणग्राही व सत्यशोधक व सभ्य अशा सात्विक लोकांचे चरणीं मस्तक ठेवून त्यांच्या ( सात्विकांच्या आणि राजसांच्या ) शंकासमाधानाकरितां समर्पण केले आहेत.

हा चवथा संग्रह—दुराग्रही, असूयाभिमानी, कलहप्रिय आणि व्रात्य अशा तामस लोकांचें शंकासमाधान होण्याच्या उद्देशानें केलेला आहे. सात्विकांकरितां नाहीं. ही माझी परम नम्रतेची सूचना लक्षांत ठेवून चारीही संग्रह वाचावे.

या चवथ्या संग्रहांत विश्वकर्मसंततीय स्वर्णकारांचे ब्रम्हकर्मास हरकत करूं नये याविषयींचे आणि विश्वकर्मसंततीय स्वर्णकारांवर व त्यांच्या उपाध्यायांवर किंवा पंचाळ म्हणविणाऱ्या सर्व जातीवर ( सुतार, तांबट, पाथरवट, लोहकार इत्यादिकांवर ) व्यवहारी, उपाध्ये, गांवजोशी यांच्या उपाध्येपणाचा हक्क नाहीं. याविषयींचे वगैरे बहुतकरून तत्वाच्या कारणांवरून झालेले निवाडे आहेत.

### निवाडा १ ला.

विश्वब्रह्मवंशस्थ शुभाशुभ कर्म वेदविधीप्रमाणें करितात त्यांस विप्रलोकांनीं आक्षेप करूं नये एतद्विषयीं.

चितूरजिल्हा अदालत कोर्टाचा हुकूमनामा. ( द्राविड )[1]
सन १८१८ इसवी सालींचा. अस्सल नंबर २०५

| वादी लोकांची नांवें राहणार सदुपेरी. | प्रतिवादी लोकांची नांवें रहाणार स० |
|---|---|
| १ वेलयाचार्य. | १ पंचांग गुंडय्या. |
| २ मार्गसहाचार्य[2]. | २ अरुणाचलय्या. |
| ३ रुद्राणाचार्य. | ३ व्यंकटसुब्बाशास्त्री. |
| ४ व्यंकटावलाचार्य. | ४ धोंडाचार्य. |
| ५ नल्लैय्याचार्य. | ५ यज्ञदीक्षित. |
| ६ कोलंदाचार्य. | ६ व्यासभट्ट. |
| ७ चिनकणाचार्य. | ७ सूर्यनारायणशास्त्री. |
| ८ अरुणाचार्य. | ८ ज्योतीषशास्त्री, |
| ९ महादेवस्थपति. | ९ वेदवासी. |
| १० वरदाचार्य. | १० शिरस्तेदार कमदराव. |

---

१ हा द्राविडी निवाडा तैलंगी लिपींत केलला आहे. त्याजवरून हें मराठी भाषांतर केलें, परंतु भाषांतर कर्त्यांस मराठीभाषा चांगलीशी येत नव्हती. त्यामुळें हें भाषांतर सरासरीच जुळलेले आहे

२ मार्गसहाचार्य हा मोठा विद्वान असून याला पंडित असा हुद्दा आहे.

वकील अबदला साहेब.

वादीतर्फे दस्तऐवज वेदशास्त्रांचा तपशील.

१ यजुर्वेद.
२ पुरुषसूक्त.
३ मूलस्तंभ.
४ वज्रसूची.
५ वेमण्णाआर्या.
६ कपिल द्विपद.
७ जिल्हा माजिस्त्रेटची नक्कल.

वकील अरुणाचल मदली.

प्रतिवादीतर्फे दस्तऐवज हजर नाहीं, विचारलेले साक्षीदारांचा तपशिल.

१ अंदुआपा मुदली.
२ शंकर नारायण वैद्य.
३ गोपीशेट.
४ अप्पास्वामी पिल्ले.
५ व्यंकटसुब्बा नायडू.

## वादी लोकांनीं दिलेली फिर्याद.

पुरुषसूक्तप्रमाण—ब्राह्मणोस्यमुखमासीद्बाहूराजन्यः कृतः। ऊरू तदस्ययद्वैश्यःपद्भ्यांशूद्रोऽअजायत ॥

यजुर्वेदप्रमाण—प्राचीदिशांवसंतऋतूनामग्निर्देवता ब्रह्मद्रविणं त्रिवृस्तोमः सउपंचदशवर्तनिः स्त्र्यविर्वयः कृतमयानां पुरोवातोवातः सानगऋषिः । दक्षिणादिशांग्रीष्मऋतूनामिंद्रोदेवताक्षत्र द्रविणं पंचदशः स्तोमः सउसप्तदशवर्तानिर्दित्यवाड्वयस्त्रेतायानांदक्षिणाद्वातोवातः सनातनऋषिः। प्रतीचीदिशां वर्षाऋतूनां विश्वेदेवा देवताविट्द्रविण॰ सप्तदशः स्तोमः सउवेकवि॰ शवर्तनिस्त्रिवत्सोवयो द्वापरोयानां पश्चाद्वातो वातोहभून ऋषिरुदीचिदिशा॰ शरदृतूनां मित्रावरुणौ देवता पुष्टं द्रविणमेकावि॰ शस्तोमः सउत्रिणववर्तनिस्तुर्यवाह्वय आस्कंदोयानामुत्तराद्वातो वातः प्रत्नऋषिः। उर्ध्वादिशा॰ हेमंतशिशिरावृतूनां बृहस्पतिर्देवतावर्चोद्रविणं त्रिणवस्तोमः सउत्रयस्त्रि॰ शवर्तनीः पष्टवाद्वयोभि भूरयानां विश्वग्वातोवातः सुपर्णऋषिः पितरः पितामहाः परेवरेतेनः पांतुतेनोवंत्वस्मिन्ब्रह्मन्नस्मिन्क्षत्रेस्यामाशिष्यस्यांपुरोधायामस्मिन्कर्मन्त्रस्यांदेवहूत्यांविश्वब्रह्मणेस्वाहावि॰ इदंनमम ॥

या वेदवाक्य पद्धतीनें पंचमुखें हीं पंचब्रह्में आहेत. तें असें कीं, सद्योजातमुखापासून सानगऋषि, वामदेव मुखापासून सनातनऋषि, अघोरमुखापासून अहभून ऋषि, तत्पुरुषमुखापासून प्रत्नऋषि, ईशानमुखापासून सुपर्णऋषि, याप्रमाणें पंचमुख ब्रह्मापासून पंचऋषि उत्पन्न झाले. त्या ब्रह्मऋषींच्या वंशांतील लोक आम्हीं ब्राह्मण आहों, म्हणून वैदिक पद्धतीप्रमाणें व चालीप्रमाणें १।२।३ वादींचे घरीं विवाहकर्म चालविण्याविषयीं सर्व मंडळी प्रयत्न करित असतां, संकरजातीचे प्रतिवादी-

---

१ हें प्रमाण यजुर्वेदांत ४ थें अष्टकाच्या तिसरे पन्नामधील तिसरे अनुवाकामध्यें आहे.

१ पंचमुखांच्या पंचदिशा आहेत. श्लोक—सद्योजातं पूर्वदिशिवामदेवंतुदक्षिणे ॥ अघोरंपश्चिमेवक्त्रं तत्पुरुषं चोत्तरेतथा ॥ १ ॥ ईशानंपातुचोर्ध्वायामितिरुद्रयामले विश्वसारोद्धारतंत्रे विश्वकर्म कवचे.

लोक जबरदस्तीनें घरांत शिरून तुम्हीं वेदोक्त कर्म करूं नये, पुराणोक्त करावयास आम्हीं आलों आहों असें म्हणून सर्व लोक मेळवून तंटा केला. इत्यादि गोष्टींविषयीं माजिस्त्रेटसाहेबांकडेस आम्हीं फिर्याद केली. साहेबांनीं चौकशी करून प्रतिवादी लोकांस शिक्षा केली. आणि नुकसानीबद्दल जिल्ह्यास जाऊन फिर्याद करून घेणें म्हणून डेरीची नक्कल दिली; त्यांत लग्नाचे सामान प्रतिवादीनें भ्रष्ट केलें त्या नुकसानीबद्दल रुपये ५५० देण्याविषयीं व पुढें चालणाऱ्या शुभाशुभ कृत्यांत प्रतिवादीनें या ग्रामांत या देशांत वादी लोकांचें घरांत प्रवेश करूं नये याविषयीं सुचविलें आहे.

( याजवर प्रतिवादीनें दिलेले ऍनसर. )

फिर्यादींत सुचविणारे वादी लोकांस ब्रह्मऋषि म्हणण्यास कांहीं संबंध नाहीं. ब्रह्मऋषिवंशांतील म्हणणारा हा वादीचा वंश ब्रम्हवंश होणार नाहीं, त्यास हा वादी पंचमजातीचा आहे; म्हणून वादी लोकांनीं पंचांग सांगूं नये, वेदोक्तांप्रमाणें उपाध्यायपणा करूं नये, असें असून वादी लोक हें कर्म करितात हें फार वाईट आहे. श्रुतिप्रमाणानें व लोकांत प्रसिद्धीनें आम्हींच ब्राम्हण आहोत. समस्त वर्णाश्रम मंडळींचे संपूर्ण कर्म आपले हातानें आम्हीं करीत असतों असें असतां वादी लोक गैरशिस्त चालीप्रमाणें आपलें हातानें विवाहकृत्य करण्याविषयीं यत्न करितात त्यास आमचे हातून कांहीं नुकसान झालें नाहीं, म्हणून जाणविलें आहे.

वादी लोकांनीं दिलेल्या उत्तराचें रिप्लाय.

सद्योजातमुखमासीत् ॥ मनुविश्वकर्मणउद्भवति ॥
वामदेवमुखमासीत् । मयाविश्वकर्मणउद्भवति
अघोरमुखमासीत् त्वष्टविश्वकर्मणउद्भवति.
तत्पुरुषमुखमासीत् । शिल्पिविश्वकर्मणउद्भवति.
ईशानमुखमासीत् । विश्वज्ञविश्वकर्मणउद्भवति.

या वेदवाक्याप्रमाणें सानग ऋषि मनुब्रह्मरूप, सनातन ऋषि मयब्रम्हरूप, अहभून ऋषि त्वष्टब्रम्हरूप, प्रत्नऋषि शिल्पिब्रम्हरूप, सुपर्णऋषि विश्वज्ञब्रम्हरूप याप्रमाणें समजणाऱ्या वंशस्थांनीं वेदाच्याप्रमाणांवरून पुढें सांगितल्याप्रमाणें सदरहू ऋषि यांचीं गोत्रें, सूत्रें, प्रवर आणि शाखा आहेत.

वेदप्रमाण—अयोमनुस्तुऋग्जातंमयोदारुयजुस्तथा ॥ ताम्रंत्वष्टरजः सामशिलाशिल्पीत्वथर्वणः ॥ रौप्यः स्वर्णार्कः प्रणवंपंचब्रह्मविधीयते ॥

याप्रमाणावरून मनु ब्रम्हास लोहांचें काम, आणि ऋग्वेदाचें पारायण; मय ब्रम्हास काष्टाचें काम आणि यजुर्वेदपारायण; त्वष्टब्रम्हास ताम्र धातूचें काम आणि सामवेदपारायण; शिल्पिब्रम्हास पाषाणाचें काम आणि अथर्वणवेदपारायण; विश्वज्ञब्रम्ह यास सुवर्ण रौप्य याचें काम आणि प्रणववेदाचें पारायण या पांचांनीं हींच कामें केलीं असतां लोकांचें संरक्षण होतें.

औपासनमहोरात्रंमनुर्लोहमहाहुतिः ॥ स्वाहासितिरणो-
पृथ्वीतदस्यापिदिनैरपि ॥ भूप्रजापालनं कृत्वासुरासुरा
भिमानुषं ॥ दुष्टशिक्षितशस्त्राणां त्रिविधं विश्वकर्मणः ॥

या श्लोकाप्रमाणें आपले हातानें होमकुंडांत सोने, चांदी, तांबें, लोखंड, काष्ठ इत्यादि पदार्थ घेऊन सर्व देवांच्या नांवांनीं आहुति देण्यास तत्पर असावें, व दुष्ट शिक्षणाविषयीं भाले, तरवारी इत्यादि आयुधें निर्माण करावींत. आणि यजनयाजन अध्ययन, अध्यापन, दान प्रतिग्रह इत्यादि नित्य षट्कर्मे करावींत.

शिल्पिमूलस्तंभ श्लोक.

तिथिरूपंमनोः प्रोक्तंवासरामयसंभवाः ॥ नक्षत्रंत्वष्ट्र
रूपंचशिल्पियोगास्तथैवच ॥ विश्वज्ञकरणं चैवपंचांगेष्वधिदेवताः॥

या श्लोकाप्रमाणें तिथि मनूनें केल्या, वार मयानें केले, नक्षत्रें त्वष्टा यानें केलीं, योग शिल्पीनें केले करण विश्वज्ञानें केले, त्यास आम्हीं पंचांग सांगून उपाध्यायपणा केला असतां कांहीं हरकत नाहीं.

वेदश्रुतिप्रमाण—विश्वब्रह्ममनसाविश्वंकरोति ददाति ब्राम्हणः
सुपर्णऋषिरेवंजानाति ॥ कश्यपब्रह्ममरीचि अत्रि अंगिरस पु-
लस्त्यपुलह पौलस्त्य कश्यपदाक्षिक गर्गनवब्राह्मणेषु विश्वब्रा-
ह्मणब्राह्मणाः ॥ ब्रह्मत्व स्वाहितानें उत्पन्न होतें असें नाहीं.

शिल्पिक श्लोक.

विश्वकर्मकुलेजातागर्भब्राह्मणनिश्चिताः शूद्रत्वंना-
स्तितद्वीजे स्वयंभूविश्वकर्मणः॥

या श्लोकाप्रमाणें विश्वकर्म वंशस्थ लोकांस आपण आईचे गर्भींच असतां ब्राम्हणत्व निश्चयानें आहे, त्यास शूद्रत्व मुळींच नाहीं. यास दृष्टांत—जसें आंब्याचे बीजारोपण केलें त्याचा पिंपळ होईल काय? नाहीं होणार.

विश्वकर्मकुलोद्भूताएकएव सहोदराः ॥ एकयोनि
प्रसूतत्वभेकशाखा प्रवर्धिता ॥ या श्लोकाप्रमाणें वादी लोक एकस्थानीं जन्मले आहेत.

प्रतिवादीविषयीं श्लोक (वज्रसूची)

ऋषिः शृंगीमृगीजातः कौशिकोगाधिनंदनः ॥जंबुकोजंबुको-
त्पत्तिर्गौतमोगौतसंभवः ॥ वाल्मीकः शरभोत्पत्तिरागस्त्यः कुं-
भसंभवः ॥ व्यासोलुब्धकसंभूतो वासिष्ठउर्वशीसुतः ॥ नारदो-
रजकीपुत्रः कौंडण्यो मंडूकीसुतः ॥ सांख्यःश्वपचसंभूतोगार्गेयो
गर्दभीसुतः ॥ शुनकीगर्भसंभूतः शौनकस्तुमहामुनिः ॥

---

१ या श्लोकांचें भाषांतर बरोबर झालें नाहीं. २ त्रिशूल, सुदर्शन, वज्र वगैरे शिवाय पांची कर्मांचाही योध होतो.

श्लोक

देवोमुनिर्द्विजो राजा वैश्य शूद्र बिडालकाः ॥
पशुर्म्लेछश्चचांडालोदशविप्राः प्रकीर्तिताः ॥

प्रतिवादीचे रिप्लायांत असें आहे कीं, सदरहू ऋषि लोकांची उत्पत्ति वादींचे रिप्लायांत सुचविल्याप्रमाणें जरी असली तरी वादींचा वंश ब्रह्मबीज ह्मणण्याविषयीं जें वादी लोकांचें वेदवाक्य आहे, तें खरें ह्मणण्यास भारतादि संपूर्ण पुराणांत विश्वब्रह्म अति वरिष्ठ ह्मणण्यास जागा मिळणार नाहीं. आह्मीच श्रेष्ठ म्हणून पूर्वीं राजादिक लोकांनीं आह्मांस मान्य करून सर्व जहागिरी वगैरे दिल्या आहेत ह्मणून सुचविलें आहे.

कोर्टनिवाडा.

१. या नंबराचा खटला वेदश्रुतीप्रमाणें कोर्टानीं चांगल्या प्रकारें, तपासतेवेळीं श्रुतिप्रमाणांनीं व शास्त्रोक्त प्रमाणांनीं, वादींचें 'आह्मींच विश्वब्राह्मण,' असें ह्मणणें सिद्ध होतें. प्रतिवादी लोक हे संकर जातीय ह्मणण्यास पुष्कळ आधार आहेत.

२. प्रतिवादींनीं आह्मीं ब्राह्मण आहों म्हणून ऐन्सरांत सूचना केली आहे. वादी लोक हे पंचम जातीचे आहेत म्हणून सांगतात, परंतु तें खरें होण्यास कांहीं वचनप्रमाण सांगण्यास आधार नाहीं, तर वादींनीं सांगितलेलें शास्त्र अगदीं नवीन आहे. ( उगींच कांहीं तरी एक वचनें आहेत ) असा आक्षेप करण्यास सामर्थ्य नाहीं, त्यामुळें वादींनीं सांगितलेलीं वेदवचनें वगैरे बिलकुल फेरफार होऊं शकत नाहींत.

३. पुराणामध्यें प्रतिवादींच्या पूर्वोक्त ऋषि लोकांच्या उत्पत्तिविषयीं यच्चावत् शोध करितां, वादींचे रिप्लायांत वज्रसूचि इत्यादि श्रुतिवाक्यांत व वेमण्णा[३]वाक्यांत वगैरे असल्याप्रमाणें सर्व ठिकाणीं आधार आहे, असा अभिप्राय होतो. सदरहू प्रतिवादी ऋषि लोकांस सदरहू रिप्लायांत सांगितलेले १५ ऋषि हे आमचे पूर्वज नव्हत, असें म्हणून उलट होण्यास देखील शक्ति नाहीं. ब्रह्मबीजापासून उद्भव झाला असें ह्मणावें, तर ब्राह्मण कधींही नीच जातींतील जीवजंतू वगैरे यांस मिळून राहणार नाहींत, असें जर खरें असतें तर ऋषींचे मूळ सांगू नये, म्हणून पुराणांत सांगितलें असणार नाहीं.

४. विप्र लोकांस गोत्रप्रवर ह्मणजे उत्पत्ति शास्त्र पूर्वोक्त चांगलें सिद्ध होण्यासाठीं सदरहू जिल्हा सदर अमीन पंडित शास्त्री लोकांकडून सवालनामा लिहून आणविला त्यांतही वर जाणविलेल्या १५ ऋषि लोकांचीं उत्पत्तिस्थानें एकंदर प्रमाण आहेत. या पृथ्वींतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, इत्यादि जातिनिर्णय आहे. त्या सर्व जातींत मागें पुष्कळ दिवसांपूर्वीं हे ऋषि लोक उत्पन्न झाले आहेत. अशा प्रकारच्या ऋषिवंशस्थ लोकांना ब्रह्मवंश ह्मणावें हा न्याय नव्हे. कारण कांहीं आधार नाहीं.

---

* या श्लोकांच्या तेलगी लिपींत असलेल्या अर्थाचें भाषांतर श्लोक स्पष्ट असल्यामुळें लिहीत नाहीं.

१. हा श्लोक पद्मपुराण उत्तरखंड अधिक महात्म्य अध्याय ४यांत आहे. २. उत्तरांत (जबानींत).

३. वेमण्णा नांवाचा तद्देशीय कोणी प्रख्यात सत्कवि असावा त्याचें वाक्य यांत घेतलें आहे.

५. प्रतिवादी लोक सर्व जातींत उंच ह्मणावे तर ब्रह्मसृष्टीही किंचित् नसून त्यांतही सर्वांनीं श्रेष्ठ कर्माचरणानें राहिलें पाहिजे, तर तें असें कांहीं एक नसतां जोगी, जंगम, भिकारी, यांसारखें मागून खातात; त्यांना श्रेष्ठ ह्मणणें होणार नाहीं.

६. वादी लोकांनीं दस्तऐवज दाखल केलेले वेदशास्त्र एकंदर तपास करून पाहतां तेंच वेदशास्त्र उभयवादी पारायण करीत असतात. तथापि या वेदांतील एका ओळींत अथवा एका अक्षरांत प्रतिवादीस आणि त्या अगोदरचें ऋपींस वर्णाश्रम कशासंबंधें आहे असें दिसत नाहीं. अगोदरचे ऋषि लोक प्रसिद्ध झालेले नीच जातींत जन्मलेले असतां, त्यांचे वंशस्थ प्रतिवादी लोकांस श्रेष्ठ ह्मणणें हा शास्त्रविचार नव्हे, असें समजण्यांत येतें. पूर्वीं राजे लोक अविवेकी, दौलतदार, अल्पबुद्धिमान्, कपटानें नानाप्रकारच्या खोडसाळी करून गुरुत्वाचा अभिमान आजपर्यंत ठेवीत आले आहेत. तर अशीं खोटीं कृत्यें शोधन करून वर्णाश्रमाप्रमाणें संरक्षण करण्यास गवर्नमेंन्ट मुखत्यार आहेत.

७. वादी लोकांच्या फिर्यादींत व रिप्लायांत सांगितलेल्या वेदप्रमाणांवरून पंचमुखोद्भव ब्रह्मसृष्टि पंरपरा वंशस्थांस पृथ्वीसंरक्षणासाठीं आज्ञा, आणि श्रुतिवाक्याप्रमाणें आणि समस्त आधारानें ब्रह्मकर्म करून पंचविध कर्मे करण्याविषयीं ( लोकसंरक्षणार्थ ) ईश्वररूप आकाशादि पंचभूतें सर्वत्र व्याप्त आहेत. तशींच वादी लोकांचीं पंचकृत्यें जगत्रयादि सर्व पृथ्वींतील मुंगी आदिकरून सर्व जीवजंतूंस आधार असून तीं सर्वत्र व्याप्त आहेत. याप्रमाणें वेदसंमतानें प्रत्यक्ष ब्राह्मण म्हणण्यास पाहिजे तेवढा तृप्तिकार झाला आहे.

८. भारतादि कल्पित पुराणांत विश्वकर्मा यास थोडें निकृष्टपण लिहिल्याची चौकशी करितांना, वादीस निश्चय झालेले क्रम सर्व आहेत. प्रतिवादी लोक हें पाहून उगें न राहूं शकतां, खोतबागीच्या चिठ्या घालण्यासारखें मनांत धुसधुसीत आहेत; असें असलें तरी सर्व शास्त्रांत साक्ष असतां, वेदांत श्रेष्ठ असतां पुराणांतील गोष्ट खरी कोणी मानणार नाहीं.

९. फिर्यादींत सांगितल्याप्रमाणें वादीच्या घरांत प्रतिवादी लोक जमा होऊन, त्यांनीं लग्नाचे मुहूर्तास हरकत केली. व हरकत केल्याबाबत फिर्यादींत जाणविलेली रक्कम वादीस नुकसानी झाली आहे, असें वादीचे साक्षीदार १ नागूजीराव, २ रामरावमुदली, ३ व्यकंटराम नायडू, इत्यादि पंधरा जणांचे साक्षीवरून, व माजिस्त्रेटाची नक्कल आल्यावरून लग्नाचे सामानाची नुकसानी ५५० ( पांचशेंपन्नास ) रुपये, आणि याचे खालीं जाणविलेले कोर्ट खर्चासह वादीस प्रतिवादीनें देणें; आणि वादी लोकांनीं वेदोक्त वगैरे आपल्या असलेल्या चालीप्रमाणें सर्व वेदाध्ययनें करून शुभाशुभ वगैरे जें कांहीं असेल तीं कर्में चालवीत येणें; आणि प्रतिवादी लोकांनीं त्यांत प्रवेश करूं नये. ( याप्रमाणें फैसला झाला आहे. ) ता० १५ दिसेंबर सन १८१८ इसवी.

---

१. लोह, काष्ट, ताम्र, शिला, सुवर्ण, इत्यादि कर्में कर्नाटक, तैलंग, द्रवीड, एतद्देशीय विश्वब्रह्म लोक ही पांचही कर्मे करितात. दक्षिणेकडील विश्वब्रह्म लोक बहुधा सुवर्णकर्म करितात.

२. पुराणांचा भरणा.

| रु० | वादीचा खर्च. | रु. | प्रतिवादीचा खर्च. |
|---|---|---|---|
| ५०। | स्टांपकागद. | १५। | स्टांपकागद. |
| २७॥ | वकील फी. | २७॥ | वकील फी. |
| ९ | समन्स भत्ता. | ६ | समन्स भत्ता. |
| ९ | साक्षी भत्ता. | ५ | साक्षी भत्ता. |
| ९१॥। | एकूण रुपये. | ५३॥। | एकूण रुपये, |

साहेबांची इंग्रेजी सही.

---

That the Brahmathvam of the Visvabrahmana community was held a Bōnā fide one and accordance a judgment was passed there upon by the District Judge of the Chittore Zilla Adault Court in O. S. No. 205 of 1818, which dicision of the learned Judge was also confirmed by the Honourable Judges of the High court of Judicature Madras in the year 1820.

भाषांतर—विश्वब्राह्मणवर्णांत ब्रम्हत्व पाळतात हें योग्य आहे असा चितूर जिल्ह्यांतील अदालत कोर्टाचे डि. जज्ज यांनीं सन १८१८ चा ओ. एस. नंबर२०५ यांत निवाडा केला आहे व हाच निवाडा सन १८२० सालीं मद्रासचे नामदार हायकोर्ट यांनींही कायम केला आहे.

सन१८१८चा निवाडा करण्याचे पूर्वीं चित्तूर जिल्हा अदालत गवर्नमेन्ट जज्जसाहेब बहादूर यांनीं सभा करून त्या सभेंत वादीतर्फे पंडित मार्ग सहाचार्य, आणि प्रतिवादीतर्फे पंचांग गुडय्या, या परस्परांचा श्रुतिस्मृत्यादि संमतांनीं संवाद होऊन शेवटीं पंचांग गुंडय्या वगैरे प्रतिवादी लोक निरुत्तर झाले, नंतर त्याच सभेंत हा निवाडा केलेला आहे. त्या संवादाचें पुस्तक निवाड्यासहित तद्देशीय ( मद्रास येथील ) विश्वब्रह्मवंशस्थ पंडित लोकांनीं तैलंग लिपींत छापिलें आहे.

आणखी या पंडित मार्गसहाचार्यांनीं श्री शंकराचार्य ग्यांच्यांशीं संवाद करून विश्वकर्म संततीय लोकांकडून शंकराचार्याला दक्षिणा घेण्याचा हक्क नाहीं असा निर्णय केला आहे.

## निवाडा २ रा.[1]

श्री शंकराचार्य ह्मणतात आम्हांस सर्व देशामध्यें सर्व जातीचे लोक खंडणी देतात आणि आह्मी येथें येऊन चार दिवस झाले आमचेकडेस तुह्मी आला नाहीं व आम्हांस कांहीं विचारलें नाहीं, दक्षिणा दिली नाहीं याचें कारण काय?

या प्रश्नाचें पंचाल ब्राह्मण तर्फे पंडितमार्ग सहाचार्य यांचें उत्तर—आह्मांस वेदोक्त कर्माचा अधिकार असून तुह्मांस खंडणी देण्याचें कारण नाहीं, उलट आह्मांसच तुम्ही खंडणी दिली पाहिजे, यांस प्रमाण आहे.

---

१ हा निवाडा तैलंगी असल्यामुळें भाषांतर साधारण झालें आहे.

शं० यांचा प्रश्न—त्याचें कारण काय ?

पंचाळ ब्राह्मणतर्फे पंडित मार्ग सहाचार्य यांचें उत्तर—श्रुति प्रमाण आहे **अरण प्रश्न १० अ.१७—२१ ऋक्१—सद्योजातं प्रपद्यामि०** या वचनावरून सद्योजात मुखापासून मनुब्रम्ह उत्पन्न झाला त्याचे संततीचे लोक लोहकाम करणारे असून त्यांना लोहकार म्हणतात त्यांना ऋग्वेदाचा अधिकार आहे. ऋक्२— **वामदेवायनमो०** या वचनावरून वामदेव मुखापासून मय ब्रम्ह, त्याचे संततीचे लोक दारुकार असून त्यांना यजुर्वेदाचा अधिकार आहे. **ऋक्३—अघोरेभ्यो०** या वचनावरून अघोर मुखापासून त्वष्ट्र ब्रम्ह त्याचे संततीस ताम्रकार म्हणतात, त्यांना सामवेदाचा अधिकार आहे. **ऋक्४—तत्पुरुषायवि०** या वचनावरून तत्पुरुषमुखापासून शिलाकार शिल्पी, त्यांना अथर्वण वेदाचा अधिकार आहे. ऋक् ५—**ईशानःसर्व विद्याना०** या वचनावरून ईशानमुखापासून विश्वज्ञब्रम्ह, त्यांना प्रणव वेदाचा अधिकार आहे. आणखी प्रमाण **यजुर्वेद अ. ३ प. ३ अ. ८** यज्ञपतिमृषय एनसाआहुः । **प्रजानिभक्ता अनुतप्यमानाः ॥ मधव्यौस्तोका वपतौरराध । सन्नस्ताभ्यां२सृजतु विश्वकर्मा ॥ १ ॥ घोराऋषयोनमो** अस्त्वेभ्यः । **चक्षुषएषां मनसश्चसंधौ ॥ बृहस्पतये महिषद्युमन्नमः ॥ नमो विश्वकर्मणे सउपात्वस्मान् ॥ २ ॥ अनन्यान् त्सोमपान्मन्यमानः । प्राणस्यविद्वान् त्समरेनधीरः॥ एनश्चकृवान् महिबद्धएषां । तंविश्वकर्मन् प्रमुंचास्वस्तये ॥३॥ ये भक्षयंतोनवसून्यानृहुः । यानग्रयोऽन्वतप्यंतधिष्णियाः ॥ इयंतेषामवयादुरिष्टयै । स्विष्टिंनस्तांकृणोतु विश्वकर्मा ॥ ४ ॥ नमःपितृभ्योअभियेनोअख्यन् । यज्ञकृतोयज्ञकामाः सुदेवाः ॥ अकामावो दक्षिणां ननीनिम । मानस्तस्मादेनसःपापयिष्ट ॥ ५॥** ह्या शिवाय **आणखी श्रुतिप्रमाण यजुर्वेद** अ० ५ प० ५ अनु० ६.

विश्वकर्मा दिशांपतिःसनः पशून्पातु सोस्मान्पातु तस्मैनमः प्रजापती रुद्रोवरुणोग्निर्दिशांपतिःसनः पशून्पातु सोस्मान्पातु तस्मैनम एतावैदेवता एतेषां पशूनामधिपतयस्ताभ्योवा एष आवृश्चतेयः पशुशीर्षाण्युप दधाति हिरण्येष्टका उपदधात्ये ताभ्यएवदेवता भ्योनमस्करोति ब्रम्हवादिनः॥ शिवाय आणखी उपनिषद्वाक्य प्रमाण श्रुति—विश्वकर्मणो वैकामायः प्रजामस्य याजयंति विश्वकर्मा विश्वप्राणो जायंते पुनःनमः ॥ सर्वेंद्रियाणि० ॥ पृथ्वी विश्वकर्मश्च दारुणि विश्वकर्मणः रुद्रो जायते विश्वकर्मणः । नारायणो जायते विश्वकर्मणः। द्वादशादित्या जायंते विश्वकर्मणः । पशवः सर्वाणिचंद्राणि विश्वकर्मणः। विश्वकर्मणः। विवासमुद्रंते विश्वकर्मणः प्रभवर्द्धते विश्वकर्मणः। ब्रम्हस्य विश्वकर्मणः। रुद्रस्य विश्वकर्मणः । विष्णो विश्वकर्मणः । चक्रस्य विश्वकर्मणः । तिथिश्च विश्वकर्मणः । अग्निश्च विश्वकर्मणः । अंतर्बहिश्च विश्वकर्मणः । विश्वकर्मणवेदं स्वरं यद्भूतं यच्चभव्यं ॥ निष्कलतो निरंजनो निर्विकल्प निराकृतिशुद्धो दैवतो विश्वकर्मणः ॥ आणखी श्रुति यजुर्वेद अ० ७ प्र० १ अ० ५ आपोवा इदमग्रे सलिलमासी त्तस्मिन्प्रजापतिर्वायूर्भूत्वा चरत्सइमा मपश्यत्तांवराहो भूत्वाहरत्तां विश्वकर्माभूत्वा व्यमार्ट्साप्रथत सापृथिव्यभवत्त त्पृथिव्यै पृथिवित्वं तस्यामश्राम्यत्प्रजापतिः सदेवान सृजत वसून्रुद्राना दित्यांते देवाः प्रजापतिममब्रुवन्प्रजाया महाइति सोब्रवीत् ॥ ह्या शिवाय यजुर्वेद अष्टक

३ प० २ अश्वमेधयज्ञप्रकरण याचें विद्यारण्य भाष्य तुह्मी आणून पहा, त्यावरून विश्वकर्मसंतति मनु, मय त्वष्टा, शिल्पी, विश्वज्ञ यांस षोडश संस्कार व षट्कर्माधिकार आहे हें स्पष्ट कळेल. आतां तुमचे लोक ( हस्तभ्रष्ट स्वरभ्रष्ट वर्णभ्रष्ट स्तथैवच ) या वचनावरून ग्रामकंटक दोषी आहेत म्हणून ते त्रिकाल स्नानसंध्या, गायत्री हृदय, गायत्री माला, गायत्री कवच, गायत्री रामायण, अजपा गायत्री हे मूल मंत्र वगैरे बीजाक्षर वेदार्थ सर्व शिकले आहेत, आणि आमचे लोक इतके विद्वान नसल्यामुळें तुह्मी आह्मांस खंडणी मागतां आणि आह्मी ब्राह्मण आहों, तुह्मी ब्राम्हण-नाहीं, तुह्मांस वेदाधिकार नाहीं, असें सांगतां परंतु तुम्हांस ब्राम्हण असें कोणत्या ग्रंथांत सांगितलें आहे असें म्हणाल तर ( उपनिषद्वाक्य—अंत्यजातिद्विजातिश्चएक योनिसहोदरः ॥ एकयोनिप्रसूतश्च एकशाखेन जायते ॥ ) या वचनावरून ग्रामकंटक लोक वर्णभ्रष्ट, (कुलभ्रष्ट) आहेत, त्यांच्यांशीं आह्मीं भाषण केलें असतां त्वष्ट्र ब्रम्हाचे गादीस बट्टा लागेल किंवा पांच वेदाचे विरुद्ध होईल म्हणून आमचे मनास फार वाईट वाटतें. तुह्मी विप्रलोक ग्रामकंटक असल्यामुळें तुम्हांस वेदाचा अधिकार नाहीं आणि शिवाय तुमचें भाषण वेदशास्त्रविरुद्ध असल्यामुळें तुह्मी गोहत्या, ब्रम्हहत्या, स्त्रीहत्या, भृणहत्या, इत्यादि पंचमहापातकी आहांत, त्यांचें निवारण ऋग्वेद छंदोकांड पत्र २ अनु० ५ पन्ना० ३ प० १५० या मध्यें सांगितलेल्या विधिवरून आम्ही निवारण करावें परंतु तुम्ही ग्रामकंटक विप्रलोक ब्राह्मण ह्मणून सांगतां, प्रेतपिंडश्राद्ध भोजन करतां आणि दुष्टदानप्रतिग्रह घेतां म्हणून फारच दोषी आहां यांस प्रमाण —( पौरोहित्यं रजानिजनितंग्रामनित्यंनियोगं । मठपत्यंअनृतवचनं साक्षवादंपरान्नं । बालद्वेषंमहादेवा पशुपतिममजन्मांतरेषु ॥ ) या स्मृतिवाक्यावरून तुम्हां दोषी लोकांस प्रायःश्चित्त नाहीं. ज्यांनीं षण्मत स्थापन केलें तो त्वष्टा विश्वकर्मवंशांत उत्पन्न झाल्यामुळें शंकराचार्याचें नांव आम्हांस आहे. तुम्हांस नाहीं.

विश्वब्रह्मापासून उत्पन्न झालेले पांच वेदांचे स्वामित्व आह्मांस आहे, हें तुह्मी न जाणतां ब्रम्हदेवाच्या चार मुखापासून चार वेद उत्पन्न झाले आणि ब्रम्हदेवानें सर्व सृष्टि केली असें सांगतां, परंतु ब्रम्हदेवाच्याउत्पत्तीविषयीं प्रमाण ( मूळस्तंभ—ह्वीनेत्रं द्विकर्णंच द्विभुजंच द्विपादयोः ॥ एतदांगं स्वरंनास्ति किमर्थं जन्म निर्मितं ) या प्रकारें उत्पन्न झाला आहे. किंवा सदरील चार मुखाचा ब्रम्हदेव आणि सर्व सृष्टि कोठें उत्पन्न झाली असें ह्मणाल तर, सर्व सृष्टि विश्वकर्म्यापासून उत्पन्न झाली असें वेदप्रमाण आहे, आणि ( यदा कर्म तदा रूपं यथा बीजं तथांकुरं ॥ यथा पिता तथा पुत्रो लोकानां वर्तमानयोः ) या वचनावरून कर्म करावें तसें फळ मिळतें, बीज पेरावें तसा वृक्ष होतो. जसा बाप असेल तसा पुत्र होतो, असा लोकांत व्यवहार आहे. आणखी प्रमाण ( लोके लोके न मृत्युंतं तत्कर्म सर्व भव्ययोः ॥ ज्ञानमार्गे सदृश्येतु सर्व विश्वज्ञ सृष्टितु ॥ वेदवाक्यमिदं सत्यं असत्यं ब्रह्मनिर्मितं ॥ ) यावरून जगांत जें दिसतें आहे त्यावरून सर्व उत्पन्न होतें, परंतु ज्ञानमार्गानें पाहिलें असतां सर्व विश्वकर्म्यापासून उत्पन्न झालें आहे; चतुर्मुखब्रम्हदेवापासूनसृष्टि

झाली हें म्हणणें असत्य आहे, कारण ( वेदवाक्यपरं ब्रम्ह वेदवाक्यं विसर्जयेत् ॥ श्रुतिभ्रष्ट मतिभ्रष्ट असत्यं ब्रम्हजन्मनि ॥ ) या वचनावरून जो वेदवाक्य खरें न मानतां वेदवाक्य सोडून देतो तो वेदभ्रष्ट बुद्धिहीन असून तो ब्राह्मण नव्हे असें समजावें. तर तुह्मी वेदशास्त्र वाक्य प्रमाण सोडून विश्वकर्म्यास दूषण देतां म्हणून तुह्मी ग्रामकंटक लोक ब्रम्हकंटक आहांत यास प्रमाण--( असत्यं पक्षपातंच निर्मलातंच पंचकं ॥ ज्ञानद्रोही कुलद्रोही एतेषु ब्रम्हकंटकं ॥ ) या वाक्यावरून पंचमहापातक्यांत तुमची गणना होते.

आणखी (ब्राम्हणोभगवान्रुद्रः क्षत्रियो परमोहरिः॥वैश्यः पितामहश्चैव इंद्रःशूद्रोभिजायते ) या वाक्यावरून इंद्र हा शूद्र असल्यामुळें शूद्रांनीं वेदाक्षर ऐकूं नये, ह्मणूं नये, म्हणून पूर्वीं ऋषींनीं गुप्तयज्ञ केला. कारण शूद्रांनीं वेद ऐकले तर ते शिकतील आणि विश्वकर्म संतति लोक मात्र ब्राह्मण आहेत आणि हे विप्र लोक ग्रामकंटक आहेत असें सर्व जातींस कळेल म्हणून दुसरे कोणी वेद शिकूं नये, त्यांनीं पुराणोक्त कर्म करावें अशा प्रकारचीं वाक्यें रचून तीं वाक्यें प्रबंध कल्पना पुराण वगैरे ग्रंथांत प्रसिद्ध केलीं आहेत. परंतु चारी वेद, विद्यारण्य, भाष्य, शास्त्र, पुराण, व्याकरण, मीमांसा, अष्टादश पुराणें, वगैरे मोठे ग्रंथ पाहिले असतां हे ऋषिवेष धारण करणारे लोक ग्रामकंटक आहेत व विश्वकर्मसंततीय मुख्य ब्राह्मण आहेत असें तुह्मांस कळून येईल. वेदाचे अधिकारी कोण?असें तुह्मी ह्मणाल तर प्रमाण श्रुति--(ब्राह्मणोस्यमुखमासीद्बाहूराजन्यक्रुतः॥ ऊरूतदस्ययद्वैश्यःपद्भ्यां शूद्रोअजायत ) या प्रमाणावरून मुखापासून उत्पन्न झालेले श्रेष्ठ ब्राह्मण आह्मी आहोंत आणखी प्रमाण-(तिथिरूपंमनोःप्रोक्तं वासरामयसंभवाः ॥ नक्षत्रंत्वाष्ट्ररूपंचशिल्पियोगस्तथैवच ॥ विश्वज्ञ करणंचैवपंचांगमधिदेवताः॥) आणखी प्रमाण.( पृथ्वीरूपंमनुप्रोक्तं आपोरूपंमयस्तथा । तेजोर्भावातित्वष्टाचवायुशिल्पीतथैवच ॥ विश्वज्ञाकाशसंयुक्तं पंचभूताधिदेवताः ॥ )। या आगम सिद्धांतावरून लोह, काष्ट, ताम्र, पाषाण, सुवर्ण, पंचशिल्पकर्ते आह्मी असून स्वयंभू विश्वकर्मसंततीचे लोकांत षट्कर्म, षोडशकर्म पूर्वींपासून आजपर्यंत चालत आहेच. आणखी--( सूर्यचंद्रौच विश्वज्ञोचक्षुर्द्वयमजायत ॥) या वाक्यावरून सूर्योदयकाल आणि चंद्रोदयकाल असे दोन काल विश्वज्ञानें उत्पन्न केले असा वेदाचा अर्थ आहे तो तुह्मी न समजतां स्वयंभू विश्वकर्मसंततीय आह्मी असून आह्मांस वेदाधिकार नाहीं ह्मणतां. परंतु ब्राम्हणोस्य०या श्रुतीवरून विश्वकर्म मुखापासून झालेल्या ब्राम्हणांसच वेदाधिकार आहे आणखी अथर्वण वेदामध्यें बीजाक्षर असें आहे कीं(ॐ अं, व्यं, ढुं, क्लीं, जं, मौं ) या बीजाक्षरांपासून गायत्री२४अक्षरी उत्पन्न झाली त्या गायत्रीचा अधिकार आम्हांसच असल्यामुळें आमचीं पंचकृत्यें आहेत म्हणून देवांचे पौरोहित्य आह्मींच केल्यामुळें आमचा स्मार्त सांप्रदाय आहे, ही गोष्ट कधीं झाली असें म्हणाल तर श्रुति--( विश्वरूपोवैत्वाष्टः पुरोहितोदेवानामासीत्० ) यावरून त्वष्टा देवांचा पुरोहित होता आणि देवब्राम्हणांचीं सर्व शिल्पें आम्ही करून सृष्ठि उत्पन्न केली आहे म्हणून विश्वब्राम्हण असें आम्हांस नांव आहे या वेदवाक्यावरून आम्हांस वेदाधिकार असतां हे ग्रामकं-

टक लोक नांवें ठेवतात परंतु ते ऋषिकुलोत्पन्न आहेत ते ऋषि—शांडिल्य, मांडव्य, मांडूक, वात्स्य, कौंडिण्य, वालखिल्य, हारीत, पिप्पल, सांख्य, वरतुंडि, गालव, बकदालभ्य, गौतम, शुक, कौशिक, पराशर, नारद, जमदग्नि, पालवान, शमिक, वाल्मिक, भूपाल, कपिल, कलश, भृंगी, भृत, मातंग, गार्गेय, श्रीवत्स, इत्यादि ऋषिवंशस्थ ग्रामकंटक असून त्यांना गोत्रें वगैरे आहेत. परंतु ( शाखारंडःसविज्ञेयःसर्वकर्म बहिष्कृतः ) या वचनावरून पांच वेदांचा अधिकार त्यांना नाहीं. आणि मनु, मय, त्वष्टा, शिल्पी, विश्वज्ञ या विश्वब्रम्ह संततीस सानग, सनातन, अहभून, प्रत्न, सुपर्ण ही गोत्रें व आश्वलायन, आपस्तंब, दाक्षायण, बौधायन, कात्यायन हीं सूत्रें; ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वणवेद, प्रणववेद, हे पांच वेद आणि सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष, ईशान हे प्रवर आहेत, यावरून वेदांचे मुख्य अधिकारी आम्ही असतां तुम्ही आम्हांस खंडणी मागतां हें न्याय शास्त्र विरुद्ध आहे. सामवेदप्रमाण—(आचार्योशांकरोनामआदिब्रम्हकुलोद्भवाः ॥ विप्रकुलगुरुर्दीक्षा त्वाष्ट्रब्रम्हा न संशय : ॥ ) या वाक्यावरून शंकराचार्य स्वामीचें सरस्वतीपीठ निश्चयेंकरून त्वष्टब्रम्ह यांचें आहे. आणखी खांडववनामध्यें बृहस्पतीनें विराट् पुरुषाचें पुष्कळ काळपर्यंत आराधान केलें, पुढें तीन दिवस अगदीं कठीण तप केलें, त्यानंतर तिसऱ्या दिवशीं दोन घटिकांनीं विराट रूप पाहिलें, त्यावेळीं सामवेदापासून---(अँ क्लीं ग्रीं श्रीं प्रं कां मौं टं ठं शं क्लं हं अं यं ) अशी १४ बीजाक्षरें ॐकारापासून उत्पन्न झालीं आणि त्या ॐकारांत अकार उकार मकार म्हणून बीजाक्षरें आहेत त्यांत उकारापासून अथर्वण वेद उत्पन्न झाला. त्या वेदापासून बीजाक्षरें ( घं घं घं घं घं ठं ठंठं ठं ठं भं भं भं भं भं ) उत्पन्न झालीं, त्यांपासून शब्द स्पर्श रूप रस गंधादि उत्पन्न झाले. या विषयीं महाभाष्यामध्यें प्रमाण आहे आणि विद्यारण्य भाष्यांतही सांगितलें आहे, तें भाष्य वगैरे पाहिलें असतां विराट ह्मणजे विश्वब्रह्म त्या विश्वब्रम्हाच्या पंचमुखांपैकीं अघोर मुखापासून त्वष्टब्रह्मा उत्पन्न झाला, तो त्वष्टापुरोहित ह्मणजे देवांचा गुरु असल्यामुळें शंकराचार्य पीठ त्याचेंच आहे आणखी यांस पुराणाचेंही समंत आहे ते( भारतं पंचमो वेदः ).त्या भारतांत भगवान् श्रीकृष्णानीं अर्जुनास बोध केला त्यांत ह्मटलें आहे (प्रणवं सर्व वेदेषु शद्धंखे पौरुषंनृषु॥) यावरून बीज ओंकार आहे, त्या ओंकारापासून ब्रम्हबोध शंकरानीं पार्वतीस केला आहे. त्याचा मूळ मंत्र (ॐऱ्हीं )त्या मूलमंत्रापासून पंचाक्षरी मंत्र (ॐनमःशिवाय) हा मंत्र विश्वब्रह्मापासून उत्पन्न झाला तो नाना गोत्रांत उत्पन्न झालेल्या ऋषींनीं उपदेश करून घेऊन थोडें तप केलें म्हणून त्यांना ऋषि हें नाम प्राप्त झालें, परंतु ब्रम्हर्षि हें नांव त्यांना नाहीं. तें नाना ऋषि गोत्रोत्पन्नग्रामकंटक लोक, पिपीलिकापासून ब्रम्हांपर्यंत सृष्टि स्थितिलय कर्त्ता, यज्ञकर्ता, यज्ञभोक्ता, सकल चराचर पोषणकर्ता, ( विराटरूपो नारायणाख्य ) असे श्रुतिप्रमाण असतां तुम्ही गुरु म्हणवितां हें तुमचें बोलणें न्यायविरुद्ध आहे कसें म्हणाल तर, सन्याशी यांची वर्तणूक लिहिल्याप्रमाणें एक दिवसांत एक अहोरात्रांत सप्तग्राम संचार करून भिक्षा करून असावें असें असतां तुम्ही एका गांवांत

सप्तरात्री, दशरात्री, एकपक्ष व एक मासपर्यंत वास करतां आणि पालखींत किंवा गाडींत बसणें अनेक लोकांचें भाषण ऐकणें, छत्र, चामर, गज, तुरंग व अनेक शूद्र समूह घेऊन देश संचार करणें हें शास्त्रविरुद्ध आहे; कारण याविषयीं श्रुतिप्रमाण नाहीं व ३२ उपनिषदांमध्येंही प्रमाण नाहीं आणखी सन्याशी लोकांनीं उदकाकरितां मृण्मय पात्र कमंडलु घ्यावा असें असतां विश्वब्रम्ह लोकांनीं केलेल्या पंचपात्री, पळी व संपुष्ट वगैरे घेऊन स्नान संध्यानुष्ठान करणें हें अज्ञान आहे व शास्त्रविरुद्ध आहे. शिवाय संन्याशी लोकांनीं रुपये वगैरे द्रव्यास स्पर्श करूं नये असा न्यायसिद्धांत असतां विश्वब्रम्हापासून उत्पन्न झालेल्या नवलोह मिळून मोहरा व होन, रुपये आणि मोठी शाल दुपट्टे व नवरत्न भूषणें करून पुष्कळ पैसा जमवून खजिना भरून ठेवतां हें अज्ञान व शास्त्रविरुद्ध आहे. असें असून तुम्ही शंकराचार्यांचे पीठाधिकारी व संन्याशी म्हणून देशामध्यें संचार करावा आणि आम्हांस खंडणी मागावी हें शास्त्रविरुद्ध आहे. आतां ग्रामकंटक लोकांस प्रायश्चित्त म्हणजे पंचप्रणव सोडावें त्याचा निर्णय श्रुति यजु० अ० ७ पन्न ४ अ० २ प० ३ प० ३५–५० पंच पूर्वार्चितो० आणि विद्यारण्य भाष्य सिद्धांतानें अमावास्या, पिंडश्राद्ध, हीनप्रतिग्रह वगैरे दोषांबद्दल यजु० अ० ५ प० ५ अ० ९ पन्न ६ पद ४५ मध्यें सांगितल्याप्रमाणें प्रायश्चित्त करावें. असा विधि आहे. हा निर्णय विश्वब्रम्ह कुलोत्पन्न पंडित मार्गसहाचार्य यांनीं वेदशास्त्र वगैरे सिद्धांताधारें केला आहे, शके १७९७ प्रवर्तमाने सुभानुनामसंवत्सरे वैशाख कृष्ण द्वादशी भौमवार. या निर्णयाची अस्सल मूळ प्रत ( पांचाल भीमाचार्य मु० गदवाल, इ० मद्रास, यांचेजवळ आहे. आणि पहिली प्रत मु० कन्हड, ता० उप्पळ, इ० निजाम येथें शरबाण्णा कदरगार यांचे घरीं आहे.

असो—**मणिर्लुठति पादाग्रेकाचः शिरसिधार्यते ॥**
**क्रयविक्रयवेलायां काचः काचोमणिर्मणिः ॥ १॥**

अर्थ—कोणी एका चतुरानें कांचेचा बिजवरा कपाळीं बांधून हिऱ्याची मुद्रिका चरणांगुष्ठांत घातली, तथापि बाजारांत हिऱ्याचीच मान्यता होऊन उलटें लेणाराचें चातुर्य मात्र दिसून येतें. असूयाभिमानी लोकांनीं दुसऱ्याचें महत्व आणि वृत्ति हरण करण्याच्या हेतूनें विश्वब्रह्मवंशीय लोकांशीं विनाकारण शेंकडों तंटे बखेडे जरी केले तथापि. न्यायाचे वेळेस विश्वब्रह्मवंशस्थांचेंच ब्राम्हण्य सिद्ध होतें. आणि तंटे करणारांची उलट द्वेषबुद्धि मात्र दुसऱ्याच्या दृष्टोत्पत्तीस येते म्हणून कोणींही कोणाशीं द्वेशबुद्धीनें कलह करूं नये.

पुढील निवाडा पहा.

---

## निवाडा ३ रा.

## कोर्ट अदालतचा फैसलनामा जिल्हा चितूर.

### फिर्याद नंबर २५४ तारीख १० जुलै सन् १८१७ ईसवी.

| वादी लोकांचीं नांवें | नंबर. | प्रतिवादींची नांवें. | नंबर. |
|---|---|---|---|
| वेल्लयाचार्य | १ | अरुणाचलैया | १ |
| व्यंकटाचार्य | २ | व्यंकटसुब्बा अडय्याझांक | २ |
| सुब्बाचार्य | ३ | पंचांगनारायणय्या | ३ |
| नलाचार्य | ४ | पंचंगमस्वामी अप्पा | ४ |
| पिनाकोमीआचार्य | ५ | गुंडु अप्पा | ५ |
| अरुणाचलाचार्य | ६ | शिरस्तेदार व्यंकटराम | ६ |
| कोलंदाचार्य | ७ | | |
| आगेराचार्य | ८ | येणेंप्रमाणें आणखीही दुसरे प्रतिवादींचीं नांवें आहेत. | |
| एकायाचार्य | ९ | | |

येणेंप्रमाणें आणखीही दुसरे वादींचीं नांवें आहेत.

| वादींचा वकील. | | प्रतिवादींचा वकील. | |
|---|---|---|---|
| महंमदअबदुल अबसी | १ | अरुणाचलमुदली | १ |

१. प्रतिवादींनीं वादींकडेस लग्न चाललें असतां हरकत करून नुकसान केलें. त्यामध्यें त्याचें ५३० रुपये ८४ आणे नुकसान झालें, त्याबद्दलची फिर्याद आहे. दप्तरामध्यें फिर्यादीचे तीन जबाब आहेत. पहिला जबाब व दुसरे दोन सामील (रिजाइनडर्ब) व तिसरे साक्षी. वादींचा गुमास्ता मार्गसहाचार्य याची जबानी. प्रतिवादीतर्फे वकील सिगराचार्य.

ही खालील नांवनिशी वादी व प्रतिवादी यांचे साक्षीदारांची आहे. ती येथें लिहित नाहीं.

२. वादी हे आपणांस कमलर्स ह्मणजे पंचब्रह्माचे वंशस्थ ह्मणवितात. कमलर्स यांचे पांच धंदे आहेत. एक लाकडी कामाचा, दुसरा लोखंडी कामाचा, तिसरा सोन्याचा, चौथा दगडकामाचा, पांचवा पितळकामाचा आणि तांब्याचा.[1]

३. वादी असें ह्मणतात कीं, आमचे जातीमध्यें प्रतिवादीचे 'ऋषिवंशीय' (ब्राह्मणांचे) साह्याशिवाय लग्नें व दुसरीं घरांतील धर्मसंबंधी याज्ञिकें करण्याची चाल आहे व आमचा अधिकार आहे. व तो स्वतःजातीमध्यें करण्याचा आमचा निश्चय झाला आहे. वादी आग्रहानें म्हणतात कीं, आमचे जातीपैकीं कोणीही आमचा गुरु प्रतिवादी यांचे जातीमध्यें क्रियाकर्मांतर करण्याकरितां जात नाहींत, अथवा प्रतिवादी जातीचे ब्राम्हण आपले येथें क्रियाकर्मांतर करण्यामध्यें लावीत नाहींत. प्रतिवादींनीं वादींचे घरांत जबरदस्तीनें शिरून याज्ञिक[2] करावें, अशाविषयीं कोणत्याही कोर्टांत परवानगी मिळणार नाहीं, असा आमचा पूर्ण भरंवसा आहे. वादी असें म्हणतात कीं, आमची जात वैश्य

---

१ हे लिहिले पांचधंदे क्रमानें लिहिले गेले नाहींत, असो. २ हव्यकव्य याज्ञिकें करणारा भट्ट

नाहीं, अथवा शूद्रांतली नाहीं, परंतु पंचब्रम्हाचे वंशांतली आहे. यास्तव आमचे येथें क्रियाकर्मांतर करण्याकरितां आमचे ऐवजीं ब्राह्मण नकोत.

दुसरे वादी हे देवब्राम्हण अथवा पारमार्थिक ब्राम्हण आहेत. ( उत्कृष्ट धर्माचरणाचे आहेत ) व प्रतिवादी हे गायी ब्राह्मण ( अथवा ऋषिब्राम्हण आहेत ) त्यांची उत्पत्ति शूद्रांपासून आहे परंतु कांहीं प्रायश्चित्तानें व विधीनें ब्राम्हणत्व मिळविलें आहे. व वादी असें म्हणतातकीं, आमचे हक्क आम्हीं वेदांच्या व स्मृतींच्या आधारानें, व शिवपुराणाचे आधारानें व शिल्पशास्त्राच्या आधारानें सिद्ध करूं.

४. मुख्य प्रतिवादी नंबर १,२,३,४,५, असें आग्रहानें ह्मणतात कीं, आम्हीं शिवभक्त ब्राम्हण आहोंत. व वादींचे घरचें याज्ञिक करण्यास आम्हांस अधिकार आहे, व आमचा हक्क आहे. कारण वादी हे संकर जातीचे आहेत, अथवा शूद्रानें बाहेर टाकलेल्या जातीचे आहेत. जरी वादींचे जातीनें पुष्कळ वेळां पुनर्जन्म घेतला तरी ते ब्राम्हण होणार नाहींत. आणि जरी वादींनीं लग्न व दुसऱ्या धर्मसंबंधी गोष्टी, चाली, त्या सर्व वतनदाखल घेण्याचा विचार केला तरी त्यांस दुसरे जन्मीं शिक्षा होइल, इतकेंच नाहीं, परंतु सद्यः सरकारतर्फे नेमलेले अधिकारी त्यांजला त्यांचे धर्माविरुद्ध क्रियाकर्मांतर करूं देणार नाहींत. आणि ते धर्मविरुद्ध वागतात कीं नाहीं याविषयींचें मत सरकारी पंडितांकडून घेण्याविषयीं आम्हीं कोर्टास अर्ज करितों.

५ वरील सर्व प्रकरण वादी व प्रतिवादी कोणते बाबतींत विरुद्ध आहेत, त्यासंबंधी एकवेळीं वादीकडे ऐन लग्न चालत असतां प्रतिवादी नंबर २ व त्याजबरोबर दुसरी कांहीं मंडळी जबरदस्तीनें घरांत शिरून कार्यास अडथळा केला, ही हकीकत वादींनीं जिल्हाजज्जाकडे कळविली, व ते त्यावेळेस फौजदारी कामाकडे होते. त्यानीं प्रतिवादी यांजला शिक्षा केली, आणि दुसरेवेळीं अशी गोष्ट करूं नये, याविषयीं ताकीद दिली.

६. नंतर कांहीं दिवसांनीं दुसरें लग्न करण्याचा यत्न चालला होता त्यामध्यें प्रतिवादी नंबर १,२,३,४, आणि ६ हे पुनः सामोर होऊन कामांत बखेडा केला व कांहीं दिवस काम तहकूब राहिल्याबद्दल वादींचें ९० पागोडा नुकसान झालें व चाकरांचे पगाराबद्दल १॥ पागोडा व लग्न संबंधी सामानाचा नाश केल्याबद्दल ६० पागोडा नुकसान झालें. एकंदर नुकसान १५१॥ पागोडांचें झालें.

७. प्रतिवादी नंबर १, २, ३, ४, आणि ५ नाकबूल करितात कीं, वादींनां स्वतः लग्न करण्याचा अधिकार नाहीं आणि त्याला प्रतिबंध केला नाहीं, असे ते ह्मणतात. आणि एकादे वेळेस अडथळा केला असेल तर तो माजिस्ट्रेटाचे हुकुमावरून केला.

८. नंबर *६ चा प्रतिवादी असें ह्मणतो कीं, मी पोलीस अधिकारी याच्या नात्यानें त्यावेळेस वर्तन केलें.

९. त्या खटल्याच्या साक्ष्या फार लांबलचक आहेत. आणि एकमेकांशी त्यांचा काहीं संबंध नाहीं. परंतु विचारा अंती कोर्टाची पक्की खात्री होते कीं, प्रतिवादींनीं खरोखर

---

१ऋषिवंशस्थलोक. २सानगादि पंचदेवर्षि संतति ( देवब्राह्मण ) ३परःश्रेष्ठारिदूरान्योत्तरक्लीबितुकेवल इतिमेदिनीकोशः ४तपानें. *व्यंकटरामनायड.

जबरदस्ती करून धमक लागण्यासारखें लग्नाचें वेळेस दुःख दिले. प्रतिवादींच्या साह्या शिवाय लग्न झालें असें समजून अडथळा केला नाहीं, अथवा वादींचे सभेमध्यें जाऊन दंगा केला नाहीं. तरी प्रतिवादींनीं वादीस दुःख दिलें अशी आमची खात्री होते.

१०ही गोष्ट सर्वांस माहीत आहे आणि वादीचे साक्षी असे सांगतात कीं, वादी व व त्यांची जात ज्याप्रमाणें जैन[1] कानडी आणि शान्यनीज[2] आपली क्रियाकर्मांतरें अथवा दुसरा कांहीं उत्साहाचा भाग ब्राह्मण[3]ांचे[4] साह्याशिवाय अथवा दुसऱ्या कोण त्याही जातीच्या साह्याशिवाय करितात किंवा चालवितात त्याप्रमाणें आह्मी करितो. जीं लग्नें आमच्या जातीच्या नेमलेल्यां उपाध्यायांकडून लागतात तींच फक्त शास्त्रोक्त व ते असे ह्मणतात कीं, आमच्यापेक्षां दुसरी कोणतीही जात आह्मी उंच मानींत नाहीं.

वादी लोक ह्मणतात कीं, हीं मतें हिंदुशास्त्राधारास अनुसरून आहेत. एक मुद्दा असा आहे आणि तो सर्वांस माहिती आहे. परंतु स्मार्त व वैष्णव तो मुद्दा व हक्क कबूल करीत नाहींत, यास्तव कोर्टांतलि पंडिताचे मत घेणे जरूर दिसत नाहीं.

जर करितां ब्राह्मण इतरजातींमध्यें धर्मसंबंधीं मत भेद असतां ज्यामध्यें त्यांचा कांहीं एकोपा व्हावयाचा नाहीं त्यांत कोर्टातील पंडिताचे मत घेणे योग्य होतें. ज्याप्रमाणें ब्राह्मण आपल्या जातीमध्यें एकमेकास उंच मानीत नाहीं त्याप्रमाणें वादी प्रतिवादीस ब्राह्मणत्वाच्या नात्यानें उंच मानीत नाहींत. आणि वादी जर एकादी जुनी चाल चालवितात व एकादी सोडतात, किंवा नवीन एकादी स्थापन करितात कीं ज्यापासून देशाच्या स्वस्थतेला, नीतीला व खरेपणाला विरुद्ध नाहीं, तर अशा चाली प्रतिवादीनीं मध्यें पडून अटकाव करावा हें बरोबर नाहीं. आणि ती स्वस्थता देशासाठीं जरूरीची नाहीं, असें जर कांहीं अम्मलदारांच्या नजरेस येईल तर तोही मध्यें पडणार नाहीं. कोर्टाचे नजरेस असें येतें कीं, जीं लग्नें वादी आपल्या जातीच्या गुरूकडून लावितात तीं पुष्कळ दिवसांपासून बहुतेक लोक चांगली रीती व शास्त्र आधारास अनुसरून आहेत, असें कबूल करितात. यासाठीं दुसऱ्या कोणत्याही जातीनें अडथळा करूं नये. आणि ब्राह्मण लोकांनीं तर मुळींच करूं नयें. कारण वादी प्रतिवादींचे जातीस उंच मानींत नाहींत. आणि प्रतिवादीही कबूल करितात. ज्याला जसें पाहिजे तसें वर्तावें. हजारों स्मार्त ब्राम्हण थोडे दिवसापूर्वी विष्णु भक्त झाले आहेत आणि आपले गुरु दुसऱ्या जातींचे केले आहेत. जर वादींनीं इतक्या गोष्टी प्रतिवादींच्या साह्यानें आपल्या जातीमध्यें आणल्या असत्या परंतु, खरोखर त्यांनीं त्या गोष्टी घेतल्या नाहींत व आणल्या नाहींत. व ते म्हणतात कीं, आमचा व प्रतिवादींचा कांहीं संबंध नाहीं, तरी प्रतिवादी लोकांनीं त्यांचे लग्नाचे वेळेस जवळ जाण्याचें कांहीं कारण नव्हतें.

कर्माचे मताप्रमाणें वादी लोकांनीं लग्न लावणें, दुसरीं धर्म संबंधीं कृत्यें ज्याप्रमाणें त्यांची वहिवाट आहे त्याप्रमाणें करणें, हें रास्त आहे. आणि तसें करण्याविषयीं त्यांस हुकूम झाला आहे.

---

१ हा जैनादिकांचा दृष्टांत केवळ ऋषि लोकांच्या अप्राधान्याचा आहे. धर्माच्या किंवा जातीच्या संबंधानें नाहीं. २ ऋषिवंशीयांच्या. ३ स्वर्णादि कर्मव्यवहार सोडून याज्ञिक वृत्ति चालविणाऱ्या आचार्यांनीं. ४ ब्राह्मणांकडून

११ कोर्टाचे मताप्रमाणें नुकसानीची समज आहे कीं, प्रतिवादीनीं वादीस लग्नामध्यें फारदुःख दिलें आणि जरी वादीनीं नुकसानीच्या रकमे साठीं दावा केलेला रास्त आहे तरी तो सिद्ध झाला नाहीं. फिर्यादीच्या कारणावरून व साक्षी पुराव्यांवरून कोर्ट असाविचार करते कीं, ६६ पागोडा, प्रतिवादी नंबर १,२,३,४,५ यानीं वादीस नुकसानीबद्दल, दुःख दिल्याबद्दल व खटल्यासंबंधी वारंवार कोर्टात हजर व्हावें लागलें याबद्दल द्यावे. नंबर६चा प्रतिवादी यानीं वादीचें नुकसान केलें असेल असें कोर्टाचे नजरेस येत नाहीं म्हणून त्याच्या वकिलाची फी वादीनीं द्यावी.

याप्रमाणें ता०१०जुलै सन्१८१७इसवी सालीं फैसला झाला आहे

याफिर्यादीस एकंदर झालेला खर्च विस्तारभयामुळें येथें लिहिला नाहीं.

आतां इत्यादि निवाड्यांतील मजकुरावरून व लोक प्रसिद्धी वरूनही कर्नाटक, तैलंग, द्रविड वगैरे देशांतील, सानगसनातनादि पंचगोत्र सांप्रदायाचे विश्वब्राह्मण (पंचब्रह्मवंशस्थ) लोह, काष्ठ, ताम्र, शिला, सुवर्ण वगैरे पांचही धंदे करणारे असून, पांचही आचारानें, ब्रह्मकर्मानें, विद्वत्तेनें वगैरे अप्रतिम आहेत. हें वास्तवीक सशास्त्र आहे. कारण पांचही मिळून विश्वब्रह्म (पंचब्रम्ह) सजातीय आहेत. परंतु या दक्षिण देशांतील सानगादि पंचगोत्र सांप्रदायी विश्वब्रम्हाचे लोक बहुतकरून स्वर्णकर्मच करीत असतात. आणि यानां पंचाल[१] ब्राम्हण, अशी संज्ञा आहे; परंतु विश्वकर्म प्रजांतर्गत म्हणजे "पंचाल"या शद्बावर अवलंबून असलेले पांचही धंदे करणारे जे,ते लोकांमध्यें लोहार (मनुसंबंधी), सुतार (मयसंबंधी), तांबट (त्वष्टसंबंधी), पाथरवट शिल्पिसंबंधी), सोनार (विश्वज्ञसंबंधी) इत्यादि अनेक भेद प्रदर्शक या नांवांनीं प्रसिद्ध आहेत. आतां जरी ही सर्व विश्वकर्म निर्मित प्रजा आहे तरी या सर्वांतून एकाचाही सानगसनातनादि पंचगोत्रज विश्वब्रम्हांशीं अन्नोदकादि व्यवहार नाहीं.त्याचीं कारणें आहेत तीं:—

एक कारण असें आहे कीं, वर सांगितलेल्या पांचाल लोहार, सुतार, तांबट, इत्यादि पांचांमध्यें कित्येक विश्वब्रम्हकुळांतील (सजातीय) असून कधीं प्राचीन काळीं उत्तरोत्तर अनाचार, असद्धर्मवगैरे ब्राम्हण धर्माविरुद्ध अशा अमंगळ चाली पडून भ्रष्ट होऊन पंक्ति वर्ज्य झालेले आहेत. दुसरें कारण असें कीं, कित्येक मुळापासूनच स्वमताभिमानानें भिन्नत्वानें आहेत. परंतु यांच्यामध्यें कांहीं आचारशील आहेत, कांहीं अनाचारी आहेत. तिसरें कारण असें कीं, परंपरा अन्यकांहीं कारणांनीं विछिन्न संस्कार पावलेले आहेत. इत्यादि अनेक कारणावरून पूर्वोक्त सर्व पंचालांचा विश्वब्रम्हांशीं (ब्रम्हपांचालांशीं) अन्नोदक व्यवहार नाहीं. तथापि हे सर्व पांचाल मिळून एक विश्वकर्माचीच संतती असल्यामुळें या सर्वांचीही शुभाशुभ हव्यकव्य कर्मे प्राचीन काळापासून मुख्यत्वें सानगादि पंचगोत्रस्थ विश्वकर्म संततीय स्वर्णकारांचेच उपाध्याय आजपर्यंत करीत आहेत.

असो, सांप्रत अचारा संबधानें अनेक ब्राह्मणांच्या जाती निराळ्या होऊन त्यांच्याशी

[१] पांचाल (पांचानम) सुपर्णः सानगश्चैवसनातनम इतिस्मृतः ॥ गुरुःश्रेष्ठोहभूनश्चप्रत्नो धात्रीसुरक्षकः विश्वकर्मामुखाद्भता ब्राह्मणा पंचकीर्तिताः ॥ १ ॥ वसिष्ठ०

आचार संपन्न इतरब्राह्मणें जसे अन्नोदक व्यवहार ठेवीत नाहींत. तसाच ब्रात्य पंचाल ब्राह्मणांशी पंचद्रविड पंचाल ब्राह्मणाचा अन्नोदक व्यवहार नाहीं. तथापि स्वधर्मात्मक पंचाल धर्माचा आपल्या ब्राह्मण्याचा अभिमान सर्वांनीं धरणें योग्य आहे.

सानगादि पंचगोत्रस्थ ब्रम्हपंचाल खेरीजकरून सर्व पंचाल प्रजेपैकीं पंचाल सुतार

---

१ स्वधर्मात्मक आपल्या ब्राह्मणत्वाचा अभिमान सर्वांनीं धरणें योग्य आहे पहा—महाराष्ट्रांत ब्राह्मणांचे जेवढे भेद आहेत त्यापेक्षां कर्नाटक व मद्रास प्रांतीं थोडे आहेत. गुजराथप्रांतीतर जातिभेदानें अगदी कमालच उडवून दिली आहे. दक्षिणेंतील व उत्तरेंतील सारस्वत ब्राह्मणांत अनेक भेद अस्तित्वांत आले आहेत काश्मीर व बंगाल याप्रांतांही ब्राह्मणांच्या अनेक जाती आहेत. सर्व ब्राह्मणांचे आचार विचार, पोषाख, अथवा सामाजिक स्थिती तरी एक आहे काय? नाहीं! ब्राह्मणजातीचा इतिहास प्रासिध्द होईल व तो सर्व ब्राह्मणांच्या वाचण्यांत येईल, तर त्यापासून पुष्कळ फायदा होईल.

बंगाल्यातील ब्राह्मण मासे खातात, सोवळें ओवळें मानीत नाहींत. काश्मीरकडील ब्राह्मणांच्या घरीं मुसलमान काम करितात. पंजाबांतील ब्राह्मण आंगरख्या पागोट्या सुद्धां खाटेवर असून खुशाल जेवण शिजवितात. त्यांची रहाणी व पोषाख अगदीं मुसलमानासारखा आहे. त्यांच्यांत कित्येक मांस खातात कित्येक खात नाहींत. काशींत शूद्रास स्पर्श झाला असतां विटाळ नाहीं. गुजराथेंतील ब्राह्मण कुणब्याचें पाणी पितात मुंबईंतील कांहीं सारस्वत वाण्याकडे भोजनास जातात. बेळगांव, धारवाड, मलबार या प्रांताच्या ब्राह्मणांत सोवळें वोवळें कडकडीत असून त्यांतच ते धर्म मानितात. मलबारकडलि नंबूरी ब्राह्मण, दक्षिणी ब्राह्मणांच्या हातचें खात नाहींत त्यांना मिशाळजंतु ह्मणतात. तिकडील ब्राह्मण नायर लोकांच्या स्त्रियांशीं व्यवहार करितात. रामेश्वरांकडे सोवळें ओवळें नाहीं. देशावरील ब्राह्मणांत विधवेचें केशवपन पतिनिधनानंतर दहा दहा बारा बारा वर्षे पर्यंत क्वचित होत नाहीं परंतु कोंकणांत केश ठेवल्याबद्दल विधवेचा छळ होतो.

महारष्ट्रांतील ब्राह्मणांत गृहस्थ व क्षिक्षुक यांत भेदाभेद नाहीं. गृहस्थ आपली मुलगी भिक्षुकास देतो व भिक्षुक आपली मुलगी गृहस्थास देतो. परंतु हीच चाल द्रवीड ब्राह्मणांत, तेलंगी ब्राह्मणांत व कित्येक गुजराथी ब्राह्मणांत नाहीं, ह्मणजे एकाच जातींतील गृहस्थ व भिक्षुक यांत बेटीव्यवहार होत नाहीं. नंबुरी ब्राह्मण क्षत्रियांच्या हातचे अन्न खातात. वडील बंधू खेरीजकरून सर्व नंबुरी, क्षत्रिय किंवा नायर यांच्या स्त्रियाशीं संबंध करितात तसेंच यांच्यांत अविवाहित स्त्रियाही असतात. सुटहू आणि इलेड्ड या जाती नंबुरी ब्राह्मणांच्यात शस्त्रक्रिया करितात. ह्मणून नंबुरी त्यांच्याशीं संबंध ठेवीत नाहीं. मारवाडी, श्रीमाळी ब्राह्मणांत जे भिक्षुक आहेत त्यांच्यांत वतसेंच सिंधुवाल सारस्वत ब्राम्हणांत विधवाविवाहाची चाल पूर्वापार आहे. अन्हिलवाडा पट्टण येथील राजा मुळराज यानें उत्तरहिंदुस्थानांतून १०००ब्राम्हण आणले असून त्यांची एकच जात झाली तिला औदिच्य सहस्र म्हणतात. गुजराथेंत एकएका ब्राम्हणाच्या जातींत चार वेदांचे भिन्न भिन्न ब्राम्हण आहेत. त्या सर्वांत विवाह होतात. तेथें ऋग्वेदी यजुर्वेदी, सामवेदी हे भेद नाहींत. हाच प्रकार तेलंग व कर्नाटकप्रांतीं कांहीं जातींत आहे गुजराथेंत गेल्यावर कित्येक गौड ब्राह्मणांनीं मांसाहार सोडला, यामुळें त्यांचा पंचद्रविडांत किंवा पंचगौडात समावेश करावा अशी शंका आहे. प्रतिग्रह घेणें हें ब्राह्मणांचें षट्कर्मापैकी कर्म असून त्यावद्दल कित्येक ब्राह्मणास छळ सोसावा लागला आहे आणि जातीस मुकावें लागलें आहे. आसवाल ब्राह्मणांची वृत्ति जैन लोकांत असून ते त्याचें गुरु ह्मणवितात. पंजाबांतील गौड सारस्वत ब्राह्मण हीन वर्णांच्या मुलींशीं लग्ने लावून त्याना गृहिणी बनवितात. पंजाबांतील ताजे गौड ब्राह्मणांत ज्या विधवा असतात. त्यांच्याशीं ते वेश्ये प्रमाणेंव्यवहार करितात. सिंध आणि राजपुताना येथील ब्राह्मण, माळी, नापिक इत्यादि जातींच्या घरीं जेवितात; तरी त्यांचें ब्राह्मण्य मोडत नाहीं दिल्लीकडील ब्राह्मणाच्या बायका पुरुषांच्या बरोबरीनें शेतांतील कामें करितात. मारवाडांतील चरण ब्राह्मणांत रजपुतांशीं विवाह करण्याची चाल आहे. नेपाळी ब्राह्मणांत ज्या विधवा असतात. त्यांच्याशीं ते वेश्येप्रमाणें व्यवहार करितात. शूद्रस्त्रियांशी ते विवाह लावितात व असल्या विवाहहापासून जी संतति होते तिला क्षात्रिय अशी संज्ञा मिळते. बंगाल्यांतील भंग कुलीन ब्राह्मणांत अनेक स्त्रिया करण्याचा फार प्रचार आहे. त्यांच्यांत एक ब्राह्मण १०, १५, २०, ४०, पर्यंत क्वचित् अधिकही बायका करतो ओरिसा ब्राह्मण शूद्रांच्या हातचे अन्न खातात इत्यादि— पुणे सुधारक ता०७-१-१९०१.

म्हणून जे आहेत त्यांचा या दक्षिण देशांत वगैरे चहूंकडे गांवोगांवीं पुष्कळ भरणा आहे. परंतु ज्या देशांतील कांहीं भागांत पंचाल जातीचे लोक क्वचित् असतात त्या देशांत ब्रम्हपंचालाचे उपाध्याय फारच थोडे असल्यामुळें एकादे त्यांच्या हव्यकव्यास अडचण पडते. परंतु मनुस्मृतिमध्यें एक वाक्य आहे. "अब्राम्हणादध्ययनमापत्काले विधीयते "संकटसमय असेल म्हणजे ज्या कर्मास ब्राह्मणच पाहिजे अशीं जीं उपाध्याय कर्मे त्या कर्मास प्रयत्न करून ही स्वधर्म विहित ब्राम्हण न मिळेल तर ब्राह्मणा व्यतिरिक्तही इतर जर कोणी ज्ञाता असेल तर त्याचे पासूनही तें कर्म करवावें. तसेंच भारतामध्येंही असेंच वाक्य आहे. "तत्वविज्ञापनं धर्मो विप्रस्यतुविशेषत-॥ ज्ञापनं क्षत्रियाणांच धर्मोविप्राभ्यनुज्ञया ॥ तदभावे तुवैश्यानां शूद्रस्य परमापादि ॥"

असो विश्वकर्म संततीय सर्व प्रकारांचें पंचाळ जातीस सानगादि पंचगोत्रस्थ उपाध्याय न मिळाल्यामुळें निरुपायास्तव सुतार वगैरे लोक आपल्या जातींतील एकाद्या सुज्ञगृहस्थाकडून कांहीं ठिकाणीं आपलें हव्यकव्य कर्म करितात. याचें कारण स्वधर्मरक्षण होय.

श्रेयान्स्वधर्मोविगुणःपरधर्मात्स्वनुष्ठितात् ॥ स्व
धर्मोनिधनंश्रेयः परधर्मोभयावहः॥३५॥ गीताध्याय३रा.

**अर्थ**—आपला स्वधर्म गुणरहित जरी असला तरी तोच आपल्यास अनंत गुणांनीं श्रेयस्कर होतो. आणि परधर्म सर्वगुणसंपन्न सर्वोत्तम जरी असला तरी तो आपल्यास भयकारक आहे, म्हणून स्वकीय कुलाचें कल्याण होण्यासाठीं आपला स्वधर्मच रक्षण करावा. आणि असें न करितां, आपला प्राचीन कुळाचार स्वधर्म सोडून परधर्म आचरिल्यानें वंशास भयप्रद होतें. यास्तव सर्व वर्णांनीं परस्परांचा द्वेष न करितां, आपआपल्या वर्णाश्रम धर्मसंरक्षणांत निपुण असावें, हा मनुष्य जातीचा स्वाभाविक धर्म होय.

नकलेची फी ८९ आणे **निवाडा ४ था.** प्रोसिडिंग नि०७२

## जुन्नरयेथीलस०जज्जकोर्टांत.

### मु०नंबर १५५२ सन१८७१.

**वादी**—चिंतोशिवराम जोशी, व मार्तंड परशुराममयत वारसपुत्र हरीमार्तंड.

**प्रतिवादी**—केसोदेवजी सुतार, व विठूजी कृष्णाजी सुतार.

### दावारुपये ७८.

बादी पुढील कारणावरून दावा सांगतात. ते असें क्षणतात कीं, शहरजुन्नर येथील सर्व जातींत जोशीपणाची वृत्ति आमची वडिलोपार्जित असून ता०२९ जुलै सन १८७० पासून ता० १७ जुलै सन १८७१ पावेतों आमचें खाजगत साल आलें होतें. हव्यकव्य लग्नकार्य वगैरे शांतिक पौष्टिक सुद्धां करण्याची आमची बाब असून प्रतिवादी नंबर २ यानें त्यास अधिकार व हक्क संबंध नसतां प्रतिवादी नंबर १ याचे सांगण्यावरून त्याचे घरीं ता० २७ जून सन १८७१ रोजीं वास्तुशांत करू-

१ हें नांव बादीचे अर्जावरून मागाहून कमी केलें आहे.

न उत्पन्न घेतलें. याजकरितां ऐन जिनसांची किंमत व नक्त उत्पन्न मिळून रुपये ७४८आमचे हक्काचे आहेत, ते आम्हास देववावेत.

प्रतिवादी केसूजी याची तकार अशी कीं, प्रतिवादी नंबर २ हा सुतार भट्ट असून तो हमेशा वडिलोपार्जित आमचे घरीं लग्नकार्य तो व त्याचे घराण्यांतील करीत आल्याप्रमाणें आमचे घराची वास्तुशांति त्याचे हातानें केली.

वादीचा आमचे जातींशी कांहीं संबंध नाहीं. धर्मादाय वगैरे करणें ही खुषीची गोष्ट आहे. आह्मीं वादीस धर्मकृत्यें देण्यास बिलकूल राजी नाहीं, सबब आह्मीं जबाबदार नाहीं.

वादींनीं उलट कैफियत दाखल केली तींत त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, सुतारभट्ट म्हणून पूर्वींपासून कोणीच नसून प्रतिवादी नंबर २ यानें किंवा त्याचे घराण्यांतील माणसानीं कांहींच कोणी भट्टपणा केला नाहीं. आम्ही उत्पन्न मागतों तें धर्मादाय नसून आमचें हक्काचें आहे.

मि. आपटे सेकंडक्लास सबार्डिनेन्टजज्ज यांनीं मुद्दे काढले ते:—

१ शहर जुन्नर येथील ग्रामजोशीपणाचें वतन वडिलोपार्जित वादीचें आहे कीं काय?

२ असल्यास वादीचे हातून धर्मसंबंधीं कृत्य प्रतिवादी केसोजी यानें घेतलें पाहिजे, असा वादीचा हक्क आहे कीं काय? अगर तें काम पाहिजे त्या[1] भटाकडून प्रतिवादी केसोजी याजला घेण्याची मोकळीक आहे.

३ प्रतिवादी केसोजी याचे घराच्या वास्तुशांतीला फिर्यादींत लिहिल्याप्रमाणें खर्च झाला आहे किंवा किती झाला आहे व ते रुपये प्रतिवादी केसोजी याजकडून वादी याजला देवविणें न्यायाचे होईल कीं काय?

अधिक मुद्दे काढण्याविषयीं कोणीं कळविलें नाहीं.

पहिले मुद्यांतील आमचा ठराव आस्तिपक्षाचा आहे.

दुसऱ्या मुद्यांतील आमचा ठराव असा आहे कीं, धर्मसंबंधीं सर्व कृत्यें वादीचे हातूनच घेतलीं पाहिजेत, अशाबद्दल प्रतिवादी केसू हा बांधला गेलेला नाहीं.

तिसरे मुद्यांतील आमचा ठराव असा आहे कीं, फिर्यादअर्जांत मागितलेली रक्कम वादीनें शाबीद केली नाहीं, व ती त्यास मिळूं शकणार नाहीं.

## ठरावांचीं कारणें.

वतनदार जोशी यांचा अधिकार सुतार जातीच्या लोकांनीं रद्द केला आहे कीं काय? असा मुद्दा या मोकदम्यांत निघाला पाहिजे होता, तथापि मुद्दा न काढल्यानें त्या तऱ्हा मुद्यावर पुरावा घेतला नाहीं, असें आलें नाहीं.

वादी हे वतनदार ग्रामजोशी आहेत याविषयीं बिलकूल अंदेशा नाहीं. परंतु दाखल झालेले पुराव्यावरून बरेंच स्पष्ट दिसून येतें कीं, त्यांचा अधिकार रद्द केला आहे. स्टील प्र० आपले बुकाचे ८३ पानांत असें लिहितात कीं, "हे ब्राम्हण म्हणजे

[1] विश्वकर्मसंततींतील पाहिजे त्या, असें समजावें.

जोशी खुद्द आपले जातीचें व इतर जातीचें उपाध्यायपणाचें काम करितात. परंतु लिंगायत, परभू व सोनार यांचे जातींतील उपाध्यायांनी तसा अधिकार रद्द केला आहे असाच प्रकार ज्या जातींत असेल त्या जातींत मात्र त्यास सदरहू अधिकार नाहीं." यावरून उघड दिसते कीं, कोणत्याही ज्ञातीस आपलें ज्ञातींतील उपाध्याय नेमण्याची मोकळीक आहे. प्रतिवादी तर्फे झालेल्या पुराव्यावरून दिसून येतें कीं, सुतार ज्ञातीत सुतारभट जात मिळून कार्य करित होते. तसें नसलें तरी ही ज्यानें प्रतिवादी केसोजीचें घरीं वास्तुशांत किंवा घरभरणीचा विधि केला असेल त्याजविरूद्ध वादीचा काय हक्क असेल तो असो; परंतु प्रतिवादी केसू यानें फक्त वतनदार जोशी यांचेच हातून काम घ्यावें, दुसऱ्या कोणाकडून घेऊं नये, अशाविषयीं एकाद्या कायद्याचा किंवा ठरावाचा अभिप्राय असल्याचे आमचे आढळांत आले नाहीं.

ब्राम्हण उपायाध्याचा सर्व जातीत मुख्यत्वें हलकें जातींत उपाध्यायपणाचा अधिकार आहे व जो ते फारशक्तीनें चालवितात ही गोष्ट इतिहासांतील आहे अशाबद्दल प्रत्यक्ष कांहीं ठराव झालेला नसेल तर तसा त्याचा अधिकार जास्ती वाढू द्यावा असें आम्हांस वाटत नाहीं. सदरहू बाबतींत तसा कांहीं ठराव झाल्याविषयीं आम्हांस दाखविण्यांत आलें नाहीं.

खुद्दवादीतर्फेचा नि० ४६ चा साक्षिदार वतनदार जोशी असें सांगतो कीं, घरभरणीविधीबद्दल अमुक उत्पन्न ठरविले नाहीं. तें यजमानाचे खुषीवर आहे. तो देईल तें आह्मी घेतो. यावरून उघड दिसते कीं, अशा विधिप्रीत्यर्थचे उत्पन्न हक्कासारखें नसून धर्मदाय स्वरूपाचें आहे. असें कार्य करण्याबद्दल जोशी यांस किती उत्पन्न मिळण्याचा हक्क आहे याबद्दल कोणींही सा० कांहीं स्पष्ट सांगत नाहीं याचें खरें कारण हेंच दिसतें.

सबब वादीची फिर्याद खर्चा सह रद्द असे. ता० ३१ जानेवारी सन १८७६ इसवी.

*L. G. Fernandess.*
*True Copy*
*(Signed)*
*Subordinate Judge.*

इंग्रेजी सही
स० जज्ज

हा वरील निवाडा करणाऱ्या जज्ज कोर्टानीं स्टील पा. ८३ चे आधारावरून लिंगायत परभू सोनार[1] या जातींच्या उपाध्यायानीं जोशांचा हक्क रद्द केला त्याचे संमत घेतले आहे. परंतु पंचाल सुतारादिकांची शुभाशुभ कर्में करणाऱ्या आचार्यांवर (विश्वब्रह्मवंशस्थांवर)[2] जोशी लोकांचा वगैरे मुळींच कोणाचा हक्क नाहीं. कारण सानगादि पंचब्रह्मवंशस्थ षट्कर्माचे[3] मुख्याधिकारी असल्यामुळें अनादिकाळापासून

१ संकर जातीय सोनार. २ विश्वज्ञांच्या. आचार्यांवर ३ यजन (आपण यज्ञयाग करणें) याजन (दुसऱ्याचें यज्ञकरणें), अध्ययन (आपण वेद पठण करणें), अध्यापन (दुसऱ्यास वेद शिकविणें), दान (आपण विधियुक्त दान धर्म करणें), प्रतिग्रह (आपण दुसऱ्याचे उचित दान घेणे) हीं षट्कर्मे जाणावींत.

त्यांचें स्वताहांचेच उपाध्याय आहेत.याविषयीं, याच सुतार लोकांवर सदरहू वादींनीं ( जोशांनीं ) पुणें जज्ज कोर्टांत अपील केल्यावरून झालेला निवाडा पहा.

---

## निवाडा ५ था.

### पुणें दिस्त्रिक्ट येथील असिस्टंट जज्ज कोर्टांत.

**अपील नंबर ४३ सन १८७६ पैकी.**

अपिलांतील मुद्दे असे आहेत कीं,—१ वास्तुशांति करण्याकरितां प्रतिवादी नंबर १यानें वादीस बोलाविलें पाहिजे होते कीं काय ? असेल तर वादींस किती रक्कम मिळणे वाजवी आहे ?

२. ( रिस्पांडेन्ट यांचे वकिलाचे सांगण्यावरून ) फिर्याद चालेल कीं काय ?

दुसरे मुद्दे काढण्याचे सांगण्यात आले नाहीं.

( १ ) वास्तुशांति करण्याकरितां प्रतिवादी नंबर १ यानें वादीस बोलाविलेंच पाहिजे होते असें नाहीं. ( २ ) फिर्याद चालेल; ह्मणून आह्मीं ठराव करितो.

वादी हे जुन्नरचे ग्रामजोशी असून ततसंबंधीं कांहीं उत्पन्नांबद्दल ही त्यांची फिर्याद आहे. त्यांचें ह्मणणें असें असें आहे कीं, नवें घर घेतल्यानंतर वास्तुशांति केली तेव्हां प्रतिवादीनें आपल्यास बोलाविलेंच पाहिजे. असें असतां त्यानें तसे न करिता आपल्या जातीच्या एका मनुष्याच्या हातून वास्तुशांति करविली. ज्यानें वास्तुशांति केली तो सुतार भट्ट असून आपले जातींत कार्यें करण्याची त्याची वहिवाट असे. व अशीं कार्यें करणें हें खुषीचे काम आहे. सबब आपण वादीस बोलाविलेच पाहिजे होतें, असें नाहीं; ह्मणून प्रतिवादीची तक्रार आहे.

हा जातीचा खटला आहे. सबब याचा दिवाणी कोर्टास विचार करतां येणार नाही, ह्मणून रेस्पॉडेन्टच्या वकिलानें अपिलांत तक्रार करून वि० रि० व्हा० १० पृष्ठ ११४ चा त्या तक्रारीस आधार दाखविला आहे व म० हा० को० व्हा० १ पृष्ठ ३०८ यांत काली साहेबांशी असे यांचें जें मत लिहिले आहे त्याजवर हवाला दिला आहे. म० हा० को० पैकीं जो मुकदमा सांगितला तो या खटल्यास लागू पडणार नाहीं कारण घडलेल्या गोष्टी भिन्न आहेत. व वि० रि० पैकीं सांगितलेला खटला मुंबई हाय कोर्टाच्या निवाड्याविरुद्ध आहे. हिंदुलोकांच्या कल्याणाकरितां ग्रामोपाध्ये आहेत असें सर्वानुमतें मानलें गेले आहे. सबब ज्यास मुद्दाम धर्मसंबंधीं कार्ये करण्याकरितां नेमले आहेत.त्यांस ओगळून आपली धर्मसंबंधी कार्यें करण्याकरितां दुसऱ्यास पसंत करण्याची लोकांस मोकळीक नाहीं. ह्मणून मुंबईहायकोर्टरिपोर्ट व्हा० ११पृष्ठ ६ यांत जो विठ्ठल कृष्ण जोशीविरुद्ध अनंत तमाचाली खटला आहे त्यांत स्पष्ट ठराव केला आहे. या कज्जाचा असा विचार केला पाहिजे. ही कार्यें करण्याची चाल अनन्य ग्राह्य हक्क असेल तर त्यास फिर्याद करण्याचा हक्क राहतो

---

१ स्वज्ञातीय आहेत. २मद्रास हायकोर्टकोड (कायदे) व्याल्यूम (बूक)

जोशांचा वंशपरंपरा हक्क सुतार लोकांनीं रद्द केला. ह्मणून सबजज्जांनीं ठराव केला आहे.व यास स्टील पृष्ठ३३आधार दाखविला आहे. त्यांत असें ह्मटलें आहे कीं, सोनार[1] लिंगायत परभू अशा जातींच्या लोकांनीं आपले भट तयार केले आहेत व कोणत्याही जातीस आपला उपाध्याय नेमण्याचा हक्क आहे. असें अनुमान केलें आहे परंतु ह्या नियमाचा इतका अर्थ करितां येईल कीं, कायद्याविषयीं संशय आहे. परंतु सुतार लोकांचे स्वतःचें उपाध्यायं[2] आहेत, असें दाखविण्यास पुरावा हवा तितका आहे.

तो पुरावा विसंगत आहे. परंतु सुतारांचे घरांतील धर्मसंबंधीं कार्यें करण्याचीं वादींची नेहेमींची वहिवाट होती, हें वादींचे साक्षिदारांस शाबीद करतां आले नाहीं. कारण अशीं कार्यें करतांना आपण पाहिलें नाहीं, म्हणून त्याप्रमाणें पुष्कळ साक्षीदार सांगतात. जोशीपणाचे जें उत्पन्न येतें, त्याजबद्दल ठेविलेले हिशेब, अशा अर्थाचे कांहीं कागद हजर करण्यांत आले आहेत. परंतु सुतारांनीं दिलेल्या अशा रकमा फारच थोड्या असून त्या बहुतेक दुसऱ्या गांवच्या संबंधानें आहेत. शिवाय ज्या यादी आहेत त्या ज्याप्रमाणें साधारण कामांतहिशेब लिहितात त्याप्रमाणें लिहिलेल्या नाहींत. त्या जरी पुराव्यास ग्राह्य असल्या तरी ज्या रकमा त्यांत लिहिल्या आहेत त्यांचा त्यांनीं त्या निरुत्तर पुरावा आहे असें मानतां येणार नाहीं.

दुसरे पक्षीं सुतार लोकांचा स्वतःचा उपाध्याय आहे ह्मणून प्रतिवादीचे साक्षीदार सांगतात. व वेळोवेळीं जोशाचे हातून उपाध्यायपणाचें काम घेतल्याचें जें कबूल करितात, ते असे ह्मणतात कीं, त्यावेळीं व त्याठिकाणीं आपल्या जातीचा उपाध्याय नसल्यामुळें जोशाचे हातून असें काम घेतलें होतें. व हरदूपक्षकारतर्फे पुराव्यावरून दिसत असल्याप्रमाणें ज्या प्रसंगाच्या संबंधानें ही फिर्याद झाली आहे त्या प्रसंगीं सुतारभट्ट हजर असून त्यांनीं वास्तुशांतिवगैरे केली होती. सबब याहीपेक्षां प्रतिवादीस विशेष अनुकूल असे संभव आहेत.

सबब जज्याचा हुकूमनामा कायम. अवलपासून अखेरपावेतों खर्चासहित वादीचा दावा रद्द केला आहे.

| | |
|---|---|
| ता० १८ जुलै सन १८७६ | एम. बी. बेकर. |
| खरा तरजुमा. | ( सही ) इंग्रजी. |
| [ signed ] K. B. Dharale. | [ signed ] M. B. Baker. |
| असिस्टंट ट्रान्सलेटर. | असिस्टंट जज्ज. |

---

या पूर्वोक्त दोन ( जुन्नर, पुणें )निवाड्यांतील सारांश असा आहे कीं, "स्टील-कायदे बुकाच्या आधारावरून" जर लिंगायत, परभू, सोनार, ( संकर[3] जातीय सोनार) यांनीं आपल्या जातींत तयार केलेल्याही भटांवर "त्यांनीं रद्द केल्यामुळें" गां-

---

१ हे सोनार संकर(पारसव) जातीय आहेत. २ सुतार लोकांचे उपाध्याय ह्मणजे विश्वब्राह्मणाचार्यच समजावे. ३ व्रात्यवैश्य, अथव :माहिष्यात्करण्यांजातः )

वजोशांचा हक्क राहूं शकला नाहीं. तर या मुख्य (मुखाचें ठायीं झालेल्या ) पांचाल ब्राह्मणावर आणि पूर्वीपासून असलेल्या त्यांच्या स्वतःच्या आचार्यांवर असूयाभिमानी नाना ऋषिवंशीय शूद्रयाजी गांवजोशांनीं आपला नवीन हक्क बसविण्याविषयीं कितीही प्रयत्न केला तथापि तो फलद्रूप न्यायानें होऊं शकणार नाहीं. आतां सुवर्णाचें वगैरे काम करणारे लाड खानदेशी, आहेर, त्रागट, इत्यादि शूद्रजातीचे पुष्कळ सोनार आहेत. परंतु विश्वकर्म मुखापासून झालेले सानगादि पंचगोत्र सांप्रदायी पांचाल ब्राह्मण हे ऋग्वेदी सर्व वेदांचे मुख्य अधिकारी असून त्याप्रमाणें त्यांच्यांमध्यें पंचमहायज्ञ[2] षट्कर्मादि[3] ब्रह्मकर्मोपभोग, स्वज्ञातीय वैदिक आचार्यद्वारा गर्भाधानादि षोडशसंस्कार वेदोक्त मंत्रविधी प्रमाणें करणें, अभक्ष्य भक्षण न करणें, अपेयपान न करणें, अन्य जातींचें सेवन न करणें इत्यादि विहित ब्राह्मणधर्म जर प्राचीनपासून आजकाल पावेतो चालत आहे, तर केवळ व्यवहारावरून पडलेल्या पांचाल सोनार यानांवावरून पांचाल ब्राह्मण या जातीवाचक नांवाचा लोप होईल काय ? कधींही होणार नाहीं. अर्थात् त्यानां आपल्या ब्राह्मण जातीय स्वधर्माविषयींचें विस्मरण होणार नाहीं. असो.

तात्पर्य कीं, विश्वकर्म मुखोद्भूत ब्राह्मणावर असूयाभिमानी गांवजोशांचा वगैरे मुळींच हक्क नाहीं. उलटनाना ऋषि ब्राह्मणापासून त्यांच्या धर्मकर्मामध्यें पांचाल ब्राह्मणांस हक्क मिळणें वाजवी आहे.याजविषयीं त्यांचें सदरहू स्टीलच्या कायद्यावरून पहा—

*THE IAW AND CASTOMS OF
HINDOO CASTS
CHIEFLY AFFECTING CIVIL SUITS,
BY ARTHAR STEEL 1865.

Of the sonars now existing the *Kanuree Panchal*, and *Koknusths* sonars wear the *Januas* bath and redress after going abroad, wear *solas* or silk Dhotee in relegious ceremonies; they shave the heads of their widows, who do not remarry by Path. They tread in gold and Jewellery and so on and many are brokers.

It appears from a statement communicated by Mr. Wilson that the sonars, Kayastahs nd vejds of Bengal, and even same Kolees of origsa wear the *Pala* [ differing from the Janva applied with the ceremony of Moonja in same pasticulars ] and are invested with it by Ved Muntras, but Bromins receiving the Huks, perform the ceremony.

In Nuggur and Poona the *Kanuree Panchal* and *Koknusths*, sonars perform the *Ved Kurm* through Bhuts of their own Castes

---

१ हें प्रथम संग्रहांत पाहावें.

२ अध्यापतं ब्रह्मयज्ञःपितृयज्ञस्क्तर्पणम्॥होमोदैवोबलिर्भौतोनृयज्ञोऽतिथिपूजनम्॥मनुः) ३ यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान, प्रतिग्रह, ४सुवर्णादिशिल्प कर्मांगभूत असल्यामुळें हा व्यवहार ब्राह्मण्यास विहित आहे प्रथमसंग्रहपहा. ५ स्वज्ञातीय आचार्यद्वाराकर्म करणें. ६ यज्ञकर्मांचेठायीं, वास्तुकर्मांचे ठायीं अग्रपूजा पांचालब्राह्मणासच आहे. ७ज्याचानिवाड्यांत आधार घेतला आहे त्याच*याकायद्यांतील इतिहास हिन्दुधर्मशास्त्रास अनुसरून आहे. तें याच्या भाषांतरावरून समजेल. पुढें पहा.

whereby *the prescriptive dues of the Wyeharee Joshee have Fallen office.*

The following statement agserting the descent of *Ruthkar Sonar caste* and their rights to the Vedokt Kurm, was communicated by Honorable Jagunath Shunkarshett of Bombay. Thease *Ruthkars Sonars* deny that they are the Parswa of the Books above mentioned.

Five different origins are attributed in the several Hindoos law books and veds to the Ruthkars sonars or Goldsmiths froms fiom which *Koknusths Dywadnya Ruthkars* are descended.

[ 1 ] The Siwagum states that from the five Months of shiva were produced five.

Bromins called *Panchal*, namely Munoo, Muya, Twasta, Silpee and Dywadnya.

[ 2 ] According to the *Rudriamul* and *Skund Poorana*, Brumha was the father of Pitamuha Manoo, who was the father of Prujapatee. The latter had eight sons known by the designation of Wasoo, of these named Prubhas, had a son with five months and ten hands called Wishvakarma, to whom born five sons having the same names, accupations and rights as those above mentioned namely *Manoo, Maya, Twasta, Silpee*, *Dywadnya.*

[ 3 ] Agreeably to the orders of Vishwakarma, Bramha agsumed the form of Virat, and from his mouth was produced swayembhoo Munoo, from whom six Bramhins and four vop Bramhins has their oregin The Eldest of the latter Silpayan, had five sons, The *first Manoo* the *second Muya*, the *third Twasta*, the *fourth Silpee*, and *fifth Dywadnya*. These five learned the five *Veds* from the five, who were produced from Sewas mouth and their names, professions rights and qualities were the same as those of their Teachers.

[ 4 ] From the diety Fire produced a man and a wooman, who were termed *Dywadnya Goldsmith.*

The above four had a pure origin and were authorized to perform the *Vedokt karms* and also the six right called *shud karm*, namely *Yejan, Yajun, Adhyan, Adhyapan, Dan* and *Pruti-graha.*

[ 5 ] The Mahishi or sanker Rathkars are of anloom origin, and although this origin be not equally pure with four above stated, still they entilled to the performance of the *Vedoct kurm.* Their title to these rights aproved in many Hindoo law books; and the *Rushi Bramhins* always required their agsistance in the *Solamnixation Yadnyas or Sacrifices.*

कायदा. (कागद ५वा.)

भाषांतर— आर्थरस्टीलच सन् १८६५चा.

हिंदुधर्म आणि चालीविषयीं.

कानडेपंचाल, आणि कोंकणस्थ सोनार जानवीं घालतात. आणि धर्मसंबंधी कृत्यांत सोंवळें नेसतात. ते आपल्या विधवा स्त्रियांस सोंवळ्या ( केशवपन) करितात. त्या पुनर्विवाह करीत नाहींत ते जवाहिराचा व सोन्याचा व रुप्याचा व्यापार करितात.

डाक्तर विलसन् साहेबाच्या लिहिण्यावरून असें दिसतें कीं, बंगाल इलाख्यांतील सोनार कायस्थ आणि व्हेद हे जानवी घालतात. आणि ओरिसा येथील कोळी पोवतें घालितात. ते मुंजवगैरे कृत्यांत जें वेदोक्तमंत्रानें जानवें घालतात त्याहून निराळें असतें, (ह्मणजे पुराणोक्त करितात ) परंतु धर्मसंबंधीं कृत्यांत त्याबद्दल ब्राह्मणांस हक्क मिळतो.

अहंमदनगर आणि पुणें इत्यादि जिल्ह्यांतील कानडे पंचाल हे आपल्या स्वज्ञातीय भटांकडून आपलें वेदोक्त कर्म करितात. त्यामुळें व्यवहारी जोशी यांचा हक्क पोंहचत नाहीं.

आनरेबल जगन्नाथ शंकरशेट मुंबई यानीं पुढील हकीकत दिल्यावरून रथकारज्ञाती व त्यांची वंशमालिका, आणि वेदोक्तकर्म याविषयीं—हे रथकार सोनार ह्मणतात कीं, रथकार कल्पद्रुम यांत सांगितलेले पारसव आम्हीं नाहीं. कित्येक हिन्दुधर्म शास्त्रांत आणि वेदांत रथकारांचीं निरनिराळी पांचमुळें काढिलीं आहेत. व त्या रथकारापासून कोंकणस्थ दैवज्ञ (देवाग्र)रथकार झाले आहेत.

(१) शैवागमांत सांगितलें आहे कीं, शिवाचे (परशिव विश्वकर्माचे) पांच मुखांपासून पांच ब्राह्मण झालें, त्यांना पांचाल ह्मणजे मनु, मय, त्वष्टा, शिल्पी, दैवज्ञ (विश्वज्ञ) असें ह्मणतात.

(२) रुद्रयामल आणि स्कंद पुराणामध्यें असें आहे कीं, ब्रह्मा हा पितामहाचा (मनूचा) बाप होता. मनु हा प्रजापतीचा बाप होता. प्रजापतीस आठ पुत्र होते. त्यानां अष्ट वसु ह्मणतात. यांपैकीं एकाचें नाव प्रभास, त्यास पांच मुखांचा आणि दहा हातांचा एक पुत्र होता, त्यासही विश्वकर्मा ह्मणतात. त्यास पांच पुत्र होते. त्यांचीं नावें—मनु, मय, त्वष्टा, शिल्पी आणि दैवज्ञ अशीं असून कर्मे आणि अधिकार वर सांगितलेल्या ( मनुमयांदिकांप्रमाणेंच ) होते.

(३) विश्वकर्म्याच्या आज्ञेवरून ब्रह्मदेवानेंही विराटरूप धारण केलें, आणि त्याच्या मुखापासून स्वयंभुव मनु झाला. त्यापासून ६ ब्राह्मण आणि चार उपब्राह्मण झाले. चहूंपैकीं वडील शिल्पायन त्यास पांच पुत्र होते. पहिला मनु, दुसरा मय, तिसरा त्वष्टा, चौथा शिल्पी आणि पांचवा दैवज्ञ हे पांचजण शिवाच्या (विश्वकर्माच्या )पांच मुखापासून उत्पन्न झालेल्या प्रथमोक्त मनुमयादिकांपासून पांच वेद शिकले. आणि त्यांचीं नांवें, धंदे, हक्क, गुण हे त्यांच्या शिक्षकाप्रमाणेंच होते.

---

१ पांच उपवेद जसें—आयुर्वेदादिक.

(४) अग्नीपासून स्त्रीपुरुष उत्पन्न झाले. त्यांचे संततीस दैवज्ञ[1] ( देवाग्न ) ह्मणतात.

वर चार ब्राह्मण सांगितले, त्यांचें मूळ स्वच्छ आहे. त्यानां वेदोक्त कर्म करण्याचा अधिकार असून षट्कर्मांचाही अधिकार आहे, ह्मणजे यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान आणि प्रतिग्रह.

(५) महिर्षी अथवा संकर रथकार याचें मूळ असंबध्द आहे आणि वर सांगितलेल्या चार ब्राह्मणांसारखें जरी यांचें मूळ स्वच्छ नाहीं तरी त्यानां वेदोक्तकर्म करण्याचा अधिकार आहे, असें पुष्कळ हिंदुशास्त्रांचें ग्रंथांत वर्णन केलें आहे. आणि ऋषिब्राह्मणांस यज्ञयागादि पवित्र धर्मकृत्यांत विश्वब्रम्ह संततीचे ब्राम्हणांची नेहेमीं गरज लागते.

---

Bombay Low Report 11.

" **बांबेलारिपोर्ट ११**" यांतील प्रसिद्ध शंकर शेट दत्तविधान प्रकरण—ज्यामध्यें नामदार मिस्टर जस्टिस फ्यारन साहेब यांनीं असें ठरविलें आहे कीं दैवज्ञांस ब्राह्मण कायदा लागू आहे, शूद्र कायदा लागू नाहीं.

---

Hindu law.

**नेल्सन साहेब** यांचा **हिंदूलॉपेज** १४० यांत पंचाल सोनार लोकांस आचार्य किंवा भट्ट ह्मणण्याचा अधिकार आहे आणि वेदाध्ययन करण्याचा अधिकार आहे. असें ह्मटलें आहे.

---

**मोनियर विल्युम साहेब** यांचा इंग्रजी मेमोचा प्यारा २।३।४।६ यांत ह्मटलें आहे आमची जाति उंच वर्णाची आहे.

---

**मेहरबान हावर्डसाहेब** यांचें दुसरें बुक किंवा आवृत्ति भाग २ रा धडा ३४ यांतही आमची जाति ब्राह्मण आहे असें ह्मटलें आहे.

---

MADRAS, FORT SAINT GEORGE GAZETTE.

That the so-called Kammalas Kamsalis do not at all give room for the remarriage of widows as stated in para 5 of the Fort Saint George Gazatte dated 25th May 1901; though that system of re-marriage is now becoming prevalent among the brahman community not a case of re-marriage of widows has yet taken place among the visvabhramans.

**भाषांतर.**

मद्रास येथील ता० २५ में सन १९०१ चे फोर्ट सेंटजार्ज गझेटचा पारिग्राफ ५ यांत कमलास आणि कंसलीस ( विश्वब्राह्मण ) या मध्यें विधवांचे पुनर्विवाह मु-

---

१ दैवज्ञ ब्राह्मण कोंकणस्थ स्वर्णकारासही म्हणतात.

ळींच होत नाहींत, आणि इतकेंच नव्हें तर ब्राह्मण लोकांत हल्लीं पुनर्विवाहाची पद्धति सुरू आहे तरी देखील विश्वब्राह्मण लोकांत अद्यापपर्यंत एकही पुनर्विवाह झालेला नाहीं. असे ह्मटले आहे.

---

**मे० डब्ल्यु फ्रान्सिस. आय. सी. एस. साहेब यांचे अर्जांतील उतारे.**

3. That the terms Kamamla and Kamasala are not the names of caste but of profession in which they become engaged.

6. That Srutis [ vedams ] make mention of the strictest *B*rahmathvam claimed alone by those that are engaged in works of Iron, Timber, coppor, stone and gold styled as the panchakritya of Visvabrhmans otherwise called as masonic Brahmans.

2. That the visvabrahamans are not at any time or age in the habit of employing Brahmans as priests or pourohits as their services are not in need when many pourohits are available in their own community.

**भाषांतर.**

३ कमर्लस आणि कंसलस हीं जातींचीं नांवें नाहीं परंतु हीं नांवें धंद्यासंबंधानें पडलेलीं आहेत.

६ जे ब्राह्मण लोक लोह, काष्ट, ताम्र, पाषाण आणि सुवर्णाची कामें करितात ( ज्या कामांस विश्वब्राह्मणांचीं पंचकृत्यें असें ह्मटलें आहे ) ते विश्वब्राह्मण लोक ब्राम्हत्वाचा हक्क फक्त आमचाच आहे, असें म्हटल्याचें वेदामध्यें एकें ठिकाणीं सांगितलें आहे.

२ विश्वब्रम्हणांतील लोकांनीं आजपर्यंत कधींही कोणतेही काळीं अगर युगांत ब्रम्हणज्ञांतील उपाध्यें अगर भट्ट लग्नकार्यांत आणलेले नाहींत, कारण विश्वब्राम्हणांत पुष्कळ उपाध्याय असल्यामुळें त्यांची कधींही जरूर पडली नाहीं.

---

कानडे पंचाल हें आपल्या स्वज्ञातीय भट्टांकडून आपले वेदोक्त कर्म करितात, त्यामुळें वेव्हारे ब्राम्हण जोशी यांचा हक्क पोंचत नाहीं. परंतु कांहीं खेडेगांवचे वेव्हारी ग्रामजोशी द्रव्याच्या आणि वशिल्याच्या बळानें विनाकारण पंचाल ब्राम्हणांशीं तंटे करितात. असो कितीही जरी तंटे केले तरी सरकारांत न्यायाचे अंती पंचालांचा हक्क पंचाल ब्राम्हणासच मिळतो. वेव्हारी ब्राम्हण ग्रामजोशी यानां मिळत नाहीं. याविषयीं हे पुढील निवाडे पहा.

---

( कागद ६ वा ) **निवाडा ६ वा.**

(१) नकलेस कागद प्रतिवादीकडून आल्याची तारीख १२ एप्रेल सन् १८८३

(२) नक्कल तयार तारीख २० एप्रिल सन् १८८३ ईसवी.

---

१ हा अर्ज मद्रासेकडील लोकांनीं छापला आहे परंतु त्यावर तारीख नाहीं. २कला. ३कौशल्य.

(३) नक्कल प्रतिवादीस दिली तारीख २१ एप्रिल सन १८८३ ई०

त्र्यंबकमोरेश्वर
अवधी कोर्ट.

## हुकूमनामा.

सातारा येथील पाटण कोर्टाचे स० जज्ज यांचे कोर्टांत
मुक्काम पाटण येथें.

दिवाणी मुकदमा नंबर १५९ सन १८८१ पैकीं.

रामचंद्र नारायण जोशीं देशपांडे व कुळकर्णी जात ब्राह्मण धंदालिहिण्याचा. उमर वर्षे ३५ राहणारा कसबे चाफळ, तालूके पाटण.... } वादी

विरुद्ध.

तात्याबिन् बाळशेट सोनार व महादेवबिन् नारायण सोनार उमरवर्षे अनुक्रमें ४५।५५ कसबे चाफळ व उंब्रज ता० कऱ्हाड. }

दावारुपये ४॥८

वादीचा दावा असा आहे कीं, नंबर १ प्रतिवादी तात्याबिन बाळशेट सोनार यानें आपल्या बहिणीच्या मुलीचें लग्न शके १८०१ चे वैशाख मासीं केलें, त्याजबद्दल जोशीपणाचे सर्व हक्क वादी सदरहू चाफळ गांवचा वतनदार जोशी असून त्या सालची वर्षल वादीचीं असल्यामुळें त्याचा हक्क खालीं लिहिलेलें आमिष मिळणेचा असतां त्यानें वादीस न देतां नंबर २ प्रतिवादी महादेव बिन नारायण सोनार यांस दिलें त्याचा तपशील—

॥१ गणपतीपूजनाबद्दल.
॥१ घाटिकास्थापनाबद्दल.
॥८ पुण्यहवाचनाचें सामान अजमासें.
॥४ पत्रिकापूजनाबद्दल.
॥२ वधुवरांचे हातांतील नारेळ २ किंमत.
१ नवरेमुलाचें फाटकें धोतर, नेसतो तें किं०
॥८ अंतरपाठाचा ( नांदीचा ) शेला किंमत अजमासें.
१ लग्नाचे शिधे ३ किंमत आजमासें.
१ लग्नाबद्दल संभावना.

वादीची विनंति अशी कीं, चाफळ गांवचें जोशीपणाचें वतन. भाऊपणाचे वर्ष-

---

१ देशावर पंचाल ब्राह्मण जातीय सोनारास नाईक किंवा पोद्दार ह्मणण्याची प्रसिद्ध वहिवाट असून वादीनें प्रतिवादीचे नांवांत बिन व शेट हे शब्द द्वेष बुद्धीनें ( प्रतिवादीचें ब्राह्मण्य लोपविण्याच्या हेतूनें अर्जांत फाजील घातले आहेत. वा ! काय ही युक्ति लढविली आहे ! अहो तळहातानें सूर्य कसा झांकेल ? असो प्रतिवादीचें नांव तात्या बाळकृष्ण नाईक पोतदार असें कागदोपत्रीं आहे.

२ हा नंबर २ चा प्रतिवादी हा सोनारांचा उपाध्याय आहे. याचे वंशांत पिढेपिढीं वैदिक उपाध्याय वृत्ति असल्यामुळें यास महादेव भट्ट बिन नारायण भट्ट पाठक असें नांव ज्या गावांत हा राहतो त्या ( उंब्रज ता० कऱ्हाड )या प्रांतात प्रसिद्ध आहे. प्रांतांतले सर्व लोक यांस महादेवभट्टजी असें हमेष ह्मणत असून, वादीनें त्याचें नांवांतील भट हीं अक्षरें काढून टाकिली. ही कपटाची कोटी उघड आहे, ह्मणून या ठिकाणीं " महादेवभट्ट बिन नारायण भट्ट " असें वाचावें.

लीचे फेरपाळीनें वादीचे मालकीचे असा वादीचा हक्क ठरवून त्या हक्का बद्दलचे सदरहू उत्पन्नाबद्दल आकार रुपये ४८८ प्रतिवादीकडून देवाविणें विषयीं फैसल्ला वादीस मिळावा.

ता० ५ मार्च सन १८८३ ईसवी रोजीं रावसाहेब स० जज्ज आत्माराम जमनादास यांचे समोर वादी रामचंद्र नारायण खुद्द गैरहजर व प्रतिवादी एक दोन तर्फे वकील नारो नरसिंह याचें समक्ष अखेर निकालासाठीं मुकदमा निघून हुकूम होत आहे कीं, वादी रामचंद्र नारायण जोशी कुळकरणी यांचा दावा सर्व खर्चासुद्धां रद्द असे.

दाव्याचा खर्च.

| | |
|---|---|
| १८७८१ वादीस खर्च | ७८१०८७ प्रतिवादीस खर्च. |
| ८१५ स्टांपाबद्दल. | ८११ स्टांपाबद्दल. |
| ८६ प्रोसेस खर्च. | ३८११ इतरटपालखर्च. |
| ८२८१ वकिलीखर्च. | ८१४ प्रोसेस. |
| | ८४८६ लिहिणावळ. |
| | ८३ पोटगी खर्च. |
| | ८२८१ वकिली. |
| १८७८१ | ७८१०८७ |

प्रतिवादीस देवाविला. ७८१०८७ व प्रतिवादीवर ठेविला ६.

| | |
|---|---|
| ९८१८ | १३८१०८७ |

येणें प्रमाणें खर्च झाला असे.

आज ता०५मार्च सन१८८०रोजीं आमचे सहीनिशी व कोर्टाचे शिक्यानिशीं दिली.

सही इंग्रेजी आत्माराम जमनादास.
स० जज्ज.

तपासून बरोबर आहे.
यशवंत बाळाजी कारकून.
पुरुषोत्तम केशव कारकून.

या नकलेंत वादीचे नांवात दुसरे ओळीस ( पाटण ) यास व दाव्याखालीं दुसरे ओळीस ( मुलींचे ) हीं अक्षरें शोध आहेत.

नक्कल करणारा—चिंतो बाबाजी फी कारकून.

अस्सल बरहुकूम नक्कल रुजू.
पांडुरंग माणीक कारकून.

शब्द सुमारें ३००
८४८६ लिखाई.
८१८६ रुजुवात.
८८३ कागद.

८६८३एकूण

खरी नक्कल.
त्र्यंबक मोरेश्वर.
क्लार्क ऑफ दी कोर्ट.




या हुकूमनाम्यावरूनही द्रव्यमदामुळें सदरहू वादीचा असूयाभिमान कमी न होतां प्रतिवादीची वृत्ति हरण करण्याच्या हेतूनें पुनः आणखी वादीनें जिल्हा जज्ज कोर्टांत अपील केलें. परंतु तेथेंही प्रतिवादी सारखाच निकाल झाला. कारण, सत्यमेवजयते. ( कोठेंही गेलें तरी खऱ्यास मरण नाहीं. ) ही अपील मिनिटाची नक्कल पहा—

---

अपील नंबर, १३८/१८८३ नि० ता. २१ सपटंबर सन १८८३ यांतील अपील मिनिटाची नक्कल.

**कागद ७ वा.**

The copy was applied for on the eighteenth July 1887
It was ready for delivery on the twenty fifth July 1887.
It was delivered on the twenty sixth July 1887

गोपाळ त्रिंबक दप्तरदार.

In the District court of satara
*At* Sattara.
Appeal No. 138 of 1883.

| | | |
|---|---|---|
| Vakeels Trimack Bulwant. | Ramchandra Narrayen | appellant Plantiff |
| Vithal Nilkant. | *Tatya* Bin *Bal*-shett and *Maha*-deo bin *Narayen* | Respondent Defendant |

Original claim filed on 29th, september 1881 for Rs. 4-8-0
Decided 5th March 1883.

Appeal filed on 9th April 1883 for Rs. 4-8-0 Plaintiffs claim was to obtain a declaration that he was the sole; Gram Joshi of Kasba Chaphal in which Defendent No. 1st lived and a marriage took place in his family and Defendant No. in place of employing him [ plaintiff ] had employed the Defendant No. 2 and had paid him so Plaintiff said, for the above declaration and for Rs. 4-12-0 the " fee " due for such a ceremony Tatya said that he had never employed Plantiff she could not claim, that he had always employed Deffendant No 2 who was his family " Oopadhia " or " Bhut " Defendant No 2 said he was Oopadhia of Defendant No 1 st family, and was always employed by them and Plantift never was.

The sub Judge Patan found that the Plantiff was " Gram—Joshi " of chaplwl but not " Joshi " of defendant No. 1 st family [ sonars ] and he threw out the claim.

Ramchandra appeals—
1 Is " Joshi " of Chaphal and this year his turn to officiate came--so should have had the fees.
2 Should have had the fees.
3 No decision as to what " Joshi " should have and what on " oopadhia. "
4 Defendant does not prove that he Plaintiff has no right to be " Joshi " of sonars.
5 Is " Joshi " for sonars.
6 Wrong reas ons for decision.

ISSUE.

Has Defendant No. 2 whom his sole right to officiate as " Joshi " in Defendant No. 1 st. family, and that he can take the fees;

No. other sought.

It is not denied that Plaintiff is the " Gram Jcshi " of Chaffal. but Plaintiff says he is the " Joshi " of the Defendant No. I st. family who are sonars—and who say, they can employ another " Joshi " this plea of the Defendants is one which under the decision in Raja walad Shiwappa Reports lll page 232 has to be proved by the party who sets it up there the Defendant plead exemption from the operation of the general rule as to Watandar, Joshi on the ground that he is a sonar and that his caste have their own family priests. This was the plea in the case above referred to and here the same question—arises. Have the Defendants shown exemption from the general rule ? No. 30 sonar says he is oopadhia of the caste ( Not Brahmin ) and takes the fees which the Bramhan Joshi does not take, has seen this practice for 30 years. No. 31 [ sonar ] says he attends the Defendants family and performs any religeous ceremonies which take place and he has done this for 20 years and has been paid for it Defendant No. 2 is his consin and he [ 31 ] acts for him and the plaintiff is not paid at all. Witness takes all No. 32 [ sonar ] calls Defendant No. 2 sonar Bhut has known him 15 years, the Bramhans are not employed by the sonars at all.—

No. 37 Koonbi says the same, he attends the house as messenger on such occasions to carry invitations, and is paid No 38 [ sonar ] says Defendant No. 2 is the ' Bhut ' employed by the defendant No. I though Gopal of Karad [ 31 ] is the chief officiator for sonars and Bramhans are not employed or paid. No. 39 [ sonar ] says as above that a Bramhan Joshi is not employed by sonars. This is the evidence and I think nothing can be clear than that the Defendants have proved full exemption from the operation of the general rule as to Village joshi being able to claim fees from all villagers. The fact of

plaintiff being "Gram joshi" does not effect this question and if the Defendants exemption be proved as I think is the case, the question is settled. The plaintiffs evidence does not contradict the Defendants and I must find the Defendants pleas proved, the claim therefore fails and the sub judges decree therefore must be confirmed costs on Plaintill.

20-9-83 [ sd. R. F. Mactier,
District judge.

True copy.
K. I. Bh.—
Clerk of the court.

अपील नंबर $\frac{१३८}{१८८३}$ नि० ता० २१ सपटंबर सन १८८३ अपील मिनिटाची नकल.

नक्कल मिळण्या करितां अर्ज ता०१८ जुलई सन्१८८७.

नक्कल तयार ता०२५ जुलई सन् १८८७.नक्कल मिळाली. ता०२६जुलई १८८७

गोपाळ त्र्यंबक दप्तरदार.

सातारा येथील डिस्क्रिक्ट कोर्टांत

सातारा.

अपील नंबर १३८ सन १८८३चा.

| | | |
|---|---|---|
| वकील त्र्यंबक बळवंत. | रामचंद्र नारायण........................ | अपील करणार वादी |
| वकील विठ्ठल निळकंठ | तात्याबिनबाळशेटआणिमहादेवबिननारायण | प्रतिवादी- |

दावा ४८८रुपये.

मूळचा दावा याची फिर्याद ता०२९सप्टंबर सन्१८८१इसवी.

ता०५मार्च सन् १८८३ रोजीं निकाल झाला.

दावा रुपये ४८८ बद्दल अपील ता०९एप्रिल सन्१८८३रोजीं फैलावर घेतला.

वादीचा दावा असा होता कीं, कसबे चाफळ, जेथें प्रतिवादी नंबर१चा राहतो त्या कसबे चाफळचा मी एकटा ग्रामजोशी आहें. आणि प्रतिवादीच्या कुटुंबांत लग्न झालें. आणि प्रतिवादी नंबर १ यानें वादीला (ग्रामजोशाला) लग्नामध्यें उपाध्याय लावण्याबद्दल प्रतिवादी नंबर२चा उपाध्याय लग्नाला लावला. आणि त्याला दक्षणा दिली म्हणून वादीनें सदर जाहीरनाम्याप्रमाणें आणि दावा४८८जी दाक्षिणा लग्नसमारंभास योग्य याबद्दल फिर्याद लाविली. तात्या म्हणाला कीं, मी कधीं वादी ग्रामजोशाला हव्यकव्यास बोलाविलें नाहीं. आणि त्यानें दावा सांगूं नये. १तात्या म्हणाला कीं, मी नेहमीं नंबर२चा जो माझा कुलोपाध्या अथवा भट्ट झाला मी कामाला नेहमीं बोलावीत असतो. प्रतिवादी नंबर२म्हणाला कीं, मी प्रतिवादी नंबर १याचा कुलोपाध्याय असून मलाच नेहमीं बोलावितात व वादीस कधीं बोलवीत नाहींत.

पाटण येथील सबार्डिनेटजज्ज यांस असें दिसून आलें कीं, वादी हा चांफळचा

ग्रामजोशी परंतु प्रतिवादी नंबर १चा (सोनारांचा)कुलोपाध्या नाहीं म्हणून यानें दावा काढून टाकला.

१चांफळ येथील जोशाचें ह्या वर्षी साल होतें काय? व तो उपाध्येपणा करावयास आला होता काय? आणि त्याची त्याला दक्षणा मिळावी काय ?

२ दाक्षिणा मिळाली काय?

३ जोशांना काय मिळावें याबद्दल ठराव नाहीं. आणि उपाध्या ह्मणजे काय?

४ प्रतिवादी पुरावा करीत नाहीं कीं, वादी हा सोनारांचा जोशीअसण्यास हक्क नाहीं.

५ सोनार लोकांचा जोशी आहे काय?

७ ठरावाच्या कारणांत चूक आहे?

## हुकूम.

प्रतिवादी नंबर २ यांनीं प्रतिवादी नंबर १ याच्या कुलोपाध्येपणाचा व जोशीपणाचा पूर्ण हक्क दाखविला कीं, तो दक्षिणा घेऊं शकेल. दुसराकोणी घेऊं शकणार नाहीं.

वादी हा चाफळचा ग्रामजोशी नाहीं असे नाहीं, परंतु वादी ह्मणतो कीं, मी प्रतिवादी नंबर १ चा जोशी आहे. ते सोनार आहेत. ते ह्मणतात कीं, आह्मी दुसरा जोशी लावितो हें प्रतिवादीचे ह्मणणे, एक राजावल्लदशिवापा रिपोर्ट कलम ३पान२३२ याच्या निवाड्याप्रमाणें असें सिद्ध करावयाचें आहे कीं, वतनदार जोशीपणाचा हक्क साधारण नियमांवरून रद्द करणें, तो सोनार जातीचा असून तो आपल्या जातींत कुलोपाध्या आहे. वरील प्रकर्णामध्यें असा ठराव झाला आहे, आणि असाच प्रश्न उत्पन्न होतो. प्रतिवादी यांनीं साधारण नियमावरून दाखविलें कीं त्याचें उपाध्येपण रद्द केलें आहे कीं काय ? नंबर ३० चा एक सोनार ह्मणतो कीं, मी सोनार जातीचा एक उपाध्या आहें. ( मी विप्र लोकांचा नाहीं. ) आणि जी दक्षणा ब्राह्मण जोशी घेत नाहींत, ती मी घेतों. ही वहिवाट ३० वर्षे चालू आहे. नंबर ३१ ( सोनार ) ह्मणतो कीं, मी प्रतिवादी याच्या घरीं कोणतेही धर्मसंबंधीं हव्यकव्य होत असतां मी जाऊन करितों, आणि हें मी वीस वर्षे करीत आहें. आणि त्याबद्दल दक्षणा मिळाली आहे. प्रतिवादी नंबर २ हा माझा चुलत भाऊ आहे. आणि तो ( नंबर ३१ ) चा त्याच्याकरितां काम करतो. आणि प्रतिवादीला कांहीं मिळत नाहीं. साक्षीदार सर्व घेतो. नंबर ३२ चा सोनार, नंबर २ चा सोनार यास सोनार भट्ट असें ह्मणतो, आणि १५ वर्षे तो त्यास ओळखितो.

सोनारलोकांकडून ब्राह्मण जोशांना धर्मसंबंधीं कामांत कधीं लावीत नाहींत. नंबर ३७ चा एक कुणबी असेंच ह्मणतो तो कुणबी त्यांची नौकरी करितो, व लग्नसमारंभांत मंडळीला बोलावणें वगैरे इत्यादिक काम करितो. आणि त्याचा पगार त्यास मिळत असतो. नंबर ३८ चा सोनार म्हणतो प्रतिवादी नंबर२ हा भट्ट आहे, प्रतिवादी नंबर १ यांनीं बोलावून आणिला, जरी कऱ्हाडचे गोपाळभट्ट नंबर ३१ हे सोनार लोकांचे मुख्य उपाध्ये आहेत. १ ब्राम्हण लोकांना बोलावीत नाहींत, व दक्षणाही देत नाहींत नंबर ३९ चा सोनार म्हणतो सदरप्रमाणें ब्राम्हण जोशी सोनार-

लोक बोलावीत नाहींत. हा पुरावा आहे. आणि मला वाटतें कीं, इतका पुरावा उघड मिळणार नाहीं. प्रतिवादी यांनीं ग्रामजोशी यांचा हक्क पुराव्यावरून सिद्ध करून मुळींच काढून टाकला. ग्रामजोशी हे इतर लोकांकडून दक्षणा घेण्यास समर्थ आहेत वादी हा ग्रामजोशी आहे. प्रतिवादी यांनीं पुराव्यावरून हक्क ना शाबीद केल्यास ग्रामजोशास हक्क नाहीं. मला वाटतें कीं या खटल्याच्या शंकेचा निकाल लागला. वादीचा पुरावा प्रतिवादीच्या म्हणण्याला विरुद्ध येत नाहीं. आणि मला असें दिसून येतें कीं, प्रतिवादीचा निवाडा कायम झाला. म्हणून वादीचा दावा रद्द होतो. आणि सबा० जज्जाचा हुकूमनामा वादीवर खर्चाबद्दल झाला आहे.
ता० २० माहे आक्टोबर सन १८८३ ई०

आर. एफ. म्याकटीयर.
डिस्त्रिक्ट जज्ज.

| | |
|---|---|
| शद्ब ७६० सातशे साठ.<br>फी ८१५८२ पंधरा आणे दोन पै.<br>कागद फक्त ८८४ चार पै. | खरी नक्कल<br>( सही इंग्रजी )<br>कोर्टाचा क्लार्क |

कोर्टाचा शिक्का

आतां कांहीं आमचे अल्पज्ञ मित्र असें ह्मणतील कीं, पंचाल सोनारांनीं आपल्या जातींत उपाध्याय आलीकडे इंग्रजी झाल्यापासून स्थापन केले असावेत. कारण आतां इंग्रजी राज्यांत ह्वें त्यांनीं हवें तें करावें. प्राचीनकाळीं पेशवाईच्या वेळेस सोनार भट्टजी होते काय या आमच्या मित्रांच्या निर्मूळ शंकेचें समाधान होण्याकरितां पुढील निवाडे पहा.

A paper read by the Hon: Mr. justice M. G. Ranade, M. A. L. L B. C. I. E.
Before the Bombay Branch Royal Asiatic Society in 1900.

Peishwa's Diaries page 35—36. " The right of the Sonars to employ priests of their own caste was upheld against the opposition of the Poona *Joshis.* "

कै० नामदार न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांनीं सन १९०० सालीं पेशव्याची डायरी म्हणून पुस्तक छापलें आहे त्यांतील ३५।३६ पानामध्यें असें म्हटलें आहे कीं, पुण्याचे ग्रामजोशी व सोनार यांचेमध्यें सोनारांनीं आपल्या जातीच्या उपाध्यायाकडून लग्नादि कार्यें करविल्याबद्दल तंटा उपस्थित होऊन तो तंटा सरकारांत गेला व शेवटीं असें ठरलें कीं, सोनारांनां आपल्या ज्ञातीच्या उपाध्यायामार्फत हव्यकव्यादि कार्यें करविण्याचा हक्क आहे.

हा ठराव बहुतकरून थोरले माधवराव पेशवे यांचे कारकीर्दीत[1] झाला असावा, कारण त्यांचेवेळीं न्यायासनावर प्रसिद्ध रामशास्त्री हे असल्याचें महशूर आहे,

आणखी याविषयीं निबंध न्यायमूर्ति रानडे यांनी " पेशव्याची न्यायपद्धति " म्हणून टाईम्स ऑफ इंडियाच्या ७ जुलई १९०० रोजच्या साप्ताहिक पत्रांमध्यें सविस्तर छापला आहे.

या ठरावानंतर हें प्रकरण कांहीं वर्षे शांत झालें. पुढें १८२४ सालीं अशाचप्रकारचा खटला पुणें येथील वेव्हारी जोशी व स्वर्णकारादिक ब्रह्मपचाल यांचे वृत्तिसंबंधीं तंटे होऊन तो खटला मेहेरबान राबर्टसनूसाहेब बहादूर कलेक्टर जिल्हा पुणें यांच्याकडे पुष्कळ दिवस चालला होता. तेव्हां त्यांनीं कित्येक हिंदुशास्त्राच्या ग्रंथाधारांचा सारांश घेऊन त्यांत अनुक्रमें सात प्रकारचें रथकार ह्मणजे १ शिव पंचाल, २ देव पंचाळ, ३ ब्रह्मपंचाल ४ देवाज्ञ, ५ उपपंचाल, ( ६ संकर रथकार, " ७ व्रात्य वैश्य )" असे सप्तविधरथकार असून आठवा एक केवळ शूद्रवत् भेद आहे. खालीं लिहिल्याप्रमाणें:—

( कागद ८ वा ) नंबर १ ला. ( शिवपंचालांचा )

शैवागम ह्मणून हिंदुकायद्याचें जें पुस्तक आहे त्यांतील उतारा घेतला आहे तो असा कीं, शिवाच्या ( परशिवविश्वकर्म्याच्या )पंच मुखापासून वेद उत्पन्न झाले, आणि त्याच्या कपाळापासून ब्राह्मण उत्पन्न झाले, आणि क्षत्रिय, वैश्य, शूद्र, हे त्याच्या शरिराच्या निरनिराळ्या अवयवापासून उत्पन्न झाले.

पांच मुखांपासून झालेले ब्राह्मणांची नांवें ह्मणजे मनु, मय, त्वष्टा, शिल्पी, दैवज्ञ, यांपैकीं मनु ( लोहार ), मय ( सुतार ), त्वष्टा ( तांबट अथवा कांसार ), शिल्पी ( पाथरवट ) आणि दैवज्ञ ( सोनार ) हे पांच पंचाळ जातीचें मुख्य आहेत. खालीं लिहिल्याप्रमाणें त्यांचें गुण, धंदेवगैरे आहेत. कोष्टकः—

| सं. | प्रकार. | मनु. | मय. | त्वष्टा. | शिल्पी. | दैवज्ञ. |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | स्वभाव.— | महेश,संहारक | विष्णु,संरक्षक. | ब्रह्मा, उत्प.क. | घरेंबांधणारा. | सोन्याचेंकामकर. |
| २ | वर्ण.— | स्फटिकमयव. | नीलवर्ण. | आरक्तवर्ण. | धुरकटवर्ण. | सोनेरीवर्ण. |
| ३ | गुण. | क्रोध (राग) | सत्य (सत्व) | प्रीति (रजो) | राग,सत्य,प्रीति. | खरें सत्य (शुद्ध) |
| ४ | कर्मकर(कुंड) | त्रिकोण. | चौकोन. | वर्तुल. | षट्कोण. | अष्टकोण. |
| ५ | दंड— | रुप्याचा. | बांबूचा. | तांब्याचा. | लोखंडाचा. | सुवर्णाचा. |
| ६ | सूत्रें. | रुप्याचें. | कमळाचेदेठाचें | तांब्याचें. | कापसाचें. | सोन्याचें. |
| ७ | व्यवहार.— | लोखंडाचा. | लांकडाचा. | तांब्यापितळे. | दगडाचा. | सोन्याचा. |
| ८ | वेद. | ऋग्वेद. | यजुर्वेद. | सामवेद. | अथर्वणवेद. | सुषुम्नारव्यवेद. |
| ९ | गोत्रें. | सानग. × | सनातन. | अहभून. | प्रत्न. | सुपर्ण. |
| १० | व्यवहारधर्म. | लोहसंहिता. | सूलसंहिता. | ताम्रसंहिता. | शिलासंहिता. | स्वर्णसंहिता. |

१ इसवी सन १७६१—७२ पर्यंत थोरले माधवराव यांची कारकीर्द आहे. त्यांच्या कारकीर्दीत नाना फडणवीस हे कारभारी होते; हे मोठे अक्कलवान्, दूरदृष्टी व राज्यकारभारांत अत्यंत निपूण होते. त्यांनींही पंचाल सोनारास न्याय दिला आहे तो या प्रकरणाच्या शेवटीं दिला आहे तो पहा.

× अनुक्रमें कौंडण्य , अत्रि, भरद्वाज, गौतम, काश्यप, अशीं हीं गोत्रें रथकारकल्पद्रुमोक्तीवरून कोंकणस्थ दैवज्ञांतच बहुधा आहेत.

सदरील पांचजणांमध्यें मनु सर्वांत वडील असून लोखंडी हत्यारें करितो; आणि ती हत्यारें पांचही जातीस देऊन आपणास आचार्य ह्मणजे शिक्षक अथवा रस्ता दाखविणारा असें ह्मणवितो. मनुची स्त्री कांचना ही अंगिरा ऋषीची कन्या, मयाची स्त्री सुलोचना ही पराशर मुनीची कन्या, त्वष्टाची स्त्री जयंती कौशिक मुनीची कन्या, शिल्पीची स्त्री करुणा ही भृगूची कन्या, दैवज्ञाची जी स्त्री चंद्रिका, ती जैमिनीची कन्या सदरील पांचजणांस ब्रह्म ऋषीनीं आपआपल्या कन्या दिल्या आहेत.

**नंबर२रा.** (देवपांचालांचा-)

पैतामह मनु याचा बाप ब्रम्हा, आणि प्रजापति (म्हणजे)ज्यास आठ मुलगे होते, त्याचा बाप पैतामह मनु. त्या आठ मुलांस वसु असें म्हणतात. १ आप, २ ध्रुव, ३ सोम, ४धर, ५अनिल, ६अनल, ७प्रत्युषस, आणि ८प्रभास. प्रभासाचा मुलगा पंचमुखी विश्वकर्मा त्यास दहा भुजा असून त्यांचीं आयुधें कुऱ्हाड, कुंभ, सोन्याचा तुकडा, विस्तववगैरे वर्णन भारताचे आदिपर्वांत केलें आहे. आणि असें लिहिलें आहे कीं, विश्वकर्म्याच्या पांच मुखांपासून मनु, मय वगैरे पांच जनांनीं पुनः अवतार घेतला. त्यांचा स्वभाव, गुण आणि व्यवहार शिवाच्या पांच मुखापासून उत्पन्न झालेल्या पांच जनांप्रमाणेंच आहेत. आणि त्यांचें विशेष वर्णन शैवागम, रुद्रयामल, स्कंदपुराण अथवा त्याचा भाग नागरखंड ह्यांत केलें आहे.

**नंबर३रा.** ( ब्रह्मपंचालांचा )

शैवागम, रुद्रयामल, सुरपांचालतंत्र, आणि असुरपंचालतंत्र त्यांमध्यें असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, "संपूर्ण पंचालांचे" मूळ पुरुष पांचच आहेत. म्हणजे सानग, सनातन, अहभून, प्रत्न, सुपर्ण यांचेच वंशज आजपर्यंत पृथ्वींत या नांवांनीं आहेत.

**नंबर ४ था.** ( दैवज्ञांचा म्हणजे देवाग्न पंचालांचा.)

अग्निदैवतापासून एक दंपत्य उत्पन्न झालें त्यापैकीं पुरुषाचे हातीं फुंकणी आणि स्त्रीच्या हातीं अग्निकुंड, त्यांच्यापासून सोनार उत्पन्न झालेले आहेत. हें वर्णन अग्निपुराण ह्मणून जे कायद्याचें बूक आहे त्यांत तपशीलवार केलें आहे, आणि भार्गव संहिता आहे त्यांतही तपशीलवार केलें आहे अग्नीच्या हातांत बर्ची, घृतपात्र पंखा वगैरे असून त्यास दोन मुखें, सात जिव्हा, चार शिंगें, सात हात, आणि तीन पाय आहेत. सदरील पांच प्रकारचे जे सोनार आहेत त्यांस ह्या जगांत उपब्राह्मण असें ह्मणतात त्यांना वेदोक्त कर्म करण्याचा अधिकार आहे. आणि जे सोनार दक्षिण आणि पूर्व देशांत राहतात. त्यांची एक जात असून त्यांचा कन्या व्यवहारही आहे.

**नंबर५वा** (उपपंचालांचा)

विश्वकर्माचे आज्ञेप्रमाणें ब्रह्मदेवानें विराट्रूप धारण केलें, आणि त्याच्या मुखापासून स्वायंभुवमनु उत्पन्न झाला; त्या पासून सहा ब्राह्मण आणि चार उपब्राह्मण उत्पन्न झाले. या चार उपब्राह्मणांची नांवें—१शिल्पायन, २गौरवायन, ३ कायस्थायन, ४ मागधायन. त्यामध्यें वडील शिल्पायन, असून त्यास पांच पुत्र होते. ते—१लोहार, २ सुतार, ३ तांबट, ४ पाथरवट, ५ सोनार. या पांच जनांला शिवाच्या (प-

राशिवविश्वकर्मांच्या ) पांच मुखांपासून वेद प्राप्त झाले होते. त्या पांच जनापासून ह्या. पांचजनांनीं पंच वेदाभ्यास केला. त्यांचा स्वभाव, गुण आणि व्यवहार त्यांच्या शिक्षकाप्रमाणेंच आहे.

## नंबर ६वा.(संकररथकारांचा)

सदरील शिवाय करून संकर रथकार ही एक ज्ञात, व्रात्य वैश्यपुत्र ही एकजात आहे. ह्या दोन्हीही जातींत लोहार, सुतार वगैरे पांच कर्मे करणारे आहेत. संकर जातीला वेदोक्त कर्माचा अधिकार असून त्यांचे उत्पत्तिचें वर्णन असे आहे कीं, क्षत्रिय जातीचा पुरुष आणि वैश्य जातीची स्त्री यांपासून पुत्र झालेला तो माहिष्य, वैश्य जातीचा पुरुष आणि शूद्र जातीची स्त्री यांच्या पोटीं झालेली कन्या ती करणी. माहिष्य आणि करणी या उभयतांत झालेला पुत्र त्यापासून झालेली जी संतती ते संकर रथकार होत. त्याचा दाखला खालीं लिहिलेल्या २९ हिंदुकायेद बुकांत विवेचन केले आहे.

१अधिकरणरत्नमाला. २कात्यायनसूत्र. ३हिरण्यकेशीसूत्र. ४अपस्तंबसूत्र. ५कर्कभाष्य. ६काशीदीक्षितीय. ७स्मृतिकारिका. ८देवयाज्ञिक. ९सुबोधिनी. १०नारायणीय. ११धूर्तभाष्य. १२ कपर्दीभाष्य. १३ चौंडप्रयोगरत्नमाला. १४विश्वनाथभट्टी. १५ वैजयंती. १६याज्ञवल्क्यस्मृति. १७शंखस्मृति. १८मनुस्मृति. १९पाराशरस्मृति. २० विज्ञानेश्वरजातिविवेक. २१दलपतजातिविवेक. २२माधवजातिविवेक. २३संस्कारसार. २४नृसिंहप्रसाद. २५स्मृतिदर्पण. २६गोविंदार्णव. २७वृहज्जातिविवेक. २८अंडबिल. २९ कमलाकरजातिविवेक.

वेदोक्त कर्म करण्याचा अधिकार संकर रथकारास आहे. हें सदरील २९ ग्रंथांत लिहिलें आहे. त्याचप्रमाणें अध्ययन आणि याशिवाय दर्शपूर्ण मासांत सोळा कर्मे, जात कर्म, उपनयन वगैरे करण्याचा अधिकार असल्याचें लिहिलें आहे.

## नंबर७वा (व्रात्यवैश्यांविषयींचा)

चार ग्रंथ किंवा कायद्यांचीं बुकें—वृद्धमनुस्मृति शास्त्रदीपिका, सोमनाथीय, आणि आपदेवीय, हे मनूचे चार भाग आहेत. ह्यावरून असें स्पष्ट होतें कीं, व्रात्यवैश्यपुत्र ह्यानीं[1] उपनयन केल्याशिवाय अध्ययन वेदोक्ताप्रमाणें शिकून करण्याचा अधिकार आहे. परंतु वेदावर ज्या टीका आहेत त्यांवरून असें निराकरण होतें कीं, त्यांनीं प्रथम उपनयन करून नंतर अध्ययन केलें पाहिजे, ही दोन मतें आहेत. सदरीं लिहिलेले सात रथकारांस वेदोक्त अन्वयें कर्म करण्याचा अधिकार आहे.

संकररथकारांस वेदोक्त कर्म करण्यास अधिकार असल्याचे सदरील२९ग्रंथांत लिहिलें आहे. सहा रथकारांस खालीं लिहिलेल्या ३९चार वेदांसमवेत ग्रंथामध्यें अधिकार असल्याचें आहे. एकंदर ६८ ग्रंथ—

१ऋग्वेद, २यजुर्वेद, ३सामवेद. ४अथर्वणवेद. ५शैवागमपंचालमाहात्म्य. ६

---

१ या जातीचे लोक वैश्य सोनार या नांवानें हल्लीं प्रसिद्ध आहेत. २ यांच्यामध्येंही सुतार, तांबट वगैरे आहेत. व गुजराथेंतील बमनीया सोनार संकरथकारांपैकींच भेद आहे.

बौधायनसूत्र. ७अपस्तंबसूत्रआधानप्रयोग. ८रामायण. ९लौगाक्षिस्मृति. १०नामलिंगानुशासन. ११ सायणाचार्यकृतवेदभाष्य१२शास्त्रदीपिका. १३भाट्टदीपिका. १४आपदेवीय. १५सोमनाथीय. १६शिल्पशास्त्रपांचालधर्म. १७रुद्रयामलवास्तुतंत्र. १८असुरपंचालतंत्र. १९सूत्रसंहिता. २०वराहपुराण. २१भार्गवसंहिता. २२श्रीमद्भागवत. २३ श्रीविष्णुपुराण. २४मार्कंडेयपुराण. २५श्रीमहाभारत. २६मत्स्यपुराण. २७आदित्यपुराण. २८रामांडरू. २९रुद्रदत्त. ३०स्कंदपुराणकाशीखंड. ३१ब्रह्मवैवर्तपुराण. ३२ ब्रह्मवैवर्तकृष्णजन्मखंड. ३३नृसिंहपुराण. ३४अग्निपुराण. ३५पद्मपुराणभूमिखंड. ३६ स्कंदपुराणनागरखंड. ३७ब्रह्मवैवर्तब्रह्मखंड. ३८स्कंदपुराणमैत्रयसंवाद. ३९श्रीकाशीविद्वत्कृतरथकारसंस्कार.

नंबर ८ वा ( शूद्रजातीयशिल्पकारांचा. )

विश्वकर्मा आणि घृताची जी देवाची दासी हीं ( दोघें ) एकमेकांच्या शापामुळें काशी आणि प्रयाग एथें जन्मलीं. विश्वकर्मा ब्राह्मणाचे पोटीं जन्मला. आणि घृताची ही गौळणीच्या पोटीं जन्मली. विश्वकर्मानें आपले धातु लांकूड, आणि पाषाण या मध्यें रोजगार चालविले. त्याची आणि तिची कर्म धर्मसंयोगानें भेट होऊन हिमाचलपर्वतावर गेलीं, तेथें बारा महिन्यांचे आंत त्यांस आठ पुत्र जाहले. त्यांचीं नांवें येणें प्रमाणें:—१ माळी. २ कांसार. ३ शिंपल्यांचें काम करणार. ४ शिंपी. ५ कुंभार. ६ सुतार. ७ सोनार आणि ८ पाथरवट.

वरतपशीलवार सांगितलेले आठ पुत्र हे शूद्र जातीचे होते. कारण त्यांचे मातापितां त्याच जातीचे होते. ह्यापैकीं एकासही वेदोक्त कर्म करण्यास अधिकार मिळेल असें वाटत नाहीं. मग दुसऱ्यांस कोठून ? त्यांच्यामध्यें सुतार, कासार, पाथरवट आणि सोनार हे शूद्र जातीचे आहेत. आणि तसेंच असल्यामुळें वेदोक्ताप्रमाणें कर्म करण्यास त्याला अगदीं अधिकार नाहीं.

ही सर्व प्रकारची विश्वकर्म ब्रह्मनिर्मित प्रजा जाणावी. व ही प्रजा वेदशास्त्रास अनुसरून पूर्वीपासून आपआपल्या धर्मानेंच वर्तत आले आहेत. मत भेदानें प्रजा २प्रकारची आहे. १विश्वकर्मनिर्मिता. २ कश्यपनिर्मिता. पूर्वी ब्राह्मणवर्ण सर्व एकमतीच होते. परंतु पुढें कांहीं कालानें त्वष्ट्याच्या ( विश्वकर्मपुत्राच्या ) आणि आगस्त्याच्या परस्पर शापांच्या कारणांनीं सप्तऋषींचें ऋषि संततीस नाना योनिजन्यत्वाचा कलंक आणि पंचब्रह्म ऋषिसंततीय विश्वकर्मसंततीस कर्महीनत्वाचा कलंक अशीं दूषणें उत्पन्न होऊन मतभेद पडल्यामुळें आपआपल्या ब्राह्मण्यांत गोत्र भेदादिव्यवस्था पृथक् करून परस्परांच्या हव्यकव्यादि व अन्नोदकादि स्वधर्म कृत्यांत संबंध न ठेवण्याची वर्तणूक प्राचीनपासून आहे. त्यामुळें पेशवाई अमलाच्या पूर्वी उभयतांत कांहीं एक तंटा नव्हता. परंतु जगामध्यें अशी चाल आहे कीं, दोनमताचे लोक जोंपर्यंत ऐश्वर्य बळानें समान असतात तोंपर्यंत कांहीं स्पर्धा नसते. त्यांतून एक पक्षास ऐश्वर्यादि बलिष्ठपणा प्राप्त झाला ह्मणजे ते निर्बळाचा द्वेष करूं लागतात. तसें अगोदरच या कलियुगांत नानायोनि समुत्पन्न ऋषि ब्राह्मणांचा, आपल्यापेक्षां दुसरा कोणीही वरिष्ठ असूं नये, हा स्वाभाविक गुण झाला आहे तशांत त्यांच्या कुलांत पेशवे सरकारचा

अधिकार मिळाल्यावर मग तर काय ? त्यांनीं ऋषींचीं नानायोनि समुत्पत्तीची दूषकवार्ता आच्छादून सर्वांहून आपलें वर्चस्व विशेष असावें या हेतूनें विद्वत्ता असूनही वेदादि ग्रंथाकडे डोळे झांक करून जिकडे तिकडे त्यांचा ( पेशवे सरकारचा ) अंमल होता, तिकडे तिकडे त्यानीं आपल्या राजसत्तेच्या बळानें "ब्राह्मणोस्य मुखमासीत्" या श्रुतिपदाधिकारी पंचब्रह्मवंशस्थ ब्राह्मणांचें ब्राह्मण्य छपविण्याकरितां त्यांच्यावर मोठा कहर करीत होते; त्या भयंकर कृत्याचें वर्णन येथें मीं केलें असतें, तर लोकांचे अंगावर शाहारे आणि नेत्रावाटे अश्रु आल्यावांचून राहतेना. असो सांगण्यास कारण कीं, पेशवाई अमलांत विश्वकर्म ब्रह्मवंशीय कित्येक उपाध्यायास मारहाण करून जबरदस्तीनें वृत्तीचे कदवे लिहून घेत असत. आणि सरकारांत पंचायत गेली ह्मणजे "यत्रराजास्वयंस्वार्थीसामात्यः सपुरोहितः ॥ तत्राहंकिंकरिष्यामि यथाराजातथाप्रजा॥ १ ॥अर्थ—जेथें पुरोहितासहित प्रधानासहित जर राजाच स्वतः स्वार्थी आहे तर तेथें मी काय करणार? कारण जसा राजा तशी प्रजा. या प्रमाणें पंचाल ब्राह्मणास होत असे. असो, स्वजातीय ग्राम जोशांस हक्क मिळण्याविषयीं पेशवे सरकारांनीं ब्रम्हंपचालावर मोठा जुलूम चालविला होता. एवढेंच नाहीं तर पंचाल ब्राम्हणजातीय सोनारानीं आपल्या परंपरेच्या आचार्यांचा परित्याग करून येथून पुढें शूद्र याजी गांवजोशांपासून शुभाशुभ कर्में करावींत याप्रमाणें कर्म धर्माचा विलकूल न्याय न करितां केवळ आपल्या राजसत्तेच्या बळानें, पेशवे सरकार गांवजोशांना शिक्के मोहरा ठोकून सनदापत्रें ( वृत्तीचें साधन ) करून देत होते. पुण्यांतील सोनारभट्टजी वेदमूर्ती रामकृष्णाचार्य यांपासून कदवा लिहून घेऊन सोनारभट्टजी व गृहस्थ मंडळी वगैरे यांचे वृत्तीविषयीं येथील वेव्हारी जोशी यांस सनद करून दिली होती त्या सनदेंतील मजकूर येणेंप्रमाणें:—" अतःपर सोनारांनी आपल्या सोनारभटाकडून उपाध्यायिक कर्में करूं नयेत, वेव्हार जोशी यांचे हातून काम घेत जावें. वेदोक्त ब्रह्मकर्म सोडून देऊन पुराणोक्त कर्में चालवीत जावीं. भाताचे पिंड करण्याची वहिवाट बंद करून कणकीचे पिंड करित जावें " वगैरे मजकूराची सनद पांडुरंग नारायण वेव्हार जोशी कसबे पुणें यांचे नांवें बाजीराव बल्लाळ प्रधान यांनीं चंद्र २७ रविलाखर सन इहिदे सल्लासिन मयातैन व अल्फ सन ११४० फसली या सालीं करून दिली. वाचकहो, या स्वकपोल कल्पित अन्याय सनदेस पंचाल ब्राम्हण राजी नसल्यामुळें ( सह्या वगैरे न केल्यामुळें ) त्यांच्यावर उत्तरोत्तर पेशवे सरकार मोठा कहर करून वरचेवर कदवे लिहून घेत. तथापि तो राजशासनाचा दुःखकहर सोसूनही आज तागाईत ब्रह्मपांचालांनीं आपली ब्रम्हकर्मादि स्वधर्म शीलता सोडली नाहीं, खरेंच आहे.

नजातुकामान्नभयान्नलोभाद्धर्मंत्यजेज्जीवितस्यापिहेतोः ॥
धर्मोनित्यसुखदुःखेत्वानित्येजीवोनित्योहेतुरस्य त्वनित्यः ॥ १ ॥

जे कुलीन लोक आहेत ते अशाश्वत नाशिवंत देहाच्या काम, लोभ, भय, जीविताशा या निमित्तांनीं किंवा सुखदुःखानिमित्तें सुखाच्या उन्मत्तपणांत आणि दुःखाच्या संकटका

लीं सुद्धां स्वधर्म सोडीत नाहींत. कारण धर्म हा शाश्वत आहे आणि सुखदुःख व शारीर हीं अनित्य आहेत-

शंका— मातायदिविषंदद्यात्विक्रीणातिपितासुतम ॥
राजाहरतिसर्वस्वंतत्रकापरिवेदना ॥१॥

अर्थ—आईच जर लेंकरास विष देईल, बापच जर लेंकरास विकतो आणि राजाच जर सर्वस्व हरण करितो,तर तेथें कोणाचा उपाय आहे ? या श्लोकावरून कोणी अविवेकी असा ह्मणेल कीं, शास्त्र सोडून जरी केली तरी ती सनद राजाची असल्यामुळें तिच्यानें तुमचा धर्म त्यावांचून कसा राहिला ?

उत्तर—वरील श्लोकांतील सर्वस्व शब्दाचा अर्थ(सर्व द्रव्य)होय. "धनेस्वःपुन्नपुंसके"— "वित्तेषुराज्ञाभयं"अशीं वाक्यें आहेत ह्मणून 'स्वं, यामध्यें स्वधर्माचा समावेश होत नाहीं. कारण स्वधर्म हा वेदोक्त, अनादि, परंपरा प्राप्त असून दिशा,भूत भविष्य वर्तमानादि सर्व कालीं व्याप्त आहे. क्वचित् एकाद्या दुष्ट मातापित्यानें पुत्रास विष दिलें किंवा त्यास विकाले असेल त्या योगानें जसें पुत्र स्नेहरूप मातृधर्माचा लोप होत नाहीं तसें एकाद्या राजाच्या असूयून्यायाधीशानें न कळून केलेल्या एकतर्फी एकदेशी अशा अशास्त्र सनदेनें वेदशास्त्र प्रसिद्ध व सर्व देशीं सर्व कालीं व्याप्त अशा पंचाल सोनारांच्या ब्राह्मण धर्माचा लोप झाला नाहीं व होणार नाहीं. या कामातदुन्याय करणाऱ्या शास्त्रींस मात्र "राज्ञ,: पापं पूरोहितः" यवाक्यास पात्र व्हावें लागले. असो.

अंभोजिनीविननिवासविलासमेवहंसस्यमहंतीवीनितरांकुपितोविधाता ॥ नत्वस्यदुग्धजलभेदविधौप्रसिद्धांवैदग्ध्यकीर्तिमपहर्तुमसौ समर्थः ॥

हंसाचा राजा ब्रह्मदेव आहे ह्मणून तो एकादे वेळेस हंसावर कोपायपमान झाला तर त्या हंसाचे कमलीनीच्या वनांतील विलासमात्र बंद करील, परंतु त्यांची, दुग्ध आणि उदक वेगळें करण्याविषयींची जी कीर्ति आहे तिचे हरण करण्यास तो समर्थ नाहीं. तसेंच पेशवे विश्वकर्म संतती यांचा ब्राह्मण धर्म हरण करण्यांस समर्थ नाहींत. ह्मणून वेदशास्त्राच्या आधारानीं, अथवा त्यांच्या त्यांच्या शास्त्रांच्या आधारानीं, कोणाचा पक्ष न धरतां ज्याच्या जातीचा जो धर्म असेल त्याप्रमाणें आपली प्रजा वागवून तिचें रक्षण करणें व स्वार्थाकरितां आपल्या प्रजेपैकीं कोणत्याही जातीचा पक्ष न धरून यथार्थ न्याय करणें हें सरकारचें कर्तव्य कर्म आहे. असें केल्यानें प्रजेची एक निष्ठता राहून सुखावह होतें.

असो पेशवे सरकारांनीं आपल्या जातीचा पक्ष धरून केलेली तर्फदारी निपक्षपात स्वतःन्याय करणाऱ्या इंग्लिश सरकारी न्यायाधिशांचे नजरेस आल्यावांचून राहिली नाहीं. याचें कारण, सुमारे ७८–८० वर्षांपूर्वीं मेहेरबान राबर्टसन साहेब बहादूरत्यांनीं केलेला निवाडा आहे. परंतु तो फारच विस्तीर्ण आहे करितां विस्तार भयामुळें यांतील कांहीं भाव लिहितो, त्याजवरून पहा.

---

१ आमचे पूर्वींचें सरकार एकदा एकाच्या गळ्यांत काम घातले ह्मणचे पुन्हा तिकडे पहात नसत.
२ आमचे हल्लींचे सरकारी अंमलदार कोणावर भरंवसा न ठेवतां स्वतः न्याय पाहतात. हें माहा आहे.

प्रतिवादीस खर्च झाला तो
स्टांपाबद्दल १ रुपया.
४८६ फी दर ८२ प्रमाणें.
८१ अर्जाचा स्टांप.

कागद ७ वा
पुण्याचा हुकूमनामा.

जमेस कागद आला.ता० १३ आगष्ट १८७४
रावजी दप्तरदार
हीं नक्कल अर्जदार नारायण केशव वैद्य याजला दिली.ता.१८ अगष्ट सन १८७४ ईसवी
रावजी दप्तरदार.

शिक्का.

स्टांप १ रुपया

शिक्का

*

सोनार यांनीं आपले घरचें ज्योतिष, उपाध्यायिक, अष्टाधिकार यांचें वृत्तिपत्र लिहून दिलें तें सोनार यांचें मनोदयानुरूप उपाध्यांयानीं चालावें असे समजून लिहून दिलें असेल. पुढें वेव्हारे जोशी त्यांचें मर्जीनुरूप वागले नसतील, सबब त्यांनीं आह्मी आपली वृत्ति तुम्हांस देत नाहीं असा तंटा होऊन पुनः आपले जातीचे सोनार भटांकडून शुभाशुभ कार्ये केलीं. तेवेळीं सरकारांत फिर्याद होऊन पुनः वृत्तीपत्राप्रमाणें चालावें. असें पेशवेसरकारांतून मुकार केलें ही तरफदारी केली,असें साफ आमचे नजरेस येतें.कारण ज्यानें आपण बोलावून वृत्ति लिहून दिली त्याचे मनोदयानुरूप होणें म्हणून दिली. तें न होतां त्याजवर सरकारानें तरफदारी करावी हें ठीक नाहीं, परंतु बाळाजी बाजीराव पेशवे यांचे कारकीर्दीत सोनारांनीं वृत्तिपत्र लिहून दिलें आहे.त्याप्रमाणें वेव्हारे जोशी यांचे हातून वृत्तीचे काम घ्यावे असें ठरविलें आहे-ऐसीयास पूर्वीपासून सोनार- व्यवहारे जोशी यांची खटपट होत आली त्यांत वृत्तीचे साधन करून घेतलें, असें नजरेस येतें ऐसीयास पूर्वापार वृत्ती चालत आली आहे असें म्हणावे तरी मग दस्तऐवज लिहून देण्याचे कारण नाहीं, तेव्हा सोनार यांनीं लिहून दिल्हे त्यांतील मतलब असा ध्यानांत येतो कीं, आमचे मनोदयानुरूप यांनीं करावें असें समजून दस्तऐवज लिहून दिल्हा- असें हल्लीं चौकशींत कयास करितां ध्यानांत येतें परंतु कोणत्या रितीनें करावें अगर कसें चालावें हें पक्कें चौकशींत ध्यानांत येत नाहीं- ज्याचा जो धर्म असेल तो त्यानें करावा, ये विषयीं सरकारची मनाई नाहीं- याच्यापुढें आणखी कांहीं मजकूर असून शेवटीं ता० ५ माहे आक्टोबर सन १८२५ ई०

सही इंग्रेजी. सायंड. एच. डी. राबर्टसन.
[ *sd* ] *H. D. Robertson.*

सही. इंग्रेजी असिस्टंट जज्ज.

सही. ता. २८ आगष्ट सन १८७४

* विस्तारभयामुळें प्रथमचा बहुतकरून मजकूर येथें सोडल्याबद्दलची रेघ आहे.

ह्या निकाल करण्याचें पूर्वी याच खटल्याची संक्षेपानें हकीकत मे० राबर्टसन सा. हेबानीं मे० चापलेन साहेबांस लिहून पाठविली आहे. त्याजवरून पहा.

( कागद ८ वा )

मेहेरबान उइलियम चापलेन साहेब बहादूर दक्षिणचे कमिशनर यांजकडे आपला हुकूम गेल्या जुलई महिन्याचे ता०२५चा आला. त्याअन्वयें पुण्याचे जोशी वतनदार सोनार यांनीं रुजू केलेले दाखले पाहून आपल्याकडे लिहिण्यांत येतें तीं कलमें बी.

तपशील

१ जोशी यांचे पहिले परिशिष्ट हें बाजीरावाची सनद आहे असें ह्मणतात. ही इहिदे सुरसन मयातेन व अलफ ह्मणजे सन १७३० मध्यें पांडुरंग नारायण कसबे पुणें व पुण्याचे इतर पेठेचे व्यवहारी, जोशी, उपाध्ये, महाजन यांना दिलेली आहे. ह्या सनदेंत नारायणाचे आजे आणि त्याचे दोन भाऊ यांना मोगलाचे वेळेमध्यें रामकृष्ण आचार्य सोनार आणि पुण्याचे सर्व पेठेचे सोनारांनीं ज्योतिष, उपाध्यायिक, अष्टाधिकारी आपल्या कुटुंबास करण्याविषयीं अधिकार दिलेला असें जें ह्मटलें आहे तें ह्या सनदेंत तपशीलवार पुनः लिहिलेलें आहे. ह्या सनदेंत जो मजकूर आहे तो एक रीति वतन पत्र काजी देशमुख देशपांडे यांची मोहोर शिक्के व पांढरी गांवचे सर्व अंमलदाराच्या सह्या असलेल्यावरून दाखल केला आहे. ह्या परिशिष्टावरून आणखी असें दिसतें कीं, नारायणांनीं हा जो हक्क आपणास मिळवून दुरुस्त केला तो थोडे दिवसांवर सोनारांनीं आपला भट्ट उपाध्याय उभा करून ज्योतिष उपाध्यें वेदोक्त ब्रह्मकर्म विवाहमौंजी हे त्यांना सांगूं लागला, तोंपर्यंत तो हक्क बिनहरकत आपल्याजवळ होता असें दाखविलें, आणि सोनारांच्या वडिलांनीं नारायणाचे वडिलास कर्म धर्म करण्यास ज्या लेखांनीं नेमिले होते ते लेख तपासून खरा असें समजल्यावरून नारायणास तें काम चालविण्यास आज्ञा दिली. आणि सोनारांनीं तांदुळाचा पिंड न करितां गव्हाचा पिंड करावा असें ठरविलें.

२ हें परिशिष्ट ह्या तंट्यासंबंधीं दाखला आहे, असें समजून खालीं लिहिल्याप्रमाणें आमचे मनांत विचार येतात.

१ ह्या सनदेचा मतलब खरा आहे. असें समजल्यास ब्राह्मणांनीं सोनारापासून हा हक्क देणगीप्रमाणें मिळवून घेतला, असें कबूल केल्याचें स्पष्ट दिसतें. ह्यावरून दोन प्रश्न उत्पन्न होतात नारायणापूर्वी हा हक्क कोणी चालविला ? तो ब्राह्मण होता कीं सोनार होता ? आणि त्याचें वतन कसें गेलें ? कोणी मनुष्य अथवा मंडळी एकादा अधिकार जरी देऊं शकतात तरी त्यांना त्या अधिकाराचें काम बरोबर प्रथमचें किंवा त्याच्या पुढील काम चालविणारांनीं खात्रीप्रमाणें न चालविलें तर मागें घेण्यास अखत्यार आहे कीं नाहीं ?

२ हा कागद खरा आहे असें पूर्वीप्रमाणें मानलें गेलें तर हें पूर्णपणीं उघड

---

१ एखाद्याचा वेदशास्त्रविहित पूर्वीपासून चालत आलेला स्वधर्म न पाहून श्रुतिस्मृतिविरुद्ध स्वकल्पित कुमतें स्थापन करण्याविषयीं जुलूम करणें हा न्याय नव्हे.

आहे कीं, ब्राह्मणाशीं संबंध न ठेवण्याचा सोनाराचा हक्क कांहीं नाहीं तरी शंभर वर्षांचा आहे.

३ हा कागद खरा जरी आहे तत्रापि खरा नाहीं, असा संशय येण्यास कारणें आहेत तीं—(१) ही सनद ब्राम्हण जातीच्या राजाची आहे. (२) ह्या सनदेचा मजकूर ज्या कागदांतून घेतलेला तो कागद ही सनद खरी दाखविण्यास रुजु केला नाहीं हें मोठें न्यून आहे. कारण नारायणाचे वडिलोपार्जितास हा कागद जेव्हां मिळाला त्या वेळेस दुसरे कागद मिळालेलें ते अद्याप आहेत. हे कागद जोशी ज्ञातीचें कर्मधर्मासंबंधीं आहेत आणि नारायणाच्या सदरीं लिहिल्याप्रमाणें उभयतां चुलत्यांच्या नांवाचे आहेत. हे कागद अग्नीनें जळाले नाहींत; परंतु हल्लींचें तंट्यासंबंधीं आहेत ते कागद ह्मणजे रीतीपत्र व कदबा सोनार लोकांचा ती जळाली असें म्हणतात.

४ दुसरें परिशिष्ट आहे तेंही सदरीं लिहिल्याप्रमाणें नारायणाचें चुलत्यासच दिलेलें असून त्याजवर फारशी आणि मराठी शिक्के मोहरा आहेत. असें दिसतें कीं, ह्या कागदावर हे सोनार शिवायकरून सर्व मंडळ्या; ज्यावर जोशी बियावाडी यांचे हक्क होते, त्या मंडळींच्या सर्व मुख्यांच्या सह्या आहेत. ह्यास्तव ह्या कागदांचा संबंध हल्लींच्या तंट्यास लागू होत नाहीं. जर लागू केला तर, जोशी लोकांच्या विरुद्ध शाबिदी होते.

५ तिसरें परिशिष्ट हें औरंगाबादच्या कामगाराचें ताकीदपत्र आहे. ह्याचाही हल्लींच्या तंट्याशीं संबंध लागू होत नाहीं. फक्त एवढें दिसतें कीं, ज्योतिषमंडळी संबंधीं सर्व कागद मोठ्या काळजीनें बाळगून ठेविलें असून सोनाराचें कागद नाहींसें झालें.

६ चौथें परिशिष्ट आहे तें शके १७१५ ह्मणजे सन १७९३ सालीं बाळंभट्ट सोनार यांनीं बापूजी नारायण जोशी याजला लिहून दिलेला कदबा आहे. बाळंभट्ट मजकूर अद्याप जिवंत आहेत. त्यांचें ह्मणणें कीं, हा कदबा जबरदस्तीनें लिहून घेतला. ह्या कदब्याचा मजकूर हा आहे कीं, लिहून देणारा क्रियाकर्म करण्यासाठीं गांवाबाहेर कधीं जाणार नाहीं. तो लकडीपुलापलीकडे एरवड्यास गेला होता.

७ ह्या परिशिष्टावरून असें दिसतें कीं जर सोनाराचें हक्क वास्तविक व बिनहरकतीनें त्याजकडेस असते, तर गांवाबाहेर जाण्याची कांहीं जरूर दिसत नाहीं. तसेंच गांवाबाहेर जाणें यावरून असें दिसतें कीं, जोशाचें जे हक्क ते सोनारांनीं सन १७९३ त कबूल केले नसावेत. सन १७९३ त जो राजा होता तो ब्राह्मणच होता तेव्हां धर्म आणि कायदा हीं ब्राह्मणानींच सुधारलीं असावींत, असें दिसतें.

८ पांचवें परिशिष्ट आहे तें, जोशाचे लढाईच्या पूर्वींच्या; वीस वर्षांच्या वह्या आहेत. त्यानें जी कांहीं जमा केली त्या जमेच्या एकंदरीवरून कितीएक वर्षेपर्यंत कांहीं

---

१ हा किमानपक्षीं उगीच अनुमान केला आहे. हक्क प्राचीनपासून आहे. २ पेशव्यानीं आपल्या जातीच्या पक्षानें केला.

१ पंचाल ब्राह्मणांनीं वेदोक्त कर्म करू नये. मुंज गांवाबाहेर चोरून करावी. यज्ञोपवीत ह्यशींच्या पाठीवर घांसून मलिन करून घालावें वरांत रस्त्यानें जाऊं देऊं नये- कोणी वेद म्हणेल तर जिव्हाछेद करावा. असे कित्येक कायदे सुरू केले होते.

उत्पन्न झाहलें नाहीं, असें दिसतें. फक्त विसाव्या वर्षी रु० ९७ मात्र जमा आहेत. एकदे मनुष्याजवळ त्याच्या हिशेबाची जीं पुस्तकें असतात त्यावरून त्याचे वतीचा पुरावा मिळण्याची आशा असते. परंतु जोशी लोकांचीं जीं पुस्तकें आहेत त्यावरून त्यांचा हक्क नक्की झालेला किंवा बिनहरकतीचा त्यांजकडें आहे, असें दिसत नाहीं. जोशी लोकांनीं जे दाखले रुजू केले तेवढेच.

९ सोनार लोकांच्या वतीनें कांहीं दाखले नाहींत, व त्याजबद्दल कांहीं कागदही नाहींत कारण त्यांचे ह्मणणें कीं, आमचे जे हक्क आहेत ते हक्क स्वाभाविक ह्मणजे ईश्वरदत्त आहेत आणि ते कांहीं कागदावर लिहिण्याची किंवा कागदावर दाखल करण्याची जरूर नाहीं, बाजीरावाची सदन, रीतिपत्र व मोगलाचे वेळेस लिहून घेतलेला कदबा, याविषयीं आम्हांस कांहींच माहीत नाहीं, असें ते साफ बोलतात. परंतु सदरीं लिहिलेल्या चौथें परिशिष्टांत असलेल्या दोन तीन गोष्टी दाखवितात, त्याजवरून असें दिसतें कीं, जोशी लोकांनीं भटाची संज्ञा घेतल्याचें कबूल करितात. जर सोनारांस भट्ट ह्मणविण्याचा अधिकार नसतां, तर सोनारांपैकीं कोणीही भट्ट असें लिहून सही केलेला कदबा जोशी लोकांनीं आपल्याजवळ कधीं ठेविला नसता.

येणेंप्रमाणें ता० २१ दिसेंबर सन १८२३ मुक्काम पुणें.

एच. डी. राबर्टसन कलेक्टर जिल्हा पुणें.

या पुणें प्रकरणी दोन निवाड्यांवरून "पूर्वी पेशवाईंत सोनारभट वगैरे होते काय ?" या शंकेचें समाधान सहज होईल. कारण पूर्वी पेशवाईमध्यें जर सोनार लोकांत भट उपाध्याय व ब्राह्मण धर्म नसतां आणि पंचाल सोनारांचे घरचे उपाध्यायिक वृत्ति वेव्हारे जोशांकडेस असता, तर फसली ११४० ह्मणजे शालिवाहन शके १६४४ सालीं शके १६५२ सालीं, आणि शके १७१५ सालीं वगैरे वरचेवर जुलूम करून स्वजातीच्या तरफदारीनें पेशवे सरकारानीं "निपक्षपात यथार्थ न्याय करणें" या राजनीतीस सोडून वृत्तीची सनदापत्रें व भट असें लिहून सही केलेले कदबे वगैरे लिहून घेण्याचे कारण काय होतें ?

यावरून उघड आहे कीं, पेशवाई होण्याचें पूर्वीं ही प्राचीन कालापासून पंचाल स्वर्णकारामध्यें वैदिक शास्त्री, पंडित, अग्निहोत्री वगैरे ब्राह्मण धर्म निर्विवाद व सर्वमान्य आहे. अशी आमचे शंकिताची खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं.

याशिवाय आणखीहीं या खटल्यासंबंधी कागदपत्र पुष्कळ आहेत. परंतु ते सर्व विस्तार भयामुळें येथें न लिहितां शेवटी अपील होऊन मुंबई हाय कोर्टानीं केलेला निवाडा लिहितो.

**कागद ९ वा.**

तिकिट — सदरदिवाणी अदालतीचा नंबर २५८९ यांतील

**आठ आणे.** — सदरकोर्टाचे हुकूमनाम्याचे तर्जुम्यासस्टांप

**मुंबई ता० ५ माहे मार्च सन १८५१ शुक्रवार.**

सदर दिवाणी (शिक्का.) अदालत.

स्पेशील अपील नंबर २५८९

वादी—महादेव भट्ट बिन शिवराम भट्ट व आन्याबा नाईक घालपे.

**प्रतिवादी**—आबाजी गिरमाजी व पांडुरंग मय्यत याचा वारसपुत्र **भटंभट्ट** बिन् पांडुरंगभट्ट व सखाराम निळकंठ, यांजवर.

**दावारुपये १६८१३**

या कामांत जिल्हा पुणें येथील जज्ज साहेबांचे कोडतांत फैसला झाला आहे. तो फिरविण्याकरितां अर्ज करून जाहीर करितात कीं, वादी याचें लग्न झालें. त्याबद्दल लग्न-संबंधीं हक्क वसूल करण्याकरितां व तो हक्क पुढें आपल्यास मिळण्याकरितां जिल्हेमजकूर येथील प्रेन्सिपाल सदर अमीन कोडतांत प्रतिवादीनें प्रथम दावा केला. याचें वादीनें उत्तर दिलें कीं, प्रतिवादीस सदरहू हक्क घेण्याचा अधिकार नाहीं. व सदरहू हक्क देणें तो देणाराचे मर्जीवर आहे. त्याजवरून प्रेन्सिपाल सदर अमिनाचे नजरेस आलें कीं, सदरहु हक्क प्रतिवादीस देण्याचा अख्त्यार आहे. असें शाबीद झालें व सदरहू हक्क वादीनें हरकत केल्यापूर्वीं प्रतिवादीस मिळाला आहे सबब सदरहू हक्क पुढें मिळावा, याप्रमाणें हुकूमनामा केला. तो असिस्टंट जज्जसाहेबांनीं अपिलांत बहाल ठेविला; कीं, त्यांत कमजास्ती करण्याविषयीं कांहीं सबब नाहीं. व वादीनें जे पुरावे दाखविले, त्यांपैकीं कांहीं पुराव्यांवरून सदरहू हक्क प्रतिवादीस पोहोंचतो, असें साफ शाबीद होत आहे. याजवरून जज्जसाहेबांचे कोडतांत अपील जाहलें, तेथें सदरहू फैसले अशा कारणावरून बहाल ठेविले कीं, सदरहू दाव्याचे हक्कास बहुत दिवसांचे सनदेचा आधार आहे. त्याविषयीं पूर्वीं कधींहीहरकत झाली नाहीं. आलीकडेस मात्र हरकत झाली आहे. ती फक्त वादीनें व त्याजबरोबर वहिवाट करणारांनीं केली आहे. त्यांचा असा इरादा आहे कीं, आमच्या मर्जीस येईल त्या जोशास सदरहू हक्क देण्यास आम्हीं मुक्त्यार आहो, असें ते स्थापन करण्यास पाहतात-त्यास वादी नाराजी होऊन स्पेशीयल अपील मंजूर होण्याकरितां अर्ज केला. तोअशा कारणावरून मंजूर केला कीं, पुढें अमुक रीतीनें अमुक असामीनें चालावें, अथवा वादी प्रतिवादीच्या धर्माचे प्रकरणांत ठराव करावा. असा हुकूमनामा करण्यास इनसाफाचें कोर्ट मुखत्यार नाहीं. व ज्या सनदा, करार फक्त सोनारांचे जातीविषयीं आहेत ह्मणून वादी सांगतो, त्याप्रमाणें वादीचें चालावें किंवा कसें? दुसरे सबबेविषयीं तर कांहीं हरकत घेतली नाहीं. परंतु या प्रकरणांत पेशवे सरकारांनीं जी सनद दिली आहे, त्यावर याणें हल्लीं वादीनें चालावें किंवा कसें? या कामाची चौकशी आज रोजीं सुरू केली. व वादी प्रतिवादीचे वकील हुजूर हजीर झाले व या कामांत कनिष्ठ को-

१ हे विश्वकर्म पंचाल सोनार. २ वेव्हारी ब्राह्मण जोशी पुणें.

टांचे कागद व दप्तरें व फैसले जे दाखल होते ते वाचून दप्तरीं दाखल केले, आणि त्यांचा पुरतेपणीं विचार केला. त्याजवरून सर्टिफिकिटांत पहिली सबब दाखल केली आहे. त्याजविषयीं असें कोर्टाचे नजरेस येतें कीं, कोणे एके असामीचे हक्काविषयीं ठराव करणें व तो हक्क देणें महकूब केल्यानें अथवा त्या हक्काकडेस लक्ष्य न दिल्यानें जें नुकसान होईल तें देवविण्याचा हुकूमनामा करणेंविषयीं इनसाफाचें दिवाणी कोर्ट मुखत्यार आहे याविषयीं संशय नाहीं. परंतु पुढें हुकुमाप्रमाणें हक्क न देणाराचें चाललेंच पाहिजे. असें कीं, पुढें हक्क न दिला असतां कोर्टाचे हुकुमास अटकाव केला. अटकाव केल्याबद्दल त्या असामीस कायद्याप्रमाणें दंड होईल. याप्रमाणें हुकूमनाम्यांत लिहिणें बेशस्त आहे. दुसरे मुद्याविषयीं कोडताच्या नजरेस येतें कीं, प्रतिवादींनीं सदरहू हक्क सोनारजातीपासून घ्यावा, अशी निशाणी ३९—९२चे दस्त ऐवजांत नाहीं. सर्टिफिकिटांत तिसरी सबब लिहिली आहे. त्याविषयीं कोर्टाचे नजरेस येतें कीं, सदरहू सबबेविषयीं स्पेशियल अपिलाचे अर्जींत कांहीं तक्रार केली नाहीं, सबब सन १८४३ चा आक्ट ३ याजवरून त्या सबबेची चौकशी करण्यास कोर्ट मुखत्यार नाहीं. या अभिप्रायावरून कोर्टांनीं असा ठराव केला कीं, सदरहू असामींनीं प्रतिवादीस हक्क वगैरे पुढें देत जावे. या प्रकारचा कनिष्ठ कोर्टाच्या हुकुमनाम्यांत जो मजकूर आहे तो रद्द करून बाकीचा बहाल ठेविला. खर्च प्रतिवादींनें द्यावा.

[ यादी. ]

कागदांचा तपशील.

१ जज्जांचें पत्र त्याजबराबर इंग्रजी अर्जी वगैरे.
२ अर्जी स्पेशियल अपिलाची.
३ तक्रार अर्जी वादीची.
४ हुकूमनामा जज्जाचा.
५ हुकूमनामा असिस्टंट जज्जाचा.
६ हुकूमनामा प्रेन्सिपाल सदर अमिनाचा.
७ जज्जमेंट.
८ वकीलपत्र वादीचें, मयारामदाजीचे नांवें.
९ स्पेशियल मंजुरीचें सार्टिफिकिट तर्जुम्यासुद्धां.
१० हुकूम जज्जावर, त्याचे मागें उत्तर, त्याजबद्दल खर्च जामिनी नक्कल व कागद जज्जाचे, पा. १ तेह्‌ प्र० व दप्तरदार मराठी असिस्टंट जज्जाचें १ पा० चे प्र. व दप्तरें २ प्रेन्सिपाल सदर अमीनाचे १

रु० आ० पै. ( खर्चाचा तपशील. )
२२०१४०४ जिल्हे कोडतांत.
३०३०२ जज्जाकडे.
४०८०२ असिस्टंट जज्जाकडे
१५०३ प्रेन्सिपाल सदरअमिनाकडे.
२२०१४०४
३०११ सदर दिवाणी अदालतींत
३०१० वादीस झाला तो.
३ अर्जी इ० अपिलाची पुरवणी सुद्धां.
०१ तक्रार अर्जी.
०१ वकीलपत्र.
०८ वकिलाची फी.
३०१०
०१ प्रतिवादीस जाहला तो वकी-

पा० ते १३८ पा०

११ खर्च जामिनाची नक्कल वादीची

१२ हुकूम असिस्टंट जज्जावर त्याचें त्यानें उत्तर त्याजबरोबर समन्स.

१३ समान प्रतिवादीस.

१४ वकीलपत्र प्रतिवादीचें, मथुरादास बालगोविंददास याचे नांवें.

१५ वकीलपत्र प्रतिवादीपैकीं आबाजीचे घरीं जनार्दन याचे नांवें

१६ अर्ज वादीचा, मुकद्दमा लौकर काढणें विषयीं.

१७ वकीलपत्र प्रतिवादीतर्फे आन्याबा याचें, रामचंद्र नारायण व मिठामुदीन मियाजी यांचें नांवें.

१८ हुकूमनामा सदरदिवाणी अदालतीचा.

१९ हुकूम पुण्याचे जज्जावर त्याजबरोबर हुकूमनाम्याची नक्कल पाठविली.

१९.

लपत्र.

३८११

२६८९८४

तरजुमा रुजू असे परशुराम शिवराम कारकून.

( सही ) विद्याराम महादजी शिरस्तेदार.

* अलेकझांडर बेल साहेब पिउनजी जज्ज,

फी ८८८६

ही नक्कल तयार करणार नारो महादेव कारकून.

जमा रुजू.

विष्णु गोपाळ हेडकारकून.

रामचंद्र धोंडदेव फीकारकून.

True.

जान वारटन साहेब पिउनजी जज्ज, फिलिप उलियम लिजट् साहेब पिउनजी जज्ज

True Translation
F. Morris.
K. Railt Registrar.
True copy,
H. C. Bed whey
Deputy Registrar.

अर्जदार केशव पांडुरंग भट्ट सोनार यानें ही नक्कल मिळणेविषयीं अर्ज केला तो मंजूर झाल्यावरून या नक्कलेची फी आठ आणे सहा पै, उमेदवार यास देऊन ही नक्कल अर्जदार यास दिली. ता०४ माहे सप्तेंबर सन् १८७४ईसवी.

विष्णु गोपाळ हेडकारकून. रामचंद्र धोंडदेव फर्स्टकारकून.

अखेर
मोहोर

---

पहा, पूर्वोक्त सर्व प्रकरणांवरून वाचकांस स्पष्ट समजेल कीं, ज्यांच्यापासून कोणांसही पीडा न होतां सर्वांच्या सुखोत्पत्तीस कारणीभूत हे पंचाल ब्राह्मण आपल्या स्वधर्मानुरून पूर्वीपासून वर्तत असतां त्यांना विनाकारण नाना ऋषिवंशीय ब्राह्मण लोक दूषणें ठेवितात.

---

* ही सही उजवेकडील प्रथमची आहे.

**शंका**—आतां कित्येक आमचे मित्र अशी शंका घेतील कीं, विश्वकर्म संततीय स्वर्णकारांचा ब्राह्मणधर्म छपविण्यास पेशवे सरकार कांहीं वेडे नव्हते. तुह्मी ब्राह्मण जरी आहात तथापि तुमच्या जातींत पूर्वीं कांहीं तरी अनाचार झाला असेल, ह्मणून विश्वकर्म संततीय स्वर्णकारादिकांच्या वेदोक्त कर्मास हरकत करण्याचा कायदा काढला असेल. आणि पेशवे सरकारांनीं एका विश्वकर्म संततीयाचेंच वेदोक्त कर्म बंद केलें असें नाहीं. त्यांनीं ज्या ज्या जातींत अनाचार झाला त्या त्या जातींचें वेदोक्त कर्म बंद केलें आहे. हल्लीं शूद्रव्यतिरिक्त क्षत्रियवैश्यादि म्हणविणारांस ब्राह्मण वेव्हारी जोशी जसें शूद्रधर्मानें वागवितात तसें विश्वकर्म संततीय स्वर्णकारांनाही शूद्रधर्मानें वागण्यास काय चिंता आहे ? कारण वेदोक्त कर्म हें, जे आचारशील असतील त्यांसच आचरण्यास योग्य आहे. एकादा ब्राह्मण जरी असला आणि तो जर नास्तिक होईल तर त्यास आह्मी 'ब्राह्मण' असें नुसतें ह्मणणार सुद्धां नाहीं, मग दुसरी गोष्ट कशाला ! तस्मात् तुह्मां विश्वकर्म०सुवर्णकारांत पूर्वीं कांहीं तरी अनाचार असेल.

या शंकेवर आमचें असें उत्तर आहे कीं, राजानें ब्राह्मणास, ब्राह्मणधर्मापासून भ्रष्टच करावें असा वर्णसंकरकारक ( पुनर्विवाह, शूद्रान्नोदकसेवन, मद्यमांसाहार इत्यादि ) अनाचार या विश्वकर्म०पंचाल ब्राह्मणजातीय स्वर्णकारांत जर पूर्वीं कधीं झाला असता तर तेही हल्लींच्या क्षत्रियवैश्यादि ह्मणविणाऱ्या वर्णसंकरादि अनाचार गतीस येऊन पोंचलेल्या रजपूत,कंठीवाले गुजर, वाणी,उदमी,पंचकुळींचे किंवा शहाण्णव कुळींचे मराठे, वैश्य सोनार वगैरे जातींप्रमाणें शूद्रधर्मानें वागण्यास राजी झाले असते. गुर्जर म्हणतात आम्ही वेदोक्त कर्माधिकारी वैश्य खरे; परंतु आमच्यानें तो आचार निभेना, म्हणून श्रीगुरु वल्लभाचार्यांनीं आमचें यज्ञोपवीत घेऊन कंठी दिली. गायत्री मंत्राबद्दल गोपालमंत्र दिला. तसे रजपूत, मराठे वगैरेही म्हणतात, आम्ही पूर्वींचे क्षत्रिय खरेः परंतु या कलियुगांत आचारभ्रष्ट, हिंसक झालों म्हणून आम्हांस वेव्हारी ब्राम्हण ( ग्रामजोशी ) शूद्रधर्मानें वागवितात, तें योग्यच आहे. याप्रमाणें विश्वकर्म० ब्राम्हणजातीय सोनारांनीं श्रीमंत पेशव्यांचा हुकूम झाला असूनही शूद्रधर्मानें वागण्याचें कां पतकरलें नाहीं ? ज्यापेक्षां विश्वब्रम्ह स्वर्णकारानीं कित्येक मरणप्राय दुःखें भोगूनही वेदोक्त ब्रम्हकर्म सोडिलें नाहीं, त्यापेक्षां पूर्वींही हे अनाचारी अगदीं नव्हते अशी कोणाचीही खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं. आमचे मित्र "नास्तिक झाल्यावर त्यास ब्रह्मकर्माधिकार कसा मिळेल" असें पटदिशीं बोलले, परंतु त्यांनीं असा विचार करावा कीं, जे नास्तिक होऊन स्वधर्मद्वेष्टे झालेले त्यांस ब्रम्हकर्माचा अभिमान किंवा अपेक्षा स्वप्नीं सुद्धां नसते. तर तसें कांहीं नसतां सर्व देशांतील विश्वकर्मसंततीय ब्राम्हणजातीय स्वर्णकार लोक आजपावेतों वैदिक ब्रह्मकर्माभिमानी व ब्रम्हकर्मतत्पर आहेत. आचारभ्रष्ट झाले नाहींत. याचें सप्रमाण कारण भारत भागवतादि ग्रंथांत सर्वत्र प्रसिद्ध वचनें असून अनुभवसिद्ध आहे कीं, "कलियुगामध्यें ब्राह्मण आणि शूद्र असे दोनच वर्णधर्म, कलीच्या ४थ्या चरणांतील सार्ववर्णिक संकर होईपर्यंत कायम रहावयाचे; ह्मणजे कलियुगांत क्षत्रियवैश्य आचारभ्रष्ट होऊन

शूद्ररूपच होणार" म्हणून विश्वकर्मसंततीय पंचाल स्वर्णकारांचा जर ब्राह्मणवर्ण आहे तर तो कलियुगांतील क्षत्रियवैश्यांप्रमाणें शूद्रांत कधींही मिसळणार नाहीं. यावरून पूर्वींपासून विश्वकर्म ब्राम्हण जातीय स्वर्णकारांत अनाचार नाहीं, हें निःशंकपणें सिद्धच आहे आणि असें असल्यामुळें श्रीमंत पेशवे सरकारांनीं विद्यावृद्धिद्वारा आणि राजसत्तेच्या बळानें शासनद्वारा " जशी स्वशाखीय ब्राम्हण धर्माची विशेष सुधारणा केली आहे व करीत आहेत" तशी या ब्राम्हण ज्ञातीय स्वर्णकारांच्याही ब्राम्हण धर्माची विशेष सुधारणा करावयाची होती. हें एक राजनीतीचें कर्तव्यकर्म सोडून या स्वधर्मी गरीब लोकांस (आपल्या प्रजेस) उलटें "स्वधर्मभ्रष्ट होऊन शूद्रधर्मात शिरा "हें ह्मणणें कोणत्याही जातींतील अगर कोणत्याही धर्मांतील राजाला शोभत नाहीं. मग ब्राम्हण जातीय राजास कसें शोभेल ! तर मित्र हो, ही गोष्ट श्रीमंतांनीं समजून केली असेल असेंही माझ्यानें म्हणवत नाहीं. कारण पेशवेसरकारची मुख्य गादी पुणें शहर, या शहरांत लाड, खानदेशी वगैरे शूद्रजातीय हजारों सोनार आहेत तसे हेही विश्वकर्म०सोनार असतील. सोनार तेथून एकच असा स्थूल दृष्टीनें न्याय केला असावा असें दिसतें. असो सत्तेपुढें शाहाणपण नाहीं ! परंतु,

> यदचेतनोपि पादैःस्पृष्टःप्रज्वलतिसवितुरविकांतः ॥
> तत्तेजस्वीपुरुषःपरकृतविकृतिं कथं सहते ॥ १ ॥

**अर्थ**—सूर्यकांतमणि ( सूर्याचे जातीचा ) जरी अचेतन ( सौम्य व जड ) पदार्थ असतो. तथापि सूर्यानें ( सामर्थ्यवान स्वजातीयानें ) पादस्पर्श ( अपमानसूचक चरणरूप किरण स्पर्श ) केल्याबरोबर जसा प्रज्वलित होतो तसा तेजस्वी पुरुष ( जरी दीनअवस्थेंत असला तरी दुसऱ्यानें केलेलें दूषण कसा सहन करील ? ह्मणून ब्राह्मण जातीय राजाचें " शूद्रधर्मानें वागा" हें ह्मणणें शूद्र असतील ते मान्य करतील. परंतु ब्राह्मण जो असेल तो प्राणांतींही मान्य करणार नाहीं, मग तो ब्राह्मण दरिद्री असो किंवा कर्महीन असो किंवा कसाही असो.

हा स्थूल दृष्टीनें केलेला विश्वकर्म संततीचा न्याय श्रीमंत पेशवेसरकारांनीं स्वतःच केला असेल अशा उद्देशानें हें माझें लिहिणें बिलकूल नाहीं. कारण कोणतेंही सरकार ह्मणजे राजे स्वतः आपण होऊन न्याय करीत नसतात. नेमलेल्या कामदार लोकांवर त्यांचा भरंवसा असतो. वास्तविक म्हटलें असतां श्रीमंत पेशवे यांच्या औदार्य कीर्तीवरून स्पष्ट दिसून येतें कीं,त्यांची राजलक्षणाप्रमाणें सर्व प्रजेवर समदृष्टि आणि दयालुत्व निःसीम होतें यांत संशय नाहीं. परंतु त्यांचे पदरीं जे शास्त्रनिर्णयार्थ न्यायाधीश नेमले असत, ते प्रायः परान्नपुष्ट भटभिक्षुक असल्यामुळें त्यांच्याच स्वाभाविक असूयाभिमानवृत्तीचा पक्षपातरूपानें हा प्रकाश पडला असावा असें दिसून येतें. कारण माझ्या एका मित्रानें या ब्राह्मणजातीय सोनारांच्या आणि वेव्हारी ब्राह्मण जोशांच्या तंट्यासंबंधीं हकीकतीची एक मोटी जुनी बखर लिहिलेली मजला आणून दिली आहे. विस्तीर्ण असल्यामुळें तिचा संक्षेपानें थोडा सारांश येथें घेतों.

विश्वकर्म संततीय सोनार कानडे पंचाल यांचें कर्मधर्माची चौकशी करण्याविषयीं

अया शास्त्रीबुवाकडेस श्रीमंत[1] सरकारची परवानगी झाली. त्याजवर अया शास्त्रीबुवांनीं पुण्यांतील विश्वकर्म० सोनारभट्टजी व सोनार यांना तुह्मीं शालिग्रामाची पूजा कां करिता ह्मणून त्यांचे देव्हाऱ्यांतून शालिग्राम घेऊन सांपडलेल्या मोर भट्टजी महामुनी, धर्माचार्यबुवा वगैरे सोनारभट्टजी व सोनार मिळून ७ असामींस मोरोबादादाचे वाड्यांत मारहाण करून कोठडींत कोंडून ठेविलें. त्यांना कोणाचा वशिला नसल्यामुळें श्रीमंतांपर्यंत दाद लागेना. ह्मणून सदरहू ७ असामींनीं आमची समर्थाकडेस दाद लागून कर्मधर्माची चौकशी व्हावी, आह्मी शास्त्रार्थ दाखवूं, वगैरे मजकुराची नानाफडनवीस यांचेकडेस फिर्याद केली. हें अयाशास्त्री बुवांस समजल्यावर त्यांनीं, तुह्मी मला न कळवितां नानांकडेस फिर्याद केली, ह्मणून पुनः आणखी सदरहू ७ असामींस मारहाण केली. पुढें त्यांपैकीं धर्माचार्य नांवाचा एक सोनार भट्टजी चार दिवसांनीं मरण पावला, ही गोष्ट नानाफडनवीस यांच्या कानावर गेल्यावरून त्यांनीं सर्व विश्व० सोनारांस बोलावणें करून विचारलें कीं, तुह्मांस ब्रह्मकर्माचा अधिकार ग्रंथ वगैरे कायसाधनसूत्र, आणि क्षेत्रस्थब्राह्मणांचें संमतिपत्र असेल तें आणून दाखवावें. असें ह्मणतांच ती गोष्ट विश्व० सोनार लोकांनीं कबूल करून ग्रंथ व संमतिपत्रें आणण्यास गेले. मागें नाना फडनवीस अयाशास्त्रीबुवास ह्मणाले कीं, या विश्वकर्मसंततीय सोनारांस ब्रह्मकर्माचा अधिकार आहे कीं नाहीं? असेल तर सोडून द्या. कोणाचा धर्मलोप करूं नये. धर्मप्रतिष्ठेसाठीं देवांनीं युगायुगीं अवतार घेऊन धर्मस्थापना केली आहे. तेव्हां अया शास्त्रीबुवांनीं प्रतिज्ञेचें उत्तर दिलें कीं, या सोनारांस जर वेदाधिकार निघाला तर मी यज्ञोपवीताचा त्याग करीन. पुढें एक महिन्यानें विश्व०संततीय यांनीं पैठणक्षेत्राहून विद्वज्जनांचें संमतिपत्र व परांड्यास श्री० शं० यांचा मुक्काम होता तेथून स्वामींचें संमतिपत्र आणिलें. सातारा जिल्ह्यांतील महाल खटावपैकीं मौजे रहाटणी येथून वे०मोरभट्ट महामुने सोनार यांनीं तैत्तिरीय ब्राह्मण भाष्य व आपस्तंब सूत्र आणि गोविंदार्णव ग्रंथ, वगैरे आणून कचेरींत हजर केले. वे० अया शास्त्रीबुवांनीं शूद्रकमलाकर आणि कमलाकर, जातिविवेक हे ग्रंथ आणून त्यांतील सोनार हे शूद्र आहेत असे वाक्य वरचेवर ह्मणून दाखवीत. परंतु विश्व०संततीय, त्रैवर्णिक रथकारापरपर्यायनाम पांचाल स्वर्णकार यांस ब्रह्मकर्माचा अधिकार आहे अशीं पूर्वोक्त भाष्य, सूत्रें, स्मृति यांतील वाक्यें व तदनुरूप श्री० चें व क्षेत्रस्थ विद्वज्जनांच्या संमति पाहून आणि शूद्रकमलाकर जातिविवेकांतील वाक्याचा केवळ शूद्र जातीय स्वर्णकारांकडेसच संबंध आहे हें पूर्णपणें लक्ष्यांत घेऊन नाना फडनवीस यांनीं, अया शास्त्रीबुवांस एकच उत्तर केलें कीं, या श्रुति, सूत्रें, स्मृति आणि श्रीचें संमतिपत्र यांच्यावर, किंवा शूद्रकमलाकरांतील वाक्यावर शाईचा बोळा पुसावा! किंवा आपण यज्ञोपवीताचा त्याग करावा! यांतून आपल्यास जें योग्य दिसेल तें करा! नंतर पुण्यांतील सोनारभट्टजी वगैरे यांना वस्त्रें व त्यांचे घेतलेले शालिग्राम परत देऊन आपआपल्या घरीं पाठविलें, आणि अया शास्त्री

१ श्रीमंतांनीं तरी स्वतः परवानगी दिली नाहीं. कामदार लोकांनींच दिली असें समजावें.

बुवांनीं संन्यास घेतला. तेव्हांपासून विश्व० संततीयपंचाल स्वर्णकार,आपल्या पूर्वचालीप्रमाणें ब्रह्मकर्म प्रसिद्धपणें करूं लागले.

असो. आमच्या न्यायाधीशांनींच आपल्या जातीचा पक्ष धरून या विश्वकर्म संततीय स्वर्णकारांच्या कर्मधर्माचा पूर्ण विचार ( खरा न्याय ) आजपर्यंत केला नव्हता. असें नाना फडनवीस यांचे कारकीर्दींत पेशवे सरकारचेही नजरेस येऊन चुकलें. परंतु यामध्यें गरीब लोकांस विनाकारण कांहीं दिवस दुःख माल भोगावें लागलें.

---

मृगमीनसज्जनानां तृणजलसंतोषविहितवृत्तीनाम् ॥
लुब्धकधीवरपिशुना निष्कारणवैरिणोजगति ॥१॥

अर्थ–हरिण, मासे, आणि सज्जन हे अनुक्रमें गवत, पाणी, आणि संतोष या वृत्तींनीं उपजीविका करीत असतां त्यांचे पारधी, कोळी आणि दुर्जन हे या जगांत विनाकारण वैरी होत. तस्मात् ऋ० ब्राह्मणलोकांपैकीं जे कांहीं विनाकारण द्वेष करणारे दुर्जन असतात त्यांची वरील सद्वाक्यावरून निर्दयवर्गांत गणना होते. आतां ते जरी आपल्यास विप्र ह्मणवितात तथापीं आपल्या स्वार्थाकरितां दुसऱ्याच्या सुखोत्साहादि मंगल कार्यास विघ्न करणें या कृतघ्नतेवरून पाहिलें असतां—

परकार्यविहंताचदांभिकःस्वार्थसाधकः ॥
छलद्वेषीमृदुः क्रूरोविप्रोमार्जारउच्यते ॥ १ ॥ चाणाक्य ॥

अर्थ–दुसऱ्याचा कार्यनाश करणारा, दांभिक, आपला स्वार्थ साधणारा, छल द्वेष करणारा, बाहेर मृदु अंतरीं क्रूर अशा विप्रास मार्जार ( हिंस्रपशु ) ह्मणावें. हें लिहिण्यास कारण, खेडेगांवीं ना ऋ० ग्रामजोशांचें उपाध्येपण ( यजमानकृत्य ) बहुतकरून मराठे, शिंपी, माळी, कोष्टी वगैरे इतर लोकांत असतें. परंतु पंचाल ब्राह्मण आपल्या स्वधर्मानुरूप स्वज्ञातीय भट्टांकडून पूर्वापारपासून वेदोक्त विधीनें आपलीं मौंजीविवाहादि सर्व कर्मे करीत असतात. त्यामुळें त्यांचे ना० ऋ० ग्राम जोशांस याज्ञिकवगैरे हक्क मिळत नाहींत. बाकी धर्मादाय वगैरे शक्त्यनुरूप करितात. सदरहू ब्रह्मपंचालवगैरे लोक ग्रामजोशाशीं स्पर्धा करावी अशा हेतूनें तीं आपलीं लग्नकार्यादि, स्वकीय उपाध्यायापासून करतात असें नाहीं. तर ते केवळ आपल्या प्राचीनपासून चालत आलेल्या स्वधर्माप्रमाणें करितात असें असून ना० ऋ० ग्रामजोशी लोक त्यांच्याशीं विनाकारण तंटे करून द्वेष करतात. याचें कारण पराभ्युदय सहन न होणें. त्यांना असें वाटतें कीं, आपल्या जातीचा पुष्कळ भरणा आहे त्यामुळें आपण करूं तें होईल. परंतु न्यायाधीशाजवळ न्यायांतीं सिद्ध होतें कीं, ज्याचा धर्म त्याला. कोणीं कोणाशीं आपस्वार्थाकरितां स्पर्धा व द्वेष करूं नये. असा न्याय होत असल्यामुळें असूयु ग्रा० जोशी मनांतून धुसधुशीत असत, कारण न्यायापुढें कांहीं कुमत चालत नाहीं. तेव्हां त्यांनीं मिथ्या चाहाड केली तीं—कोल्हापूरप्रांतीं जैनांची वस्ती फार असून पूर्वीं त्यांचें प्राबल्य विशेष होतें. कांहीं कालापूर्वीं त्या

प्रांतांतील एके गांवीं लिंगायितवाणी लोकांचा गुग्गुळ ( त्यांच्या देवतेसंबंधीं रस्त्यानें जाणारा एक प्रकारचा उत्सव ) रस्त्यानें जात असतां त्यास पेठेंतील जैन धर्मी लोकांनीं मत भेदाच्या मत्सरानें खून पडेपर्यंत मारामारी करून हरकत केली. त्या दिवसापासून लिंगायितांचे आणि जैनाचें वैरत्व असतें झालें. नंतर लिंगायित लोकांनीं सर्वदेशोदेशींचे तमाम आपल्या जातिमंडळीस असें जाहीर केलें कीं, जैन लोकांचा रस्त्यानें जाणारा वरात वगैरे सर्व प्रकारचा उत्सव पेठेंतून अगर गांवांतून जाण्याचें बंद करण्याविषयीं शरीरबलादिद्वारा प्रयत्न करण्यास आळस करूं नये. तेव्हांपासून लिंगायित वाणी लोक जैनांचे वरातीस हरकत करीत होते. हें निमित्त करून वेव्हारी ग्रामजोशी लोक, " पंचाल ब्राह्मण जातीचे लग्नांतील याज्ञिक मिळत नाहीं ह्मणून, द्वेषबुद्धीनें शेटचे महाजन वगैरे पेठकरी लोकांस मिथ्या आळ घेऊन चोरून सांगत कीं, पंचाळ हे जैनासारखेच दिसतात तर त्यांचेही वरातीस हरकत करीत जा. वाचक हो, पहा बरें पंचाल ब्राह्मणांचा, जैनादिकांशीं बिलकूल संबंध नसून असूयुलोकांनीं लिंगायत लोकांस केवळ ही साप साप ! ह्मणून भूमि धोपटण्यास सांगितली यांत संशय नाहीं, परंतु लबाडी उवडकीस आल्यावांचून राहत नाहीं. कारण, कालेंकरून दिवसानुदिवस जसजशी माहिती होत गेली तसतशी असूयुलोकांनीं स्वकुलकलंकाच्छादनार्थ कित्येक कुलीन जातींस भलभलतीं ठेविलेलीं दूषणें वगैरे त्यांच्या लबाडीची डिंडिमा सर्वांस कळून येऊन पंचाल ब्राह्मण ( स्वर्णकारेत्यादि ) सद्धर्मी गरीब लोकांच्या आनंदकारक मंगलकार्यांत नाश करून बेआब करणें असलें वरातीस हरकत करण्याचें कृतघ्नतेचें काम लिंगायित वाणी लोकांनीं लवकरच बंद केलें, आणि उलट तेच लिंगायित लोक आपल्या लग्नादि सर्व कार्यांत असूयुब्राह्मणांची जरूर ठेवीनातसे झाले. असो—

वाचक हो, पंचाळ लोकांच्या वरातीस हरकत करणारांपैकी कोणास ताकिदी, कोणास दंड कित्येकांस शिक्षा वगैरे होऊन या बंडाचा लवकरच लोप झाला, या विषयींची प्रचीति पाहणें असल्यास हल्लीं एकादे गांवीं क्वचित् ज्या लोकांचे वरातीस हरकत होण्याचा संभव असेल तर त्या लोकांनीं मामलेदाराकडेस किंवा फौजदाराकडेस अगोदर अर्ज केला असता हरकत करणारास ताकीद मिळून बंदोबस्त होतो, कारण रस्ता सरकारी असल्यामुळें त्याजवर कोणाचा हक्क नाहीं. असो, याविषयीं फार लिहिणें नको. या ग्रंथांतील २ रे संग्रहाचे पृ० २५ व २९ यांत या प्रकरणीं एक महजरनामा लिहिला आहे आणखी एका गांवचे उदाहरण लिहून हा विषय आटपतों

नंबर २३८ [ ताकीदपत्र ] कागद ११ वा.

## पाटील कारभारी यांस ताकीद चिठ्ठी.

ता० पाटील कारभारी कसबे बावडें प्रांत इंदापूर सन १२५१ फसली.——कसबे मजकूर येथील कृष्णासोनार यांनीं अर्जी आपले मुलाची वरात रस्त्यांतून मिरवण्यास शेठ्ये व समस्त महाजन, पेठकरी कसबे मजकूर यांनीं ही अर्जी केल्यावरून त्या दोन्ही अर्ज्या हुजूर असिस्टंट कलेक्टर साहेब बहादूर यांजकडे रवाना करितां, साहेब

महसूफ यांचा हुकूम शेटे व समस्त महाजन यांचे अर्जीखालीं नंबर १५१ चा आला कीं, रस्ता आहे तो सरकारी आहे त्यांत कोणतेही जातीचा माणूस हत्तीवर अगर उंटावर, किंवा घोड्यावर किंवा गाडीवर वगैरे बसून जाईल तर त्यास मनाई नाहीं. तुमच्या दुकानांचा अगर मालाचा किंवा घराचा किंवा शरीराचा नाश होईल तर मात्र बंदोबस्त होईल. परंतु हें होत नसून तुह्मीं जर हरकत कराल तर तुह्मांस शिक्षा दिली जाईल. हें तहकीम जाणावें ह्मणून हुकूम आल्यावरून तुह्मांस ताकीद सादर करण्यांत येते कीं, सोनारमजकूर यांची वरात रस्त्यांतून मिरवूं द्यावी. जर कोणी हरकत करील तर हरकत करूं देऊं नये. इतकेंही असून कोणीही हरकत करील तर त्यास ठाण्यास पाठवावें ह्मणजे शिक्षा देण्याची तजवीज होईल. तारिख ७ माहे सप्तंबर सन १८४१ ईसवी.

श्रीपत विठ्ठल.

मामलेदार ठाणें मजकूर.

" अस्सल ताकीदचिठी भगवंतराव बिन काळोजी पाटील यांचे दप्तरीं असे सन १८५१ माहे भाद्रपद वद्य ८ रोज बुधवार" अर्जदार सोनार मजकूर यांस दाखला दिला त्याची नक्कल.

नंबर३८९] कागद १२. वा.

ता० कृष्णाजी महादजी सोनार कसबे वावडे प्रांत इंदापूर सन १२५१ फसली सालीं तुह्मीं अर्जी केली कीं, माझे मुलाची वरात रस्त्यांतून कसबे मजकुरीं शेटे जाऊं देत नाहींत. चालते वहिवाटीस हरकत करितात. ह्मणून वगैरे मजकुरचा केल्यावरून त्यांची चौकशी करण्याविषयीं देशमुख देशपांडे यांस हुकूम अर्जी वटनंबर १२५३ चा लिहितां त्यांनीं चौकशी करून रिपोर्ट त्याखालीं केला तो पाहाण्यांत येऊन त्या अर्जीखालीं मेहेरबान हंटसाहेब बहादूर असिस्टंट कलेक्टर जिल्हा पुणें यांस रिपोर्ट करितां त्यांचे रिपोर्टाखाली हुकूम असिस्टंट अर्जी नंबर १७० चा आला कीं, हल्लीं वाणी व शेटे वगैरे लोकांचे अर्जीखालीं हुकूम दिल्हा आहे त्या लिहिल्याप्रमाणें बंदोबस्त ठेवावा ह्मणून त्यांस वाणी व शेटे वगैरे लोक त्यांची, रिपोर्ट बरोबर इकडून गेली होती. त्याखाली हुकूम असिस्टंटचा नंबर १७१ चा आला कीं, कोणत्याही जातीचा माणूस हत्तीवर अगर उंटावर अगर घोड्यावर किंवा गाडींत वगैरे बसूनजाईल त्यास मनाइ नाहीं. यांत तुमच्या मालाचा किंवा घराचा अगर शरीराचा नाश होत असेल तर मात्र बंदोबस्त केला जाईल. परंतु हें होत नसून तुह्मीं जर हरकत कराल तर तुह्मांस शिक्षा दिली जाईल, ह्मणून वगैरे मजकुराचा आला त्यास तुमची वरात तुह्मीं रस्त्यांतून चालवावी. कोणी हरकत करणार नाहीं. सदरहू हुकूम वाणी, शेटे वगैरे यांजकडे पाठविला आहे, त्याप्रमाणें ते चालतील. कळावें तारीख ७ माहे सपटंबर सन १८४१ इसवी.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, किंवा शूद्र असो अगर यवन असो, परंतु रस्त्यानें जाणाऱ्या कोणत्याही जातीच्या मंगलकार्यांतील उत्सवास हरकत करावी असें कोण-

त्याही शास्त्रांत सांगितलें नसून आपआपसांतच पहा कशा खोडसाळी आहेत त्या! प्रसंगवशात् आणखी एक उदाहरण—३० सुमारें—३२ वर्षांपूर्वी विठ्ठल शिवराम शास्त्री तारळेकर यांनीं सोनार हे ब्राह्मण नाहींत अशाविषयीं "स्वर्णकारद्विजत्वखंडन" या नांवाचें एक ओतप्रोत निंदेनें भरलेलें पुस्तक छापून तयार केलें होतें. तें करण्याचें कारण—ठाणें जिल्ह्यांतील मोरबेगांवीं एका पंचाल दैवज्ञजातीय सोनाराला विवाहित स्त्रीचे ठायीं झालेले दोन पुत्र आणि दासीचेठायीं झालेला एक लेकावळा असे तीन मुलगे आहेत. त्यांचा बाप मरण पावल्यावर त्याची सर्व जिनगी जातिरिवाजाप्रमाणें व कायद्याप्रमाणें त्याचे विवाहित स्त्रीच्या दोनच पुत्रांस वांटून मिळाली. दासीचे मुलास मिळाली नाहीं. कारण कायदा असा आहे कीं, ब्राह्मण जाति असेल तर दासीचे मुलास जिनगीची वाटणी मिळत नाहीं. इतर जाति असेल तर मिळते. असो, सांगण्यास कारण त्या गांवांतील ऋषि ब्राह्मण लोकांनीं सदरहू दासीचे मुलास फूस देऊन सांगितलें कीं, सोनार हे ब्राह्मण नाहींत असा आह्मी शास्त्र पुरावा करवून देऊं; तूं जिनगीची वांटणी मिळण्याविषयीं सरकारांत वाद सांगण्यास उभा राहा. त्याजवरून द्रव्याच्या आशेनें तो, मला वांटणी मिळावी ह्मणून वाद सांगूं लागला. त्यावेळेस तेथील ऋषि ब्राह्मण लोकांनीं त्याचे पुराव्यास सदरहू तारळेकर शास्त्री यांचेकडून वरील 'स्वर्णकारद्विजत्वखंडन' नांवाचें पुस्तक करवून कोर्टांत दिलें. परंतु कोर्टानीं तें पुस्तक पाहून त्याजवर 'या पुस्तकांत शास्त्राधार निर्णय बिलकूल नसून केवळ कुटाळीचा व निंदास्पद मजकूर असल्यामुळें पुराव्यास ग्राह्य नाहीं, असा शेरा मारिला, आणि पंचाळ सोनार हे ब्राह्मण आहेत ह्मणून वादीचा ( दासीच्या मुलाचा ) अर्ज नाकबूल केला तो निकाल.

## कागद १३ वा.

नादार मुलकी नंबर ७२७

| | | |
|---|---|---|
| तिकिट आठ आणे | ८४८९ फी, नकल मिळणेबद्दल<br>८३ ८१८६<br>कागद ८८३<br>८४८९ | सन १८७५<br><br>क्लार्क आफ् कोर्ट.<br>ता० २० नोव्हेंबर सन १८७७ |

मेहेरबान स० स० जज्ज ठाणें यांचे कोर्टांत.

गणपत दशरथ शेट सोनार राहणार मौजे मोरबे हल्लीं वस्ती खरवली... ता० मानगांव........ } वादी.

लक्ष्मण दशरथशेट सोनार व रामशेट दशरथशेट मयत वारस बायको जानकीबाई राहणार मौजे मोरबें........ } प्रतिवादी.

*दावा रुपये ४९९९८१५८३

१ ही बातमी मुंबई ग्याझिटांत ( वर्तमानपत्रांत ) छापून प्रसिद्ध झाली आहे. * पांच हजार रुपयांत तीनच पै कमी करण्याचें कारण काय असावें ? कायद्यास मिळविण्याकरीतां असेल.

वादीकडून कागद दाखल केले ते.

१ सोनार हे ब्राह्मण नाहींत अशाबद्दल विठ्ठल शिवराम शास्त्री तारळेकर यांनीं सन् १८७६ सालांत 'स्वर्णकारद्विजत्वखंडन,' या नांवाचें बुक तयार केलें तें हजर केलें आहे.

१ माझ्याबद्दल मय्यत बापुशेट यानें माझी जन्मपत्रिका करविली ती जुने कागदपत्रांत होती. यापूर्वीं सांपडली नव्हती. हल्लीं सांपडल्यावर हजर केली आहे.

सदरहूप्रमाणें कागद दाखल करावे. ता० १० माहे नोवेंबर सन १८७७ई.

चिंतामण सदाशिव वझे वकील.

अर्जदार यांस जबाब—

जे दस्तऐवज तुम्हीं हजर केले आहेत ते मुद्दे निघाल्यावर व अर्ज तुमचे वकील कांहीं सामील झाल्यावर कोर्टासमोर ठेविले आहेत. पैकीं नवीन पुस्तक सन १८७६ सालचें तयार केलेलें दिसतें. व त्यांत ब्राह्मणांचा व सोनारांचा तंटा असल्याची गोष्ट दाखल केली असून मुद्दाम ह्या मुकद्दम्यासाठीं बनावल्यासारखें दिसत आहे. तुम्हीं जी पत्रिका जुने कागदावर लिहिलेली असें सांगून कोर्टासमोर आणिली आहे, ती जरूरीचा दस्तऐवज नसून पूर्वीं आणणें अवश्य होती. तसें तुम्हीं केलें नाहीं, व हजर करण्याचेंही कांहीं कारण चांगलेंसें दाखविलें नाहीं. व असे दस्तऐवज बनाव करणें फार दुर्लभ आहे. या सर्व गोष्टींवरून तुमचे हजर केलेले दस्तऐवज दाखल करीत नाहीं. व अर्ज नाकबूल केला. ता० १० माहे नोवेंबर सन१८७७ईसवी.

नक्कल करणार—नारायण अनंत उमेदवार. खरी नक्कल

रुजू पाहणार—आत्माराम चिंतामण. क्लार्क आफ् कोर्ट.

ही नक्कल मिळणेंविषयीं प्रतिवादीतर्फे मिस्तर सखाराम बापूशेट दांडेकर वकील यांनीं अर्ज नंबर १०८ सन १८७७ चा केल्यावरून वकील मजकूर यास दिली असे. ता० २० नोवेंबर सन १८७७

कोर्टाचा शिक्का. क्लार्क आफ् कोर्ट.

---

व्यवहारी ब्राह्मणांस प्रत्येक बाबतींत आपलें श्रेष्ठत्व असावें ही मोठी महत्वाकांक्षा असते म्हणून ते द्वेषबुद्धीनें विनाकारण तंटे करतात पहा—

मुंबई शहरीं सन १८७२ सालीं कांहीं दैवज्ञ ब्राह्मण ज्ञातीचे गृहस्थ स्वज्ञातीय उपाध्ये बरोबर घेऊन ठाकूरद्वार येथील मंदिरांत रुद्राभिषेक करीत होते. त्यावेळीं देवळाचे पुजारी व्यवहारी ब्राम्हणांनीं वगैरे जमून त्यांचे पुजेचा विध्वंस केला व दैवज्ञांना मारहाण केली. यावरून सदहू दैवज्ञ ब्राह्मणांनीं पोलीसांत फिर्याद केली, पण मॅजिस्ट्रेट साहेब यांना हिंदू जातींतले लोक एकमेकास देवळांत जाऊन पूजा करण्यास प्रतिबंध करितात हें ऐकून फार आश्चर्य वाटलें व त्यांनीं आरोपीच्या वकिलांस आपसांत समजूत करण्याची सल्ला दिली. त्यावरून तो तंटा मिटला व व्यवहारी ब्राम्हणांकडून शांततेचा भंग न करण्याबद्दल हातमुचलके लिहून घेतले ( ह्या खटल्याची हकीकत

ता० ८ व ता० १२-९-१८७३ च्या टाइम्स ऑफ इंडिया पत्रांत सविस्तर दिली आहे ).

असे कित्येक ठिकाणीं पंचाल ब्राह्मणांस देवळांत रुद्राभिषेक व पूजा करण्याविषयीं व्यवहारी ब्राह्मण तंटे करतात; परतु त्यांनीं कितीही जरी तंटे केले तरी सरकारांत न्याय पंचाल ब्राह्मणासच मिळतो. पहा—

IN HER MAGESTY'S HIGH--COURT OF JUDICATURE AT MADRAS No. 421 & 422 OF 1885.

The *Vishwa—Brahmin* community have right to enter, any. Hindoo--Shrine of *holy--temple*, and worship and make *Rudr abhishek* Madras High--Court [ criminal-ruling ] Vide, page. 152 calendar No. 78 of 1885.

भाषांतर—सन १८८५ सालीं मद्रास नामदार हायकोर्टानीं विश्वब्राह्मणांस ब्रम्हत्वाचा अधिकार असल्यामुळें त्यांना कोणत्याही देवळाचे आंतील पवित्र गाभाऱ्यांत जाऊन रुद्राभिषेक करण्यास हरकत नाहीं, असा ठराव केल्यावरून त्यास देवळांत अभिषेक करूं देतात. मद्रास नामदार हायकोर्टाचे १८८५ चें फौजदारी ठरावाचें ( क्रिमिनल रूलिंगचें ) पान १५२ वरील अनुक्रम नं. ७८ चा ठराव पहा.

That the *Second class Magistrate* of *Krishna District* passed Judgment on the 29th day of May 1894 in case No. 8 of that year that the members of the *Vishwabrahmin Community* might be allowed to perform the ceremony called *Abhishekam* which order was confirmed by District Magistrate on the 6th day of july 1894.

भाषांतर—कृष्णा डिस्ट्रिक्टाचे सेकंडक्लास असिस्टंट म्याजिस्ट्रेट यांनीं सन १८९४ चा फौजदारी खटला नंबर ८ यात ता. २९ माहे मे सन १८९४ रोजीं ठराव केला कीं, विश्वब्राम्हण लोकांस( देवळांत ) अभिषेक करूं द्यावा. हाच ठराव ता. ६ जुलै सन १८९४ रोजीं डिस्ट्रिक्ट म्याजिस्ट्रेट यांनीं कायम केला.

---

सुमारें ८५—८६ वर्षांपूर्वी पंचालांनीं वेदोक्त कर्म करूं नये म्हणून पंढरपूर, सातारा वगैरे ठिकाणीं त्यांच्याशीं ऋषिवंशीय लोक मोठमोठे भयंकर तंटे करीत असत आणि त्या तंट्यांचे न्याय साताराचे महाराजाकडेस गेले, म्हणजे महाराजांचे दरबारांत शास्त्री पंडित वगैरे न्यायकर्ते,त्याच तंटे करणाऱ्या नाना यो० ऋषिवंशज लोकांचे सोयरे धायरे ! मग त्या स्वपक्षाभिमानी असूयु नैयायिकांच्या शास्त्रार्थाची तारीफ काय विचारावयाची आहे? त्यांच्यापुढें वेदादि सर्वमान्य प्राचीन ग्रंथांची प्रमाणें जरी ठेविलीं, तथापि ती पाहण्याविषयीं अंधळेपणा, आणि पंचाल ब्राम्हणांच्या स्वधर्माची अथवा तंट्यांत दिलेल्या दुःखाची हकीगत ऐकण्याविषयीं बहिरेपणा धारण करून त्यांनीं आपल्या जातीच्या एकाद्या स्वमताभिमानी असूयु आचार्यांनीं रचलेल्या अर्वाचीन ग्रंथावरून आणि त्यांतही स्वकलंकाच्छादनार्थ स्वकपोल

१ पाराशर स्मृति जातिभेद विवेकसार इत्यादि ग्रंथांत घुसडाघुसड केली आहे हे प्रसिद्ध आहे.

कल्पित कित्येक मिसळलेल्या वाक्यांवरून मनःपूतं समाचरेत् हवीं तशीं (माहिष्येण- करण्यांतु, शूद्रांशयनमारोप्य, पंचैतेमहापातकी) अशीं संकर शूद्रजातीय शिल्पका- रासंबंधीं दूषित संमतें घेऊन, या निर्दोष विश्वकर्ममुखोद्भूत ब्रम्हपांचालावर नाना प्र- कारचीं दूषणें ठेवून त्यांना स्वधर्मापासून भ्रष्ट करण्याविषयीं प्रयत्न करीत असत. परंतु ही नाना ऋषिवंशीय लोकांच्या कपटाची कोटी छत्रपति महाराजांच्या दृष्टो- त्पत्तीस येऊन त्यांनीं " विश्वकर्मसंततीय ब्रम्हपंचालांस वेदादि प्राचीन ग्रंथाधारां- वरून ब्रम्हकर्म करण्याचा अधिकार असून ते पूर्वींपासून चालत आलेल्या वहिवाटी- प्रमाणें ब्रम्हकर्म करीत आहेत. त्यास कोणींही प्रतिबंध करूं नये, म्हणून निर्णयपत्र दिलें. त्या निर्णयपत्रावरून सातारा व क्षेत्र पंढरपूर येथील दूषक लोकांस ताकीद दिली तें पत्र—

## कागद १४ वा.

पत्र १००८४ सही ग्रांटसाहेबांची.




राजश्री रंगूनरसिंह मामलेदार पेटा पंढरपूर.

आपल्या स्वकर्माविषयीं सोनार व्यंकाजी नाइक अरणगांवकर व सोनार भट्टजी वगैरे पंढरपूर—वेदार्थ हुजूर निर्णयपत्र महाराजांची आज्ञा—सोनार कानडे पांचाल विश्वकर्मसंततीय यांसीं ब्रह्मकर्म करण्याची अर्हता[1] आहे. त्यांस कोणी दूषण ठेव- ण्यास गरज नाहीं. आपले सत्य स्मरून दूषण ठेविल्यास वतनास जप्ति केली जाईल जाणिजे चंद्र १५ जमादिलावल सुरुसन अशरीन मयातैन व अलफ. मुरजत ता० १ मार्च सन १८२० ईसवी.

मोर्तबसुद्धांहस्ताक्षर बाळाराव चिटणीस.

**साक्षी.**

**१ पत्राप्रमाणें साक्षि काकापंडित.**
**२ पत्राप्रमाणें साक्षि गोपाळशास्त्री.**
**३ पत्राप्रमाणें साक्षि बळवंतरावमोहिते.**
**४ पत्राप्रमाणें साक्षि बापूसाहेब शिरके.**
**५ पत्राप्रमाणें साक्षि बाळासाहेब कितुरकर.**

यांचे अस्सल पत्र शाहूमहाराज यांचे दप्तरीं आहे.

---

१ अधिकार.

Besides the above, by the judgment passed by the *law Courts* against the *Calandar numbers* quated, and by the decisions passed by eminent Learned pandits of different places, the public come to understand that we are the true *Brahmins.*

| Serial No. | Particulars. |
|---|---|
| 1. | Judgment passed by the *High Court* of judicatare *Madras* in 1840. |
| 2. | Judgment passed by the *Salem Court* in C. C. No. 1862, in the year 1840 *No.* 108 of 1844 and *No.* 4 of 1846. |
| 3. | Judgment passed by the *Trichinopally Court* in 1856. |
| 4. | Judgment passed by the *Adalat Court Salem* in calendar case *No.* 141 of 1857. |
| 5. | Judgment passed by the *Adalat Court Salem* on the 2 *nd December* 1861. |
| 6. | Judgment passed by the *High Court* of judicatare *Madras* in the year 1861. |
| 7. | Judgment passed by the District *Munsif Guntur* in C. C. *No* 588 of 1866. |
| 8. | Judgment passed by the District *Munsif Bezwada* in C C. *No.* 220 of 1866. |
| 9 | Proceedings No. 1993, Dated 30th Novembar 1866, sent by the *Government Chief Secretary Madras* to the General. Department. |
| 10. | Order No. 1935 dated 13th Decembar 1869 sent to the *Dist. Magistrate* of *Krishna* by the *Inspector General* of *Police.* |
| 11. | Endorsement passed by Mr. M. *Abdul kadar Saheb,* Deputy Commissoner of *Chittaldrug* on petition No. 74 dated 8-3-1881 presented by one Valaji Muraga charya. |
| 12. | Judgment passed by the *Sessions Judge.* M*ysore* Mr. *Thambu Chettiyar* in C. C. No. 5 of 1882 and confirmed by Mr. *Plumer.* |
| 13. | Procidings passed by Mr. *Turner* the District M*agistrate* of *Vijagapatan* in his calendar case No. 78 of 1885. |
| 14. | Judgment passed by the Sessione judge of M*ysore* Mr. S. *Hemajirao* in No. 4 Dated 12 August 1889. |
| 15. | Procedings passed by Hugheo Esquire *Assist:,* M*agistrate Krishna* D*istrict* in his calendar case No. 8 of 1894. |
| *16.* | judgment passed by Mr. *J. N. Atkinson* Dist: Magistrate of *Krishna* in C. C. No. 521 of 1894. |
| 17. | Proceedings passed by *Roson* Esquir: Acting Dist Magistrate in the year 1894. |
| 18. | Procedings sent by *J. N.-Atkinson* Esqr. to the *Police* in 1894. |
| 19. | Report sent by the police to the D*istrict* M*agistrate Kistna* in the year 1894. |

20. Proceeding passed by the *Collector* of *Ganjam* in the year 1901.

## भाषांतर.

या निवाड्याखेरीज आणखी खाली दिलेले न्यायाचे कोर्टांतील ठरावावरून व निरनिराळ्या ठिकाणचे प्रसिद्ध व विद्वान पंडितांनीं दिलेल्या निकालावरून लोकांची अशी खात्री होईल कीं, आम्ही ब्राह्मण आहों.

| क्र. नं. | तपशील. |
|---|---|
| १. | सन १८४० सालीं मद्रास हायकोर्टांनीं केलेला ठराव. |
| २. | सालम कोर्टांनीं सन १८४० सालीं मुकदमा नंबर १८६२ यांत व मुकदमा नंबर १०८ सन १८४४ यांत व मुकदमा नंबर ४ यांत केलेले ठराव. |
| ३. | त्रिचनापल्ली कोर्टांनीं सन १८५६ सालीं केलेला ठराव. |
| ४. | अदालत कोर्ट सालम यांनीं मुकदमा नंबर १४१ सन १८५७ यांत केलेला ठराव. |
| ५. | सालम कोर्टांनीं ता० २ दिसेंबर १८६१ सालीं केलेला ठराव. |
| ६. | मद्रास हायकोर्टांनीं सन १८६१ सालीं केलेला ठराव. |
| ७. | डिस्ट्रिक्ट मुनसफ गंतूर यांनीं मुकदमा नं० ५८१ सन १८६६ सालीं केलेला ठराव. |
| ८. | डिस्ट्रिक्ट मुनसफ बेझवाडा यांनीं मुकदमा नं० २२० सन १८६६ यांत केलेला ठराव. |
| ९. | गव्हर्नमेंट चीफ सेक्रेटरी मद्रास यांनीं जनरल डिपार्टमेंट यांजकडे पाठविलेला ठराव नं० १९९३ ता० ३० नोवेंबर १८६६. |
| १०. | पोलिस इन्स्पेक्टर जनरल यांनीं डिस्टिक्ट म्याजिस्ट्रेट कृष्णा यांजकडे पाठविलेला हुकूम नं० १९३५ ता. १३ दिसेंबर १८६९. |
| ११. | बालाजी मृगाचार्य यांनीं ता. ८ मार्च सन १८८१ रोजीं केलेला अर्ज नं. ७४ याजवर चित्तलदुर्गचे डेप्युटी कमिशनर मि. एम. अबदुल कादरसाहेब यांनीं केलेला ठराव. |
| १२. | म्हैसूरचे सेशन जज्ज मि. थंबु चेटियार यांजकडील खटला नं० ९ सन १८८२ यांतील ठराव. सदर्हू ठराव मि. प्लमरसाहेब यांनीं कायम केला आहे. |
| १३. | विजागापट्टणचे डिस्त्रिक्ट माजिस्त्रेट मि. टर्नर यांनीं खटला नं. ७८ सन १८८५ यांत केलेला ठराव. |
| १४. | म्हैसूरचे सेशन जज्ज मि. एस् हेमाजीराव यांनीं ख० नं ४ ता. १२ आगष्ट १८८९ यांत केलेला ठराव. |
| १५. | मेहेरबान ह्यूगेस साहेब कृष्णा डिस्ट्रिक्टचे असिस्टंट मॅजिस्त्रेट यांनीं खटला नं. ८ सन १८९४ यांत केलेला ठराव. |

१६. मेहेरबान जे. एन्. अटकिनसन् डिस्त्रिक्ट माजिस्त्रेट कृष्णा यांनीं खटला नं. ५२१ सन १८९४ यांत केलेला ठराव.

१७. मेहेरबान रोसन साहेब अक्टिंग डिस्त्रिक्ट मॅजिस्त्रेट यांनीं सन १८९४ सालीं केलेला ठराव.

१८. मेहेरबान जे. एन्. अटकिनसन साहेब यांनीं सन १८९४ सालीं पोलीसकडे पाठविलेले ठराव.

१९. डिस्त्रिक्ट मॅजिस्त्रेट कृष्णा यांजकडे सन १८९४ सालीं पोलिसांनीं पाठविलेला रिपोर्ट.

२०. गंजमचे कलेक्टर साहेब यांनीं सन १९०१ सालीं केलेला ठराव.

---

आतां विश्वकर्म संततीय पंचाल ब्राह्मणांचा केवळ सोनार काम करण्याचाच धंदा आहे असें नाहीं. वैदिक, शास्त्री, भट्ट, पुराणिक, हरदास, ज्योतिषी, वैद्य, सुवर्णादि धातूंच्या देवमूर्ति, देवोपकरणीं, देवालयें, मंदिरें, इनामदार, खोत, जव्हेरी, हिरेमाणकें, पच्चीकाम, व्यापार, कंट्राक्टर, कारकून, भांडारी ( ट्रेझरर ) इत्यादि धंदे आहेत. परंतु सोनार कामाच्या धंद्यावरून सोनार हें उपनाम पडल्यामुळें खानेसुमारीचे गणती करणारे खानेसुमारीच्या तक्त्यांत जात या सदराखालीं सोनार असें घालीत असत. परंतु पंचाल ब्राह्मणांचा सोनार कामाचा धंदा आहे. सोनार हें जातींचें नांव नाहीं असें सरकारच्या स्पष्ट लक्ष्यांत आल्यावरून सरकारांनीं विश्वकर्म संततीय पंचालास ब्राह्मणवर्गांत घालावें असे ठिकठिकाणीं हुकूम सोडले आहेत पहा—

That according to the Census taken in the year 1891. It was familly decided after hot discussions by the *District collector* of *Ganjam* that these men should be entored as *Vishwabrahmans* in the *census returns* as per order No. 88, dated the 4 th day of February 1891, vide page 280 vol xlll. of census Report of 1891.

**भाषांतर**—सन १८९१ सालीं जी खानेसुमारी झालीं त्यांत गंजम येथील डिस्त्रिक्ट कलेक्टर यांनीं पुष्कळ वादविवादाअंतीं असें ठरविलें कीं, ( सेन्सस रिटर्न मध्यें ) खानेसुमारीच्या तक्त्यामध्यें ( पंचाल ) लोकांना " विश्वब्राम्हण " म्हणून घालावें, सन १९०१ चा खानेसुमारीच्या रिपोर्टाचा १३ वा व्हाल्यूमांतील पान २८० वरील ता. ४ फेब्रुवारी १८९१ चा ८८ नंबरचा हुकूम पहा.

In dated 27 January 1891 the *census Suprintendent* of *Mysore* order to enter the Nemes of panchalas as *Vishwabrahmin*. order No. 117.

**भाषांतर**—ता. १७ जानेवारी १८९१ रोजीं मेहेरबान सेन्सस सुपरिंटेंडेंट म्हैसूर यांनीं पंचालास विश्वब्राह्मण म्हणून घालावें असा हुकूम केला आहे. **हुकूम नंबर ११७.**

Mr. Drew Suprintendent of the census Department *Bombafi.* has ordered that the Daivadnya—Panchalas should write as

*Brahmins* in the *census returns* aunder the tittle of caste, and *Daivabnya* ender the tittle of other distinctions of the caste the Daivadnyas are report according to the census of 1891, in the *Brahman class.*

**भाषांतर**—खानेसुमारीचे मुख्य डयू प्राव्हिन्स सुपरिंटेंडेंट साहेब बहादूर मुंबई यांनीं असें ठरविलें आहे कीं, दैवज्ञ पंचालांनीं आपल्या ज्ञातीचें नांव खानेसुमारीच्या पत्रकांत " ज्ञात " या सदराखालीं लिहितांना " ब्राह्मण " असे लिहावे व ज्ञातीचे पोटभेद या सदराखालीं " दैवज्ञ " असें घालावें आणि त्याप्रमाणें इ० स० १८९१ चा खानेसुमारीच्या रिपोर्टांत दैवज्ञांस ब्राम्हणवर्गांत घातलें आहे.

Mr. *W. Francis*, Esqr: I. C. S. Suprintendent of the census Department Madras; has given orderes to the *collectors* and Dt: Magistrates of *Kistna* and Ganjam to enter thair names under the title of *Vishvabrahmin* order No: 99 P, T; of 1901;

**भाषांतर**—खानेसुमारीचे मुख्य मेहेरबान डब्ल्यु फ्रान्सिस आय. सी. एस. सुपरिंटेंडेंट साहेब बहादूर मद्रास, यांनीं पंचालांस " विश्वब्राम्हण " या सदराखालीं नोंदावें असा हुकूम कृष्णा जिल्हा व गंजम जिल्हा येथील कलेक्टर व म्याजिस्ट्रेट यांस कळविलेला आहे. १९०१ चा पी. टी. हुकूम नं ९९.

In the District No. 279 dated the 17 th day of February 1901. The Collector of Ganjam order to enter the names of panchalas as *Vishvabrahmin* and the *collector* of *Kistna District* the same.

**भाषांतर**—गंजमचे कलेक्टर यांनीं ( पंचाल लोकांस ) खानेसुमारीच्या पत्रकांत विश्वब्राम्हण म्हणून नोंदावें असा हुकूम केला आहे. डि. नं. २७९ ता. १७ फेब्रुवारी १९०१ चा हुकूम पहा आणि त्याचप्रमाणें कृष्णा डि० कलेक्टर यांनींही असेच हुकूम सोडले आहेत.

In *1901* the *census* Suprintendent of *Benglore* and *Mysore* passed the same order.

**भाषांतर**—सन १९०१ सालीं बंगलोर व म्हैसूर येथील खानेसुमारीचे सुपरिंटेंडेंट यांनींही असाच हुकूम सोडला आहे.

या वरील सर्व सरकारमार्फत झालेल्या निवाड्यांवरून उघड आहे कीं पंचाल ब्राह्मण ज्ञातींतील अज्ञसुज्ञ मनुष्यांची प्रत्येकी आपली इच्छा सामान्यतः शास्त्रविरुद्ध नाहीं; कारण पंचाल ब्राह्मणांत सर्व कालीं सर्व देशांत स्वधर्मनिष्ठ सिद्ध, शास्त्री, वैदिक वगैरे प्रसिद्ध पुरुष आहेत. पहा—

रा ज्याधिमनोविराजित[1]—या ग्रंथांत लिहिलें आहे, जैनांचें प्राबल्य होतें त्याकालीं जैनपंडित विश्वब्राह्मणांची निंदा करूं लागले, परंतु विश्वब्राह्मण मोठें तपस्वी, योगसिद्ध कर्मनिष्ठ सूर्यासारखें असल्यामुळें त्या निंदा करणाऱ्या पंडितांच्या जिव्हेंत किडे पडले. त्यामुळें त्यांना बोलतां येईना व जेवतां येईना, फारच पीडा झाली तेव्हां ते विश्वब्राह्मणाला शरण आले. विश्वब्राह्मण तपोनिष्ठ असल्यामुळें त्यांची कृपा होतांच कीटकां-

---

१ हा ग्रंथ तैलंग देशांत छापला आहे. ही माहिती वे० गोविंद विश्वनाथ भटजी रा. सोलापूर यांनीं पाठविली

ची पीडा दूर झाली. त्यानंतर हें विश्वब्राह्मणांचें सामर्थ्य जैनराजास समजल्यावर राजानें प्रार्थना केली, महाराज माझी हिमाचल पर्वत पहाण्याची इच्छा आहे तरी आपण घेऊन चलावें. अशी प्रार्थना केल्यावर विश्वब्राह्मण, राजास हिमाचल पर्वतावर घेऊन गेले. परंतु हिमाचल पर्वतावर योगासिद्ध लोकांखेरीज इतरास जाणें कठीण असल्यामुळें राजास थंडीमुळें फारच पीडा होऊं लागली. मग विश्वब्राह्मणांनीं राजास बद्रिकेदार व बद्रिनारायण यांचें प्रत्यक्ष दर्शन करविलें. त्यानंतर राजास फारच आनंद होऊन त्याची पीडा दूर झाली, इत्यादि वर्णन आहे.

विश्वकर्म पुराण—या ग्रंथांत अहभून ऋषि गोत्रोत्पन्न श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य योगींद्र कालहस्तिमुनि यांनीं काशी येथें सुव्रतराजास विश्वकर्म्यानें प्रजा कशी निर्माण केली, स्वर्गलोक, मृत्युलोक, पाताळलोक यांची रचना इत्यादि विश्वकर्म शास्त्र उपदेशिलें आहे यांची परंपरा संग्रह २ रा यांत दिली आहे. संग्रह दुसरा पृष्ठ५४पहा.

विश्वकर्म महात्म्य—बालाकि नामक ऋषीनें आपल्या शिष्यास सांगितलें आहे.

भक्तिकथामृत—हा ग्रंथ नरहरिवंशस्थ धुंडीसुत मालू यांनीं केला आहे. व यांत पूर्व उत्तर मिळून १४ पिढ्यांसहित नरहरिचरित्र आहे. नरहरीनें भक्तिकथासार व अभंग आणि मालूनें नवनाथभक्तिकथासार इत्यादि ग्रंथ केले आहेत.

दानलिंगचरित्र—या ग्रंथांत दानलिंग स्वामींनीं ज्ञानेश्वर महाराजाप्रमाणें भिंत चालविली, व्याघ्रापासून वेद बोलविले, प्रेतें उठविलीं वगैरे अनेक कथा आहेत यांची समाधि उमळवाड इ० कोल्हापूर येथें आहे.

गोपाळनाथ चरित्र—यांत त्रिपुटीचे गोपाळनाथ यांचे गुरु रंगनाथ स्वामी यांची समाधि बाभुळगांव येथें आहे. त्यांनीं केलेले चमत्कार वर्णिले आहे रसाळ कथा आहेत.

श्री मत्परमहंस परिव्राजक तुकाब्रह्मानंद सरस्वती—हे विद्वान् योगी साताराचे राहणार शिवाजी महाराजांचे कारकीर्दींत होते. यांचे हातून सुवर्ण रत्नांचे अलंकार श्रीजगदंबेनें मूर्तींतून प्रगट होऊन आपले हातानें घातले आहेत. असें यांनीं जगदंबेच्या केलेल्या स्तोत्रावरून समजतें. यांनीं शांकर भाष्यटीका, प्रणवाष्टकटीका वगैरे बहुत ग्रंथ केले आहेत. यांची समाधी माहुली येथें कृष्णावेण्या संगमीं आहे.

याशिवाय आणखी बाळकृष्णबुवा, बावा वैरागकर, चैतन्यस्वामी, नागलिंगस्वामी, विरूपाक्षशास्त्री, अशेषाचार्यशास्त्री, त्रिवेंगडाचार्यशास्त्री, पंडितमार्ग सहाचार्य, विश्रामभट्ट, बाळकृष्णभट्ट, गोपाळभट्ट, कीर्तियप्पाहल्याळ इत्यादि प्रसिद्ध पुरुष होऊन गेले आहेत. आतां विद्यमान प्रसिद्धपुरुष, परमहंस परिव्राजक नीलकंठस्वामी, परिव्राजक नीरांजनाचार्य, परिव्राजक चन्नवीराचार्य स्वामी, परिव्राजक व्यंकटाचार्य, परि० विपूरिव्यंकट स्वामी, परि० कोटेंद्राचार्य. पापय्यशास्त्री दीक्षित अग्निहोत्री, ब्रह्मश्री सांबशिवाचार्यशास्त्री, सुब्रह्मण्यशास्त्री, रामशास्त्री, लक्ष्मीकांत श्रौती, वीरेशावधानी, ब्रह्मश्री भट्टाचार्य पार्थसारथि आचार्य, ज्योतिर्विद नारायणभट्ट धर्माधिकारी, पंडित वेलायुधाचार्य, अंदिसुंदराचार्य बी. ए. बी. एल्., सुब्रह्मण्याचार्य बी. ए. एल्. टी., सुंदरराम एम्. डी.

१-२ हे नरहरिचरित्र आणि प्रणवाष्टक आम्ही छापले आहे.

मल्लिकार्जुनाचार्य बी.ए., मार्गसहाचार्य बी. ए., इत्यादि अनेक आहेत. परंतु विस्तार-भयास्तव सर्व माहिती संक्षेपांत दिली आहे.

---

आर्षेयब्राह्मण पौरुषेयब्राह्मण संवाद. या नांवाचें पुस्तक तैलंगदेशांत छापले आहे. यांत आर्षेय ऋषि ब्राह्मण आणि पौरुषेय विश्वब्राह्मण यांचा विवाद होऊन शेवटीं विश्वब्रह्मसंततीस गर्भींच असता ब्राह्मणत्व निश्चयानें आहे असा सिद्धांत झाला आहे.

---

मुख्यवर्ण वाचक ब्राह्मणत्व विश्वकर्मसंततीसच आहे; ह्मणून जगप्रसिद्ध महासाधु तुकारामबुवांनीं पंचाल ब्राह्मण ज्ञातीच्या वर्णनाचे पुष्कळ अभंग केले आहेत त्यांपैकीं वेंचे.

---

अभंग ॥ १ ॥

ऋषीचेंहीमूळ पाहोनियाजळ ॥ डोहो तो केवळ रोहिणीचा ॥ १ ॥
त्यानीं पुण्य केलें ब्रह्म स्थापियेलें ॥ कलियुगीं केलें मान्य त्यांशीं ॥ २ ॥
आपुला स्वधर्म त्यांनीं सोडियेला ॥ देवाहो गुरूला निंदिताती ॥ ३ ॥
देव तोचि जाणा मस्तकीं घेतला ॥ त्या पंचमुखाला नेणवती ॥ ४ ॥
ह्मणूनि मळीन ब्राम्हण ते झाले ॥ सुमार्ग सोडिले कर्महीनीं ॥ ५ ॥
पंचाल यातीतें विसरोनि गेले ॥ मळीन हे केले कली ठायीं ॥ ६ ॥
पांची पांचजण तेची पंचमुखें ॥ आपुलालें सुख भोगिताती ॥ ७ ॥
तुका ह्मणे नव्हे निंदाकर्म त्यांसी ॥ वंद्य हो सर्वांशीं पंचमुखें ॥ ८ ॥

अभंग ॥ २ ॥

विश्वाचा जो कर्ता विश्वाचें हें कर्म ॥ आहे तेंचि वर्म निराळें हो ॥ १ ॥
पांची जणीं त्याचें कर्तव्य दाविलें ॥ विसरोनी गेले मूळबीजा ॥ २ ॥
कर्मब्रह्में अवघा अष्टाकार केला ॥ ह्मणोन पावला मळीनत्व ॥ ३ ॥
आपुल्या पूर्वजा विसरोनी गेले ॥ कलियुगींचे केले वंद्य विप्र ॥ ४ ॥
विश्वाचिये मुखीं आहे विश्वकर्ता ॥ तोचि खेळविता सूत्र दोरी ॥ ५ ॥
सूत्रदोरी केली आदिशक्ति उभी ॥ तीनें जग शोभी आणीयेलें ॥ ६ ॥
पंचवेदातीत पांच हे ब्राह्मण ॥ करा त्याचें स्मरण नित्य घोषें ॥ ७ ॥
तयांपासोनिया झाला ब्रह्मदेव ॥ सूक्ष्मवेद पाहा गुप्त झाला ॥ ८ ॥
धन्य विश्वकर्मा धन्य त्याची भक्ति ॥ वेढावले मुनी हरिहर ॥ ९ ॥
पंचवेद तैशी पंचाळाची याती ॥ मूढ ते नेणती तयांलागी ॥ १० ॥
तुका ह्मणे धन्य विश्वकर्मा गुरू ॥ उतरील पारू भवसिंधू ॥ ११ ॥

इत्यादि अनेक अभंग आहेत, परंतु ग्रंथाचा विस्तार फार होईल ह्मणून घेतले नाहींत. असो.

---

१ तुकारामबुवाविषयीं मोरोपंत ह्मणतात--स्वात्मानुभव पद्य ता तुकया केवळ सखाचि जनकाचा ॥ वैराग्यें डोलविला माथा जेंणे मुनींद्र सनकाचा ॥ १ ॥ वामनपंडित ह्मणतात-जयाची वदे पूर्ण वेदांत वाणी॥ह्मणावे कसेहो तयालागी वाणी॥परब्रह्मरूपी असा जो तुकावा ॥ तयाचे तुकी कोण ऐसा तुकावा।

वरील सर्व प्रकरणावरून सर्व लोकांच्या स्पष्ट लक्ष्यांत येईल कीं, अनादि प्राचीन कालापासून पंचाल ब्राह्मणांचा वेदोक्त धर्मपरंपरा प्राप्त चालू आहे. कारण या वेदोक्त धर्मरक्षणाकरितां श्री भगवंतानीं परमसुखस्थान असें आपलें दिव्य वैकुंठ सोडून या मृत्युलोकीं पशुयोनींत सुद्धां अवतार घेऊन ज्या वेदोक्त धर्माचें रक्षण केलें आहे त्या धर्माचे बाबतींत धर्मशास्त्र न पाहतां असूयाभिमानी लोकानीं दुसऱ्याचें महत्व आणि वृत्ति हरण करण्याच्या हेतूनें पंचाल ब्राह्मणांशीं कितीही जरी तंटे बखेडे केले तथापि ( **नदूष्यंतेमहात्मानोदुर्जनानांकटूक्तिभिः ॥ काकमुखाशुचिक्षेपैर्हीरःकिंमलिनोभवेत् ॥ १ ॥ अर्थ**—दुर्जनांच्या निंदास्पद भाषणांनीं महान् कुलीन लोक दूषित होत नाहींत. यास दृष्टांत कावळ्यानें आपल्या कृष्णवर्ण चोंचीनें हिरा शतशःवळा दंशित केला म्हणून तो मलिन होईल काय? कधींही होणार नाहीं. ) या वचना प्रमाणें, न्यायांतीं पंचाल ब्राह्मणांचें ब्राह्मण्य सिद्ध होतें उलट तंटे करणाराची द्वेषबुद्धि मात्र दिसून येते. ह्मणून विनाकारण आपसा आपसात कलह न वाढवितां सर्वांनीं परस्पर प्रेमबुद्धीनें असावें हें उत्तम आहे.

संग्रह ४ था समाप्त.

---

**पद विश्वकर्म याचें.**

**मंगल तनु पंचवदन विश्वकर्मया ॥ सुखकरणा, भय हरणा, भवतरणा शुद्ध चिन्मया ॥ धृ० ॥ मंदस्मित पंचवदन सत्वमंदिरा ॥ चरणकमलसेवितातिभारतींदिरा ॥ पंचमुकुटकुंडलमणिखचित चंदिरा ॥ त्राही, पाही, राही ममत्हृदयामधिं सदया करिउदया निर्मलाद्वया ॥ मंगलतनु पंचवदन० ॥ १ ॥ सायुधतवहस्तदहाशोभतीतुसी ॥ चमकतातिकीर्तिमुखेंकंकणकशी ॥ करुणाकर-दीनसखेराक्षिगामासि ॥ तारी, तारी, दरदुरिता, भवसरिता, मजकरितां करुनियांदया ॥ मंगलतनु पंचवदन० ॥ २ ॥ विमलांगीं चर्चियेलें धवलचंदना ॥ रत्नखचितछत्रशिरींपंचनंदना ॥ करितीतवसुरवरमुनिपादवंदना ॥यावें,धांवे, पावे, सुखकंदा निज शंदा स्वानंदा मंगलोदया ॥ मंगलत० ॥ ३ ॥ रत्नान्वित मुक्ताफलगुंफितोत्पला ॥ तारापरिहारावलि झळकतीगळां ॥ कटिंकशिलाताडिदंबरदिव्यपींवळा ॥ ध्याऊं गाऊं होऊं तवचरणा विमलगुणातुजशरणागतनिरामया॥ मंगलतनु०॥ ४ ॥ तववंशींजन्मुनिमी विसरलोंतुला॥ बापमायतारकतूं भक्तवत्सला ॥ रावात्मज नारायणसिद्धजाहला ॥ भजनीं, पुजनीं, स्मरणीं, रतिकरुनी, दृढधरुनी, पदतरणीं, भवतरावया ॥ मंगलतनु-पंचवदन० ॥ ५ ॥**

**समाप्त.**

---

# शोधपत्र.

## संग्रह १ ला.

| अशुद्ध — शुद्ध | पृ.ओ |
|---|---|
| अणोरेणियात्—अणोरणीयान् | ८ |
| विश्वब्रह्माख्य—विश्वब्रह्माख्य | ९,२० |
| मन्त्रांतरं—मंत्रातरं | १०,१२ |
| प्रजानति निर्विश्व—प्रजापतिर्विश्व | १०,२० |
| मान्पुवंती—माप्रुवंती | १०,२६ |
| अस्तिन्-आस्मिन् | १३,१२ |
| प्रतिष्ठापान प्रतिष्ठापन | १५,१९ |
| विधीर्न—विधीनें | १५,१८ |
| ब्राह्मण—ब्राह्मण | १६,९ |
| होतोपंचाल—होतोझणून पंचाल | १६,१० |
| शाकटायण—शाकटायन | १६,१९ |
| चामसिनायण—चामसिनायन | १६,२० |
| मागवत—भागवत | १८,१ |
| शूभ—शुभ | १९,२९ |
| महाभग—महाभाग | २०,१५ |
| आयधे—आयुधे | २२,२८ |
| अश्विन्यादि—अश्विन्यादि | २४,३३ |
| मंडपे—मंडपं | २५,१० |
| जनन—जननं | २७,५ |
| आणि कुला—आणि ज्या कुला | २९,११ |
| पुसां—पुंसां | ३१,४ |
| शकरा—शंकरा | ३१,३२ |
| नुष्टभः—नुष्टुभः | ३२,४ |
| उश्चैर्वाजि - उच्चैर्वाजि | ३२,६ |
| सर्वाः—सर्वाः | ३२,६ |
| नमृते—ममृतें | ३२,९ |
| वृत्रहो—वृत्रहा | ३२,११ |
| विश्वकममाह—विश्वकर्ममाहा | ३२'१८ |
| त्रैष्टभ—त्रैष्टुभ | ३५,२ |
| अमीब्रवअबत्रप्त—अमीवरअवतप्त | ३६,३२ |
| अग्मिपुराण—अग्निपुराण | ३८,१० |
| इष्ठका—इष्टका | ३८,१० |
| मक्तियो—भक्तियो | ३८,२५ |
| व्हदये—हृदये | ३९,४४ |
| तेद्विस्तरेण—तद्विस्तरेण | ४०,१९ |
| विश्वकर्म—विश्वकर्म | ४०,२४ |
| वाजपया—वाजपेया | ४४,२३ |
| करण—कारण | ४७,१५ |
| शिल्पा पा—शिलपापा | ४७,३६ |
| क्षिल्पी—शिल्पी | ४९,१३ |
| गौतभादि—गौतमादि | ५०,६ |
| क्षिल्पं—शिल्पं | ५२,३ |
| नैःध्रुवे—नैध्रुवे | ५२,७ |

| अशुद्ध — शुद्ध | पृ.ओ. |
|---|---|
| भगु—भृगु | ५२,३२ |
| विश्वकर्य—विश्वकर्म | ५५,३३ |
| गहादि—गृहादि | ५५,३३ |
| क्षिल्प—शिल्प | ५९,३२ |
| पत्नीवनग्ने—पत्नीवनभे | ६०,३३ |
| शांतितः—शातितः | ६५,३१ |
| सन—सन् | ६५,३३ |
| माराध्ये—मारोप्य | ६७,३२ |
| नापक—नामक | ६७,३६ |
| परच—परंच | ७४,१ |
| प्रष्टि—प्रष्टि | ७६,२४ |
| हरेतू—हरत् | ७६,२८ |
| बुवन्—ब्रुवन् | ७७,१३ |
| वृहन्नथं—वृत्रहन्नथं | ७७,१४ |
| पसूत—प्रसूत | ७७,२० |
| वामुज्ज—वाजमुज्ज | ७७,२० |
| जपेतू—जपेत् | ७७,३४ |
| अथ र्वणदेवी—अथर्वणवेदी | ७७,२४ |
| अशौच आज्ञा—आज्ञा | ७७,३३ |
| स्वरसू—स्वरम् | ७८,१६ |
| जातवेर—जातवेर्द | ७८,२४ |
| रुद्रयामलोक—रुद्रयामलोक्त | ७९,३ |
| मूत्तिकेची—मृत्तिकेची | ७९,३३ |
| ब्रह्मणाला—ब्राह्मणाला | ७९,१५ |
| महराष्ट्र—महाराष्ट्र | ७९,३० |
| वन्स्विर्णादि—वन्हिस्वर्णादि | ८२,८४ |
| स्वर्णकरादे—स्वर्णकारादि | ८२,२६ |
| ब्राह्मण—ब्राह्मण | ८३,३३ |
| भरद्दाज—भरद्वाज | ८३,३६ |
| नीवंश--निवशं | ८३,२२ |
| सभ्घाः—सभ्याः | ८४,३२ |
| बह्मकर्मे—ब्रह्मकर्मे | ८५,२१ |
| वागीश्वरी—वागीश्वरी ॥ | ८५,२४ |
| तिश्वकर्म—विश्वकर्म | ८५,२६ |
| संशिता—संज्ञिता | ८५,३४ |
| प्रश्य—प्राश्य | ८६,४ |
| शुभ्र—शुभ | ८६,१५ |
| ब्रह्मणाचा—ब्राह्मणांची | ८६,२७ |
| बृहसंहिता—बृहत्संहिता | ८६,२५ |
| विशेषता—विशेषतो | ८६,२६ |
| देवत—दैवत | ८७,४ |
| सुर्यच—सूर्यंच | ८८,५ |
| पतिश्चच्छंदा—पतिच्छंदा | ८८,१८ |
| सगितल्यावर—सांगितल्यावर | ८८,२६ |

